KÂVYASANGRAHA. 41.

# THE RÂMÂYANÂS

OF

# MOROPANTA

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

## PART V.

Containing 32 Râmâyaṇâs

( 43-74 ).

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂG

Bombay

19

काव्यसंग्रह. ४१.



महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# रामायणें.

## भाग पांचवा.

४३–७४.

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे
मालक तुकाराम जावजी यांनीं छापून
प्रसिद्ध केला.

१९०३.

किंमत २। रुपये.

..ल्या चार भागांत मिळून एकंदर ४२ रामायणें प्रसिद्ध झालीं आहेत. या ..त रामायणांची संख्या ७४ पर्यंत येऊन पोंचली आहे. हीं सर्व रामायणें पूर्वी संग्रह' आणि 'काव्येतिहाससंग्रह' यांत एकवार प्रसिद्ध झालीं आहेत. 'सर्वसंग्रहांत ..घाटीरामायण' म्हणून एक प्रकरण रामायणांत गणिलें गेल्यामुळें उपलब्ध रामाय..ची संख्या ७५ समजली गेली होती. पण तें रामायण नसून 'अश्वघाटीदशक' या ..नें काव्यसंग्रहांत पूर्वींच प्रसिद्ध झालें आहे. (मोरोपंती स्फुटकाव्यें—भा० १ ३६४ व अंक ११० च्या मलपृष्ठावरील लेख पहा.) याप्रमाणें उपलब्ध रामाय..ची संख्या ७४ ठरली गेली होती, पण रा० रा० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. ..नीं पंतांच्या व पंतांशीं संबंध असणाऱ्या घराण्यांतील उपलब्ध होणाऱ्या कागद..चें संशोधन करून पंतांच्या रामायणांसंबधानें ४।२।०२ आणि १७।६।०२ या ..ख्यांच्या केसरीमध्यें दोन महत्त्वाचीं पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत, त्यामुळें या संख्ये.. पुनः विचार करण्याचें कारण प्राप्त झालें आहे.

..या रामायणांच्या संबंधानें तीन गोष्टी विचार करण्यासारख्या आहेत. (१) रामा..ची संख्या, (२) त्यांचीं नांवें आणि (३) त्यांच्या नामकरणाची मीमांसा.

(१) पंतांनीं भैराळबुवांस लिहिलेल्या पत्रांत 'अष्टोत्तरशत संख्या झाली पाहिजे. पाठवावी.' असें एक वाक्य आहे त्यावरून १०८ रामायणें रचण्याचा पंतांचा ..होता असें स्पष्ट होतें. त्याचप्रमाणें पंतांचे समकालीन रामचंद्र प्रल्हाद बडवे ..नीं आपुल्या 'मयूरस्तुती'मध्यें पुढील गीति लिहिली आहे:—

अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं, ।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं. ॥

यांतील 'केलीं' या भूतकालवाचक पदावरून सदरील बडवे यांनीं वरील गीति लिहिण्याचे आधींच १०८ रामायणें लिहून झालीं होतीं हें स्पष्ट होतें. या १०८ रामायणांची यादी रा० पांगारकर यांनीं केसरींत प्रसिद्ध केली आहे. ती आम्ही काव्यसंग्रहाच्या वाचकांकरितां येथें देतों:—

१ अद्भुत रामायण.
२ अनुष्टुभ् रामायण.
३ अभंग रामायण.
४ अवतारमालांतर्गत रामायण.
५ अष्टोत्तरशत रामायण ऊर्फ आर्यागीतिमुक्तामाला.
६ आद्यार्या रामायण.
७ उमा रामायण.

८ ऋषि रामायण.
९ एकपदी रामायण.
१० एकश्लोकी रामायण.
११ ओवी रामायण (आर्याओवीछंद रामायण).
१२ ओवीगीत रामायण (सीतागीत).
१३ कडव्याचें रामायण.
१४ कथासुधा रामायण.
१५ कन्यारत्न रामायण.
१६ कविप्रिय रामायण.
१७ कल्पलता रामायण.
१८ कल्याण रामायण.
१९ काशी रामायण.
२० गंगा रामायण.
२१ गद्यम्न रामायण.
२२ गुरु रामायण.
२३ घनाक्षरी रामायण.
२४ छंदो रामायण.
२५ तन्वी रामायण.
२६ तीर्थ रामायण.
२७ त्रिःसप्तमंत्र रामायण.
२८ दंडक रामायण.
२९ दाम रामायण.
३० दास रामायण.
३१ दंडि रामायण.
३२ दिव्य रामायण.
३३ दोहा रामायण.
३४ दोहा सोरटा रामायण.
३५ धन्य रामायण.
३६ धर्म रामायण.
३७ धीर रामायण.
३८ नामांक रामायण.
३९ निरोष्ठ रामायण.
४० पंचचामर रामायण.
४१ पंचशती रामायण.
४२ परंतु रामायण.
४३ पीयूष रामायण.
४४ पुण्य रामायण.
४५ पुत्र रामायण.
४६ पुष्पिताग्रा रामायण.
४७ पूत रामायण.
४८ पृथ्वी रामायण.
४९ प्रयाग रामायण.
५० प्रहर्षिणी रामायण.
५१ बालमंत्र रामायण.
५२ भाव रामायण.
५३ भारत वनपर्व रामायण.
५४ भागवत नवमस्कंध रामायण.
५५ मंत्र रामायण.
५६ मंजु रामायण.
५७ मत्तमयूर रामायण.
५८ मधु रामायण.
५९ मंत्रगर्भसाकी रामायण.
६० मंत्रमय रामायण.
६१ मंत्र रामायण (प्राकृत).
६२ मंत्र रामायण (संस्कृत).
६३ मंत्रा रामायण.
६४ मंत्री रामायण.
६५ मात्रा रामायण.
६६ मुक्तामाला रामायण.
६७ रम्यमंत्र रामायण.
६८ राज रामायण.

६९ रामनामाष्टोत्तरशत रामायण.
७० रामप्रार्थना रामायण.
७१ लघु रामायण.
७२ वरद रामायण.
७३ विचित्र रामायण.
७४ विद्युन्माला रामायण.
७५ विबुधप्रिय रामायण.
७६ विष्णुसहस्रनाम रामायण.
७७ वृत्तरत्नमय रामायण.
७८ शिव रामायण (प्रथम).
७९ शिव रामायण (द्वितीय).
८० शुद्ध रामायण.
८१ श्रवणामृत रामायण.
८२ श्रीप्रिय रामायण.
८३ श्रीमत्सुरामायण.
८४ श्रीरमणीय रामायण.
८५ श्रीरामायण.
८६ श्रीहररमणीय रामायण.
८७ श्लोकबद्ध रामायण.
८८ सत्कीर्ति रामायण.
८९ सत्व रामायण.
९० सच्छ्राव्य रामायण.
९१ सद्गर्भ रामायण.
९२ सद्गीत रामायण.
९३ सद्भक्तसर्वस्व रामायण.
९४ सद्रत्न रामायण.
९५ सद्वृत्त रामायण.
९६ सन्नामगर्भ रामायण.
९७ सप्तमंत्र रामायण.
९८ सवाया रामायण.
९९ स्रग्विणी रामायण.
१०० सार रामायण.
१०१ सीता रामायण.
१०२ सुख रामायण.
१०३ सूरा रामायण.
१०४ सौम्य रामायण.
१०५ हनुमद्रामायण.
१०६ हूं रामायण.
१०७ हृद्य रामायण.
१०८ हर्ष रामायण.

(२). आतां उपरिनिर्दिष्ट यादींत दिलेल्या रामायणांचा विचार करूं. पांगारकरांनीं केलेली याद नांवांच्या संबंधानें पाहतां पक्की झाली आहे असें म्हणतां येत नाहीं. त्यांनीं मिळविलेलीं पत्रें, यादी व चिठ्याचपाट्या यांपैकीं एकांतही संपूर्ण १०८ रामायणांचीं नांवें आहेत असें दिसत नाहीं. निरनिराळ्या अपुऱ्या यादींचा मेळ घालून ही यादी तयार केलेली दिसते. एकाच रामायणाचीं निरनिराळीं नांवें निरनिराळ्या यादींत सांपडणें शक्य आहे; कारण दिव्य रामायणास कोणी दीर्घ रामायण म्हणतात, तसेंच लघु रामायणास लघ्वक्षर रामायण म्हणण्याचा पाठ आहे. आणि पुढेंमागें या संबंधाचे आणखी कांहीं कागदपत्र सांपडल्यास वरील यादींतील १०८ रामायणांपैकीं कांहींचीं नांवें बदलण्याचा व कांहींचीं नवीन नांवें सांपडण्याचा संभव आहे. थोडे दिवसांपूर्वींच रा० पांगारकर यांस आम्हीं या विषयासंबंधानें कांहीं अधिक माहिती मिळावी म्हणून पत्र पाठविलें होतें; त्यांनीं कृपा करून जें उत्तर पाठविलें

त्यावरून कळतें कीं त्यांनीं केसरींतील यादी प्रसिद्ध केल्यानंतर त्या यादींतील रामायणांशिवाय छंदो रामायण आणि मंच रामायण हीं दोन पंतांचीं नवीन रामायणें त्यांस पहावयास मिळालीं. या गोष्टीवरून आमच्या वरील विधानास बळकटी येते हें सांगावयास नकोच.

वरील दोन व पंतांच्या दुसरीं असून अद्याप प्रसिद्ध न झालेलीं अशीं दहा* मिळून बारा रामायणें मिळण्यासारखीं असून अद्याप अमुद्रित रामायणें आहेत तीं रा० पांगारकर यांच्या मदतीनें लवकरच मुद्रित होऊन महाराष्ट्रग्रंथसंग्रहास एक चांगली भर पडेल अशी आम्हांस बळकट आशा आहे. कै० ओकांनीं काव्यसंग्रहाच्या ३७ व्या अंकांत अद्भुत रामायणाचा उल्लेख केला आहे त्या संबंधानें त्यांचे पुतणे रा० रा० दामोदर केशव ओक (कामटी, मध्यप्रांत) यांजकडून कळतें कीं सदर्हू रामायणाच्या उपलब्ध असलेल्या फक्त चारच आर्या जबलपूरचे रा० रा० केशव विश्वास फणसे यांनीं कै० ओक यांजकडे पाठविल्या होत्या, त्या येणेंप्रमाणें:—

सच्चित्सुखघन अक्रिय तेणें त्र्यंबकधनुष्य भंगावें।
स्त्रीकामास्तव, अद्भुत सद्यश हें व्यासवाल्मिकीं गावें॥
कैलासा डळमळवी त्यातें शिवचाप कांय न ढळावें?।
हें अद्भुत, सीतेनें तें धनु घोडा करूनि खेळावें॥
अथवा स्पर्शें जडता जाउनि सद्बुद्धि होय कोदंडा,।
श्रीरामातें प्रार्थी हें अद्भुत 'भज अशा खळा दंडा'॥
किंवा ज्ञान (चाप?) मिषें हा दृढतर ज्ञानाभिमान जनकाचा,।
भंगुनि वधु पर्णावी हा अद्भुत हेतु विश्वजनकाचा.॥

या चार गीतींतील यमकरचना, 'वाल्मिकी' पैकीं ऱ्हस्व 'ल्मि', रामायणासंबंधानें व्यासाचा उल्लेख, 'वधु' मधील 'धु', जनकावरील ज्ञानाभिमानाचा आरोप व तिसऱ्या गीतींतील अद्भुत पदाची अयथार्थता इत्यादि गोष्टी या चारच गीतींत आढळतात, त्यावरून त्या पंतांच्या नसाव्या असें मानण्यास पुष्कळ जागा होते.

आतां याच कलमाखालीं दुसऱ्या एका गोष्टीचा विचार करणें आहे तो स्तोत्र रामायणाबद्दलचा होय. रा० पांगारकर हे आपल्या केसरींतील पत्रांत म्हणतात कीं 'त्यांना सांपडलेल्या सर्व कागदांत विष्णुसहस्रनामस्तोत्र रामायण हें एकच रामायण

---

*१. कथासुधा रामायण. २. कन्यारत्न रामायण. ३. तन्वी रामायण. ४. दंडक रामायण ५. श्री रामायण. ६. स्त्रग्विणी रामायण. ७. सुख रामायण. ८. प्रहर्षिणी रामायण. ९. पूत रामायण (त्रुटित). १०. द्रुतरमणुक रामायण (त्रुटित).

धरिलें आहे म्हणून आजपर्यंत जीं स्तोत्ररामायणें दहा आहेत असें समजलें जात होतें त्यांचें आतां एकच रामायण धरिलें पाहिजे. पण आम्हांस या संबंधानें एक शंका आहे ती अशीः—प्रत्येक स्तोत्र रामायणांत रामकथा संपूर्ण वर्णिली आहे यामुळें तें एक स्वतंत्र रामायणच कां समजूं नये ? विष्णुसहस्रनामस्तोत्र रामायण हें एकच रामायण कल्पिल्यास त्यांत रामकथा दहा वेळां सांगितली जाते हें वाजवी दिसत नाहीं. शिवाय हीं दहा रामायणें जर निराळीं नसतीं तर निरोष्ठ रामायणासारख्या स्वतंत्र रामायणाचे शेवटीं 'निरोष्ठ रामायण हें मयूरें रामनंदनें। श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ॥' असा जो उपसंहारात्मक श्लोक आढळतो, तसाच, 'स्तोत्र रामायण प्रेमें मयूरें रामनंदनें । श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ॥' हा श्लोक प्रत्येक स्तोत्र रामायणाच्या अखेरीस कां असावा ? आतां जिज्ञासूच्या मताप्रमाणें (केसरी ता० २७।५।०२पहा) हा अनुष्टुपी उपसंहार पंतांचा नसून तो पंतांच्या कोण्यातरी भोळ्या भक्तानें मागाहून घुसडलेला असावा, असें म्हणावयास जागा होती, कारण 'हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्पमाला खेळविण्यास जितके श्रम पडतात' तितकेच श्रम ज्या भाषाप्रभूला मराठी पद्यरचनेसंबंधानें पडतात तो सुमारें ६० राणायणांच्या शेवटीं जर एकच उपसंहारात्मक अनुष्टुप् श्लोक लिहील तर त्यामुळें कवीचें 'निरंकुशत्व' सिद्ध न होतां वैचित्र्यप्रियतेचा अभाव मात्र दिसून येईल आणि पंतांची वैचित्र्यप्रियता व भाषाप्रभुत्व हीं तर वरील विधानाच्या आड येतात; पण इतक्या गोष्टी असूनही ज्या अर्थीं रा० पांगारकर म्हणतात कीं वरील उपसंहारात्मक एकच श्लोक खुद्द पंतांनींच जवळ जवळ ५०।६० ठिकाणीं लिहिला आहे; त्याअर्थीं आम्हांस या बाबतींत कांहीं ज्यास्त लिहितां येत नाहीं. रा० पांगारकरांच्या या विधानामुळें स्तोत्र रामायणें १० आहेत असें म्हणण्यास मात्र आणखी एक पुरावा मिळतो.

असो. रा० पांगारकरांनीं १०८ रामायणांची याद करितांना आजपर्यंत इतरत्र असलेलीं ७ प्रकरणें स्वतंत्र रामायणें म्हणून निवडून काढून त्यांचा समावेश १०८ रामायणांत केला आहे. हीं प्रकरणें म्हणजे (१) आर्यागीति मुक्तामाला, (२) रामप्रार्थना, (३) मुक्तामाला (संस्कृत), (४) अवतारमालेंतील रामायण, (५) सीतागीत, (६) भारत वनपर्वातील रामायण (अध्याय १०।११।१२) आणि (७) मंत्रभागवत नवमस्कंधांतील रामायण (गीति १३ ते १६६). हीं प्रकरणें रामायणांत गोंवण्याला कारण पंतांनीं मैराळबुवांस पाठविलेल्या पत्रांत 'भारतांतील लहानमोठी याद पाठवावी' असें लिहिल्यावरून मैराळबुवांनीं आपल्या उत्तरांत 'श्रीरामायणांची याद पाठवावी म्हणून लिहिलें त्यांचा तपशील' असें म्हणून दिलेल्या यादींत (१) रामायण ओव्या गीत (२) भारत वनपर्व रामायण, (३) भागवत नवमस्कंध रामायण, (४) अवतारमाला रामा-

यण हीं नांवें आहेत. यावरून पंतांनीं भारतादि चार निरनिराळ्या ठिकाणीं ओघानें ज्या रामकथा लिहिल्या, त्याच पुन्हा १०८ या संख्येच्या भरतीकरितां घेतल्या हें स्पष्ट होतें. रा० पांगारकरांच्या पत्राप्रमाणें मंत्ररामायण हें स्वतंत्र असें पहिलेंच रामायण पंतांनीं लिहिलें, यावरून त्याच्याही आधीं म्हणजे बारामतीस पंत जाऊन राहिल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांनीं यजमानांच्या मुलींकरितां सीतागीत तयार करून दिलें त्या वेळीं १०८ रामायणांचा संकल्प पंतांनीं केलेला नव्हता. मंत्ररामायण व इतर बरींचशीं स्वतंत्र रामायणें लिहून झाल्यानंतर त्यांची बेरीज करितां ती संख्या १०८ च्या जवळ आल्यामुळें अष्टोत्तरशत रामायणांची कल्पना त्यांच्या डोक्यांत आली असावी. आणि वरील चार ठिकाणीं रामकथा आपण गाइली आहेच; तेव्हां तीं चार प्रकरणेंही रामायणें समजून त्यांचा समावेश १०८ या संख्येंत करावा असें त्यांस वाटलें असावें. बाकी पंतांना आणखी चार रामायणें स्वतंत्र रीतीनें रचण्यास फारसे श्रम पडले असते असें नाहीं.

(३) आतां तिसरा मुद्दा नामकरणाचा, म्हणजे या रामायणांचीं नांवें कोणत्या तत्वावर ठेवलीं गेलीं आहेत हा होय. यासंबंधानें शालापत्रक–वर्ष २ अंक ११ मध्यें कै० ओकांनीं पुष्कळ विचार करून एक लेख प्रसिद्ध केला आहे. तो वाचकांनीं अवश्य पहावा अशी शिफारस करण्यापलीकडे या मुद्यासंबंधानें आम्हांस तूर्त कांहीं ज्यास्त लिहावयाचें नाहीं. वर सांगितलेलीं बारा (अद्भुत रामायण मिळाल्यास तेरा) रामायणें प्रसिद्ध झालीं म्हणजे या गोष्टीचा ज्यास्त विचार करण्यास एक नवें साधन मिळेल, म्हणून तोंपर्यंत स्वस्थ रहावें हेंच बरें.

शेवटीं प्रस्तुत विषयासंबंधानें रा० पांगारकर यांनीं फार श्रम करून पुष्कळशी नवीन माहिती महाराष्ट्रीयांस मिळवून दिल्याबद्दल व त्या संबंधानें वरील दोन शब्द लिहिण्याचा प्रसंग आणून दिल्याबद्दल त्यांचे फार आभार मानून व हा भाग पुरा करण्यास अनेक अडचणींमुळें बरेच दिवस लागले याबद्दल वाचकांची क्षमा मागून आम्ही हा प्रस्तावनालेख पुरा करितों.

काव्यसंग्रहकार.

# अनुक्रमणिका.


| अनुक्रमांक. | रामायणनाम. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| ४३ | विद्युन्माला रामायण .... .... .... | ४३ | १–७ |
| | उपसंहार .... .... .... | १ | ७– |
| ४४ | सूरा रामायण .... .... .... .... | १०२ | ७–२० |
| | उपसंहार .... .... .... | १ | २०– |
| ४५ | प्रिय रामायण .... .... .... .... | १०९ | २१–५५ |
| ४६ | सद्वित्त रामायण .... .... .... .... | १२२ | ५५–७८ |
| | उपसंहार .... .... .... | १ | ७८– |
| ४७ | गदघ्न रामायण .... .... .... .... | १७० | ७८–१०३ |
| | उपसंहार .... .... .... | १ | १०३– |
| ४८ | सुरा रामायण .... .... .... .... | १११ | १०३–१२० |
| ४९ | हररमणी रामायण .... .... .... | ४८ | १२०–१२६ |
| ५० | वरद रामायण .... .... .... .... | ६७ | १२६–१३३ |
| ५१ | रमणीय रामायण .... .... .... | ८० | १३३–१४२ |
| ५२ | विचित्र रामायण .... .... .... | २१ | १४२–१४५ |
| | उपसंहार .... .... .... | १ | १४५– |
| ५३ | एकश्लोकी रामायण .... .... .... | १ | १४५– |
| ५४ | पुष्पिताग्रा रामायण .... .... .... | ५४ | १४६–१५१ |
| ५५ | मत्तमयूर रामायण .... .... .... | ४७ | १५१–१५६ |
| ५६ | सद्भक्तसर्वस्व रामायण .... .... .... | १५९ | १५६–१७१ |
| | उपसंहार .... .... .... | १ | १७१– |
| ५७ | रामायणपीयूष .... .... .... | १०८ | १७१–१८९ |
| | उपसंहार .... .... .... | १ | १८९– |
| ५८ | पंचचामर रामायण .... .... .... | ९० | १८९–२०५ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २०५– |
| ५९ | पृथ्वी रामायण .... .... .... .... | ८२ | २०६–२२१ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २२१– |

| अनुक्रमांक. | रामायणनाम. | ग्रंथसंख्या | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| ६० | भाव रामायण .... .... .... .... | ११८ | २२१–२४३ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २४३– |
| ६१ | सच्छ्राव्य रामायण .... .... .... | ८१ | २४४–२५७ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २५७– |
| ६२ | श्रवणामृत रामायण .... .... .... | २५ | २५७–२६१ |
| ६३ | विबुधप्रिय रामायण .... .... .... | १०६ | २६१–२७७ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २७७– |
| ६४ | त्रिःसप्तमंत्र रामायण .... .... .... | २१ | २७८–२८१ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २८१– |
| ६५ | सत्त्व रामायण .... .... .... .... | १३ | २८१–२८३ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २८३– |
| ६६ | सत्कीर्ति रामायण .... .... .... | २१ | २८३–२८६ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २८६– |
| ६७ | कविप्रिय रामायण .... .... .... | १९ | २८६–२८९ |
| ६८ | सद्रत्न रामायण .... .... .... .... | ३९ | २९०–२९६ |
| | उपसंहार .... .... .... | १ | २९६– |
| ६९ | सवाई रामायण .... .... .... .... | १४८ | २९६–३१८ |
| | उपसंहार .... .... .... | १ | ३१८– |
| ७० | सीता रामायण .... .... .... .... | १८७ | ३१८–३३८ |
| | उपसंहार .... .... .... | १ | ३३८– |
| ७१ | श्रीगुरु रामायण .... .... .... | ८६ | ३३८–३४९ |
| | उपसंहार .... .... .... | १ | ३४९– |
| ७२ | रम्यमंत्र रामायण .... .... .... | | |
| | बालकांड .... .... .... | १३ | ३४९–३५१ |
| | अयोध्याकांड .... .... .... | १३ | ३५२–३५४ |
| | अरण्यकांड .... .... .... | १३ | ३५४–३५६ |
| | किष्किंधाकांड .... .... .... | १३ | ३५६–३५८ |
| | सुंदरकांड .... .... .... | १३ | ३५८–३६० |

| अनुक्रमांक. | रामायणनाम. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| | युद्धकांड.... .... .... .... | १३ | ३६०–३६२ |
| | उत्तरकांड .... .... .... | १३ | ३६३–३६५ |
| | उपसंहार .... .... .... | ९ | ३६६–३६७ |
| ७३ | ओवी रामायण .... .... .... ... | १६ | ३६७–३७० |
| | उपसंहार .... .... .... | १ | ३७०– |
| ७४ | घनाक्षरी रामायण .... .... .... | १३३ | ३७०–४२८ |
| | उपसंहार .... .... .... | ३ | ४२८– |
| | एकंदर ग्रंथसंख्या | २५५० | |

# मोरोपंतकृत रामायणें.

## भाग पांचवा.

### ४३. विद्युन्मालारामायण.[1]

( विद्युन्माला वृत्त. )

श्री[2]भर्ता ब्रह्म्याच्या[3] स्तोत्रा[4]; मानी[5] [6]श्री दे भास्वद्गोत्रा[7]; ।
कौसल्येच्या पोटीं आला, स्वभ्रातेहि स्वांशें झाला. ॥
भव्या[9] रामाख्या[10] स्वीकारी, संपादी [11]सद्विद्या सारी, ।

---

१. 'विद्युन्मालारामायण' हें रामायण अष्टाक्षरात्मक अनुष्टुभ् वृत्ताच्या वर्गांतील 'विद्युन्माला' नांवाच्या छंदांत लिहिलें आहे म्हणून तसें 'सार्थ' नांव कवीनें दिलें आहे. याचें लक्षण='मो मो गो गो विद्युन्माला' इति वृत्तरत्नाकरे । 'सर्वे वर्णा दीर्घा यस्यां विश्रामः स्यात् वेदैर्वेदैः । विद्वद्वृन्दैर्वीणावाणिव्याख्याता सा विद्युन्माला ॥' इति श्रुतबोधे. २. लक्ष्मीपति, विष्णु. 'दुःखदारिद्र्यवाचकाः शब्दाश्चादौ न प्रयोज्याः' । 'देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः । ते सर्वे नैव निन्द्याः स्युर्लिपितो गणतोऽपि वा ॥' 'मङ्गलादीनि मङ्गलमध्यानि मङ्गलान्तानि च काव्यानि प्रथन्ते' या नियमामुळें श्रीशब्दप्रयोग काव्यारंभीं केला आहे. 'म'गणानें आरंभ करण्यानें कवीला व पठन करणाराला सुख होईल असें सुचविलें आहे. 'मो भूमिस्त्रिगुरुः श्रियं दिशति.' परंतु वर्णशुद्धि नाहीं त्यावरून नायकाला सुख होणार नाहीं हेंही कवि सुचवीत आहे. 'श्री' हें संयुक्ताक्षर असून दीर्घही आहे. 'संयुक्तं चेह न स्यात्' इति भामहः । 'श्लोकस्य लघुना मुखम्' इति क्षेमेन्द्रः । 'अक्षरे परिशुद्धे तु नायको भूतिमृच्छति.' ३. या पदाच्या आद्याक्षरावर यति आहे ती पदांच्या मध्यें असल्यामुळें दुष्य आहे. या ४३ श्लोकांच्या रामायणांत निदान ६० पदांवर अशाच प्रकारें यति आहे ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. 'यतिर्जिह्वेष्टविश्रामस्थानं कविभिरुच्यते' । 'पदान्ते सा शोभां व्रजति पदमध्ये त्यजति च' । शुक्लांबरादयस्तु पदान्त एव यतिमाहुः । भरतादयस्तु यतिमेव नेच्छन्ति । अत एव कविप्रयोगाः । तत्र भर्तृहरेः 'लभेच सिकतासु तैलमपि यत्नतः पीडयन् पिबेच्च मृगतृष्णिकासु सलिलं पिपासार्दितः । कदाचिदपि पर्यटञ्शशविषाणमासादयेन्न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥' इति । जयदेवस्यापि 'भावं श्रृङ्गारसारस्वतमयजयदेवस्य विष्वग्वचांसि' इति । 'तदुभयं बहुविरोधाच्चिन्त्यम्' इति वृत्तरत्नाकरे केदारभट्टाः. ४. स्तुतीला, प्रार्थनेला. ५. मान्य करतो. ६. शोभा आणतो. ७. भास्वत्+गोत्र+द्वि० प्र०. सूर्यवंशाला. प्रशस्ता भा अस्त्यस्येति भास्वान्. ८. उदरीं जन्मला. ९. शुभावहा. १०. राम+आख्या. राम हें नांव. ११. क्षत्रियाला उपयुक्त असें राजनीति-व्यवहार-धनुर्विद्यादिकांचें ज्ञान.

आधीं [1]सद्यज्ञातें पाळी, साध्वीच्या [2]ग्रावत्वा [3]टाळी. ॥ २
मोडी [4]त्र्यक्षाच्या चापातें, वारी सीतेच्या [5]तापातें, ।
[6]वैदेहाच्या चौघी कन्या [7]जोडी योग्या [8]रम्या धन्या. ॥ ३
ठावी होती [9]ज्या न [10]क्षांती [11]त्र्यक्षच्छात्रा [12]त्यां दे शांती, ।
[13]मातेच्या पूज्यत्वा लक्षी, ताताच्या सत्यातें रक्षी. । ४
[14]अत्र्याद्यर्षि प्रेमें वंदी [15]ज्यांचे वेद स्वर्गी बंदी, ।
जो [16]पारावारातें [17]प्राशी [18]त्यां विप्रेंद्राच्या घे [19]आशी. ॥ ५
[20]गृध्रेंद्रा ताताच्या [21]मित्रा भेटे, योजी लीला चित्रा, ।
सांगे, '[22]गोदातीरीं प्राज्ञा! राहें.' वंदी त्याची आज्ञा. ॥ ६
[23]जीचा [24]आशाकंठ भ्राता, जो दे कंप [25]स्वर्गिव्राता, ।
त्या पापेची नासा खंडी; तीचे [26]कैवारीही दंडी. ॥ ७

---

१. सत्+यज्ञ+द्वि० प्र०. महात्मा जो विश्वामित्र त्याच्या यज्ञाला. २. पाषाणत्वाला, अहल्येच्या पाषाणरूपतेला. ३. दूर करी. 'येऊं नेदी' असा अर्थ इष्ट नाहीं. ४. त्रि+अक्षि (अक्ष)+ष०प्र० त्र्यंबकाच्या. त्रीणि अक्षीणि यस्य स त्र्यक्षः. ५. आधीतें; चिंतेला. ६. जनकाच्या. ७. प्राप्त करून घेई. ८. रमणीय गुणांच्या कुमारींना. 'रम्या' हें पद 'योग्या' व 'धन्या' यांमध्यें मार्मिक रीतीनें योजलें आहे. रमणीय गुणांनीं युक्त असल्यामुळें रामादिकांच्या पाणिग्रहणाला योग्य झाल्या व आपल्या रम्य गुणांनीं रामादिकांसारखे पति मिळाल्यामुळें धन्य झाल्या. ९. परशुरामाला. १०. सहनशीलता. ११. त्र्यक्ष+च्छात्र द्वि० प्र०.- त्र्यंबकशिष्याला. १२. परशुरामाला. १३. कैकेयीच्या. 'सर्वाः पितृपत्न्यो मातरः' इति स्मृतेः. १४. अत्रि+आदि+ऋषि. अत्रि, शरभंग, सुतीक्ष्ण इत्यादि ऋषींना. १५. ज्या परमात्म्याचे वेद व स्वर्गी (देव) बंदी (स्तुतिपाठक) आहेत. १६. समुद्राला. १७. प्राशन करतो. इल्वलाची गति पाहून वातापि पळूं लागला व तो समुद्रांत जाऊन लपला. तेव्हां अगस्त्यमुनींनीं सगळ्या समुद्राच्या पाण्याचा एकच घोंट केला अशी इतरत्र कथा आढळते. वा० रा०,अरण्य० स० ११ श्लो० ५५,६६ त वातापीला नेत्राग्नीनें भस्म केला अशी कथा आहे. काव्यसंग्रहग्रंथमाला—रामायणें भाग ४, संस्कृत मंत्ररामायण-पृ० १२७ टीप १ पहा. १८. अगस्त्यमुनीच्या. १९. आशीर्वादांना. २०. अरुणपुत्र जटायु याला. जटायु हा संपातीचा धाकटा बंधु. २१. स्वपिता जो दशरथ त्याच्या मित्राला. जटायु हा दशरथराजाचा केव्हां व कसा मित्र झाला यासंबंधी कथा बहुश्रुत वाचकांपैकीं कोणास माहीत असल्यास कळविण्याची कृपा करावी. २२. गोदावरीच्या तीरीं. 'नामैकदेशे नामग्रहणम्' इति न्यायात् गोदावरीच्या अर्थी गोदा असा प्रयोग केला. २३. ज्या शूर्पणखेचा. २४. दिक्कंठ, दशानन. २५. स्वर्गिन्+व्रात+द्वि० प्र०. देवांच्या समुदायाला. २६. खरदूषणादि पक्षपाती.

मारीच स्वर्णैणच्छद्मा दिक्कंठ प्रेषी, त्या पद्मा, ।
पाहे, स्वामीपासीं मागे, त्यामागें तो धन्वी लागे. ॥ ८
बाणें मर्मीं ऐणा हाणी, 'हा सीते! सौमित्रे!' वाणी, ।
ऐसी बोले रामावाणी, ऐके, भी रामाची राणी. ॥ ९
सौमित्रीतें खिन्नस्वांता सांगे, 'जा, संरक्षीं कांता,' ।
तो प्रार्थी, 'हे रक्षोमाया स्वामीच्या वाणीची छाया.' ॥ १०
ती मानी त्या भक्ता खोटा, दे खेद क्ष्मांकन्या मोठा, ।
रामातें सांगाया जोडी हस्त श्रीतें, शाला सोडी. ॥ ११
संन्यासीसा ये शाळेतें, ने दिक्कंठ क्ष्माबाळेतें, ।
ती स्त्री नेतां हाका फोडी, त्रात्या गृध्रा खड्गें तोडी. ॥ १२
कीशांमध्यें[15] टाकी भूषा, पावे मंदत्वातें पूषा, ।
लंकेंत स्वारामी स्थापी, दापी कामी क्रोधी पापी. ॥ १३

---

१. हा एक मायावी राक्षस होता. 'यत्तेन रामभद्रेण मारीचः शतयोजनम् । क्षिप्तोऽब्धौ मानवास्त्रेण वातेनेव तरुच्छदः ॥' मोरो० संस्कृत मंत्ररा० बालकांड श्लो० ११३. २. स्वर्णैणच्छद्मा=स्वर्ण+एण+छद्मन्+प्र० प०. सुवर्णमृगाचें मायारूप धारण करणारा. ३. लक्ष्मीचा अवतार जी सीता. 'विष्णुस्त्वं जानकी पद्मा' इति पुराणम्. पद्मा हा पाहे या क्रियेचा कर्ता. ४. धनुर्धर. (राम). ५. मृगा. ६. रामाप्रमाणें. ऐसी रामावाणी वाणी बोले—असा अन्वय. पुढील अर्धाचा अन्वय करतांना पुनः 'रामा वाणी' अशीं पृथक् पदें घ्यावीं. व 'रामाची राणी रामा (ती) वाणी ऐके (व) भी' असा अन्वय करावा. परस्परांवर ज्यांचें दृढ प्रेम आहे त्यांपैकीं एकाला जरी कांहीं दुःख झालें तर दुसऱ्याला वाईट वाटणें साहजिक आहे. येथें जानकीची स्त्रीस्वभावसुलभा कातरता सुव्यक्त आहे व ती कातरता वृद्धिंगत होण्याला वनवासही कांहीं अंशानें कारण झाला. ७. जिचें अंतःकरण खिन्न झालें आहे अशी. ८. रक्षस्+माया=राक्षसाची माया, राक्षसाचें कपट. ९. अनुकृति, नकल. १०. भूमिजा, पृथ्वीची कन्या. (सीता.) ११. रामाला सांगण्याकरितां जाण्याचे वेळीं. १२. संन्यासिसदृश, यतिरूपी. १३. सीतेतें. १४. सोडविण्याकरितां धांवून आलेल्या (जटायूला). १५. वानरामध्यें. सीतेला रावण आकाशमार्गानें नेत असतां ऋष्यमूक पर्वतावर मारुतिअंगदसुग्रीवादिकांना सीतेनें पाहिलें व रावणाला नकळत आपलीं भूषणें खालीं टाकिलीं. तीं भूषणें रामाची व सुग्रीवाची भेट झाली तेव्हां सुग्रीवानें रामाला दाखविलीं. १६. अलंकार. १७. सूर्य. ही 'पूषन्' शब्दाची प्रथमा विभक्ति. सूर्याचें तेज मंद होणें हा एक उत्पात होय. १८. स्व+आराम+सप्त० प्र० अशोकवनिकेंत. १९. ज्याच्या मागें अनावर अशी कामपिशाच्चिका लागली होती त्या रावणाला कामी क्रोधी पापी हीं विशिष्टपदें युक्तच आहेत.

राम श्रीविश्लेषें[1] शोका स्त्रैणाच्या[2] तो दावी[3] लोका, ।
विश्वाचा जो धाता[4] तो या दे गृध्रेंद्रा ताता[5] तोया[6]. ॥ १४
ज्या मूर्धा[7] नाहीं तो[8] खाया पाहे स्वामी दे तोखा[9] या, ।
दिव्यां[10] भक्ता भिल्ली[11] केली, श्रीरामें स्वस्थाना[12] नेली. ॥ १५
पाहे जेव्हां रम्या पंपा[13] श्रीविश्लेषें पावे कंपा[14], ।
तो भेटे वाताच्या तोका[15], सुग्रीवाचा वारी धोका[16]. ॥ १६
उद्वृत्ता[17] वाळीतें मारी, मित्रा दे राज्यश्री भारी, ।
तो राजा लावाया शोध श्रीचा धाडी मोठे योध[18]. ॥ १७
वाताच्या पुत्रानें सीता केली हृष्टा चिंताभीता[19], ।
दे तीस स्वामीची मुद्रा, जाळी लंका, गांजी क्षुद्रा. ॥ १८
श्रीश श्रीच्या चूडारत्नें केला हृष्ट प्रौढें यत्नें[20], ।
आलिंगी प्रेमें भृत्यातें, वर्णी त्याच्या त्या कृत्यातें[21]. ॥ १९
'कीशांच्या ऋक्षांच्या कोटी जीमध्यें[22] ऐसी ती मोठी ।
सेना ने सिंधूच्या तीरा' हें सांगे सुग्रीवा वीरा. ॥ २०
ज्याचे[23] बाहु[24] स्वर्गी[25] गावे तो पारावारातें[26] पावे, ।
वंदी शत्रुभ्राता[27] प्राज्यप्रेमें[28], दे त्या लंकाराज्य: ॥ २१
निर्मी पारावारीं सेतु स्वामी जो विश्वाचा हेतु[29], ।
मत्ता[30] हंता[31] तो[32] भासेना, पावे फार क्षोभा सेना. ॥ २२

---

१. सीतेच्या वियोगानें. २. बाईलबुद्धि पुरुषाप्रमाणें. स्त्रीचा ज्यावर पगडा आहे अशा पुरुषाप्रमाणें. ३. स्त्रैणाच्या शोकाची बतावणी करतो. ४. पालनकर्ता. ही 'धातृ' शब्दाची प्रथमा विभक्ति. ५. पितृसम मानलेल्या जटायूला. ६. तिलांजलि दे. ७. मस्तक. ही 'मूर्धन्'–शब्दाची प्रथमा विभक्ति. ८. कबंध. दे तोखा या=त्या कबंधाला मुक्त करून आनंद देतो. ९. संतोषाला. १०. स्वर्गवासाला योग्य. दिव्यदेहा, मुक्त. ११. शबरी. १२. वैकुंठाला. १३. हें सरोवराचें नांव आहे. १४. मनोभवव्यथेला. १५. वायुपुत्राला, मारुतीला. १६. मनांतील भीति. सुग्रीवाला वाटलें होतें कीं समोरून येत असलेले पुरुष वालीनें आपल्या वधाकरितांच पाठविले आहेत. व म्हणून मारुतीला पुढें पाठवून शत्रु किंवा मित्र या संबंधाची परीक्षा करविली. १७. दांडगा. १८. शूर वानर. १९. चिंतेनें भ्यालेली. २०. मोठ्या प्रयत्नानें. २१. सीताशुद्धिरूप कार्यातें. २२. ज्या सेनेंत. २३. ज्या रामाचे. २४. बाहुबल. २५. स्वर्गांतील देवांनीं. २६. समुद्रतीराजवळ येतो. २७. बिभीषण. २८. अतिप्रेमानें. २९. जो विश्वाचें आदिकारण. ३०. माजलेल्या रावणाला. ३१. मारणारा. ३२. तर.

मानी[1] मानीना[2] सामातें, खोटें मानेना रामातें, ।
मर्दी त्या द्वेष्ट्याचें सैन्य, स्वामी दे योद्ध्यातें दैन्य. ॥ २३
सेनापाळा[3] [4]कुंभश्रोत्रा भंगी जैसा वज्री[5] गोत्रा[6], ।
मेघध्वानाच्या[7] ज्या माया[8] मानी लीला विश्वें गाया. ॥ २४
तार्क्ष्या[9] अंक्षघ्ना[10] दे थोरी स्वज्ञाना सामर्थ्यी [11]चोरी,।
लीलामर्त्य[12] ब्रह्मस्रष्टा[13] [14]कीर्त्यर्थ स्वीकारी कष्टा. ॥ २५
[15]द्वेषी मायासीता[16] मारी, सौमित्री त्यातें संहारी, ।
पुत्राच्या शोकें दिक्तुंड श्रीतें मारूं पाहे [17]पुंड. ॥ २६
त्यातें ज्ञाता[18] मंत्री वारी, युद्धा धाडी सेना भारी, ।
तीतें सीताभर्ता मारी कल्पांतीं जैसा कामारी[19]. ॥ २७
सौमित्रीतें वक्षीं ताडी दिक्कंठ, क्ष्मापृष्ठीं[20] पाडी, ।
त्या[21] [22]श्रीभर्ता [23]भंगी आधीं क्षोभे जेंवि व्याघ्री[24] व्याधीं[25]. ॥ २८
भ्रातृस्नेहें तो 'हा[26]!' वाणी बोले अन्या जीवां[27]वाणी, ।
अक्षारी[28] त्या [29]शृंगा आणी, सौमित्रीची मूर्छा खाणी[30]. ॥ २९

---

१. अभिमानी रावण, गर्वित. २. सलोख्यानें तंटा तोडण्यास कबूल होईना. ३. सेनापतीला. ४. कुंभकर्णाला. ५. वज्रायुध. (इंद्र.) ६. पर्वताला. ७. मेघनादाच्या. मेघनाद हें इंद्रजिताचें जन्मनांव. ८. इंद्रजिताच्या मायांत सांपडल्यासारखें दाखवी. ९. गरुडाला. नागपाशांनीं बद्ध केलेल्या रामलक्ष्मणांला गरुडानें येऊन मुक्त केलें, या कथेकडे अनुसंधान आहे. १०. या ठिकाणीं 'अस्त्रघ्ना' असा पाठ केला तर तो संदर्भाशीं चांगला जुळतो. नागपाशास्त्रापासून मुक्त करणाऱ्या गरुडाला—असा अर्थ. किंवा अक्षघ्ना=अक्ष नांवाच्या रावणपुत्राला मारणाऱ्या मारुतीला—असा अर्थ. ११. प्रकट करीत नाहीं. १२. लीलानरतनु. १३. व्याकृत ब्रह्माला उत्पन्न करणारा. १४. कीर्तीसाठीं. परमेश्वराला देखील कीर्तीकरितां कष्ट स्वीकारावयाला लावणारे कवि खरोखर शब्दसृष्टीचे ईश्वर होत. १५. इंद्रजित. १६. लटकीच मायेनें निर्माण केलेली जी सीता तिला. १७. पोळ=अविचारी व उन्मत्त असा रावण. १८. सुकार्श्व नांवाचा ज्ञाता मंत्री. १९. मदनदहन शिव. २०. क्ष्मातलावर, पृथ्वीच्या सपाटीवर. २१. त्या रावणाला. २२. सीतापति. २३. पराजित करतो. २४. 'व्याघ्री' हें स्त्रीलिङ्ग पद रामाला अतिक्रोध आला हें दाखविण्यासाठीं योजिलें आहे. जिचीं पिलें हरण केलीं आहेत अशी वाघीण अति क्रुद्ध होऊन चवताळून आंगावर येते, त्याप्रमाणें राम प्रिय कनिष्ठ बंधूच्या वधामुळें चवताळून रावणाच्या आंगावर गेला. २५. व्याधावर, पारध करणाऱ्यावर. २६. 'हाय!' असा दुःखाचा शब्द. २७. सामान्य जनाप्रमाणें. २८. मारुति. २९. द्रोणागिरीच्या शिखराला, ओषधिपर्वताला. ३०. खणून काढतो, समूळ नाहींशी करतो.

देवेंद्राच्या [1]बैसे [2]ध्यानीं ज्याचे पाय [3]ज्ञानीध्यानीं, ।
सप्ताहोरात्र क्रूरासीं भांडे स्वामी त्या शूरासीं. ॥ १०
तच्छीर्षें बाणांहीं झालीं छिन्नें होतीं तैसीं आलीं, ।
वाटे स्वामीला कीं, 'कांहीं शक्ति त्यांगीं शास्त्री नाहीं.' ॥ ११
[4]कुंभोत्पन्नर्षि [5]श्रीसूरा प्रार्थूं [6]बोधी [7]आद्या शूरा, ।
[8]तो सांगे या, 'मारीं [9]बा ! हूं भंव्य त्रैलोक्या दे पाहूं.' ॥ १२
योजी ब्रह्मास्त्रातें बाणीं तेणें तद्वक्षातें हाणी, ।
पाडी, मार्गों नेदी [12]फेणी, झाले हर्षी सर्व प्राणी. ॥ १३
नेतां अंता तो [13]सर्वांचें [14]झौंली उन्नादें स्ववांदें, ।
गंधर्वांहीं गातां कृत्य [15]स्ववेश्यांहीं केलें नृत्य. ॥ १४
देवांनीं पुष्पांच्या वृष्टी केल्या, हर्षें [16]कोंदे सृष्टी, ।
ब्रह्मा आरंभीं स्तोत्रा त्या प्रार्थी कैवारी हो ! त्रात्या. ॥ १५
केलें [17]तैशांचेंही [18]गात्र श्रीशें सत्काराचें पात्र; ।
[19]तोही लंकाभर्ता [20]दांस स्पर्शेना ज्या [21]काळ त्रास. ॥ १६
[22]दिव्योत्तीर्णा सीता देवी स्वामीच्या वामांका सेवी, ।
भेटे वंदूं [23]दे तो तात [24]प्रेंह्व ज्ञानी ज्या होतात. ॥ १७
त्या युद्धीं जे मेले होते शक्रें [25]जागे केले हो ! ते, ।

---

१. इंद्रानें मातलि नांवाच्या आपल्या सारथ्याबरोबर पाठविलेल्या रथांत. २. ज्ञा-त्यांच्या ध्यानांत. ज्ञानी ज्याच्या चरणकमलांचें निशिदिनीं ध्यान करितात. ३. पूर्ववत् रावणाच्या कंधरेवर शिरें उत्पन्न झालीं. ४. कुंभोत्पन्न+ऋषि=घटजमुनि=अगस्त्य. ५. श्रीसूर्यनारायणाला. ६. प्रार्थना करण्याचा उपदेश केला. ७. वीराग्रणीला. ८. सूर्य. ९. हूं, मार बुवा. 'हूं' हें प्रोत्साहनसूचक अव्यय आहे. बा=बाबा=बुवा=अहो. १०. मंगल, सुख. ११. त्याच्या वक्षस्थलास. १२. पाणी देखील मागण्याचा अवकाश दिला नाहीं. तत्क्षणीं त्याचीं शिरें उडविलीं. १३. आदिपुरुषें. १४. स्वर्गांतील वाद्यें, मोठ्यानें वाजूं लागलीं. १५. अप्सरांनीं. १६. भरली. १७. दारहर जो रावण, अर्थात् आततायी व पापी, अशाचे. १८. शरीर. १९. बिभीषण. २०. भक्त. २१. काळाचें भय० किंवा पीडा. २२. अग्निदिव्य करून तेजस्वीशरीरा बाहेर आलेली. २३. दशरथास. दशरथ विमानांत बसून भेटीकरितां आला होता त्याला रामलक्ष्मणांनीं नमस्कार केला. राम. 'दे' या पाठाबद्दल 'ये' असा पाठ बरा दिसतो. २४. नम्र. २५. उठविले. मरण हें महानिद्राच आहे या सिद्धांतावरून 'जागे केले' हें म्हणणें ठीकच आहे.

वैसे वित्तेशाच्या यानीं[1] स्वामी जैसा योगी ध्यानीं. ॥ ३८
सेत्वालोकें[2] चित्तीं हर्षे, प्रेमाश्रु श्री देवी वर्षे, ।
तारा सुग्रीवाची राणी जी तीतें[3] त्या यानीं[4] आणी. ॥ ३९
श्रीश श्रीतें गोदा दावी गावी जी सप्रेम ध्यावी, ।
विप्रांचींही भव्य स्थानें जाती पापें ज्यांच्या गौनें. ॥ ४०
वाताच्या पुत्रातें ध्याल्या[6] 'आलों' हें सांगाया भ्राल्या[7] ।
आधीं वात्सल्यें तो[8] प्रेषी ज्याचे होती मुक्त द्वेषी[9]. ॥ ४१
शुद्धा बुद्धा[10] सेवासक्ता भेटे श्रीश भ्राल्या भक्ता, ।
राजस्थानीं ठाके[11] तातें जें[12] द्यावें दे साकेतातें[13]. ॥ ४२
तो वारी भूतापा[14] राजा, 'संसाराब्धीच्या पारा जों[15]' ।
हें सांगे, जो दासा मोरा[16] ये द्याया मोदा[17] सामोरा. ॥ ४३

### उपसंहार.

(अनुष्टुभ्वृत्त.)

रामात्मजें मयूरें हें रामायण कथासुधा ।
वाहिलें रामचरणीं तर्पाया रसिकां बुधा. ॥ १

---

## ४४. सूरारामायण[18].

(सूरा वृत्त.)

देवर्षिंहीं संप्रार्थिला तो उद्धरी जो वारणा[19] ।

---

१. कुबेराच्या पुष्पकविमानांत. २. सेतु+आलोक+तृ० प्र०. सेतूच्या अवलोकनानें. ३. त्या तारेतें. ४. त्या पुष्पकविमानांत. तारेला किष्किंधेहून आणवून विमानांत बसविली. ५. नामस्मरणानें. ६. निरंतर रामचिंतन करणाऱ्याला. ७. नंदिग्रामीं असलेल्या भरताला. ८. राम. ९. वैरी. भगवद्भक्तापेक्षां भगवद्द्वेषी अगोदर मुक्त कां होवात याचें रहस्य महीपतीनें 'तुकारामचरित्रां'त उत्तमरीतीनें सांगितलें आहे. १०. ज्ञात्या. ११. विराजमान होतो. १२. जें सुख. १३. अयोध्येला, अयोध्येंतील लोकांला. १४. पृथ्वीच्या पीडेला. १५. परतीराला जा. १६. मोरोपंताला. १७. आनंदाला. १८. हिंदुस्थानी भाषेंत जसें 'दोहा' वृत्त आहे त्याप्रमाणें 'सूरा' म्हणून एक वृत्त आहे. अशा वृत्तांत लिहिलेल्या पद्याच्या प्रत्येक चरणांत तगण व मगण असे दोन गण असून शेवटीं एक लघु व एक गुरु अक्षर असतें. हें अष्टाक्षरी चरणांचें वृत्त होय. १९. गजेंद्रास. गजेंद्राला नक्रानें धरिला तेव्हां त्यानें श्रीविष्णूची भक्तिपुरःसर प्रार्थना केल्यावरून त्याचा भगवंतांनीं उद्धार केला ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.

सूर्यान्वयीं जन्मे स्वयें दिकं[1]धराच्या मारणा. ॥ १
शक्राचिया ख्याता सख्या दिक्स्यंदना[2] दे तातता[3] ।
झाला चतुर्मूर्तित्व[4] जें तेणें महा[5] देता तता[6]. ॥ २
ज्येष्ठात्मजा ठेवी वसिष्ठाच्या मतें तो राम हें ।
नाम क्षितीचा वल्लभ श्रीमान् सुधी थोरा[7] महें[8]. ॥ ३
आधीं 'भ' या वर्णापुढें यावें 'र' 'त' स्थापी असें ।
जी केकयाची नंदिनी तन्नंदना राजा [10]रसें. ॥ ४
दोघे सुमित्रा जी तिचे जो पूर्वजन्मा[11] लक्ष्मणा, ।
श्रीरामचंद्रासीं तया साहे न विश्लेष[12] क्षण. ॥ ५
शत्रुघ्न या नामें दुजा रामानुजीं हा सादर, ।
स्पर्शो न दे ज्याचें यश स्वप्नांतही दासा दर[13]. ॥ ६
जागा तिळ [14]श्रीशोदर्यीं [15]राष्ट्रीं [16]पुरीं खेदा नसे ।
संस्कारिले[17] दोघे सुत श्रीकौशिका[18] दे दानसे[19]. ॥ ७
ज्याच्या जयें अत्यद्भुतें चित्तीं धरी कंपा दिती[20] ।
श्रीगाधिजापासूनि ते अस्त्रें [21]पथीं संपादिती. ॥ ८
कृत्या तसी क्षोभे, पथीं रोधी तपस्याहाटका[22], ।
[23]त्यांच्या निदेशें मारिली श्रीराघवें ती ताटका. ॥ ९

---

१. रावण, दशकंठ. २. दशरथाला. ३. पितृता. पिता ही पदवी. ४. परमेश्वरानेंच राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न असे चार देह धारण केले. ५. आनंदा. ६. बापाला. ७. मोठ्या. ८. उत्सवें. ९. 'भ'च्या पुढें 'र', 'त' म्हणजे 'भरत' असें नांव कैकेयीच्या पुत्राचें स्थापी, ठेवी. १०. आनंदानें, प्रीतीनें. ११. आधीं जन्मलेला. १२. वियोग. १३. भय. १४. श्रीचा ईश म्हणजे विष्णु याचा कौसल्येच्या उदरीं जन्म झाल्यावर. १५. सर्व राज्यांत. १६. अयोध्या नगरीमध्यें. १७. जातकर्म वगैरे १६ संस्कार आहेत त्यांपैकीं लग्नाच्या आधींचे सर्व संस्कार केले. १८. विश्वामित्रास. १९. उसने दिले. राक्षस यज्ञांचा विध्वंस करित असत म्हणून यज्ञसंरक्षणासाठीं विश्वामित्रानें दशरथापासून राम लक्ष्मण या शूर राजपुत्रांस मागून घेतलें होतें हें प्रसिद्धच आहे. २०. दिति ही कश्यप ऋषीची भार्या आणि दैत्यांची जननी. आपल्या पुत्रांस मारणाऱ्याला अद्भुत जयप्राप्ति होत आहे असें पाहून आईच्या चित्तांत भीति उत्पन्न झाली हें साहजिकच आहे. २१. मार्गांत. २२. तपश्चर्यारूप सुवर्णास. २३. विश्वामित्राच्या. स्त्रियेवर हत्यार कसें उचलावें ही रामास शंका आली, पण गुरूची आज्ञा झाली म्हणून रामानें ताटकेचा वध केला.

सिद्धाश्रमीं श्रीगाधिज स्वस्थें मनें यागा सजे, ।
ते राक्षस [1]व्यापादिले कर्ते बळें [2]आगास जे. ॥ १०
श्रीगौतमें शापूनियां केली [3]महामाना शिला, ।
तो तापही तो [4]लौकिकें स्पर्शें पदाच्या नाशिला. ॥ ११
[5]श्रीकंठचापारोपण [6]श्रीमैथिलें केला पण, ।
श्रीश क्षणें तो पूरवी भंगूनियां [7]त्यां आपण. ॥ १२
सीता रमा रामा वरी, तीच्या तिघी [8]भव्या [9]स्वसा, ।
त्याही तिघां रामानुजां दे धन्य हो [10]राजा असा. ॥ १३
तो मैथिल श्रीगाधिजें आज्ञापिला तें आदरी, ।
चारी विवाह प्रोत्सवें [11]भ्रात्यासह प्रेमें करी. ॥ १४
[12]स्वर्णांबरें रत्नें [13]हरी सुस्यंदन क्षोणीवरी ।
भारी [14]सुरेभाच्या परी दे जावया राजा [15]करीं. ॥ १५
पुत्र स्नुषा घेऊनियां [16]राजा निघे, मार्गीं [17]भैया ।
दे काळसा, ज्याच्या मनीं नाहीं कधीं कांहीं दया. ॥ १६
दावी स्वतेजाची कळा राम प्रभु [18]क्रूराशया ।
रक्षी, स्वधर्मीं बोधुनि स्थापी [19]जगद्भर्ता तथा. ॥ १७
हर्षे अयोध्या स्वामिच्या भाग्योदयें हे साजली, ।
ऐसी [20]सुरेशाची जयें नाहीं कधींही गाजली. ॥ १८
योग्य स्वपुत्र [21]क्ष्मावनीं झाला म्हणे [22]राजा मनीं, ।

---

१. मारिले. २. अपराधास. ३. मोठ्या मानाची अहल्या. सर्व लोकांस वंदनीय अशी. 'महामांना' हें 'शिळे'चें विशेषण केल्यास 'मोठ्या प्रमाणाची, मोठी' असा अर्थ होतो. तथापि 'महामाना' नामच घ्यावें हें बरें दिसतें. ४. दुर्लौकिक, अप्रतिष्ठा. ५. शिवधनुष्य. ६. जनकराजानें. ७. धनुष्यास. ८. सुंदर. ९. भगिनी. १०. जनक राजा. राजाला असे चौघे जांवई मिळाले म्हणून संतोष झाला. ११. कुशध्वज म्हणून जनकाचा भाऊ होता. १२. जरीचीं वस्त्रें. १३. मनोहर, अश्व. १४. इंद्राच्या ऐरावतासारखे हत्ती. १५. स्वहस्तानें. १६. दशरथ राजा. १७. मार्गामध्यें परशुरामानें विघ्न आणिलें. परशुरामानें जनकास शिवचाप दिलें होतें तें श्रीरामानें मोडलें म्हणून परशुरामास क्रोध आला. त्यानें रामास युद्धास बोलाविलें म्हणून दशरथास भीति उत्पन्न झाली. क्षत्रियांविषयीं परशुरामास दया नव्हती हें त्यानें एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली त्यावरून व्यक्त होत आहे. १८. क्रूरतेचा सांठा. क्रूरतेचा सागर जो परशुराम त्याचा रामानें पराभव केला. १९. रामचंद्र. २०. देवेंद्राची नगरी. २१. क्ष्मा+अवनीं=पृथ्वीचें संरक्षण करण्यास. २२. दशरथ.

[५]रामीं असे [१]बर्हीं [२]घनीं कीं [३]एण सारे [४]सुस्वनीं. ॥ १९
त्या [६]यौवराज्य [७]क्ष्मापती देवूं सजे, त्याची [८]सती, ।
[९]स्वार्थोत्सुकीं देवीं अतिभ्रांता तिची केली मती. ॥ २०
'द्यावे [१०]वर प्रेमें दिले जे [११]सत्यवाक्चूडामणे ! ।
मत्पुत्र हो राजा, वनीं राम, प्रिया !' ऐसें म्हणे. ॥ २१
सत्यव्रता राया जरी संप्रार्थिली न स्त्री [१२]वळे, ।
तत्काळ तें मान्य [१३]प्रभु स्नेहें करी जेव्हां कळे. ॥ २२
ताताचिया [१४]सत्यावना [१५]जाया वना, [१६]ती पावली ।
वेळा भली श्रीशा गमे [१७]कीर्तिप्रदा झेंपावली. ॥ २३
सीता सती राहेल कां? [१८]कीं [१९]स्वामिची ती सावली, ।
सौमित्रिच्या [२०]तों मानसीं हें बाप [२१]तो [२२]ती मावली. ॥ २४

---

१. मोर. २. मेघोदय झाला असतां. ३. हरिण. ४. सुंदर गाणें चाललें असतां. मेघोदय झाला म्हणजे मोरांस आनंद होतो, किंवा सुंदर आलापांनीं हरिणांचें चित्त वेधून जातें त्याप्रमाणें रामचंद्राचा भाग्योदय पाहून राजा व प्रजा यांस अत्यंत आनंद झाला. ५. रामचंद्राला. ६. युवराजाचा अधिकार. ७. पृथ्वीपति दशरथ. ८. कैकेयी. ९. स्वार्थोत्सुकीं देवीं तिची मति अतिभ्रांता केली म्हणजे स्वार्थाविषयीं म्हणजे रावणाच्या वधाविषयीं आतुर झालेल्या देवांनीं कैकेयीच्या बुद्धिला विपर्यास करून तिच्याकडून वदविलें. 'म्हणे' हें २१ पद्यांत क्रियापद आहे त्याचा कर्ता 'त्याची सती' हा होय. १०. देवदैत्यांचें युद्ध चाललें असतां देवांनीं दशरथास साह्यार्थ बोलाविलें होतें. कैकेयीस घेऊन राजा युद्धास गेला. युद्ध चाललें असतां ऐनवेळीं रथाचा कणा मोडला. तेव्हां कैकेयीनें आपल्या हाताचा कणा करून राजाचें कार्य केलें. युद्धानंतर 'कोणते पाहिजे ते दोन वर माग. मी ते पूर्ण करीन' अशी राजानें तिला भाक दिली होती, तिचें स्मरण करून कैकेयीनें राजास दोन वर मागितले. ११. सत्य म्हणजे खरें बोलणाऱ्यांमध्यें अग्रगण्य राजा. १२. जरी पुष्कळ प्रार्थना केली, तरी कैकेयी 'सत्य हेंच व्रत त्याचें अशा दशरथ राजास वळली नाहीं म्हणजे राजाचें तिनें ऐकिलें नाहीं.' १३. रामचंद्र. रामचंद्रास हा वृत्तांत कळला तेव्हां त्यानें आनंदानें राजाचें म्हणणें मान्य केलें. १४. सत्याचें रक्षण करण्यासाठीं. १५. जाण्याची. १६. ती वेळा. (हा शब्द पुढील अर्धांत आहे.) १७. कीर्ति देणारी वेळा प्राप्त झाली, असें रामचंद्रास वाटलें. १८. कारण कीं. १९. आपल्या पतीची. पंतांचा आशय हा आहे कीं पतिव्रता स्त्री ही आपल्या पतीची सावलीच असते. जिकडे पति जाईल तिकडे ती सावलीप्रमाणें जावयाचीच. अशी सीता सती रामचंद्र वनांत जाण्यास निघाल्यानंतर मागें राहील काय? अर्थातच नाहीं. २०. तर. सौमित्र=लक्ष्मण. २१. रामचंद्र. २२. सीतादेवी. रामचंद्र पिता व सीता ही आपली माता हें लक्ष्मणाच्या ध्यानीं मनीं; तेव्हां तोही आपल्या ज्येष्ठ भ्रात्याबरोबर वनवासास निघाला.

‘द्वि[1]:सप्तवर्षें तों वनीं [2]वन्यें रहा, [3]वल्कें वहा, ।
[4]साकेतसें तूं अन्यही मध्यें असेव्यत्वें पहा.’ ॥ २५
[5]माता असें मोहें वदे, श्रीराम घे आज्ञा, निघे, ।
[6]हा काननीं जैसा तसा शोक प्रजाचित्तीं रिघे. ॥ २६
मंत्री सुमंत्र स्यंदन प्रेषी पिता पुत्राकडे, ।
[7]तोकासु तो वृद्ध क्षमाभर्ता महाशोकीं पडे. ॥ २७
भक्ता गुहा श्रीदर्शन [8]स्वःसिंधुच्या तीरीं घडे, ।
[9]स्थानीं भरद्वाजा स्वयें [10]संब्रह्म जें तें सांपडे. ॥ २८
[11]वैकुंठवासी आदरें श्रीचित्रकूटीं राहिला, ।
तेथील जे योगी तिहीं [12]भाग्योदयीं हा पाहिला. ॥ २९
सांगे गुहाचा [13]चार [14]हें मंत्री पुरीं [15]दिक्स्यंदना, ।
[16]ज्येष्ठालयीं देह त्यजी शोकें, म्हणे, ‘हा! नंदना!’ ॥ ३१
[17]जीच्या महालोभें [18]श्रितस्वर्द्रु क्षणें [19]हा [20]खाणिला, ।
तद्बंधुच्या होता पुरीं [21]तत्पुत्र जो तो आणिला. ॥ ३१
तेणें [22]प्रसू धिक्कारिली, केली बरी तातक्रिया, ।
संप्रार्थिलें भेटोनियां [23]याया पुरा [24]विश्वप्रिया. ॥ ३२
स्वामी वदे, ‘म्यां त्वांहि बा! [25]संपादुनी आज्ञा, पित्या ।

१. चौदा वर्षेंपर्यंत. २. वनांतील वस्तूंवर. ३. झाडाच्या सालींचीं वस्त्रें. ४. तूं (रामचंद्र) अन्यही (लक्ष्मण) मध्यें (चौदा वर्षांच्या अवधींत) साकेतसें (अयोध्या) असेव्यत्वें (सेवा करून घेण्यास अयोग्य अशा रीतीनें) पहा. म्हणजे या चौदा वर्षांच्या कालांत रामलक्ष्मण या दोघांनींही अयोध्येंत राहूं नये व प्रजेकडून सेवा करून घेऊं नये असा कैकेयीच्या बोलण्यांतील भाव. ५. कैकेयी. ६. रामचंद्र. रामचंद्र वनांत जाण्यास निघाल्याबरोबर प्रजेच्या मनांत शोकानें आपलें ठाणें दिलें. ७. पुत्रच प्राण ज्याचे असा दशरथ तो. ८. भागीरथी-नदीच्या. ९. आश्रमांत. १०. विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय होण्यास आदिकारण जें ब्रह्म त्यानें रामाचा अवतार घेतला होता म्हणून श्रीरामास सद्ब्रह्म म्हटलें आहे. ११. नेहमीं वैकुंठलोकीं राहणारा. १२. त्यांचें (योग्यांचें) भाग्य उदयास आलें तेव्हां. १३. समाचार. १४. हें म्हणजे रामाचें गंगा उतरून पलीकडे जाणें. १५. दशरथास. १६. कौसल्येच्या मंदिरांत. १७. कैकेयीच्या. १८. आश्रितांचा कल्पवृक्ष. १९. राम. २०. एका क्षणांत खणून टाकिला. २१. कैकेयीचा पुत्र भरत. २२. माता. २३. यावयास. २४. विश्व म्हणजे सर्व ब्रह्मांड आहे प्रिय ज्याला असा श्रीरामचंद्र. २५. मान्य करून.

पुत्रें सदा थावें सुख.' [1]श्रेयःक्रिया आज्ञापि त्या. ॥ ३३
'वत्सा! तुझ्या [2]हृन्नीरजा संताप हा न व्यापु, न्हा ।
[3]बोधामृतीं, मद्दर्शनें पाव प्रिया नव्या पुन्हा.' ॥ ३४
सिंहासनीं पूजावया तो पादुका मागोनि घे, ।
त्यांतें शिरीं स्थापूनियां तत्सेवनीं [4]जागों निघे. ॥ ३५
'नंदी' असें यन्नाम त्या ग्रामीं वसे [5]वन्याशि, या ।
वृत्तें जगा तारी, करी ख्यात स्वका [6]धन्याशया. ॥ ३६
स्वामी वनीं अत्र्यादि जे [7]कुंभोद्भवांत [8]क्ष्मासुर, ।
प्रेमें तयां भेटे, करी विश्वीं [9]महत्वें [10]भासुर. ॥ ३७
[11]गृध्रा सख्या ताताचिया मानी पिता, [12]मोदा वरी, ।
राहे तटीं, मावे यशें [13]कांडीं न ती [14]गोदावरी. ॥ ३८
जी रावणाची ये [15]स्वसा पाहे हरूं [16]सीतापदा, ।
[17]नासाश्रुतिच्छेदाकुळा केली [18]कुधी ती तापदा. ॥ ३९
भ्राता तिचा नामें [19]खर क्रोधें वधूं आला खर ।
[20]स्वर्गीश [21]ज्या भी [22]सोमर, श्रीशापुढें तो पामर. ॥ ४०
लीलालवेंचि श्रीश तो आधीं वधी त्याच्या [23]वेळा, ।
श्रीरुद्र जैसा [24]अंधका मत्ता, मग द्वेष्टया [25]खेळा. ॥ ४१

---

१. पुण्यप्राप्ति होईल अशा क्रिया, कृत्यें. २. हृत्कमल, अंतःकरण. ३. विवेक हेंच अमृत. यांत स्नान केल्यावर संताप होणार नाहीं हें उघडच आहे. ४. जागण्यासाठीं, अहर्निश त्या पादुकांची सेवा करण्यासाठीं. ५. अरण्यसंबंधी फलादि भक्षण करणारा. ६. धन्य असा जो आशय=हेतु. आपल्या सद्धेतूस जगविख्यात करी. 'आशय' याचा अर्थ 'ठिकाण' केल्यास नंदिग्रामाची कीर्ति भरतानें सर्वत्र पसरविली. ७. कुंभ=घट+उद्भव=उत्पन्न झाला. घटोद्भव=अगस्तिपर्यंत सर्व. ८. भूदेव, ब्राह्मण. ९. मोठीं कृत्यें. १०. तेजस्वी. ११. जटायूला. १२. आनंदाला. १३. ब्रह्मांडीं. १४. गोदावरीच्या तटाकीं श्रीरामचंद्रांनीं वसति केल्यामुळें तिचें यश (कीर्ति) सर्व विश्वांत मावेना. तात्पर्य सर्वत्र तिची ख्याति झाली. १५. शूर्पणखा. १६. सीतेची पदवी हरण करून घेण्याकरितां म्हणजे श्रीरामाचें स्त्रीत्व संपादण्यासाठीं. रामचंद्राची सुंदर मूर्ति पाहून शूर्पणखेला कामज्वरानें फारच पीडा दिली होती. १७. नासा (नाक)+श्रुति (कान)+च्छेद (कापणें)+आकुला (व्याकुळ झालेली). नाक व कान कापल्यामुळें दुःखित झालेली. १८. वाईट बुद्धीची. १९. राक्षसविशेष. २०. देवेंद्र. २१. खरास. २२. युद्ध. २३. सैन्याला. २४. राक्षसविशेष. २५. खरासुराला.

दिक्कंधर क्षोभे जनस्थाना पहातां ओस, हा ।
बोले, 'अरे रामा! [1]महा दुःखा वियोगी हो, सहा.' ॥ ४२
मारीचनामा राक्षसा [2]स्वर्णैणता दे [3]शोभवी, ।
धाडी बळें रामाश्रमीं, [4]तो जानकीतें लोभवी. ॥ ४३
ती त्या धराया पाठवी, स्वामी निघे, ज़ाणों [5]वश, ।
भ्रात्या कथी स्त्रीरक्षण, स्वर्गीं जगीं व्हाया यश. ॥ ४४
खोटा मृग त्रासे मनीं, [6]प्राणावना वेगें पळे, ।
ताडी शरें मर्मीं प्रभु [7]क्रव्याद, हें जेव्हां कळे. ॥ ४५
'हा भूसुते! हा लक्ष्मणा!' फोडी असी हाक, क्षया ।
पावे, विलंघी संमतें देवा दवा हा [8]कक्ष या. ॥ ४६
भी [10]भूमिजा, [11]नाथावना जाया कथी ती दे[12]वरा, ।
[13]जो 'हे' म्हणे 'माया, नसे चिंता जगीं धन्वीश्वरा.' ॥ ४७
बोले कटु, [14]क्रोधें नता [15]त्यां [16]प्राकृतस्त्री सारखी ।
कार्या सुरांच्या [17]ईश्वरी झाली स्वभक्तीं पारखी. ॥ ४८
साश्रु त्यजी [18]सीतोटजा [19]तो [20]कीं म्हणे त्या जाचि [21]ती ।
आर्याकडे गेला वनीं, झाली [22]परासी जाचिती. ॥ ४९
तों ये कुधी दिक्कंधर, [23]श्रीतें हरी, वाहे रथीं, ।

---

१. वियोगी हो म्हणजे स्वस्त्रीच्या वियोगानें दुःखी हो आणि हें महा दुःख येईल त्यातें सहन कर. २. सुवर्णमृगत्व. ३. सुंदर. शोभा देणारी. मनोहारी. ४. मारीच. ५. श्रीराम हे जणों काय सीतादेवीच्या ताब्यांतच होते! श्रीरामास पुढें काय होणार हें माहित होतें पण आपली या लोकीं व परलोकीं कीर्ति विस्तारण्यासाठीं रामचंद्र सुवर्णमृगाच्या मागें लागून गेले, हें सांगण्याचा कवीचा हेतु आहे. ६. प्राणसंरक्षणासाठीं. ७. राक्षस. ८. देवासंमतें विलंघी; या दवा हा कक्ष—हा अन्वय. म्हणजे देवाच्या संमतीनें मारीच राक्षस वि म्हणजे आकाश लंघून गेला अथवा स्वर्गास गेला. रामरूपी वणव्याला मारीच हा तृणवल्लीच होता झाला. ९. तृण आणि वल्ली. १०. सीता. ११. रामाच्या रक्षणार्थ. १२. दीर जो लक्ष्मण त्याला. १३. लक्ष्मण म्हणे, 'हे माया आहे. धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ अशा रामचंद्रास जगांत चिंता उत्पन्न करणारा शत्रु नाहीं.' अर्थात् सीतेनें भिऊं नये म्हणून ही लक्ष्मणाची उक्ति आहे. १४. क्रोधानें जिंकलेली, क्रोधाला वश झालेली. १५. लक्ष्मणाला. १६. सामान्य स्त्री. १७. आदिमाया सीता देवी देवांचें कार्य व्हावें म्हणून आपला भक्त जो लक्ष्मण त्याचे ठिकाणीं भेदबुद्धि मानणारी झाली. १८. सीता आणि पर्णशाला. १९. लक्ष्मण. २०. कारण. २१. सीता. २२. लक्ष्मणास. २३. सीतेला.

गांठी तिच्या आर्तस्वरें [2]गृध्रेंद्र या पापा पथीं. ॥ ९०
बोधें स्नुषा सोडूनि दे [3]अत्याग्रही तो मंद न ।
क्रोधें चुरी चंचुप्रहारांनीं जटायु [4]स्यंदन. ॥ ९१
सोडी [5]सती, [6]उग्रासिनें [7]तोडी खगाच्या [8]पक्षती, ।
मोडी नयातें, दुष्क्रिया जोडी, बळें ने दक्ष ती. ॥ ९२
नेतां नभोमार्गें [9]त्यजी [10]भूषा निजा [11]कीशांत ती, ।
लंकापुरींत स्थापिली पापें [12]अशोकाव्हीं सती. ॥ ९३
सौमित्रिच्या [13]वक्रें वनीं श्रीचीं कटूक्तें सेवुनी, ।
[14]शून्या स्वशाला देखतां झाला त्वरेनें येवुनी. ॥ ९४
[15]लीलामनुष्य स्त्रैणसा 'हा! हा!' वदे, शोधी वनीं, ।
बाहेर भारी शोक, [16]न श्रीवल्लभाच्या तो मनीं. ॥ ९५
गृध्राननें 'दिक्कंधरें नेली' असें ऐके, तया ।
तातापरी [17]संस्कारुनि श्रीश स्वयें पाजी पया. ॥ ९६
[18]यीं प्रार्थना वारावया कांहीं न [19]बंधा लागती, ।
तत्काळ दे खाया धरी जो त्या कबंधाला [20]गती. ॥ ९७
मोठे कवी गाती सदा हे [21]मोहभिल्लीला भली, ।

---

१. तिच्या आर्तस्वरें गृध्रेंद्र या पापा (रावणाला) पथीं गांठी–हा अन्वय. २. जटायु. ३. तो रावण मंद बुद्धीचा व हट्टी म्हणून त्याला जटायूनें आपली स्नुषा (सीता) सोडून देण्याविषयीं पुष्कळ बोध केला. पण तो सोडून देईना. ४. रावणाचा रथ. ५. जटायूनें सीतेस सोडविलें. ६. प्रखर शस्त्रानें. ७. रावण तोडी. ८. पिसांचीं मूळें. ९. सीता आपले अलंकार टाकून देती झाली. १०. अलंकार. ११. वानरयूथांमध्यें. १२. अशोक नांवाच्या वनांत. १३. लक्ष्मणाला सीता दुरुक्तें बोलली तीं त्याकडून ऐकून घेऊन. १४. आपला आश्रम सीतेविना शून्य आहे असें रामानें पाहिलें. १५. मनुष्यासारखीं कृत्यें करणारा. १६. कारण त्याला पुढें देवकार्य कर्तव्य होतें. १७. जटायूचा पराभव रावणानें केला व त्यास मरणोन्मुख करून निघून गेला. पुढें राम येईपर्यंत जटायूनें प्राण धरिला. 'सीता रावणानें नेली' असें सांगून त्यानें प्राण सोडिला. पुढें रामचंद्रांनीं आपल्या बापाचा स्नेही म्हणून त्याची उत्तरक्रिया यथासांग केली. १८. रामा. १९. बंधा वारावया या कांहीं प्रार्थना न लागती–हा अन्वय. म्हणजे संसारतापत्रय वारण्यासाठीं रामाची कांहीं प्रार्थना करावी लागत नाहीं. कबंधासुराचेंच प्रत्यक्ष उदाहरण घ्या. जो राक्षस रामाला खाण्यासाठीं आला, त्याला श्रीशानें तात्काळ मुक्त केलें! २०. मुक्ति. २१. मोह नाश करणारी लीला.

थोरें[1] रसें बोरेंहि दे, ती[2] मुक्ति भिल्ली लाभली. ॥ ५८
पंपातटीं 'हा! हा!' वदे तें वर्णितां मोहा हरी[3], ।
जो वायुभू[4] जो सूर्यभू[5] केला सुखी तो हा हरी. ॥ ५९
श्रीवल्लभें ते क्षाळिले[6] स्वास्त्रें[7] अलंकार क्षण, ।
केलें सख्याचें[8] वारुनि त्रासा[9] कलंका रक्षण. ॥ ६०
शक्रात्मभू[10] कीश क्षमापाळ स्वयें वाळी बळी, ।
गर्वें करूं येतां कळी[11] दिक्कंधरातें तो छळी. ॥ ६१
स्त्रीतें[12] हरी, भ्रात्यासिही[13] मारावया पाहे अरी[14], ।
त्यातें वधी, तद्राज्य दे भक्ता सुकंठा[15] श्रीहरी. ॥ ६२
खंव्योमपृथ्वी[16] योजनें पाथोधितें[17] लंघी हरी[18], ।
वातात्मभू मुद्रा सतीतें दे, मति[19] स्वस्था करी. ॥ ६३
रक्षश्चमू शाखी[20] चुरी, जाळी बळें लंकापुरी, ।
आनंदवी[21] नागी[22] सुरी[23] होय द्विषद्वक्षीं[24] सुरी[25]. ॥ ६४
श्रीराघवा आणूनि दे भूयोनिचा[26] चूडामणी[27], ।
स्वामी निवे भेटोनियां त्या, चंदना जैसा फणी[28]. ॥ ६५
वर्णी प्रतापा सद्यशा प्रेमें त्रिलोकींचा धणी[29], ।
साक्षात् स्वंजीवातु[30] स्वयें[31] या अंजनापुत्रा[32] गणी. ॥ ६६
देवांश जे मोठे बळी ऋक्षप्लवंगांचे[33] पती ।
नेले समुद्राच्या तटीं, ज्यांची महासंख्या[34] गती. ॥ ६७

---

१. मोठ्या प्रेमानें. २. ती भिल्ली (शबरी) मुक्ति लाभली. ३. हरण करी. ४. मारुति. ५. सुग्रीव. ६. भिजविले. ७. आपल्या नेत्रोदकें. ८. सुग्रीवाचें. ९. संकटातें व डाग लागला होता त्यातें वारून. १०. वाली. ११. भांडण. गर्वानें रावण वालीशीं संग्राम करण्यासाठीं गेला होता, त्यास धरून वालीनें रावणाला मुलाच्या पाळण्यावर खेळणें करून ठेविलें होतें. १२. सुग्रीवाची स्त्री तारा. १३. सुग्रीवास. १४. वाली. १५. सुग्रीवाला. १६. ख=०; व्योम=०; पृथ्वी=१=१०० योजनें. ४०० कोस. १७. समुद्राला. १८. वानर. १९. सीतेचें मन. २०. वृक्ष. २१. नागस्त्रियांस व देवस्त्रियांस आनंद झाला, कारण रावणाच्या मरणाची वेळा जवळ आली असें त्यांस दिसूं लागलें. २२. नागस्त्रिया. २३. देवस्त्रिया. २४. शत्रूच्या वक्षस्थळीं. २५. शस्त्रविशेष. २६. सीतेचा. २७. अलंकारविशेष. २८. नाग, सर्प. २९. त्रैलोक्यस्वामी रामचंद्र. ३०. आपलें वांचण्याचें औषध. ३१. स्वतः आपल्या मनांत मारुति हा आपले प्राण वांचविणारा आहे असें मानी. ३२. मारुति, हनुमान्. ३३. आस्वल आणि वानर. ३४. मोठी. ज्यांची गति फार मोठी होती.

ये [1]रावणभ्राता, नमी, त्या राज्य दे, मी सागर, ।
प्रार्थी निदे[2]शातिक्रमें, जैसा [3]स्वनाथा [4]नागर. ॥ ६८

सेतु प्रतापें निर्मिला, [5]अत्यद्भुतश्री पाहिला, ।
माथां समुद्रें हारसा अत्यादरें जो [6]वाहिला. ॥ ६९

पावे अहोरात्रत्रयें [7]पारा [8]बळाकूपार हा, ।
गर्जे, म्हणे, 'आलों उगा तुच्छा खळा कूपा रहा.' ॥ ७०

[9]सुग्रीव त्या दिक्कंधरा 'भंगा' म्हणे 'आधीं सहा,' ।
जो बोलवी शक्रादिकां देऊनियां आधींस '[10]हां!' ॥ ७१

[11]वाल्यात्मजें दूतें [12]प्रभूक्तें बोधिलें जें अंगदें, ।
नाहींच तें स्वीकारिलें दिक्कंधरें [13]सद्भंगदें. ॥ ७२

आरंभिलें [14]दुर्मंत्रितें अत्याग्रहें जें उद्धतें, ।
एके दिसीं ही न [15]स्थिरा स्वल्पा जया दे युद्ध तें. ॥ ७३

[16]तप्तीं जसीं लोहीं जळें नाहींच तीं झालीं बळें, ।
[17]मेघस्वनें स्वामी [18]खळें केले रणीं बद्ध [19]च्छळें. ॥ ७४

ते नागपाश [20]स्वस्वनें [21]नागांतकें नेले लया. ।
त्या [22]सानुज स्वामी म्हणे, 'बापा! तुवां केली दया.' ॥ ७५

---

१. बिभीषण. २. स्वमर्यादेचें उल्लंघन करून. ३. भ्यालेला नागरिक जसा मर्यादा सोडून राजाची प्रार्थना करितो, त्याप्रमाणें भीति पावलेल्या सागरानें आपली नेहमीची मर्यादा सोडून देऊन रामाची प्रार्थना केली. ४. नगरांत राहणारा, नागरिक. ५. अति विलक्षण आहे शोभा ज्याची. ६. सेतु. ७. समुद्राच्या पलीकडील तीरास तीन दिवसांत गेला. ८. बळाचा समुद्र. ९. शक्रादिकां आधींस (त्रास) देऊन (त्यांच्याकडून) 'हा!' बोलवी त्या दिक्कंधरास सुग्रीव म्हणे, 'आधीं (प्रथम) भंगा (समुद्रभंग केला त्यास) सहा (सहन कर.)' १०. हाय! ११. अंगद. १२. रामानें सांगितल्याप्रमाणें, रामाच्या शब्दांनीं. १३. चांगल्यांचा नाश करणाऱ्या रावणानें. १४. वाईट मंत्र अगर संकल्प करून, वेड्यासारखे बेत करून. १५. कायमच्या. रावणानें वेडेपणा करून ज्या युद्धास आरंभ केला, त्यांत त्याला एक दिवसही कायमचा असा लहानसा जय मिळाला नाहीं. १६. तप्तीं लोहीं जसीं जळें (तशीं) तीं बळें नाहींच झालीं—हा अन्वय. म्हणजे तापलेल्या लोखंडावर ठेवलेलें पाणी जसें क्षणमात्रांत नाहींसें होतें, तद्वत् शत्रूचीं बळें नाहींशीं झालीं. १७. इंद्रजित्. रावणाचा मुलगा यानें. १८. दुष्ट राक्षसानें. १९. मायेच्या योगानें राम लक्ष्मण दोघेही युद्धांत बद्ध केले. सर्पांच्या पाशांनीं त्यांस बद्ध केलें. २०. आपल्या गर्जनेनें. २१. गरुडानें. २२. लक्ष्मणासह.

कुंभश्रवा मोहीं भरी, सुग्रीव तेंनासा हरी; ।
क्षोभे रणीं, भक्षी हैरी, त्याही व्यसु स्वामी करी. ॥ ७६
मेघध्वनि ध्वंसी बैळें, मोहीं खिळी स्वामीसही, ।
शैल्यार्त पाडी, सर्वही तेव्हां भयें कांपे मही. ॥ ७७
वातात्मभू ओषध्यगाच्या आणुनी शृंगा रेहा, ।
तेजो म्हणे, 'झाला जयश्रीचा महाशृंगार हा'. ॥ ७८
मायामयी सीता रणीं तो शक्रजित् पापी वधी, ।
'हा! हा!' म्हणे, मानी खरें ज्ञानामृताचा शेवधी. ॥ ७९
केला 'विभी'पूर्वे 'षणें' बोधूनियां हीं सावध, ।
भ्राता महेशाचा करी त्याचा शचीहासा वध. ॥ ८०
पुत्राचिया शोकें बहु क्षोभे कुंधी, तो घे असी, ।
सीतावधा धांवे, म्हणे, 'वांचो न हे दुष्टा असी.' ॥ ८१
भ्याली सती, 'हा!' बोलिली, हस्तीश जेणें तारिला ।
चिंती तया नाथासि, तों सुज्ञें सुपार्श्वें वारिला. ॥ ८२
द्वेषी पुन्हा मारावया प्रेषी महासेनाशतें, ।

१. कुंभकर्ण. २. त्याच्या नाकास. ३. वानर. ४. कुंभकर्णास. ५. विगतासु, गतप्राण. ६. वानरसैन्यें. ७. बाणानें पीडा झालेला असा. ८. पृथ्वी. रामचंद्र इंद्रजिताच्या मायेनें व शरवर्षावानें जेव्हां विव्हल होऊन खालीं पडले, तेव्हां सर्व पृथ्वी भयानें कांपावयास लागली. आपला भार उतरण्यासाठीं अवतार धारण केलेले रामचंद्र शरपंजरीं निर्माल्यवत् पडले असें पाहून भूमिदेवीस भीतीनें कांपरें सुटलें. शिवाय रामचंद्र हे तिचे जामात. तेव्हां सीतेच्या पतीची ही दशा पाहून बिचाऱ्या पृथ्वी सासूस भीति वाटणें हें साहजिकच आहे. ९. मारुति. १०. औषधांच्या पर्वताच्या शिरोभागास. ११. गुप्त असणाऱ्या. १२. तेजा (सूर्याला) म्हणे, 'हा (रामचंद्र) जयश्रीचा महाशृंगार (अतिमोलवान् अलंकार) झाला आहे. म्हणजे रामचंद्र सावध होऊन विजयसंपादनार्थ तयार झाला आहे'. असें मारुति सूर्यास सांगता झाला. सूर्यास सांगण्याचें कारण हें कीं, रामचंद्र सूर्यकुलोत्पन्न, तेव्हां रामास मूर्च्छा आल्यामुळें विमनस्क झालेल्या त्या तेजोराशीस उत्साह यावा. १३. मायेनें उत्पन्न केलेली, खोटी. १४. बहुमोल सांठा. ज्ञान हेंच अमृत याचा सागर जो रामचंद्र यासही खरें वाटून शोक झाला. १५. 'वि' 'भी' हे वर्ण पूर्वी ज्याच्या अशा 'षणें'=बिभीषणें. १६. राम. १७. रामाचा. १८. इंद्रजिताचा. १९. शची इंद्राची पत्नी तिला आनंद देण्यासाठीं. इंद्रजिताचा वध रामचंद्राच्या भावानें केला हें पाहून इंद्रपत्नीस आनंद झाला. २०. वाईट आहे दुष्टबुद्धि ज्याची असा (रावण). २१. तरवार. २२. गजेंद्र. २३. रावणाचा मंत्री. २४. मोठमोठालीं शेंकडों सैन्यें.

भ्याली, न जी आली पुढें, घाली रसें, झाली हतें. ॥ ८३
साहे विलापातें, न तो राहे पुरीं, पाहे बरें, ।
बाहेर ये, बाहे रणा, 'हा! हे चमू' बोले दरें. ॥ ८४
सौमित्रिला तो शक्तिनें ताडी उरीं, पाडी अरी, ।
श्रीरामही क्रोधें तया भंगी, गजा जैसा हरी. ॥ ८५
औषध्यगाचें शृंग तें आणी पुन्हा, त्यां वांचवी, ।
श्रीमारुति स्वच्छें यशें जीं दुर्लभें तीं सांचवी. ॥ ८६
स्वस्यंदन श्रीशा रणीं बैसावया धाडी हरी, ।
युद्धक्रतु श्रीराम दिक्तुंडासह क्रोधें करी. ॥ ८७
छेपन्नयाम क्रूर तो न श्रांत झाला, तोडिलीं ।
जीं मस्तकें, योगें शत क्षिप्र प्रसन्नें जोडिलीं. ॥ ८८
चिंता करी श्रीराम[11] तों श्रीकुंभभू[12] यीं भेटला, ।
तो मंत्र दे, त्याच्या जपें वातें शिखीसा[13] पेटला. ॥ ८९
सूर्यें दिला देवा वर, ब्रह्मास्त्र हें[14] योजी शरीं, ।
तो रावणीं झाला तसा जैसा पवि [15]क्षोणीधरीं. ॥ ९०
तैसा पडे उन्मूळिला वातें जसा मोठा नग[16], ।
ब्रह्मा [17]सदेवर्षि स्तवी, आनंदलें सारें जग. ॥ ९१

१. तीं सैन्यें भ्यालीं, पुढें येईनात. भयानें गांगरून गेल्यामुळेंच ठार मारलीं गेलीं. २. हांक मारी. ३. बाहेर येऊन रावणानें रामचंद्रास लढाईचें आमंत्रण दिलें, पण सेनेची दशा पाहून त्याला भयाचें वारें सुटलें व तो शोक करूं लागला. ४. रावणास. ५. लक्ष्मणास. ६. इतरांस न मिळणारीं अशीं कलंकशून्य यशें मारुतीनें सांचविलीं; म्हणजे निष्कलंक कीर्ति त्यानें स्वामीसेवा करून मिळविली. ७. इंद्र. ८. समररूपी यज्ञ. ९. सात दिवस. याम=प्रहर. १०. प्रसन्नें योगें शत जोडिलीं—हा अन्वय. क्षिप्र=लवकर. लवकर रावणाचीं शिरें जोडिलीं गेलीं, शंभर वेळ जोडिलीं गेलीं. कारण त्यानें पूर्वी जी उग्र तपश्चर्या केली होती, तिला प्रसन्न होऊन ब्रह्मदेवानें वर दिला होता कीं, 'पुनस्तानि (शीर्षाणि) भविष्यंति तथैव तव राक्षस.' [वा० रामायण—उत्तरकांड—सर्ग ७ पहा.] ह्यामुळें त्याचीं शीर्षें पुनःपुनः जेथल्या तेथें येऊन बसत. 'क्षिप्रप्रसन्न' असा समास केल्यास 'लवकर प्रसन्न होणारा ब्रह्मदेव' हा अर्थ घ्यावा; आणि 'ब्रह्मदेवानें आपल्या योगबळानें' असा अर्थ करावा. ११. अगस्तिऋषी. १२. रामास. १३. अग्निसा. १४. श्रीराम. १५. पृथ्वीवरील पर्वतावर. पर्वतावर जसें इंद्राचें वज्र पडतें तसा तो मंत्रयुक्त शर रावणावर पडला. १६. वृक्ष. १७. देवर्षींसह ब्रह्मदेव रामचंद्राचें स्तवन करूं लागला.

वाद्यें सुरांचीं वाजलीं, वर्षे प्रसूनांचा घन, ।
प्रेमें तसेही नाचले ज्यांचें तपस्या हें धन. ॥ ९२

'जैसा तुझा माझाहि बा तैसाचि हा, याची क्रिया ।
सांगा करीं सांत्वूनियां मंदोदरी राजप्रिया.' ॥ ९३

ऐसें नव्या लंकेश्वरा सांगोनि दे त्याला गती, ।
गाया कवी शत्रूसही कल्याणदेया लागती. ॥ ९४

लंकापुरींत स्थापिला सौमित्रिहस्तें तो भला, ।
विश्वांत या रामप्रभूत्तंसप्रसादें शोभला. ॥ ९५

दीतानळीं न्हाली सती, देवर्षिनीं ती वानिली, ।
अग्न्यादिदेवांच्या मतें श्री श्रीवरें संमानिली. ॥ ९६

ये दिग्रथ स्वर्गाहुनि, श्रीशा सुता भेटे, निवे, ।
तेव्हां शिव प्रेमें वदे, 'धन्य स्तवावा हा शिवे!' ॥ ९७

---

१. पुष्पांचा. २. ज्या ऋषींचें तप हेंच धन असे तपोधन ऋषी सुद्धां प्राकृतपुरुषासारखे नाचूं बागडूं लागले. आनंदातिरेकाचें हें लक्षण आहे. ३. 'रावण जसा तुझा भाऊ तसाच माझाही आहे म्हणून याची उत्तरक्रिया समग्र व यथाविधि कर व मंदोदरीचें शांतवन कर' असें श्रीरामचंद्रानें नव्या लंकेश्वरास म्हणजे बिभीषणास सांगितलें. केवढी ही रामचंद्राची उदारबुद्धि! आपल्यास प्रियपत्नीविरहाचें दुःख देणाऱ्या रावणासही ज्यानें बंधूसमान लेखिलें तो महापुरुष लोकांस वंदनीय होणें यांत कांहींच नवल नाहीं. 'मरणान्तानि वैराणि' हा मंत्र कितीकांस रुचतो? सारांश श्रीरामासारखें उदार अंतःकरण असणें ही सामान्य पुण्याईची गोष्ट नव्हे. ४. रावणाला मुक्ति दिली. ५. शत्रूसही कल्याणदेया कवी गाया लागती—हा अन्वय. रामासारखे पुरुष, कीं जे आपल्याशीं उभा दावा करणाऱ्या शत्रूंसही कल्याणदायक स्थिति देतात, त्यांची कीर्ति विस्तृत करण्याची प्रेरणा कवींस होते यांत कांहीं आश्चर्य आहे? ६. बिभीषण. ७. राम हा स्वामीश्रेष्ठ याच्या प्रसादानें बिभीषण या विश्वांत शोभावयास लागला. म्हणजे श्रीरामाच्या प्रसादामुळें या विश्वांत बिभीषणाचें नांव अजरामर झालें. बिभीषण-सप्त चिरंजीवांपैकीं एक होय. ८. धन्यांमध्यें तुऱ्यासारिखा म्हणजे श्रेष्ठ. ९. अग्निप्रवेशरूप दिव्य करण्याच्या प्रसंगीं. १०. सीता. ११. तिची स्तुति केली. १२. सीतादेवी. १३. ग्रहण केली. अग्नि, देव, ब्राह्मण यांच्या अनुज्ञेनें श्रीरामानें अग्निशुद्ध झालेल्या सीतेचा अंगिकार केला. सीतादेवी परक्याच्या घरीं होती, हा दोष निवारण करण्यासाठीं अग्नीचें दिव्य करावें लागलें व देवब्राह्मणांच्या अनुग्रहाची गरज लागली. १४. दशरथ. १५. समाधान पावला. पुत्रविरहानें दग्ध झालेलें दशरथाचें मन श्रीरामाची गांठ पडल्यावर शांत झालें. १६. हे पार्वती!

गुह होय जटादिकें श्रमी न भरद्वाजचि तत्वधी[1] शमी. ॥ ५
स्वसुखीं न दिसेचि तूट यो वदला[2] विध्वनि[3] चित्रकूट 'या,' ।
स्मरतां[4] सुत तापस त्यजी असु[5] राजा, करिं शाप सत्य जी[6]! ॥ ६
भरता गुरु[7] शीघ्र आणवी, जननी त्या कृतकार्य[8] जाणवी, ।
बहु निंदुनि साधु[9] तो तिस त्यजि, बोले, 'भुजगीच होतिस'. ॥ ७
करि साधु यथोचित क्रिया विधिनें लक्षुनियां[10] पितृप्रिया, ।
मग बंधुकडेचि सोडुनि[11] क्षिति गेला द्रुत[12] हस्त जोडुनि. ॥ ८
प्रभु त्या भरतासि युक्तिनें हितसत्यप्रियरूपसूक्तिनें[13] ।
निववी, करि तुच्छ कापुरा[14], फिरवी[15] देउनि पादुका पुरा. ॥ ९
करि अत्रिस राम वंदन, स्वपित्या जेंवि सुशीळ नंदन, ।
बहु भूमिसुतेसि गौरवी अनसूया, यश चंद्रगौर वी. ॥ १०
परमोग्र[16] विराध मारिला प्रभुनें, तुंबरु[17] भक्त तारिला, ।

१. तत्वज्ञानामध्यें पारंगत असलेले व इंद्रियनिग्रह करून समाधान पावलेले भरद्वाजऋषी यांस श्रीरामचंद्राचा जटावल्कलादिक वन्यवेष पाहून श्रम झाले नाहींत. गुह प्राकृतपुरुष, त्यास फार वाईट वाटलें. २. रामा. ३. शब्दरहित. मनुष्याची वसति जेथें नाहीं, असा चित्रकूट 'या' म्हणाला. म्हणजे चित्रकूटानें सुद्धां रामचंद्राचें स्वागत केलें. तेव्हां रामास सुखाची वाण कोठें पडणार? ४. आपल्या मुलाला तापसवेष धारण करून वनवास भोगावा लागणार हें मूर्च्छेनंतर शुद्धीवर आलेल्या दशरथास आठवतांच. ५. प्राण. ६. अहो! त्याला श्रावणाच्या मातापितरांनीं दिलेला शाप त्यानें खरा केला. वृद्ध मातापित्यांस कावडींत बसवून त्यांस तीर्थयात्रेस घेऊन जाणाऱ्या श्रावणाला दशरथानें चुकून ठार मारिलें. तेव्हां त्याच्या अंध आईबापांनीं 'आमच्यासारखाच तुला पुत्रविरह होऊन तूं मरशील' असा शाप देऊन प्राण सोडिला होता. तो शाप दशरथानें खरा केला म्हणजे राजा पंचत्व पावला. ७. वसिष्ठमुनी. ८. कैकेयीनें भरतास सुचविलें कीं, 'राम वनवासास गेला, दशरथ मेला, आतां गादीचा मालक तूंच! झालेना तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण?' ९. भरत. हा महारामभक्त असून सदाचरणी होता. १०. बापास जें काय आवडत होतें तें सर्व ध्यानांत ठेवून, किंवा आपल्या पित्यास सद्गति मिळावी म्हणून. ११. राज्यकारभार सोडून देऊन. १२. लवकर. १३. हित+सत्य+प्रियरूप+सूक्तिनें=कल्याणप्रद, खरें व आवडणारें असें सार्थ भाषण करून. रामाचें भाषण म्हणजे प्रत्यक्ष कल्याण, सत्य व प्रियता यांची मूर्तीच होती. १४. कापुर शीत आहे, त्यापेक्षांही रामाचें भाषण शीतकर म्हणजे संताप झालेल्या मनाला शांति देणारें होतें. १५. भरतास मागें फिरविलें, व राज्य कर म्हणून सांगितलें. १६. अति उग्र, परम भयंकर. १७. तुंबरु हाच वैश्रवणाच्या शापामुळें विराधनामक राक्षस झाला होता. विराधानें राक्षसदेह त्यागिल्यानंतर तो स्वस्वरूपाप्रत जाऊन मिळाला.

शरभंगसुतीक्ष्णकुंभजप्रिय[1] केलें, बहु रक्षिले द्विज. ॥ ११
पितृमित्र जटायु पूजिला, प्रसवे पुण्य करूनि भू जिला ।
करि मान्य तिचें[2] सुरक्षण, स्तविती गृध्रवरा सुर क्षण. ॥ १२
यश पंचवटीस दे, वसे; ऋषि ज्याचे विजयेच्छु देवँसे[3], ।
वदली हृदयांत[4] गौतमी[5], 'प्रभुपादाब्जरजें सुधौत[6] मी'. ॥ १३
धरि शूर्पणखा कुकामना[7], प्रभुच्या तो न रुचे चुका[8] मना, ।
द्रुत कापवि नाक कान, या न सुखें गाइल नाक[9] कां नया[10]? ॥ १४
खर बंधु तिचा, तया खळा प्रभु मारी, निवटी रणीं बळा[11], ।
भगिनीवदन स्मशान[12], नें[13] प्रिय पाहोनि खिजे दशानन. ॥ १५
कपटें कनकाभ[14] तो अरी[15] मृग मारीचनिशाचरा करी, ।
खळ [16]तो हरि जानकीमती, दवडी तद्ग्रहणार्थ ती पती. ॥ १६
विशिखें[17] हृदयांत ताडितां, प्रभुनें तो कपटैण[18] पाडितां, ।
प्रभुसाच वदे दयारसें[19] खळ 'हा लक्ष्मण!' 'हा प्रिये!' असें. ॥ १७
असुसंकट सत्य वाटलें[20], हृदयीं शोकतिमिर[21] दाटलें, ।
वदली, 'द्रुत धांव देवरा[22]! प्रियसंरक्षण याचि दे वरा.' ॥ १८
'प्रभुतें शिवें[23] नित्य सेवितें, मन जें कैंलिप[24] नसेचि देवि! तें,' ।

---

१. शरभंग, सुतीक्ष्ण, कुंभज (अगस्ति) हे दंडकारण्यांतील ऋषि. २. सीतेचें. ३. देवांप्रमाणेंच ऋषींची इच्छा होती कीं, रामाचा जय व्हावा व त्याच्या हातून सर्व राक्षसांचा संहार व्हावा. ऋषींच्या यज्ञयागादिक क्रिया यथास्थित चालेनात, म्हणून ऋषी म्हणत कीं, रामाचा जय व्हावा. देवांच्या जागा राक्षसांनीं पटकावून त्यांस बंदींत ठेविलें होतें. शिवाय यज्ञयागांच्या अभावामुळें देवांस हविर्भागही मिळत नव्हता, तेव्हां देवांचीही इच्छा ही होती कीं, रामचंद्रास जय व्हावा. ४. मनांत. (मनापासून.) ५. अहल्या. ६. शुद्ध झालेली, पापक्षालन झालेली. ७. दुष्ट इच्छा, परपुरुषाशीं संग करण्याची इच्छा. ८. चूक (अपराध). ९. स्वर्ग. १०. नीतीला. रामचंद्राच्या एकपत्नीव्रताला, किंवा रामानें शूर्पणखेस जी शिक्षा केली त्याला. ११. राक्षससैन्याला. १२. कर्णनासाच्छिन्न असें भयंकर. १३. अप्रिय, अमंगल, १४. सुवर्णासारखी कांती ज्याची असा. १५. रावण. १६. मृगरूपी मारीच निशाचर. १७. बाणानें. १८. कपटमृग. १९. करुणपूर्ण स्वरानें. २०. सीतेला वाटलें. २१. शोकरूपी अंधकार, मोह. २२. दिरा, भावोजी! २३. कल्याण. लक्ष्मण म्हणतो, रामचंद्राला कांहीं भीति नाहीं; कारण मंगलच स्वतः त्यांची सेवा करीत आहे. २४. 'मन चिंती तें वैरी न चिंती' ही म्हण ध्यानांत ठेवून लक्ष्मण सीतेस सांगतो, हे देवि! तुझ्या मनांत जे तरंग येत आहेत ते खरे नाहींत.

तिस तो विनवी, 'निशाचरें छळ[1] केला, सति! जाण हें खरें'. ॥१९
वदली[2], 'हृदयांत[3] नांदतो तव माझा अभिलाष, चांद तो।
प्रभु मत्प्रिय होय, आज वा न उद्यां तूं रुचसील[4] काजवा.' ॥ २०
क्षितिजा असि फार कोपली, निजदासी[5] शुचि बुद्धि लोपली, ।
स्वविवेकसुदीप[6] मालवी, उटजांतूनि बळेंचि घालवी[7]. ॥ २१
कटु ऐकुनि तो[8] असें रडे द्रुत[9] जाय प्रभुसत्तमाकडे[10], ।
तंव ये दशकंठ, तो यती गमला[11], सादरबुद्धि होय ती[12]. ॥ २२

---

१. कपट केलें आहे. २. सीता वदली. ३. तव हृदयांत माझा अभिलाष नांदतो; तो मत्प्रिय प्रभु चांद होय. तूं आज न वा उद्यां काजवा रुचशील–हा अन्वय. सीतेचा भावार्थ हा कीं, 'लक्ष्मणा! तूं अपहारबुद्धीनें माझ्यावर दृष्टि ठेविली आहेस! नीचा! तो माझा प्रियकर स्वामी केवळ आकाशस्थ चंद्रमा आहे, आणि तूं मेल्या! आज उद्यां म्हणजे एकदोन दिवस लिक् लिक् करणारा काजवा आहेस. ४. शोभा देशील. आपल्या नवऱ्यामध्यें व दिरामध्यें केवढा फरक शोककोपवश झालेल्या सीतेनें काढला हा! 'न' हा शब्द कोपाच्या भरांत सीता बोलून गेली आहे. ५. निर्मलबुद्धि सीतेची दासी खरी, पण रागाच्या भरांत शुद्धबुद्धीचा लोप झाला. कोपाच्या आवेशामुळें आपले सहचर व सहचरी आपल्यास सोडून देतात हें सांगण्याचा कवीचा अभिप्राय आहे. 'निजदासीं' असा पाठ घेतल्यास 'लक्ष्मणावर, लक्ष्मणसंबंधानें' असा अर्थ करावा. ६. सारासारविचाररूपी दीप. ७. लक्ष्मणाला. त्याची इच्छा नसतांनाही सीतेनें पर्णकुटीच्या बाहेर घालवून दिलें. ८. लक्ष्मण. ९. लवकर. १०. रामाकडे, उत्तम धन्याकडे. ११. तंव दशकंठ ये. तो (रावण) यति गमला. ती (सीता) सादरबुद्धि होय. लक्ष्मण पर्णशालेंतून बाहेर गेल्याबरोबर रावण यतीचा वेष घेऊन तेथें आला. सीतेला तो दंडकमंडलुधारी व काषायवस्त्रें परिधान केलेला अतिथी पाहून मोह पडला. यतीचें आदरआतिथ्य उत्तम प्रकारें करावयाची आपली चालच आहे. त्यांतही सीता जनकराजाची कन्या व रामचंद्राची स्त्री, तेव्हां सासुरीं व माहेरीं अतिथींचें स्वागत करण्याचें व्रत अव्याहत चाललेलें पाहून सीता प्रस्तुत प्रसंगीं सादरबुद्धि झाली यांत काय आश्चर्य आहे? स्वतःचें संरक्षण करण्यास कोणी नाहीं, हा विचार नाहींसा होऊन अनाथाचें परिपालन करणें आपलें कर्तव्य आहे, हा विचार किंवा ही दीनवत्सलता तिच्या मनांत प्रबल झाली. शिवाय सीता सति निष्कपटी व ऋजु स्वभावाची असल्यामुळें येथें कांहीं कपट असेल, अशी शंका येण्याचा संभवच नव्हता. म्हटलें आहे:–'अतिथिं तत्र संप्राप्तं पूजयेत्स्वागतादिना। श्रद्धया चान्नदानेन प्रियप्रश्नोत्तरेण च ॥' (शातातपः). १२. सीता.

हरि कामसहाय हा यती, वदली शापुनि 'हाय! हाय!' ती,[2] ।
'अजि राघव वीररायजी! करुणा ती त्यजिलीच काय? जी! ॥ २३
त्यजिली कसि कीर्ति[3]? याच, कीं तुमच्या दैन्य उरे न याचकीं, ।
अजि लक्ष्मणजि! त्वरा करा, यश द्या स्वाहितजित्वरा[4] करा[5]. ॥ २४
अवलोकुनि गृध्रपा वटीं यश द्याया अतिभव्य[6], शेवटीं, ।
वदली, 'निववा दयारसें अजि मामाजि! पहा, उठा' असें. ॥ २५

१. हा कामसहाय यति (सीतेला) हरि; ती शापुनि 'हाय! हाय!' वदली—हा अन्वय. सीता अतिथिसत्काराला सिद्ध झाली, म्हणून लक्ष्मणभावोजीनें आंखून ठेवलेली रेषा तिनें उल्लंघन केली. त्या बिचारीला काय ठाऊक कीं आपल्या अव्याजमनोहर स्वरूपाला लुब्ध होऊन यतिवेषानें छद्मी रावण आपलें व आपल्या धवलकीर्तीचें हरण करण्यास आला आहे? रावणानें तिला धरल्यावर 'परदाराभिलाष करणाऱ्या रावणा! तुझा व तुझ्या कुलाचा नाश होईल' असा त्या नीच निशाचरास शाप देऊन सीता 'हाय! हाय!' असा शोक-करूं लागली. हा शोक पंतांनीं हृदयभेदी शब्दांनीं थोडक्यांतच वर्णिला आहे. पुढील दोन शोकरसपरिप्लुत पद्यें वाचून कोणा रसिकाचें सदय अंतःकरण उकलणार नाहीं? २. सीता. ३. कीर्ति कशी त्यजिली? याच. कीं तुमच्या याचकीं दैन्य न उरे—हा अन्वय. 'हे रघुकुलोत्पन्ना जगदेकवीरा रामचंद्रा! आपण आपली सहचरी जी करुणा, दया, तिचा आजच त्याग केला काय? कुसुमापेक्षांही मृदु असें जें आपलें अंतःकरण त्याला आपण आजच, म्हणजे माझ्यावर, तुमच्या एकनिष्ठ पत्नीवर, संकट येऊन पडलें असतां, रजा दिली काय? हेंही कदाचित् संभवेल! पण अहल्येचा उद्धार करून प्रज्वलित झालेली आपली दीनवात्सल्याची कीर्ति, हिला आपण खचित टाकून देणार नाहीं. म्हणून म्हणते, याच, लवकर या, कसलेंही काम असलें तरी तें सोडून या. सुवर्णमृगचर्म मला नको. कसेंही करून या. कारण मला ठाऊक आहे कीं तुमच्या जवळ याचना करण्यास आलेल्या भक्तांचें दैन्य शिल्लकच राहत नाहीं. त्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. आतां मला धीर निघत नाहीं. लवकर या. तुम्हीं आल्याबरोबर माझें सर्व दैन्य नाहींसें होईल. ४. स्व+अहित+जित्वर=स्वशत्रु जिंकणाऱ्या. ५. हातांला. ६. दैदिप्यमान. ७. रामलक्ष्मणांपैकीं कोणीच धांवून येत नाहीं, असें पाहून शेवटीं वटोदरवासी जटायु, आपल्या मामंजी, ... ... सीतेनें पाहिलें, आणि त्याला म्हणाली, 'अजि मामाजी! पहा, उठा, दयारसें निववा.' 'जटायु मामंजी! मी कोणत्या संकटांत पडल्यें आहें, हें पहा. तुम्ही वृद्ध आहांत, तरी मला सोडविण्यास उठा, आणि परपुरुषाच्या हस्तस्पर्शानें संतप्त झालेल्या मला, तुमच्या सुनेला, आपल्या स्वाभाविक दयामृतानें शांत करा.' वीररसास संदीप्त करणारे हे या महापतिव्रतेचे शोकपूर्ण शब्द कोणाचें अनाथवात्सल्य जागृत करणार नाहींत? दशरथाच्या मुलांवर व सद्गुणी सुनेवर निःसीम प्रेम करणाऱ्या वृद्ध जटायूनें, देवांनींही स्तुति करण्यासारखें अघोर समरसाहस केलें हा परिणाम तरी वरील शब्दांनींच झाला आहे.

करि तो[1] अरितोषहानितें[2], समरा त्या सुरवृंद[3] वानितें[4], ।
रथ भंगुनि सून[5] सोडवी, परि त्याचे विधि[6] पक्ष तोडवी! ॥ २६
अमृताधिकगोडवीक्षण[7] द्विज[8] पावे, सुन सोडवी क्षण; ।
परि तोडुनि गृध्रपक्षती[9] हरि अन्यायरणैकदक्ष ती. ॥ २७
कपिपंचक[10] ऋष्यमूकग[11] क्षितिकन्या[12] अवलोकि, ती मग, ।
त्यजि त्यांतचि आपले नग, स्वपुरा[13] ने तिसें[14], कांपवी जग. ॥ २८
कथि लक्ष्मण वृत्त, 'हा!' वदे प्रभु[15], त्या शोक मनुष्यभावदे[16], ।

---

१. जटायु. २. अरि (रावण) त्याचा तोष (आनंद) त्याच्या हानितें (पराभवाला, नाशाला). म्हणजे सीता सांपडली म्हणून रावणाला जो हर्षवायु झाला होता, त्याचा भंग जटायूनें केला. म्हणजे सीतेस सोडविलें. ३. देवकदंब. ४. वर्णी. ५. सीता. ६. भवितव्यता. ७. करुणेनें पूर्ण म्हणून अमृतापेक्षां अधिक गोड पहाणें ज्याचें असा. ८. पक्षि (जटायु) तो. ९. वृद्ध जटायुपक्ष्यानें महाबली रावणाबरोबर अद्भुत समरकर्म केलें, त्याची विमानस्थ देवांनीं सुद्धां स्तुति केली. जटायूनें रावणाच्या रथाचा चुराडा केला. पण दैवदुर्विलासानें जटायु रावणाच्या हातांत सांपडला व त्या अधर्मयुद्धामध्यें प्रवीण असलेल्या रावणानें संधि साधून जटायूचे पक्ष उपटून टाकिले! शत्रु किंवा सामनेवाला अडचणींत सांपडला असतां त्याच्यावर शस्त्रप्रहार करूं नये, अशी युद्धनीति आहे. पण कामशरानें विव्हल झालेल्या अधर्मचारी राक्षसाधमास ही नीति काय होय? त्यानें जटायूचे पंख उपटून त्यास निःशस्त्र केलें व सीतेस घेऊन गेला. १०. कपिपंचक=सुग्रीव व त्याचे चार प्रधान–नळ, नीळ, जांबुवंत व हनुमान. यांस वालीनें हद्दपार केल्यामुळें हें पंचक ऋष्यमूकपर्वतावर राहत असे. ११. ऋष्यमूकपर्वतावर राहणारे. १२. जानकी. १३. लंकेंत रावणानें सीतेस नेलें. १४. तिस स्वपुरा ने, जग कांपवी–हा अन्वय. सीतेला रावणानें लंकेंत नेऊन ठेविली. ह्या अपकृत्यामुळें रावणानें सर्व जगास कांपरें भरविलें. कारण उघड आहे कीं, स्वबलदर्पानें देवद्विजांस अंकित करणारा मदनोन्मत्त राक्षस एकाकी व अनाथ अबलेवर मोठा भयंकर प्रसंग आणणार असें पाहून सर्व प्राण्यांचें धाबें गडबडून गेलें. 'कांपवी जग' याचा 'भूकंप झाला' असा अर्थ घेतला तरी चालेल. म्हणजे रावणाचा नाश सुचविणारीं चिन्हें होऊं लागलीं. १५. रामचंद्र प्रभु. १६. कपटरूपी मृगाचा वध करून व हा सर्व मायावीराक्षसाचा खेळ होता असें जाणून स्त्रीवत्सल रामचंद्र परत फिरला तों लक्ष्मण त्यास भेटला व ह्यानें पर्णशाळेंतील वृत्तांत रामास कळविला; तेव्हां राक्षस संचार करणाऱ्या अरण्यांत सीतादेवी एकटीच राहिली असा विचार मनांत येऊन शोकावेगानें रामानें सुस्कारा टाकिला आणि 'वनिं गति अबलेची काय झाली असेल?' असा विलाप करण्यास आरंभ केला. रामचंद्र हा 'नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त' अशा परब्रह्माचा अवतार खरा; पण त्याला सुद्धां शोकमोहानें प्राकृत मनुष्याचें स्वरूप प्राप्त झालें! त्या (रामाला) शोक, मनुष्यभाव दे (देता झाला). प्रिय वस्तु हरवण्याची भीति प्राप्त झाली असतां आपण प्राकृत माणसें शोकाविष्ट होतोंच. पण नित्यानंदामध्यें स्थिरबुद्धीनें रहाणाऱ्या

करि फार तदा विलाप हा, वदला, 'ताप! न देविला पहा.' ॥ २९
उटज द्रुत शून्य देखिलें, प्रभुनें विश्वहि शून्य लेखिलें, ।
बहु शोधिलि विश्वजीवनें, न दिली नेलि गजा गजी वनें. ॥ ३०
रणरंगमहानटायुतें स्तुत जें कर्म, करी जटायु तें, ।

---

परब्रह्माला सुद्धां प्रियासंकटजन्य शोकानें वश केलें! असें सांगण्याचा पंतांचा भाव आहे. यावरून रामचंद्राची सीतेवर किती भक्ति होती व शोकाचा प्रभाव केवढा जबरदस्त आहे ह्या गोष्टी व्यक्त करण्याचा पंतांचा कटाक्ष दिसतो. 'शोक त्या (रामाला) मनुष्यभाव दे' या पंक्तीमध्यें पंतांनीं जें विकारस्वरूपाविष्करणव्यंजनेनें (साक्षात् शब्दांनीं न सांगतां सुचविण्याच्या रूपानें–Suggestively) केलें आहे, त्यावरून पंतांच्या काव्यप्रतिमेचें उत्तम दिग्दर्शन होतें. असल्या स्थळीं रसिकांची मति सर्वस्वी लीन झाली तर आश्चर्य काय?

१. शोकसागरास भरती आली होती तिला आंवरून धरून रामचंद्र म्हणतो, 'हे ताप! देवीला न पहा.' म्हणजे हे दुर्दैवा! तूं देवीला पाहूं नकोस. दैवाची प्रार्थना करून राम म्हणाला, 'माझ्या देवीवर कोणतेंही संकट येऊं देऊं नको.' कदाचित् असाही अर्थ करितां येईल कीं, 'लक्ष्मणा! देवीला ताप न, (असें) पहा.' म्हणजे 'लक्ष्मणा! माझे भार्येवर कांहीं संकट आलें आहे कीं काय हें पहा.' पण पहिला अर्थ बरा दिसतो. २. पर्णशाला. ३. लवकर लवकर येऊन. ४. पर्णशाला शून्य आहे म्हणजे तेथें सीता नाहीं असें पाहून प्रभु रामचंद्राला सर्व चराचर विश्व सुद्धां शून्यवत् म्हणजे निरर्थक, असार वाटूं लागलें. आपली सहधर्मचारिणी प्रियपत्नी नष्ट झाली असतां म्हणजे जन्माचा मित्र नाहींसा झाला असतां, एकपत्नीव्रताचें कडकडित आचरण करणाऱ्या पुरुषाच्या मनाची स्थिति अशीच व्हावयाची. ५. विश्वाचें जीवन ज्याच्यामुळें होतें त्यानें. सकल विश्वाचा प्राण जो रामचंद्र, ज्याचा शोध ब्रह्मादिदेवांनीं व सनकादिमुनींनीं चालविला आहे, त्यानें आपली प्राणरूपी प्रियपत्नी जी सीता, हिचा पुष्कळ शोध केला. ६. नेली (नेलेली) गजी (सीता) वनें गजा (रामाला) न दिली–हा अन्वय. म्हणजे रामचंद्रानें वनांत पुष्कळ शोध केला. परंतु अदृश्य झालेली, हरवलेली, नाहींशी झालेली गजी (सीता) गजा (रामाला) सांपडली नाहीं. वनाचा सर्व कोपरान्‌कोपरा धुंडून काढिला, पण सीता सांपडली नाहीं. रावणानेंच नेली, तिला वन कोठून देणार? येथें हस्तिहस्तिणीचें रूपक फारच समर्पक होय. आपली पत्नी नाहींशी झाली असतां गज जसा तळमळ करितो, तशीच तळमळ रामचंद्रानें केली, परंतु व्यर्थ–असें सांगण्याचा भाव. ७. रणरूप सभामंडपामधें उत्कृष्ट नटासारखा होणारा जो त्यातें. ८. रणरंगमहानटायुते जें कर्म स्तुत, तें (कर्म) जटायु करी–हा अन्वय. रणरूपी रंगभूमीवर (समरांगणामध्यें) आपल्या उत्कृष्ट अभिनयानें (उत्कृष्ट युद्धकौशल्यानें) सर्वांकडून शाबासकी मिळविणाऱ्या जटायूला (धनुर्धराला) ज्या कर्माची स्तुति करावी लागेल, तें कर्म वृद्ध जटायूनें केलें. म्हणजे रणांगणामध्यें समरकर्मावद्दल ज्या वीराची सर्वतोमुखी ख्याति झाली आहे, अशा पटाईत वीरवरानेंही स्तुति करावी. अशा प्रकारें जटायु लढला. तात्पर्य, जटायूनें रावणाशीं जें युद्ध केलें तें अद्भुत व अद्वितीय होतें. सीता ही अबला,

प्रभुनेंहि असेंच मानिलें, दिधलें तोयं, यथोक्त वानिलें. ॥ ३१
परमोग्र केबंध मारिला, प्रभुनें दारुण शाप वारिला; ।
शेबरीस बरी दिली गेती, स्वपदाब्जि भ्रमरी जिची मती. ॥ ३२
यश हें सुजनांत ठेविलें, मग पंपातट साश्रु सेविलें, ।
पवनात्मज भक्त लक्षिला, रविचा पुत्र सुकंठ रक्षिला. ॥ ३३
नगभित्सुत बंधुस च्छळी, खळ वाळी वधिला महाबळी, ।

---

आपल्या मित्राची सून, हिच्यावर अघोर संकट प्राप्त झालें, असें पाहून वृद्ध जटायूला अद्भुत स्फुरण प्राप्त होऊन त्यानें अत्यंत बलिष्ठ राक्षसपतीबरोबर रोमहर्षण युद्ध केलें हा चमत्कार तरी कसला? आपण ज्याच्यावर स्नेह करितों, त्यावर संकट ओढवलें असतां, त्याला संकट-मुक्त करण्याविषयीं आपण जीवापाड श्रम करूं, प्रसंगीं मरून जाऊं; असें सांगण्याचा कवीचा आशय आहे. ही स्नेहजन्यश्रमतत्परता ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

१. तिलांजलि दिली. २. कबंध हा राक्षस होता. पूर्वी याचें स्वरूप अतिलावण्यमय होतें. तथापि विचित्रवेष धारण करून ऋषींस ताप देण्याचा क्रम यानें चालविला. एका ऋषीनें यास 'तुझें असेंच रूप राहो' असा शाप दिला. 'पुढें रामचंद्रांनीं तुझ्या बाहूंचें छेदन केल्यावर तुला पूर्ण स्वरूप मिळेल' असा त्याच ऋषीनें उःशाप दिला. नंतर कबंधानें उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवास संतुष्ट केलें व त्यानें कबंधास दीर्घायुष्य दिलें. पुढें कबंधानें इंद्राबरोबर युद्ध केलें. त्या युद्धांत इंद्राच्या वज्रघातामुळें कबंधाचें शिर व नाभ्यधोभाग शरीरमध्यभागांत शिरलीं. यापुढेंही कबंधानें सर्व प्राण्यांस त्रास दिला. पुढें रामचंद्रानें त्याचे योजनदीर्घ बाहू कापून त्यास शापमुक्त केलें. यानेंच रामलक्ष्मणास पंपासराचा मार्ग दाखविला व सुग्रीवाशीं सख्य करा म्हणजे सीताशुद्धि होईल असें सांगितलें. ३. शबरी ही मतंगऋषीची शिष्या. पंपासरोवराच्या तटावर शबरीनें रामलक्ष्मणांचें स्वागत करून त्यांची अर्घ्यपादादिकांनीं पूजा केली. रामचंद्रानें हिला मुक्ति दिली. पद्मपुराणांत म्हटलें आहेः—'फलानि च सुपक्कानि मूलानि मधुराणि च । स्वयमास्वाद्य माधुर्यं परीक्ष्य परिभक्ष्य च ॥ पश्चान्निवेदयामास राघवाभ्यां दृढव्रता । फलान्यास्वाद्य काकुत्स्थस्तस्यै मुक्तिं परां ददौ ॥.' सारांश, प्रेमानें दिलेलीं उष्टीं बोरें खाऊन रामानें जिला मुक्ति दिली, तीच ही शबरी. ४. सद्गति, मोक्ष. ५. जिची, (ज्या शबरीची मति (बुद्धि) स्वपदाब्जीं (रामचरणकमलावर) भ्रमरी होती. शबरीचें रामचंद्रचरणावरील प्रेम दर्शविण्यास भ्रमर आणि कमल हें रूपक उत्तम होय. ६. शबरीचा उद्धार केला, कबंधास शापमुक्त केलें, ही कीर्ति साधुसंतांमध्यें पसरली. ७. पंपासरोवर ऋष्यमूक पर्वताजवळ आहे. येथें रामचंद्रास वनश्रीचें सौभाग्यसर्वस्व दृष्टीस पडलें. परंतु वनश्रीसुखाचा उपभोग घेण्यास आपली पत्नी नाहीं हा विचार मनांत येऊन येथें रामास अत्यंत शोक झाला. ८. वायुसुत. (मारुति.) ९. सुग्रीव. १०. इंद्रसुत. (वाली.) ११. सुग्रीवाला. १२. इंद्रसूनु वाली हा महाबलाढ्य वानर होता. महिषासुर नामक अजेय्य राक्षसास ठार मारून त्याचें प्रेत त्यानें सहज, लीलेनें कित्येक योजनें दूर फेंकून दिलें होतें. आपल्या मुलाच्या (अंगदाच्या) पाळण्यावर दशकंठास खेळणें करून ठेवलेले हेच कपि होत.

सुगळा कपिराज्य ओपिता गमला राम दयाळु तो पिता. ॥ ३४
स्वकपींस म्हणे, 'सती पहा द्रुत ग्याया रघुसत्तमा महा.' ।
शतयोजनसिंधुतें करी सहसा गोष्पद वातभू हरी. ॥ ३५
हुडकूनि पुरींत तो धरी बहु चिंताज्वर कीशकेसरी, ।
सदशोकवनांत पाहिली नियमें स्वारिलयार्थ राहिली. ॥ ३६
कपि बैसुनि शिंशपानगीं निरखी, जीस तुला नसे जगीं; ।
तंव ये, विनवी कुधी, तया झिडकारी, न धरी सती भया. ॥ ३७
परते परतेजहारवी, नय सोडूनि, म्हणेल 'हा!' रवी, ।

---

१. सुग्रीवास. २. कपिराज्य ओपिता तो दयाळु राम सुगळा (सुग्रीवाला) पिता गमला (बापासारखा वाटला). वालीस मारून सर्व राज्य रामानें सुग्रीवास दिलें, तेव्हां सर्व जन्मभर यातायात करून शेवटीं आपल्या पुत्रास वित्तसर्वस्व देणाऱ्या पित्याप्रमाणें रामानें वर्तन केलें असें सुग्रीवास वाटलें. ही पुत्रवात्सल्याची उत्प्रेक्षा कितीतरी खुलत आहे! ३. सीतादेवी. ४. उत्सवा, आनंदा. ५. वातभू (मारुति) नांवाचा हरी (वानर) शतयोजन सिंधुतें (४०० कोस विस्तीर्ण समुद्राला) सहसा (एकदम) गोष्पद (गाईच्या पावलायेवढा) करि (करिता झाला). येवढा मोठा समुद्र, पण तो वायुपुत्राला गोष्पद झाला. या आलंकारिक शब्दयोजनेनें मारुतीचें बल व उड्डानसौकर्य हीं दोन्हीं स्पष्टरीतीनें मनांत येतात. ६. वायुपुत्र. (मारुति.) ७. वानर. ८. वानरसिंह. (मारुति.) ९. सीतेस पाहिलें. १०. सर्व लंका धुंडिली तरी सीता सांपडेना म्हणून चिंतेमध्यें मग्न झालेल्या वानराधिपानें अशोकवनांत सीतेस अकस्मात पाहिलें. ती तेथें व्रतस्थ राहिली होती. कशासाठीं? तर आपला शत्रु जो रावण त्याचा नाश व्हावा एतदर्थ ती व्रतस्थ होती. सीतेचें स्वरूप व तिची दीनावस्था यांचें वर्णन रामायणांत (सुंदरकांड—सर्ग १५।१६।१७ यांत) उत्कृष्टरीतीनें केलें आहे. ११. वृक्षविशेष. १२. दुर्बुद्धि. (रावण.) १३. परतेजहारवी परते. नय सोडूनि रवि 'हा!' म्हणेल—हा अन्वय. अमंगल बुद्धीचा रावण येऊन लुब्धपणानें सीतेचीं आर्जवें करूं लागला, तेव्हां कोणतीही भीति न बाळगतां सीतेनें त्यास झाडून 'पाण्यापरिस पातळ केला.' तेव्हां दुसऱ्याचें तेज हरण करणारा रावण परत फिरला. हें सर्व पाहून सूर्यानें आपलें नैसर्गिक जें चेतोधैर्य तें सोडून देऊन दुःख करण्यास आरंभ केला. सूर्यकुलोत्पन्न रामचंद्राची पत्नी सीता. हिच्यावर हें अनिवार्य संकट प्राप्त झालें आहे, आतां पुढें कसें होईल ही शंका अधीरपणानें मनांत येऊन 'कुल मलीन होईल कीं काय?' या भीतीनें सूर्यास शोक झाला. 'हा!' ह्याचा अर्थ समाधानवाचक उद्गार केल्यासही कांहीं हरकत नाहीं. परतेजोभंग करणारा रावण परतला तेव्हां सूर्यास समाधान वाटलें असेल, व नेहमींचें गांभीर्य एकीकडे ठेवून त्यानें आपला आनंद प्रगटही केला असेल.

यश वर्णुनि तो[1] करी नती, प्रभुमुद्रा[2] तिस दे महामती[3]. ॥ ३८
प्रियवृत्त[4] पुसे, दया सती करि, चूडामणि[5] दे तयास ती, ।
वन भंगुनि मार्दि अक्ष[6], तें पुर देहें करि भस्म अक्षतें[7]. ॥ ३९
क्षितिजोदित[8] वायुतोक[9] पी; परते, ये द्रुत हृष्ट तो कपी, ।
विनयें धरि[10] पाय, दे खुण[11]; प्रभु आलिंगुनि फार घे गुण. ॥ ४०
'अरिची[12] करुं हानि रोप[13], हा[14] म्हणवूं, सेवि महानिरोप हा,' ।
प्रभु जाय पयोधिच्या[15] तटा, करिती नृत्य सुरर्षिच्या[16] जटा. ॥ ४१
कपिसैन्यसमुद्र[17] गर्जन प्रलयींचें करि तेंवि तर्जन[18], ।
प्रभुनें पदभाक्[19] बिभीषण स्तुत[20] केलाचि न लावितां क्षण. ॥ ४२

१. मारुति. २. रामचंद्राच्या करांगुलीस भूषित करणारी अंगठी. 'मी रामदूतच आहे असा प्रत्यय सीतामातुःश्रीस यावा म्हणून बुद्धिवैभवशाली मारुतीनें रामपराक्रमाचें वर्णन करून तिला रामाची अंगठी प्रणामपूर्वक दिली. ३. बुद्धिमान्. ४. पतीची हकीकत. ५. शिरोरत्न मारुतीची गांठ पडली होती याची खुण पटविण्यासाठीं सीतेनें आपलें शिरोभूषण (चूडामणि) रामचंद्राकडे पाठविलें. ६. रावणपुत्र. ७. अक्षतें देहें तें पुर (लंका) भस्म करी. आपल्या शरीरास धक्का न लागूं देतां मारुतीनें लंका जाळून टाकिली. ८. सीतेचें भाषण. ९. वायुसुत. १०. रामाचे पाय धरी. ११. चूडामणि. १२. 'अरीची (रावणाची) हानि (नाश) रोप (रामबाण) करूं; (शत्रूंस) हा म्हणवूं (म्हणावयास लावूं) असा हा महानिरोप सेवि' असे मारुति रामास म्हणाला. 'सीतेचा मला काय निरोप आहे?' असें विचारल्यावर मारुति म्हणाला, 'बाणांनीं शत्रूंचा नाश करून त्यांला शोक करावयास लावा' हा सीतामातुःश्रीचा निरोप आहे. १३. बाण. १४. हाय! १५. समुद्राच्या; हिंदुमहासागराच्या. १६. सुर+ऋषि, म्हणजे देव आणि ऋषी यांच्या जटा. रावणाची ताबेदारी असल्यामुळें, किंवा अनेक वर्षे हविर्भाग न मिळाल्यामुळें देवांस अभ्यंग स्नानादिकांचें सौख्य नव्हतें. त्यांच्या केशकलापास अर्थातच जटास्वरूप प्राप्त झालें होतें! देवर्षींच्या जटा नाचावयास लागल्या ही शब्दयोजना चमत्कारजनक होय. देवांस व ऋषींस 'रावणाचा अंत होणार' म्हणून आनंदाच्या कशा उकळ्या फुटल्या व ते कसे नाचावयास लागले हें यावरून व्यक्त होतें. प्रसंग प्रत्यक्ष डोळ्यापुढें घडत आहे असें कवि **'भाविक'** अलंकाराच्या योजनेनें येथें दाखवितात. १७. कपिसैन्यसमुद्र प्रलयींचें तेंवि तर्जन (भयंकर) गर्जन करि—हा अन्वय. वानरसेना समुद्र गर्जूं लागला. कसा? तर प्रलयकालीं जसा समुद्र भयंकर गर्जना करावयास लागतो त्याप्रमाणें. दुष्ट लोकांस वानरसेनेच्या भयंकर गर्जना प्रलयकालच्या समुद्रगर्जनेप्रमाणें वाटल्या सारांश, आपला विनाशकाल जवळ आला असें त्यांस वाटलें. १८. भीति देणारें. १९. लंकाधिपत्व. २०. स्तुत बिभीषण (रामचंद्राकडे आल्यावर) प्रभूनें (रामानें) क्षण न लावितां पदभाक् (लंकेचा अधिपति) केलाचि. साधु बिभीषण रामचरणाजवळ हजर झाल्याबरोबर 'मित्रभावेन

। सागर भेटला भयें, दिधली त्यास अभी महाशयें, ।
; सेतु विनिर्मिला नळें, तरलीं सिंधु सुखें महाबळें. ॥ ४३
गळें दशकंठ पाहिला, न महाकोपज वेग साहिला, ।
द्रुत त्यावरि घातली उडी, दिधली जी उचिता दशा कुडी. ॥ ४४
प्रभुमस्तकचाप दाखवी, सतिला शोकविषाग्नि चाखवी, ।
सरमा परमाप्तता धरी, कळवी छद्म, तदश्रुतें हरी. ॥ ४५

---

प्राप्तस्य त्यागोऽयुक्तः' असें मानणाऱ्या प्रभूनें त्याला लंकाधीशत्व दिलें. 'चि' यानें निःसंशय दिलें असा बोध होतो. २१. स्तुति केलेला.

१. 'भिऊं नको' असें अभयवचन. २. मोठ्या हेतूनें. ३. नळ हा विश्वकर्म्याचा पुत्र होय, अर्थात् त्यानेंच सेतु बांधावा हें योग्य होय. हा सेतु अद्यापिहि खंडशः दृग्गोचर होतो. आधुनिक शास्त्र्यांच्या मतें हा निसर्गनिर्मित पर्वत आहे. रामचंद्रानें सेतु बांधिला किंवा समुद्रतरंगाच्या खालीं असणाऱ्या पर्वतशिरोभागाचा उपयोग केला, यावरून त्यावेळीं समुद्रांतून नौका चालविण्याची कला अनुद्भूत होती असें दिसतें. रामायणांतील सेतूचें वर्णन वाचून बहुश्रुत वाचकांस पारसीकाधिपति क्षेर्क्षेस् यानें यूरप व एशिआ यांस विभागणाऱ्या 'हेलिस्पांट'वर पूल बांधिला त्याचें स्मरण होईल. ४. वानरसैन्य. ५. महा+कोपज असा वेग न साहिला. सुग्रीवानें रावणास पाहिलें तेव्हां त्या परदारापकर्षक राक्षसाचा सुग्रीवाला इतका संताप आला कीं त्या संतापाचा वेग त्याचा त्यालाच आवरतां येईना. सुवेलापर्वतावरून त्यानें जी उडी मारली ती थेट रावणाच्या डोकीवर! आणि जी कुडी दशा उचिता (ती) रावणास दिली म्हणजे त्याचा मुकुट खालीं पाडून व त्याला पुष्कळ त्रास देऊन सुग्रीव परत फिरला. तात्पर्य, सुग्रीवानें रावणाची योग्य ती फजीति केली. सुग्रीवाची साहसप्रियता या कृत्यावरून व्यक्त होते. ६. सुग्रीवानें रावणावर. ७. वाईट, दुःखमय. ८. आपल्या मायावी कृत्यानें रावणानें प्रभु (रामाचें)+मस्तक+चाप (शिर व धनुष्य) सीतेस दाखवून 'रामाला मीं मारिलें' असें सीतेस सांगितलें. तेव्हां त्या पतिव्रतेला पतिनिधनविषयक शोक, व 'अधुना मे वशा भव' ('आतां मला वश हो') हें विष—हीं दोन्ही अग्निस्वरूपच—हा अग्नि चाखावयास रावणानें लाविलें. नवरा मेला असें कळल्यावर तन्निष्ठ-पत्नीला किती दुःख होतें व त्यांतच अग्नींत तैल ओतल्याप्रमाणें 'मला तूं वर' असे विषमय, कर्णकठोर शब्द ऐकल्यावर तिचा कसा मनोदाह होतो हें 'शोक+विष+अग्नि चाखवी' ह्या शब्दांनीं पूर्णपणें व्यक्त झालें आहे. शिवाय सतीला पतिनिधनानंतर अग्निकाष्ठभक्षणच योग्य असें 'सती' व 'अग्नि' ह्या शब्दांनीं सुचविलें आहे. थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ गोवितां येईल अशी अर्थपुष्ट शब्दांची योजना करण्याची पंतांची हातोटी लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. शोकविषाग्नि हें रूपक होय. ९. सीतेला. १०. बिभीषणपत्नी. ११. सीतेच्या अश्रूंतें.

भगवान्[1] नयधर्म[2] आठवी, सुकृती[3] अंगद[4] दूत पाठवी, ।
'कथितों गुणपाशनाश[5] मीं हितवाक्श्री कुणपाशना! शमीं[6]. ॥ ४६
शमवील कळीस[7] साम रे! हरिनादेंहि[8] बळी ससा मरे, ।
अनळासहि[9] कंप दे सती त्यज, संरक्षिल संपदेस ती.' ॥ ४७
कटु मत्त महातपें[10] वदे, चिरधी भेसि[11] न हात पेंव दे, ।
धरवी[12] परवीरभंगदा[13] अहि वीशीं[14] खळे[15] तेंवि अंगदा. ॥ ४८
खवळे, न वळेचि दांडगा[16], हरिसीं जेंवि मदांध लांडगा; ।

---

१. रामचंद्र. २. 'प्रथमच युद्ध करूं नये, सामदामांचा अवलंब करूनही 'शत्रु वश होत नाहीं तर मग युद्धास प्रवृत्त व्हावें,' अशी राजनीति आहे. नय=राजनीति. प्रथमच युद्ध केल्यास प्रजानाश होतो म्हणून सामदामाचा आश्रय करितात. ३. सदाचरणी. ४. वालीसुत. ५. रजोगुणाचा जो पाश त्याचा नाश करणारा. गुणपाशनाश मीं (हे) कुणपाशना! हितवाक् श्री कथितों—हा अन्वय. हे प्रेतें खाणाऱ्या राक्षसा! सत्व, रज, तम इत्यादि गुणांचे पाश नष्ट करणारा मीं (रामचंद्र) तुला तुझें हित होईल अशीं वाक्यरत्नें तुझ्यापुढें ठेवितों. असा निरोप रामचंद्रानें रावणास पाठविला. संसृतिचे पाशच्छेद करणाऱ्या रामचंद्राचीं हीं वाक्यें आहेत. ६. शांतता ठेवण्याच्या कामीं, साम करण्यासाठीं. ७. कलहास. ८. सिंहाची गर्जना ऐकिली मात्र कीं बळवान् ससा प्राणत्याग करितो. 'रावणा! तुला बळाचा गर्व झाला आहे, पण तूं सशासारखा आहेस. म्यां सिंहानें गर्जना केल्याबरोबर मरून जाशील! तात्पर्य, युद्धाची जरूरच लागणार नाहीं. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार आहे. ९. अनलाला (वायूला) कंप देणारी सति (सीता) हिला सोडून दे. रामचंद्राचे बोलण्यांतील भाव कीं, 'सीतेचें पातिव्रत्य कडकडीत आहे. आपण हिला स्पर्श केला, तर आपल्यास सीता शापून भस्म करील, अशी वायूला सुद्धां सीतेची भीति वाटते! १०. महा+तपें=मोठ्या तपश्चर्येनें. महातपें मत्त (रावण) कटु वदे. (त्याची) धी चिर भेसि हात पेंव (पोचूं) न दे—हा अन्वय. 'आपल्या उग्र तपश्चर्येनें आपणास अवध्यत्व प्राप्त झालें आहे' या विश्वासानें उन्मत्त झालेला रावण कर्णकटु शब्द बोलला. भीतीला आपले हात त्याच्या बुद्धिपर्यंत पोहोंचवितां आले नाहींत. अंगदाच्या मार्फत पाठविलेला रामाचा निरोप ऐकून त्याची बुद्धि गांगरली नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या क्रूरकर्म्यानें आपल्या सचिवांस 'अंगदास धरा, पकडा' असे कठोर शब्द बोलून अंगदास धरण्याविषयीं आज्ञा केली. यांत रावणाचें औद्धत्य व दूतास धरविण्याचें अन्यायवर्तन स्पष्ट दिसतें. ११. भयास. १२. रावण धरवी. १३. शत्रूच्या वीराला भंग देणारा; त्यांचा पराभव करणारा. १४. गरुडास. १५. परवीरभंगदा अंगदा खळ 'वीशा अहि तेंवि (त्याप्रमाणें) स्वबळें (राक्षसांकरवीं) धरवी—हा अन्वय. अर्थ स्पष्ट आहे. सर्पांनीं गरुडास, पक्षिनायकास, धरण्याचा प्रयत्न केला तर तो जसा विफल होतो, तसा रावणाचा यत्न निष्फळ झाला हें 'अहि वीशा जेंवि' या **उपमेनें** सुचविलें आहे. १६. दांडगा न वळेचि, जेंवि मदांध लांडगा हरिसीं (न वळे तेंवि). सिंहाला

प्रभुसीं करि युद्ध, मारवी बळ, राम प्रभु त्या तमा रवी. ॥ ४९
स्वपरक्षयहेतु युद्ध तें कटु केलें चिरकाळ उद्धतें, ।
बहु ज्यांत शिरोब्जकर्तन त्रिदशागण्यकबंधनर्तन. ॥ ५०
पति रिक्त करूनि राहिल्या, शतशः शोणितसिंधु वाहिल्या, ।
क्षितिनें भयदा न साहिल्या, अमरीनींहि न नीट पाहिल्या. ॥ ५१

---

मदोन्मत्त लांडगा जसा वळत नाहीं म्हणजे सिंहाचें ऐकत नाहीं, तसा हा दांडगा वळला नाहीं. सिंह लांडग्याच्या उपमेनें दांडगेश्वर लांडगा मृत्युमुखीं पडतो, तसाच रावण नष्ट होणार असें सुचविलें आहे. 'हरिसीं' याचा अर्थ 'वानरास,' 'अंगदास,' असा केल्यास अंगदास तो दांडगा वळला नाहीं असा वाक्यार्थ निघेल.

१. त्या तमा (रावणसैन्यरूपी अंधकाराला) राम प्रभु रवि (झाला). सूर्य जसा अंधकाराचा ऐका क्षणांत लीलेनें नाश करितो, तसा रामचंद्रानें रावणसैन्याचा नाश केला असें या रूपकानें सूचित होतें. यावरून वाचकांनीं रामचंद्राच्या युद्धविशारदत्वाची कल्पना करावी. २. स्व (आपला) पर (शत्रूचा) क्षय (नाश होण्याचा) हेतु (कारण) तें कटु युद्ध त्या उद्धतें (उन्मत्तानें) चिरकाळ केलें. 'कटु'शब्दाची योजना खुबीची आहे. हें युद्ध कटु येवढ्याचसाठीं कीं, यांत स्वतःचा व दुसऱ्याचा नाश व्हावयाचा होता. आपला नाश करूनें दुसऱ्याचा नाश करणारे पुरुषांस काय नांव द्यावें हें भर्तृहरीसारख्या महाकवीला सुद्धां समजलें नाहीं! 'स्वपर' यांत 'पर' याचा अर्थ 'एकनिष्ठ' असा केला तर व 'आपल्यास एकनिष्ठ असे जे सेवक त्यांचा नाशहेतु' असा अर्थ घेतल्यासही 'कटुत्व' येतें. ३. मदोन्मत्तानें. ४. ज्यांत (ज्या युद्धांत) बहु शिरस् (शिररूपी) अब्जांचें (कमलांचें) कर्तन (कापणें) होतें व (ज्यांत त्रिदश (देव) यांना अगण्य (गणति करितां येत नाहीं) इतक्या कबंधांचें (शिरोविहीन शरीरांचें) नर्तन (नृत्य) चाललें होतें. सारांश या युद्धांत हजारों शिरःकमलांची कापाकापी चालली होती व धडें तर इतकीं नाचत होतीं कीं, देवांना सुद्धां त्यांची संख्या सांगतां येईना! कोण प्राणीसंहार हा! ५. रक्ताच्या नद्या. ६. हें रोमहर्षण युद्ध किती घनघोर झालें त्याचा मासला पंत प्रस्तुत पद्यांत दाखवितातः–शतशः शोणितसिंधु पति रिक्त करूनि राहिल्या, (व) वाहिल्या, (त्या) भयदा क्षितीनें न साहिल्या, (व) अमरीनींहि नीट न पाहिल्या–हा अन्वय. शेंकडों रक्तनद्या पति (समुद्र) रिक्त (रिकाम्या) करून राहिल्या (शिल्लक असल्या झाल्या) व वाहूं लागल्या. त्याच्या ओघांची त्वरितगति सांगतातः–पृथ्वी ही धीट, क्षमावती, सहनशील खरी; परंतु ह्या भयानक नद्यांचें स्वरूप इतकें उग्र होतें कीं, त्या सर्वसाहिनी पृथ्वीला सुद्धां त्यांचें स्वरूप अक्षम्य झाल्यामुळें तिनें त्यांस लवकर लवकर पलीकडे ढकलण्याचा प्रयत्न सुरू केला! तसेंच त्यांचा चंड वेग इतका भयानक होता कीं, देवस्त्रिया स्थिरचित्तात्मकतेविषयीं प्रसिद्ध, परंतु त्यांना सुद्धां त्या नद्यांची झपाट्याची गति नीटशी बघवली नाहीं! नद्यांचा पति समुद्र हें सर्वांस विदितच आहे. नद्या पुष्ट करण्यासाठीं आकाशांतील मेघ हे सागरोद-

घननाद करूनियां पण प्रभु जे दुर्जय रामलक्ष्मण ।
अहिपाशनिबद्ध ते करी, सुगळश्रीधृतिबुद्धिही हरी. ॥ ५२
वदवे न तसीहि शोचि तें, त्रिजटा त्या घन होय शोचितें, ।

---

काचें शोषण करून घेतात व नद्यांस तें जल अर्पण करितात ही गोष्ट पूर्वजांस अवगत होती, असें 'महामेघः क्षारं पिबति कुरुते वारि मधुरम्' वगैरेवरून दिसतें. सारांश नद्यांस पाणी मिळतें तें समुद्रापासून होय. आतां लंकेमध्यें जें युद्ध झालें तेथें रक्ताच्या नद्या उत्पन्न झाल्या त्यांतील आरक्त जल किति विपुल होतें हें सांगण्याकरितां सांगतात कीं, नदीपति सगळाच्या सगळा रिकामा, ठणठणित करून ही आणखी कांहीं रक्तनद्या अवशिष्ट राहिल्याच. समुद्राच्या पाण्यानें जितक्या नद्या उद्भूत होणें शक्य होतें तितक्या नद्या होऊन आणखीही कांहीं नद्या उत्पन्न झाल्या. सारांश समुद्र कांठोकांठ भरूनही आणखी शिल्लक उरेल इतका रक्तसंचय ह्या युद्धांत उत्पन्न झाला व तो सिंधुरूपानें म्हणजे महानदीरूपानें वाहूं लागला! त्यांचा वेग व उग्रस्वरूप इतकें भयहेतुक होतें कीं देवस्त्रियांस अगर पृथ्वीस तीं दोन्हीं असह्य झालीं. भीषण वस्तु आपण जवळ ठेवीत नाहीं व नीटशी पाहतही नाहीं. तात्पर्य रक्तांचे पूर असंख्यात वाहिले. पहिल्या पंक्तींत **अधिक** अलंकार आहे. तिसऱ्या व चवथ्या ओळींत **परिकर** अलंकार आहे, साभिप्राय विशेषणें असलीं म्हणजे हा अलंकार होतो. ५० आणि ५१ या श्लोकद्वयांत **बीभत्स** व **भयानक** रस अनुक्रमें प्रधान आहेत.

१. इंद्रजित्. २. नागाच्या पाशांनीं बांधलेले. ३. जे दुर्जय प्रभु रामलक्ष्मण ते, घननाद पण करुनियां अहिपाशनिबद्ध करी; (आणि त्या योगें) सुगळ-श्री-धृति-बुद्धिही (तो इंद्रजित्) हरी. अर्थ स्पष्ट आहे. दुर्जय म्हणजे अजिंक्य; सुगळाची तेजस्विता, धैर्य व विवेकबुद्धि सुद्धां नाहींशी झाली; रामलक्ष्मण नागपाशांनीं मूर्च्छित होऊन पडले, तेव्हां सुग्रीवाचें मुख म्लान झालें, धैर्य गळालें आणि विचारशक्ति शून्य झाली. अजिंक्य राघवद्वयास मूर्च्छित केलें. यावरून इंद्रजिताचें युद्धकलापटुत्व आणि रामलक्ष्मण पडल्याबरोबर सुग्रीवाचें तें भयानें गांगरणें, भेदरून जाणें, यावरून सुग्रीवाचें राघवद्वयांवरील निष्कपट प्रेम व भक्ति हीं व्यक्त होतात. येथें **दीपक** अलंकार व **सहोक्ती**ची छाया आहे. ४. शोक करी. ५. तें (रामलक्ष्मणनिबंधन) न वदवे तसीहि (ही सीता) शोचि. त्या शोचितें (त्या दुःखाग्निज्वालेला) त्रिजटा घन (मेघ, जलवर्षी मेघ) होय (होती झाली). नागपाशांमध्यें जखडून गेल्यामुळें निश्चेष्ट पडलेले रामलक्ष्मणांस जेव्हां सीतेनें पुष्पक विमानांतून पाहिलें, तेव्हां वर्णन करण्यास अशक्य असा दगडास रडविणारा शोक सीतेनें केला, परंतु त्यावेळीं तिच्या शोकसंतापज्वालेला शमविणारी त्रिजटा तेथें होती म्हणून बरें झालें. त्रिजटेनें सांत्वन करून सीतेचा शोकावेग शमविला. त्रिजटेचें सांत्वन म्हणजे अग्निशमन करणारी जलधाराच होय. त्रिजटा ही सीतेची देखरेख करणाऱ्या राक्षसींचा पहारा ठेविला होता, त्यावरील मुख्य. स्वप्नांतील दृष्टांतानें दयार्द्र अंतःकरण होतें म्हणून सीतेवर प्रेम करावें अशी बुद्धि तिला झाली. ही पुढें सीतेचें हित करणारी सखी झाली. येथें दुसऱ्या ओळींत **रूपकालंकार** आहे. ६. ज्वालेस.

करि पत्रिप[1] मुक्त बोधसा, कथि शत्रूंत सुकीर्ति हो! धेंसा[2]. ॥ ९३
मग जागविला[3] महाबळें[4] घटकर्ण[5] स्वजया महाखळें[6]; ।
कटका गट काळसा कैरी[7], सुगळा[8] मोडुनि संगरीं धरी, ॥ ९४
परतोनि पुरींत जों शिरे[9], म्हणती त्या सुरकाळ[10] होसि रे! ।
तंव सावध होय तो हरी[11], हरि[12] तच्छ्रीविजयासि[13], मोहरी. ॥ ९५
फिरला[14], शिरला बळांत कोपें, गमलें केवळ तें तयासि सोपें. ।
भुज पाद शिर प्रभु स्वरोपें[15] हरि, शोभे अरि धूमकेतुलोपें[16]. ॥ ९६
करि शोक दशास्य, सोदरक्षय[17] होतां धरि फार तो[18] दरे[19], ।
मग कुंभनिकुंभ कोपले बहु तन्नंदन[20], तेहि लोपले[21]. ॥ ९७

---

१. गरुड. बोधसा, पत्रिप (रामलक्ष्मणांस) मुक्त करि—हा अन्वय. सर्पशत्रु गरुडानें नागपाशांपासून दशरथात्मजांस मुक्त केलें. ज्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा बोध (ज्ञान) झाल्यावर त्रिगुणात्मक संसारबंधनापासून जीव मुक्त होऊन 'मीच ब्रह्म आहें' असें त्यास समजतें, त्याप्रमाणें राघवांस गरुडानें मुक्त केलें. उपमानउपमेयांमध्यें मोहापासून मुक्त होणें व आत्मस्वरूप ओळखणें हा साधारण धर्म आहे. हा उपमालंकार. रामलक्ष्मण पाशमुक्त झाल्यावर वानरसैन्यांत जो सिंहनाद झाला त्यामुळें शत्रूंत (राक्षसांस) रामलक्ष्मण मुक्त झाले व आपले प्रयत्न व्यर्थ आहेत, असें धसा सुकीर्तीनें कळविलें. म्हणजे ह्या गोष्टी रावणास कळल्या. २. मोठी. ३. जागा केला. ४. रावणानें. ५. कुंभकर्ण. ६. महादुष्ट. ७. कुंभकर्ण गट्ट करी. ८. सुग्रीवाला. ९. कुंभकर्ण लंकेंत शिरला तों. १०. देवांचा नाश करणारा. ११. वानर. (सुग्रीव). १२. हरण करी. १३. षण्मास निद्रेमध्यें घालवून एक दिवस जागृत राहणारा महाबळी कुंभकर्ण, त्याच्या कीर्तीचें हरण सुग्रीवानें केलें; म्हणजे त्याचा पराजय करूनं आपण जय मिळविला. व मोहरी म्हणजे त्यांस मागें फिरविलें. १४. कुंभकर्ण फिरला. १५. स्व-रोपें=आपल्या बाणानें. १६. प्रभु स्वरोपें (कुंभकर्णाचे) भुज, पाद, शिर, हरि; आणि) अरि धूमकेतुलोपें शोभे—हा अन्वय. रामचंद्रानें कुंभकर्णाचे हस्त, पाय, मस्तक वगैरे तोडून टाकिले म्हणजे त्यास ठार मारिलें; आणि धूमकेतूचा अस्त झाल्यावर सूर्यचंद्रादि प्रकाशगोलक शोभायमान दिसतात, तसा कुंभकर्णाचा वध झाल्यावर रामचंद्र शोभूं लागला. धूमकेतूचा तीव्र प्रकाश क्षणैक राहून पुनरपि नष्ट होतो, परंतु सूर्यचंद्रादिकांचे प्रकाश निरंतर असतात, तद्वतच कुंभकर्ण व रामचंद्र यांचें सामर्थ्य अनुक्रमें होतें. म्हणजे राक्षसाचें सामर्थ्य क्षणैकजीवि व रामचंद्रप्रभूचें नित्य आहे, असें कवीनें मोठ्या चातुर्यानें रूपक योजना करून व्यक्त केलें आहे. 'धूमकेतु' याचा अर्थ 'कृष्णमेघ' असा घेतला तरी चालेल. पण त्यांत पूर्वोक्त चमत्कार दिसणार नाहीं. रविचंद्रांचा ग्रास करूं इच्छिणारे राहुकेतू यांची छाया नाहींशी झाल्याबद्दल आपले तेजोगोलक (रविचंद्र) शोभतात, तसा रामप्रभु शोभावयास लागला; हाही अर्थ घ्यावा. १७. बंधूचा नाश. १८. रावण. १९. भय. २०. रावणाला आनंद देणार. २१. मेले.

त्रिशिरा अतिकायही खिजे, दशकंठात्मज संगरीं निजे; ।
सुत देवनरांतकादि जे, बहु त्यांच्या रुधिरें धरा भिजे. ॥ ५८
तपले, खपले, न राहिले प्रिय मोठे, भटभंग पाहिले; ।
घननाद कृती, तथापि त्या स्वजयाचीच कथी कथा पित्या. ॥ ५९
प्रभु, लक्ष्मण, सैन्यही खिळी; अतिमूर्छा सकळांसही गिळी. ।
स्थळ ऋक्षप दूर जाणवी, अतिदिव्यौषधि शीघ्र आणवी. ॥ ६०
मरुदात्मज तो उडे जवें, यश अत्यद्भुत दाखवी नवें, ।
वदले सुर साधु मर्त्य 'गा;' हरि कैलाससमीपवर्त्यगा. ॥ ६१
द्रुत ओषधिशृंग आणिलें, व्यसन क्षिप्र समूळ खाणिलें, ।
परतूनि तसेंचि पाविलें, बळ सेश स्वनुतीस लाविलें. ॥ ६२

१. देव व मनुष्यें यांचा अंत करणारे. २. मोठ्या वीरांचे पराभव. ३. इंद्रजित्. ४. तथापि कृती घननाद त्या पित्या (रावणाला) स्वजयाचीच कथा कथि—अन्वय. मोठे मोठे वीर मेले, महापराक्रमी रावणपुत्र समरांगणांत कायमची झोंप घेऊं लागले, तथापि आपल्या पराक्रमानें स्वतःस धन्य मानून घेणारा अहंमन्य इंद्रजित् 'आपण युद्धभूमीवर जाऊन रामलक्ष्मणांचा आपल्या अमोघ बाणांनीं वध करून येतों' अशी पराक्रमपूर्वक प्रतिज्ञा रावणासमोर करिता झाला. त्यानें सर्व वानरसैन्यास व रामलक्ष्मणास मूर्च्छित करून पृथ्वीला खिळून टाकिलें हें पुढील श्लोकांत सांगितलेंच आहे. ५. ऋक्षप (ऋक्षपति जांबुवंत) दूर स्थळ जाणवी, आणि अतिदिव्यौषधि शीघ्र आणवी—असा अन्वय. बिभीषण व हनुमान् हे उभयतां कोण कोण पडले हें पाहण्याकरितां रात्रीं निघाले व पहात पहात जांबुवंत पडला होता तेथें गेले. तेव्हां जांबुवंतानें 'हिमालय व कैलास यांच्या मध्यें द्रोणागिरी' नामक दिव्यौषधी धारण करणारा पर्वत आहे तेथें जाऊन मृतसंजीवनी, विशल्यकरणी (शल्य नाहीसें करणारी), सुवर्णकरणी (सोन्यासारखी अंगकांति करणारी), आणि संधानी (जखम भरून आणणारी) अशा औषधी घेऊन ये' म्हणून मारुतीस सांगितलें. ६. वायुसुत. ७. मारुति हरी. ८. कैलासाच्या समीप असणाऱ्या द्रोणागिरीला. ९. सुर, साधु, मर्त्य 'गा' (असें) वदले; (मारुति-कैलाससमीपवर्तिअगा हरि—हा अन्वय. रामलक्ष्मणांसहित वानरांस पुनर्जन्म देण्यासाठीं केलेलें तें मारुतीचें चंडवेगात्मक उड्डाण पाहून देव, ऋषि, मानव हे सर्वजण मारुतीचें तें अभिनव यश 'गाऊं या' असें बोलूं लागले. मारुतीनें कैलासशिखराजवळ असणारा पर्वत पाहिला. पण 'आपण आल्याबरोबर येथील औषधी अदृश्य झाल्या' असें पाहून त्यानें तो पर्वतच उचलून आणला! याला म्हणावी एकनिष्ठ स्वामिभक्ति!. १०. संकट. ११. लवकर. १२. (ओषधिशृंग) परतूनि तसेंच मारुतीनें पाविलें, (आणि) सेश बळ स्वनुतीस लाविलें—हा अन्वय. हनुमंतानें तो द्रोणागिरी तसाच्या तसाच पुनः जेथल्या तेथें नेऊन ठेविला. हें अद्भुत कृत्य पाहून सेश बळ म्हणजे रामलक्ष्मणसुग्रीवादिकवानरसेनापतिसुद्धां सर्व कपिसैन्य मारुतीची नुति म्हणजे स्तुति करण्यास लागलें.

विधि, [1]शर्व सदार, [3]मानवे, स्तव ती गाय सदां रमा नवें. ।
[4]उपकारभरार्त तो लवे प्रभु, कीं हा गिरिसीं न तोलवे. ॥ १३
प्रभुची धरि [5]मुग्धभाव धी, [6]खळ मायाजनकात्मजा वधी. ।
करि लक्ष्मण [7]तैल्ह्या रणीं, पुरवी [8]वासवदृष्टिपारणीं. ॥ १४
सुतशोकदवांत [9]भाजला, [10]क्षितिकन्याहनना न लाजला; ।
सदमात्य [11]सुपार्श्व वारि त्या [12]सुरगोब्राह्मणसाधुमारिल्या. ॥ १५
चतुरंगबलाब्धिला [13]भरी बुडवाया रघुनायका [14]अरी, ।
प्रभुमार्गणकुंभजा पुरे न, जसें कक्ष दवापुढें नुरे. ॥ १६

---

१. ब्रह्मदेव. २. उमेसहित शंकर. ३. आनंदातें पावले. ४. तो प्रभु (रामचंद्र) उपकार-भर-आर्त लवे; कीं हा गिरिसी तोलवे न—हा अन्वय. ह्या उपकारश्रेणीनें भाराव-लेला रामचंद्र मारुतीला लवला म्हणजे मारुतीच्या अगणित उपकारांच्या भारानें राम-चंद्र त्याला नमस्कार करूं लागला. कारण, ह्या उपकारापुढें पर्वताचा मोठेपणा सुद्धां यःकश्चित् झाला; पर्वत हा कांहींच नव्हे असें झालें. येथें आणखी एक अर्थ निघण्याचा संभव आहे. प्रभु रामचंद्र हा मानधन होता. पर्वत हा कोणासच लवत नाहीं, पण तोही कदाचित् लवेल; परंतु, लवण्याच्या कामीं पर्वतापेक्षांही जास्त आग्रही असा सर्ववंद्य रामचंद्र हा सुद्धां लवला. तेव्हां मारुतीचे उपकार केवढे आभारात्मक पाहिजेत?. ५. खळ (इंद्रजित) माया-जनकात्मजा (कपटानें उत्पन्न केलेली, खोटी सीता) इचा वध करी, (तेव्हां) प्रभुची (रामचंद्राची) धी (बुद्धि) मुग्धभाव धरी. म्हणजे सीतेचा वध झालेला पाहून रामचंद्रास मूर्च्छा आली. येथें त्याचा बुद्धिस्तंभ झाला, काय करावें हें सुचेना असेंही म्हणतां येईल. पण हा अर्थ गौण होय. प्रियपत्नी मेली हें पाहून रामचंद्रास मूर्च्छा येणें हेंच साहजिक होय. ६. राक्षस इंद्रजित्. ७. इंद्रजिताचा वध. ८. (लक्ष्मण) वासव (इंद्र) दृष्टि-पारणीं पुरवी. म्हणजे इंद्राच्या दृष्टीचें पारणें फेडी. आपला शत्रु मेला असें पाहून इंद्रास समाधान झालें. 'इंद्रजिता वध कुव्हां होईल' ह्या निदिध्यासाचें व्रत इंद्राच्या डोळ्यांनीं घेतलें होतें. त्या व्रताची समाप्ति झाली. इंद्रजित् मरेपर्यंत कांहीं बघावयाचें नाहीं (हा इंद्राच्या सहस्र नेत्रांस मोठाच उपवास!) असें व्रत घेणाऱ्या इंद्राच्या नयनांचें पारणें फिटलें. इंद्रजितापासून इंद्राला किती ताप झाला असेल याची कल्पना सहज व्हावी एतदर्थच कवीनें 'पारणीं' या शब्दाची योजना केली आहे. ९. 'रावण' हा कर्ता. १०. सीतेला माराव-यास. ११. रावणाचा मंत्री; हा सज्जन होता. १२. देव, गाई, ब्राह्मण व साधु यांचा छळ करणारा. १३. अरि (रावण) रघुनायका बुडवाया चतुरंगबलाब्धिला भरी. (तो अब्धि) प्रभु-मार्गण-कुंभजा न पुरे, जसें दवापुढें कक्ष नुरे—हा अन्वय. रामचंद्राचा नाश करण्यासाठीं रावणानें आपला चतुरंग सेनासमुद्र कांठोकांठ भरून तयार केला, परंतु प्रभूचे बाण अगस्त्यरूपी होऊन त्यांनीं तो सर्व समुद्र आटवून टाकिला. रावणानें रथ, हय,

भट घे जड वासवास जें समरा सेवुनि आसवा सजे, ।
म्हणवी बहु 'हाय!', कांपवी कपि, भी यत्खरसायका पवी. ॥ १७
प्रियसून्वरिचें स्वशक्तिनें दशकंठें भ्रमहातभक्तिनें ।
समरीं मग वक्ष भेदिलें, भय भारी भगवत्सभे दिलें. ॥ १८
नगशृंग पुन्हाहि तो दयाकर आणी प्रभुच्या हितोदया; ।
प्रभुतें भजनें करी रिणी, गणि त्यां भक्ति निजा शरीरिणी, ॥ १९

---

हस्ती, पादाति इत्यादिकांनीं पूर्ण झालेली चतुरंग (चार अंगें आहेत जिला अशी) सेना रामचंद्राच्या समाचारासाठीं पाठविली. ती सेना म्हणजे एक जलनिधिच! पण अगस्त्यऋषीनें जसा एका आचमनानें सर्व समुद्र पिऊन टाकिला, तसा हा अरिसेनासागर क्षणमात्रामध्यें रामसायकांनीं आटवून टाकिला. सेनासमुद्रच नाहींसा झाल्यावर तो रामचंद्रास बुडविणार कोठून? गवताची राशी अग्निज्वालेपुढें टिकत नाहीं, तद्वत ही सेना क्षणैकांत भस्मसात् झाली; 'समुद्र आणि अगस्त्य' या रूपकानें रामसायकांचें सामर्थ्य व 'दव आणि कक्ष' या उपमेनें अरिसेनेचा क्षणमात्रांत झालेला विध्वंस हीं उत्तम प्रकारें व्यक्त होतात. १४. रावण.

१. वासवास (इंद्रास) जे (जे योद्धे) जड (जिंकण्यास अवघड) ते भट (राक्षस) घे (घेता झाला). आसवा सेवुनि समरा सजे (तयार झाला). रावणाचे वीर इंद्राला सुद्धां जिंकितां येण्यासारखे नव्हते; ते घेऊन तो समराला, लढाईला सजला. आसवा (दारू, मद्य) घेऊन तो लढाईस तयार झाला. 'आसवा' याचा 'अश्रु' असा अर्थ केल्यास बंधु, पुत्र, मित्र, सेवक यांच्या मरणानें प्राप्त झालेले दुःखाश्रु गिळून रावण युद्धभूमिकेवर गेला असें म्हणतां येईल. पहिला अर्थ बरा. युद्धापूर्वी मादक पदार्थ सेवन करण्याची पद्धति अद्यापिही नष्ट झाली नाहीं. समरांतील रावणाचें कौशल्य पहा: बहु 'हाय!' म्हणवी. पुष्कळांस त्यानें 'हाय, हाय' करावयास लाविलें; कपि कांपवी (वानरसैन्यांत कंप सुटला. वानर भीतिग्रस्त झाले.) यत्खरसायका पवी भी म्हणजे ज्याच्या प्रखर बाणापुढें इंद्राचें शस्त्र (वज्र) फिकें पडत असे. त्या रावणानें पूर्वोक्त कर्म केलें. २. प्रिय-सूनु-अरि=प्रियपुत्राचा शत्रु लक्ष्मण त्याचें. ३. भ्रमानें टाकिली भक्ति ज्याणें असा त्यानें. ४. वक्षःस्थळ. ५. देवांच्या सभेला. ६. द्रोणागिरी. ७. मारुति. ८. रामाच्या. ९. रामचंद्राचें कल्याण व्हावें अशी ज्याची मनीषा त्या दयाशील मारुतीनें पुनः द्रोणागिरी आणून लक्ष्मणास संजीवित केल्यानंतर कवि म्हणतो: (मारुति) भजनें प्रभूतें ऋणी करी. म्हणजे भक्ति करून, एकनिष्ठेनें सेवा करून मारुतीनें आपल्या स्वामीस, यजमानाला, आराध्य देवतेला (रामचंद्राला) ऋणी करून ठेविलें. रामचंद्र मारुतीचा जन्माचा ऋणी झाला. मारुति धनको आणि भगवान् ऋणको! तेव्हां रामचंद्रास या कर्जाची फेड कशी करावी हें समजेना. म्हणून मारुतीला 'बा मारुते! तूं मूर्तिमंत भक्तिच आहेस! असें गणावयास, मानावयास लागतों' असें रामचंद्र म्हणाले. असली जाडी शिफारस मिळाल्यावर मारुतीला 'धन्य' असें वाटलें असेल. 'अमूर्त स्वामीगौरवः' हें सर्वथा खरें आहे. १०. मारुतीस.

केलहा बळहानिकारणा करि वाटे खळ हा निकारणा; ।
निरेया चिर या न जावया यश दे आत्मपदा भजावया. ॥ ७०
भगवान् हैरिच्या रथीं चढे, बहु कोपें अँरि मानसीं कढे; ।
वचके हैरिला न वारण, त्रिँदश प्रेक्षिति हा नवा रण. ॥ ७१

१. बळहानिकारणा (बळाच्या हानीचें, नाशाचें कारण जो) कलह त्यातें (कलहाला, युद्धाला) हा खळ (हा रावण, दुष्टबुद्धि रावण) निकारणा (व्यर्थ, निष्कारण) करि (करिता झाला) असें वाटे. आपल्या स्वतःचें बळ आणि सैन्य यांचा नाश करणाऱ्या युद्धाला दुष्टबुद्धि रावण उगीच प्रवृत्त झाला, असें वाटे (त्या राम प्रभूस वाटूं लागलें.) इतका नाश झाला, आप्त इष्टबंधु नाहींसे झाले, तरी हा साम करण्याची इच्छा प्रकट करित नाहीं, व्यर्थ संग्राम करूं इच्छितो, असें त्या दयाशील रामचंद्रास वाटलें. २. चिर निरया न जावया व आत्मपदा भजावया या (रावणाला) यश दे–असा अन्वय केला तर अर्थ असा होईल कीं, रावणानें नेहमीं नरककुंडांत (निरयांत) पडूं नये व त्यानें आत्मपद (परब्रह्मस्वरूप) नित्य भजावें म्हणून त्या रावणाला प्रभूनें यश दिलें. रावणाला समरांत विजय दिला तो केवळ त्याला आपलें दर्शन पुष्कळ वेळ होऊन त्यानें नरकांत जाऊं नये म्हणून दिलें. येथें रामचंद्राची औदार्य बुद्धि प्रकट होते. रामापुढें रावणानें काय टिकावें? पण त्याची महती वाढावी म्हणून रामानें त्यास कांहीं वेळ खेळविलें. पंत 'दिव्यरामायणां'त म्हणतातः 'या पूर्वी युद्धांत क्रूरा शूरा दशानना मोडी। थोडी दावी शक्ति क्रीडायाला पुनः पुनः सोडी ॥ (का० सं०–अंक २८ पहा). तेव्हां रावण-मूषकास रामसिंहानें कांहीं वेळ पूर्वोक्त हेतुसाठीं खेळविलें–हा एक अन्वय. आतां या दोन्ही पंक्ति रामोक्ति समजून चालल्यास 'चिर निरया न जावया (व) आत्मपदा भजावया या (रामास) यश दे (म्हणजे मी जो सामप्रकार सांगत आहें त्याचें ग्रहण करून मला यश दे, दुष्ट शत्रूस ही मी सामपद्धतीनें वळविला अशी माझी कीर्ति होऊं दे) असा अर्थ निघेल. पंत 'चतुर्थ स्तोत्ररामायणां'त रामचंद्राकडून वदवितातः–'मच्चरणावरि सीता शीर्षासह धरुनि साममार्गे वहा ॥ बुडवितिलचि दशकंठा! जे काम क्रोध लोभ हे तुज गा! । बुडल्यासि म्हणसि हरि-हरसे धर्मन्याय हेतु जगा ॥ वरुनि सदा मोर रहा, दे सीता, स्वस्थ वांच पापा! या । सोडी दुराग्रहा, हा त्यजिल न तुलाचि कांच पापा या? ॥ पंतांचा हा आशय धरून अर्थ केल्यास असा होईलः–हे रावणा! तुला जर नरकांत जावयाचें नसेल व आत्मपद म्हणजे तुझें राज्य याची जर तुला पुष्कळ काळ सेवा करावयाची असेल तर हा निकारण व बलहानिकारण कलह टाकून देऊन साम कर, माझी सीता मला परत दे आणि मला शरण ये. असें झालें तर स्वस्त्रीचें हरण करणारासही सामेच्छु रामचंद्रानें जिवंत ठेविलें व राज्यपद दिलें, 'अशी माझी कीर्ति होईल.' पहिला अर्थ बरा दिसतो. दुसराही त्याज्य नाहीं. पंतांच्या मनांत कोणता अर्थ विवक्षित होता, किंवा हे दोन्ही नसून कांहीं तिसराच अर्थ त्यांस इष्ट होता हें उपलब्ध असलेल्या प्रतीवरून सांगण्यास मार्ग नाहीं. ३. इंद्राच्या. ४. रावण. ५. सिंहाला. ६. देव.

दिनसप्तक जाय संततें समरें, अद्भुत गाति संत तें. ।
तुटलीं फुटलीं पुन्हा शिरें, प्रभु 'चिंतेंत' म्हणे 'मना! शिरें'. ॥ ७२

प्रभुनें समरांत सोडिल्या विशिखांच्या अरि तापला शतें, ।
धरि रूप मधूंत होय जें कुसुमाहीं धरितां पलाश तें. ॥ ७३

रविचें हृदय स्वयें कथी घटजन्मा, प्रभु तो तया जपे, ।
रविदत्तवरें परा मथी; द्रुहिणास्त्रें उर भेदितां खपे. ॥ ७४

---

१. इंद्रानें पाठविलेल्या रथावर प्रभु बसला तेव्हां रावणाच्या मनःसंतापाला.कद, ऊत आला; रावण अत्यंत क्रुद्ध झाला. रावणरूपी हस्ती रामसिंहाला भ्याला नाहीं. रावणानें सर्व देवांस जिंकून टाकिलें होतें; म्हणून त्रिदशांना (देवांस) हें रामरावणयुद्ध (मानवराक्षस-युद्ध) अभिनवच झालें. (ह्मा) संततें समरें (अखंड युद्धामध्यें) दिनसप्तक (एक आठवडा) जाय. एक आठवडाभर अहोरात्र हें अद्भुत युद्ध सारखें चाललें होतें. तें संत गाति, म्हणजे कवींना हें अद्वितीय युद्ध गावयाला एक विषयच झाला. कविप्रतिमा प्रज्वलित होण्यासारखें हें युद्ध होतें. पण वर्णन करितां करितां थकून त्यांनीं म्हटलें काय? 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव!' 'या युद्धाला उपमाच नाहीं!' २. तुटलीं शिरें पुनः फुटलीं. प्रभु म्हणेः—'हे मना! चिंतेंत शिरें (शिर)—हा अन्वय. रामानें रावणाचीं शिरें शंभरवेळां तोडिलीं तरी पुनः तीं फुटावयास लागलीं; म्हणजे पुनः धडावर बसावयास लागलीं असें पाहून रामचंद्र मनास उद्देशून म्हणतोः—'मना! तूं चिंतेंत शिर.' म्हणजे रामचंद्राचें मन चिंतामग्न होऊन पुढें काय करावें हें त्यास सुचेना. 'शिर तुटलें तरी पुनः तें जसेंच्या तसें येऊन बसेल' हा रावणास महादेवाचा वर होता. ३. सोडिलेल्या बाणांच्या शेंकड्यांनीं. ४. प्रभूनें (रामानें) सोडिल्या (सोडिलेल्या) विशिखांच्या (बाणांच्या) शतें अरि (रावण) तापला. मधूंत (वसंतऋतूंत). कुसुमाहीं (पुष्पांनीं) धरितां पलाश जें रूप होय, तें (रावण) धरी—हा अन्वय. रामचंद्रानें शेंकडों बाण (अग्निरूपीच ते!) सोडल्यामुळें रावण संतापून गेला, भाजून निघाला. तो कसा दिसला? तर वसंतऋतूमध्यें फुलें यावयास लागलीं म्हणजे पलाश (पळस) जसा तांबडा लाल दिसावयास लागतो, तसा रावण दिसला. जाज्वल्य बाणांनीं रक्ताच्या चिळकांड्या उडावयास लागल्यामुळें रावणाचें शरीर फुललेल्या पळसाप्रमाणें दिसावयास लागलें. रावणाची शरीरस्थिति हुबेहुब रेखाटण्यास वरील शब्दयोजना किती समर्पक आहे! येथें दुसरा व चवथा चरण मात्र यमकबद्ध आहेत, ७३ वा श्लोक ७१ व्या नंतर वाचल्यास अर्थसंगतीस सौकर्य येईल. ५. घटजन्मा (अगस्त्य) स्वयें (स्वतः येऊन) रवीचें हृदय कथी; तो प्रभु (राम) तया (रविहृदयमंत्रास) जपे (जप करिता झाला.)० (आणि) रवि-दत्त-वरें (सूर्यानें दिलेल्या वराच्या साह्यानें) परा (शत्रूस, रावणास) मथी (मारिता झाला) द्रुहिणास्त्रें (ब्रह्मास्त्रानें) उर भेदितां (छाती, वक्षःस्थळ फोडल्यावर) खपे (रावण मेला.)—हा सान्वय शब्दार्थ. रामास चिंता प्राप्त झाली, तेव्हां अगस्त्य ऋषी स्वतः येऊन त्यांनीं रामास सौर मंत्राचा उपदेश केला. ह्या मंत्राचा जप करून रामानें

अरि होय परासु वासवा हे शुभ वेळा निववी, रमा रणातें ।
स्तवि, कीर्ति बरा सुवास वाहे, मन दे या शिव वीरमारणातें. ॥ ७५
परमोत्सव होय देवलोकीं, नरलोकीं, भुजगांचियाहि ओकीं[2] ।
त्रिजगद्रिपु[3] मारिलाचि तो कीं, प्रभुची दृष्टि जगीं जसीच तोकीं. ॥७६
सुरदुंदुभि तोचि मेघ गाजे, बहु वीणामुरजादि वाद्य वाजे, ।
अजितीं वरपुष्पवृष्टि साजे, मुनि गातां[6] गणिकागणीं न लाजे. ॥ ७७

---

युद्धास आरंभ केला. पुढें रावणाचा वध शिरें तोडून होत नाहीं, असें पाहून ब्रह्मास्त्रानें रावणाचें वक्षःस्थल विदारिलें व त्यास ठार मारिला. ह्या सौर मंत्राचें माहात्म्य रामायण–युद्धकांड, सर्ग १०५ यांत दिलें आहे. येथें १ ला व ३ रा; २ रा व ४ था चरण यमकांत आहेत.

१. अरि (रावण) परासु (गतप्राण) होय (झाला) हे (हीं) शुभ वेळा (मंगलकाल) वासवा (इंद्राला) निववी (समाधान देती झाली). रमा (लक्ष्मी) रणातें (युद्धातें) स्तवी (स्तवन करी). कीर्ति बरा (चांगला, मधुर) सुवास (सुगंध वायु) वाहे. शिव (शंकर) या वीरमारणातें (रावणहननाला) मन दे (लक्ष्य देता झाला). सुर-गो-ब्राह्मणांस त्रास देणारा रावण गतप्राण झाला, तेंव्हां स्वर्गादि त्रिलोकांत किती आनंद झाला, याचें वर्णन पंत ७५,७६ श्लोकांत करितातः—रावणवधाची मंगल वेला प्राप्त झाली, पर्वणी आली, असें पाहून इंद्राचें समाधान झालें. कारण त्रासदायक शत्रु नाहींसा झाला. प्रत्यक्ष लक्ष्मी (जिला रावणासारख्या दुष्टाची सेवा करावी लागत होती) ती या युद्धाची स्तुति करूं लागली. कारण तिला दुःसह होणारा कारागृहवास आतां संपला. सुगंधी वायूला आनंद होऊन तो रामकीर्ति वहावयास लागला. त्याला आजपर्यंत रावणराज्यांत मलापवाहनाचें काम करावें लागत असे! शंकर नित्य योगी, तपश्चर्येमध्यें मग्न झालेले; पण त्यांना सुद्धां हें युद्ध संस्मरणीय झालें. पुढील पद्य स्पष्ट आहे. शेवटील पंक्तींत **उपमा** आहे ती मात्र विसरूं नये. पिता जसा आपल्या कन्यापुत्रांवर प्रेमदृष्टि ठेवितो, तशीच प्रभूची (परमेश्वराची) प्रेमदृष्टि या जगावर, विश्वावर आहे. आईबाप मुलांवर जशी निष्काम बुद्धीनें व शुद्ध मनानें प्रीति करितात, तशीच सर्व विश्वावर विश्वजनकाची प्रीति असते ही परमेश्वरविषयक कविकल्पना वाचकांनीं विसरूं नये. जगाचें कल्याण करावयाचें हा परमेश्वराचा सत्य संकल्प लोकांच्या मनांत जितका दृढपणानें ठसेल, तितकी त्यांची ईशभक्ति सबल होईल. हा भाव विसरतों म्हणून ईश्वरी प्रेमाविषयीं साशंक होऊन आपण दुर्मार्गाकडे वळतों. म्हणून 'येई, येई वो विठाबाई! । माझे पंढरीचे आई!' ही तुकोबारायाची उक्ति मनामध्यें पूर्णत्वानें बाणल्यास आपलें अपरिमित कल्याण होणार आहे. २. घरीं, लोकांमध्यें. ३. स्वर्ग, मृत्यु, पाताळ यांचा शत्रु. ४. मृदंग. 'वाद्य' हें एकवचन जातिसूचक आहे. ५. रामचंद्रावर. ६. मुनि गणिकागणीं गातां लाजे न. यज्ञयागांचा विध्वंस करणारा रावण मेल्यावर मुनींना किती

मधुरस्वर, नैकरागजातीक्षम गंधर्व रघूत्तमासि गाती. ।
हिम मंद सुगंध वायु वाहे. स्तवितां न द्विजदेववृंद राहे. ॥ ७८
'जय राघव! राम! रावणारे!' म्हणती 'तूंहि सुधन्य रावणा रे! ।
प्रभुजी! भवदूनपावणा रे! खचरा! हो गतिपूज्य पावणारे!' ॥ ७९
करवी बरवी क्रिया तशाची, बहु चाड प्रभुला सदा यशाची. ।

---

आनंद झाला हें पंतांनीं मोठ्या खुबीनें सांगितलें आहे. मुनि हे स्वतः वेदाभ्यासजड म्हणून गायनवादनादि ललितकलांविषयीं अरसिकच खरे. पण त्यांचा आनंदातिरेक इतका झाला कीं नृत्यगायनामध्यें अतिनिष्णात असा जो वारांगनांचा समुदाय, त्यामध्यें गाण्याला ऋषींना यत्किंचितही लज्जा वाटली नाहीं! गायनकुशलांच्या सभेमध्यें गाणें दुष्करच होय. त्यांत मठ्ठ बुद्धीच्या ऋषींला तर हें कर्म दुर्घटतर. तथापि ते सुद्धां भीडमर्यादा एकीकडे ठेऊन गावयास लागले! सारांश, या आनंदातिशयानें 'ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी?' अशी त्यांची स्थिति झाली! आम्हा स्वतःला सुद्धां अशी भीति आहे कीं ही कवीची अभिनव सृष्टि पाहून वाचकांचीही अशीच स्थिति होईल कीं काय कोण जाणे!

१. मधुरस्वर नैकरागजातीक्षम गंधर्व रघूत्तमासी गाती. म्हणजे निसर्गतःच ज्यांचा स्वर कोकिळेप्रमाणें मधुर व अनेक (न+एक=नैक) रागरागिण्यांच्या जाति (भेद) त्यांमध्यें निष्णात असे गंधर्व रघुकुलतिलकाचें यश गाऊं लागले. २. समर्थ. ३. ब्राह्मण आणि देव यांनीं एकत्र जमून सारखी स्तुति चालविली. स्तुतीला खळ पडेना. ४. रावणशत्रो! ५. देव ब्राह्मण स्तुति करितात, 'हे राघव! राम! रावणशत्रो! तुझा जय असो!' आणखी म्हणतात, 'हे रावणा! तूं ही सुधन्य आहेस. (कारण सर्व जगाला पूत करणाऱ्या प्रभूच्या हातून तुझा शेवट झाला. अंतसमयीं तुला रामचरण दिसले; तेव्हां तुझी धन्यता, तुझें भाग्य, काय वर्णन करावें?' पुनः रामाकडे पाहून म्हणतात, 'प्रभुजी! प्रभो! तूं संसारामधील त्रिविध तापानें पापमग्न झालेल्यांना पावना (पावन करणारा, 'शुद्ध करणारा) आहेस. अहंकारामध्यें मग्न झालेला महापापी रावण याला सुद्धां तूं शुद्ध केलेंस!' पुनः रावणाकडे दृष्टि फेंकून म्हणतात, 'हे पावनारे! (अरे पुण्यशत्रो!) खचरा! (राक्षसा!) तूं आतां गति-पूज्य हो! म्हणजे संसाराच्या भयानक भोंवऱ्यामध्यें सांपडून तूं लक्ष चौऱ्याशीं योनींमधून हिंडत आहेस, तें तुझें फिरणें आतां बंद होऊं दे.' म्हणजे 'तुला मुक्ति मिळाली. स्थिर हो. आतां जन्ममरणाचें तुला कारणच उरलें नाहीं.' रामाचा पराक्रम व दयालुत्व आणि रावणाचें भाग्य आणि मुक्तिप्राप्ति हें या स्तोत्रांत सांगितलें आहे. ६. संसारानें तापलेल्यांस पवित्र कर-णाऱ्या. ७. येथें प्रासाकरितां 'णा' योजिला आहे. ८. तशाची म्हणजे परदारापकर्षण करणाऱ्या महापातकी रावणाची उत्तरक्रिया रामानें करविली. कारण रामप्रभुला यशाची, कीर्तीची विशेष आवड होती. वनवासामध्यें पत्नीविरहदुःख देऊन ज्यानें आपला संताप द्विगुणित केला त्याला जन्मोत्तर अनेक यातना व्हाव्या अशी सामान्य मनुष्य इच्छा करील व करितो. परंतु राम प्रभूचें मन उदार असल्यामुळें शत्रूलाही सद्गति मिळावी अशासाठीं रामानें बिभीषणास

न रुचे स्वशुभा कथा, पिशाला प्रभु दे सद्गतिची तथापि शाला. ॥८०
प्रभुच्या वचनें दशास्यभार्या समजावी कळवूनि तत्व आर्या; ।
शुचिबुद्धि बिभीषण स्वतापा शमवी गाउनि राघवप्रतापा. ॥ ८१
मग राम पुन्हा करी दया त्वरित प्रेरुनि लक्ष्मणा तया, ।
विधिनें विनयालयास या बसवी राज्यपदीं कृताभया. ॥ ८२
शिखिदिव्य नता पतिव्रता करि, पाहेच न तापतीव्रता ; ।

---

सांगून त्या रावणाचा अंत्य विधि करविला. 'लोकोत्तराणां चेतांसि मृदूनि कुसुमादपि' असें भवभूति म्हणतो तें सर्वथा खरें आहे. अंत्यविधि केला नाहीं तर आत्म्यास कष्ट होतात, अशी आपली समजूत आहे.

१. (प्रभुला) स्वशुभा (स्वतःचें मंगल वाढविणारी) कथा न रुचे (आवडे). प्रभु तथापि पिशाला सद्गतिची शाला दे. तसल्या नीच राक्षसाला सद्गति देणाऱ्या प्रभूला, सदय पुरुषसिंहाला स्वकीर्तीचें स्तोम वाढविणें आवडलें नाहीं, यांत आश्चर्य नाहीं. असल्या महापुरुषांचा जन्मच लोकाभ्युदयासाठीं होत असतो. 'स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः' यापेक्षां या नरवराविषयीं जास्त काय म्हणावयाचें आहे? शाला म्हणजे स्थान. २. मंदोदरी. ३. आर्या (आपल्याहून वडील, आपल्यास वंदनीय अशी) दशास्य-भार्या (मंदोदरी) इला तत्त्व कळवून (मृत्युलोकची ही वसति आहे, जन्मास आलेला प्राणी नष्ट व्हावयाचा, रामचंद्राच्या हातून रावणाचा वध झाला, तेव्हां त्यास स्वर्ग मिळेल वगैरे खऱ्या गोष्टी सांगून) समजावी (बिभीषणानें मंदोदरीची समजूत घातली). ४. अनुकंपा. ५. मर्यादेचें घर. (बिभीषण.) ६. नष्टभय. ७. अग्नीचें दिव्य. ८. नता (नम्र असलेली, मर्यादशील, पतीचें अंतरंग ओळखून त्याप्रमाणें आचरण करणारी) पतिव्रता (पत्यैकनिष्ठ सीता) शिखिदिव्य (अग्नींत प्रवेश करून स्वतःच्या पापशून्य आचरणाविषयीं खातरी करून देणारें दिव्य) करि (करिती झाली). ताप-तीव्रता न पाहेच. म्हणजे अग्नीची तीव्रता तिला भासली नाहीं. अग्नीनें तिला बिलकुल इजा दिली नाहीं. स्वतःच्या आचरणानें पवित्र अशा साध्वीला अग्नीनें ताप दिला नाहीं व सीता देवी जशीच्या तशी बाहेर आली व त्यावरून तिनें आपल्या आचरणशुद्धतेविषयीं लोकांची खातरी केली हें ठीकच झालें. दिव्य करून आपला खरेपणा सिद्ध करण्याची चाल वाल्मीकि ऋषीच्या वेळेपासून अस्तित्वांत आहे. मराठेशाईंत खटल्यांचा निकाल दिव्य करवून होत असे हें बहुश्रुत वाचकांस विदितच असेल. यूरपांतही १६ शतकापर्यंत व कोठें कोठें अजूनही दिव्य करण्याचा प्रघात रूढ असल्याचीं उदाहरणें मिळतात. असो; अग्नि हा तापद खरा. पण सीतेसारख्या 'उत्पत्तिपरिपूत' महासाध्वींच्या तेजःपुंज शरीरास स्पर्श करून ताप देण्याची अग्नीसारख्यांची काय प्राज्ञा आहे? तो बिचारा सीतेस पाहून थंड गार होऊन गेला असेल! हा चमत्कार पाहून सर्वप्रकारें दास झालेले देव एकत्र जमून सीतेची स्तुति करावयास लागले. कवि म्हणतात, देवांनीं स्तुति केली म्हणून सीतेची शोभा व कीर्ति विस्तृत झाल्या असें नाहीं. ती सती सर्वदा, पहिल्यापासूनच शोभेस व कीर्तीस भूषण देत होती.

स्तविती सुर सर्वदास, ती मिरवी श्रीयश सर्वदा सती. ॥ ८३

सुरराजमतें परासुतातें दिधली भेटि अजा परा सुतातें, ।
'चिर राज्य करून तें जगातें' वर दे 'जें तैव बाहुतेज गातें.' ॥ ८४

'भरतीं भरतप्रसूवरी प्रभुची नित्य असो दया बरी.' ।
विनवी रघुवीर यापरी, प्रियें तें, मान्य करूनि तो करी. ॥ ८५

---

१. इंद्राच्या परवानगीनें. २. अजा (ज्याला जन्म नाहीं अशा) परा (सर्वांहून श्रेष्ठ अशा) सुतातें (रामाला) परासुतातें (गतप्राण झालेला रामपिता जो दशरथ त्यानें) सुरराजमतें (सुरांचा राजा, देवांचा नायक इंद्र याच्या मतानें) भेटि दिधली. दशरथ राजा पुण्यशील होता. त्यानें आपला देह येथें ठेविल्यानंतर त्यास इंद्रलोक प्राप्त झाला होता. पुढें रामचंद्रानें राक्षसांचा व त्यांचा पति जो रावण, त्या दुष्ट व गोब्राह्मणमारित्या निशाचराचा वध करून पृथ्वीचा भार उतरल्यानंतर संतुष्ट झालेल्या इंद्रानें दशरथाला रामास भेट देण्याविषयीं सुचविलें. तेव्हां आनंदभरित होऊन दशरथानें आपलें पुत्रत्व अंगीकृत करून आपली कीर्ति वाढविणारें जें स्वयंभु परब्रह्म त्याची भेट घेतली, आणि रामचंद्रास वर (आशीर्वाद) दिला, 'हे परात्पर पुरुषा! रामचंद्रा! जें (जग) तुझें बाहुतेज, तुझ्या पराक्रमाची कीर्ति गातें, गात आहे, त्या जगावर तूं चिरकाल राज्य करशील.' दशरथ म्हणतो, 'बा रामचंद्रा! तूं आपल्या बाहुपराक्रमानें दुष्टांचा वध करून जगास सुख दिलेंस, वाली रावण इत्यादिकांची राज्यें आक्रमण करूनही त्यांचा अभिलाष न धरितां सुग्रीव–बिभीषणांवर दया करून त्यांस राज्यावर बसविलेंस, व त्यांस आणि त्यांच्या प्रजांस स्वराज्याचें सुख दिलेंस ही तुझी धवल कीर्ति सर्व लोक गात आहेत. असा परसुखनिरत जो तूं त्या तुझें राज्य चिरकाल असावें व तूं प्रजेस असेंच सुख द्यावेंस, असा मी तुला आशीर्वाद देतों. ३. तुझें. ४. कैकेयीवर. ५. वडिलांची आज्ञा शिरसा वंद्य करून रामचंद्र दशरथास विनंति करितो, 'हे प्रभो! तातमहाराज! भरतीं (भरतावर) भरत-प्रसूवरी (भरत-माता, भरतास जन्म देणारी कैकेयी इच्यावर) प्रभुची (आपली, दशरथाची) बरी दया (पुष्कळ कृपा, पूर्ण कृपा) नित्य (सदोदित) असो (असावी).' रामचंद्राची उदार बुद्धि किती लोकोत्तर आहे पहा. स्वपुत्राच्या अभिवृद्धीसाठीं कैकेयीनें रामास वनांत धाडिलें, सारांश कैकेयीच्या दुष्टपणामुळें आपल्यास इतके कष्ट पडले, वनवास झाला, पत्नीविरह झाला, तथापि हें सर्व गिळून टाकून, किं बहुना विसरून जाऊन ज्या महापुरुषानें संतप्त झालेल्या व शाप देण्यास उद्युक्त झालेल्या आपल्या पित्याचें मन वळवून त्याला 'भरतीं, भरत-प्रसूवरी बरी दया' करावयास लाविलें तो रामचंद्र केवढ्या उदार बुद्धीचा असला पाहिजे? रामचंद्राच्या औदार्याचा एक अंश जरी आपल्या आचरणांत दृग्गोचर झाला, तरी काम होणार आहे. रामस्मरणाचा महिमा वर्णन केला आहे, त्याचें तरी इंगित हेंच असावें कीं ह्या नित्यस्मरणानें रामप्रभूच्या उदार बुद्धीचा एखादा अंश तरी स्मरणमार्गानें आपल्या आचरणांत दृश्य व्हावा. ही विनंति दशरथास अर्थातच मान्य झाली व त्यानें पत्नीवरील अवकृपाही काढून घेतली.

मिते ज्याहुनि सिंधुसैकत प्रभुचे ते गुण गात ऐकत।
स्वपदा नृप जाय तो महें सुविमानें, यशगाय सोमे हें. ॥ ८६
वदला जगदीश, 'देवेराया! मृत कीशर्क्ष उठोत, दे वरा या.'।
भजनार्थ पुन्हा सजी 'वसा रे'! म्हणती ते 'भजनीं' सजीव सारे.॥८७
पैलमुक्पति आग्रहें प्रभूतें विनवी पूजन घ्यावया प्रभूतें;।
कथि त्या 'सुगळास, पूज्य पूजा, मम हे जे दिधली सुकीर्ति भूजां. ॥८८
भरता भर तापवी महीचा, गमला भोगचि भोग त्या अहीचा;।

१. ज्याहुनि (प्रभूचे गुणापेक्षां) सिंधुसैकत (समुद्रांतील वाळूचे कण) मित (मोजलेले, गण्य, थोडे) असे रामाचे गुण गात (व) ऐकत तो नृप (दशरथ) महें (प्रकाशित) सुविमानें (चांगल्या विमानांत बसून) स्वपदा (स्वर्लोकीं, इंद्रलोकीं) जाय. अर्थ स्पष्टच आहे. २. समुद्राचे वाळूकण. ३. शंकर. ४. इंद्रा! ५. वानर, अस्वलें. ६. देवराय इंद्र रामचंद्राची इच्छा मान्य करून, मेलेल्या वानरांस व अस्वलांस उठविता झाला व त्यांस पुनः भजनार्थ (भजन करण्यासाठीं, रामसेवा करण्यास्तव) सजीव तयार करिता झाला; ते (जिवंत झालेले कीश, ऋक्ष) सारे सजीव (होऊन) म्हणतात, 'भजनीं वसा' (रामचंद्राची भक्ति करा. जो जो म्हणून जिवंत आहे त्यानें रामभजन करावें; केल्यास संसारतापत्रयांतून मुक्त व्हाल, म्हणून रामस्मरण करा). ७. मांस खाणारे राक्षसांचा स्वामी, बिभीषण. ८. पुष्कळ. ९. रामातें. १०. प्रभूतें (पुष्कळ) आग्रहानें, पल (मांस) भुक् (खाणारे जे त्यांचा)+पति (स्वामी, बिभीषण) प्रभूतें (रामचंद्रास) पूजन घ्यावया (आदरआतिथ्य, अग्रपूजा घेण्यासाठीं) विनवी (विनंति करिता झाला). तेव्हां त्या (बिभीषणाला) कथी (रामचंद्र सांगता झाला.) 'पूज्य सुगळास (श्रेष्ठ, वंदनीय, मानास योग्य अशा सुग्रीवास) पूजा (मान द्या). जे सुकीर्ति (जी उज्ज्वल कीर्ति) मम भूजां (माझ्या बाहूंला) दिधली, हे (तीच) मम पूजा झाली.' कृतज्ञ बिभीषणानें पूजेविषयीं रामास विशेष आग्रह केला, तेव्हां त्या सुशील, विनयशाली साधु पुरुषानें उत्तर केलें, 'राजा! तूं सुग्रीवाची पूजा कर, माझ्या बाहूंला सुकीर्ति मिळाली, माझ्या पराक्रमाची सर्वत्र कीर्ति पसरली हीच माझी पूजा होय. माझी कीर्ति झाली यांतच मला सर्व पावलें. मला आतां जास्त कांहीं नको. सुकीर्ति म्हणजे कीर्ति जिची चांगली आहे अशी पतिव्रता सीता माझी मला परत मिळाली, आतां मला कांहीं नको, असाही अर्थ घेतल्यास प्रत्यवाय नाहीं. बिभीषणाच्या मनांत रामास मंगलस्नान घालून त्यास वस्त्रें अलंकार इत्यादि नजर करावयाचे होते. संस्कृताप्रमाणेंच विशेषणांस विभक्तिप्रत्यय लावण्याची पंतांनीं सरणी घेतलेली आढळते. उ० 'प्रभूतें आग्रहें.' ११. असें सांगितलें तरी जेव्हां बिभीषण ऐकेना तेव्हां रामचंद्र पुनः म्हणतो, 'भरता महीचा भर तापवी. ज्या (भरताला) भोग (राज्यसुख) अहीचा (सर्पाचा) भोगचि (नागफणच) गमलें (वाटला), तोच बंधु द्रुत (लवकर) आधीं (अगोदर) भेटवी. हेंचि (भरताची व माझी गांठ पडणें हेंच) बहु (पुष्कळ) मत्पूजन आहे. हेंचि साधीं (हेंच साध्य करून दे). 'बिभीषणा! माझी

द्रुत भेटिव तोचि बंधु आधीं; बहु मत्पूजन हेंचि हेंचि साधीं.' ॥८९
सबळा सुगळा पुजूनि भावें वंदला स्वामिस 'पुष्पकीं बसावें.' ।
प्रभु त्यासि म्हणे, 'तव प्रभावें जय हा, मत्सह बा! तुवां असावें.'॥९०
ससुकंठ ससाधुनिष्कलंकापति, अंकीं बसवूनि निष्कलंका ।
प्रभु पुष्पक शोभवी, शतातें सुगतींच्या धरि, दावि वीशता तें. ॥९१
शतयोजन भव्य सेतु पाहे क्षितिकन्या, क्षण चित्रसीच राहे; ।
प्रभु साधुसमागमस्थळांतें कळवी, जेंवि तृषार्तिहृज्जळांतें. ॥ ९२

वाट बघणारा माझा बंधु भरत ह्याच्या शिरावर राज्यभाराचें ओझें पडल्यामुळें तो तप्त होत आहे, त्याला अग्नीमध्यें पडल्यासारखें झालें आहे. राज्यसुखादिक भोग त्या भरताला नागफडीवर बसलेल्या मनुष्यास दुःख होतें, तसें दुःख देत आहेत. हें सुख नव्हे तर नागफडीवरच उभा आहे कीं काय असें त्यास वाटत आहे. म्हणून मन्निष्ठ असलेला माझा प्रिय बंधु मला अगोदर लवकर भेटेल अशाविषयीं तजवीज कर, म्हणजे मला तुझी सर्व पूजा पावली. ह्या आर्यांतील द्वितीय चरणांत **उत्प्रेक्षा** अलंकार आहे. त्यावरून राज्यसुखापासून भरताला किती दुःख होत असेल याची मूर्तिमंत कल्पना वाचकांच्या मनांत बिंबविण्याची कवीनें खाशी तजवीज केली आहे. राज्य असतां सुख न होणें व दुःखकारण नसतां दुःखी असणें यांत **विभावना** व **विशेषोक्ति** अलंकार येतात. १२. नागफणा.

१. बिभीषण वदला. २. सुवर्णलंकापति साधु त्यासह बिभीषण. ३. निष्कलंका सीता=कलंकशून्य रामपत्नी. अगोदर ती माउली आचरणशुद्ध आणि त्यांतही अग्निदिव्य करून 'लौकिकमतानें स्वच्छ झालेली' सीता, इला मांडीवर घेऊन प्रभूनें पुष्पक विमानास शोभा आणिली. हें पुष्पक विमान रावणानें कुबेरापासून मिळविलें होतें. ४. वि+ई-शता=गरुडपणा. ५. तें (पुष्पक विमान) सुगतींच्या शतातें धरी (शेंकडो प्रकारच्या सुखावह गतींनीं चालूं लागलें). वीशता दावी (गरुड जसा आरोह अवरोह इत्यादि अनेक प्रकारचीं उड्डाणें करून यजमानास, श्रीविष्णूस सुख देतो त्याप्रमाणें हें विमानही आकाशावर आपला स्वामीपणा आहे असें दाखवूं लागलें. तात्पर्य उत्कृष्टरीतीनें चालूं लागलें). ६. चित्रासारखी तटस्थ. ७. शंभर योजनें पसरलेला तो भव्य, सुंदर व विस्तीर्ण सेतु पाहून सीता, पृथ्वीची मुलगी खरी, पण ती सुद्धां क्षणभर चित्रासारखी स्तब्ध झाली. हा विस्तीर्ण सेतु पाहून तिचें मन थक्क झालें. पतीनेंही आपल्यासाठीं केलेली अवाढव्य खटपट पाहून सीतेला केवढें गौरव वाटलें असेल बरें? असो; नंतर रामचंद्रानें साधुसमागमस्थळें म्हणजे बिभीषण व सुग्रीव यांचा ज्या ज्या स्थलीं स्नेह झाला तीं तीं स्थळें दाखविलीं. हीं स्थळें म्हणजे जणूं कांहीं तृषेनें पीडित झालेल्याची आपत्ति दूर करणारीं सरोवरेंच होतीं! खरेंच आहे; सीता मिळविण्याच्या कामीं उपयोगी पडलेलीं रामेश्वर व ऋष्यमूक पर्वत ह्या दोन्ही ठिकाणीं बिभीषण व सुग्रीव यांच्या गांठी पडून रामचंद्राची विरहतृष्णा शांत झाली होती; तेव्हां या स्थळांनीं जलाचें काम केलें म्हणून त्यांस जळेंच म्हटलें आहे. **रूपक** अलंकार आहे. ८. तृषा-आर्ति-हृत्-जळातें=तृषेची पीडा दूर करणाऱ्या उदकातें.

म्हणती यति ज्या 'दयाघनाशें विझवा दुःसहकर्मदाव, तारा,'[1] ।
मुदिता[2] बहु त्या भयाघनाशें नमि तारा नतशर्मदावतारा. ॥ ९३
'मज ही विरहांत दत्तकंपा सति! आतां सुखहेतु तीच पंपा;'[3] ।
कळवी शबरी मतंगशिष्या प्रभु, ज्याचें यश दे प्रकंप तिष्यां,[4] ॥ ९४
कळवूनि कबंधवृत्त मोदा प्रभु दे, त्याहुनि दाखवूनि गोदा[5]; ।

---

१. ज्या (ज्या प्रभुला) यति (कर्मसंन्यास करून मोक्षाची इच्छा धारण करणारे विदेही) म्हणतात (विनंति करितात) कीं 'दुःसह कर्म-दाव दया-घनाशें विझवा, तारा;' त्या नतशर्मदावतारा, भयाघनाशें बहु मुदिता तारा नमी—हा अन्वय. ज्या प्रभूला कर्मापासून व्यावृत्त झालेले, कर्मपराङ्मुख झालेले यति म्हणजे मुमुक्षु लोक रात्रंदिवस प्रार्थना करितात, कीं 'हे प्रभो! आपल्या दयारूपी घनाशें म्हणजे मेघोदकानें आम्हांस असह्य असा जो कर्मरूपी अग्नि त्याला विझवा, कर्मनाश करा, आणि आम्हांला तारा, आम्हांस मुक्ति द्या, जन्ममरणांतून सोडवा' त्या नत म्हणजे नम्र झालेल्या, अनन्यभावानें शरण आलेल्यास शर्मद म्हणजे सुख देण्यासाठीं अवतार घेणाऱ्या परमेश्वराला तारेनें सुग्रीवपत्नीनें नमस्कार केला. दया हाच घन (मेघ) हें आहे राहण्याचें ठिकाण ज्याचें (परमेशदयारूपी जल) त्यानें. कर्म हाच दाव (अग्नि) तो कर्मदाव. दयाघनाश व कर्मदाव हीं रूपकें आहेत. भय+अघ (पाप) यांच्या नाशानें (यांचा नाश झाल्यावर, नाश झाला म्हणून) मुदिता तारा नमन करिती झाली. नत (नम्र झालेले, शरण आलेले) त्यांस शर्म म्हणजे कल्याण देण्यासाठीं अवतार घेतला आहे ज्यानें (रामचंद्रानें) त्यास नमी. तारेनें त्यास नमस्कार केला. २. आनंदित झालेली ३. रामचंद्र सीतेस म्हणतो, 'हे सति! विरहांत (तुझ्या वियोगानें मी झुरत होतों तेव्हां) मज दत्तकंपा (मला जीच्यापासून कंप प्राप्त झाला, शोकानें मी कांपावयास लागलों, हिला पाहून माझा विरहशोक द्विगुणित वाढला), तीच पंप आतां (तुझें समागमसुख मी अनुभवित आहें तेव्हां) सुखहेतु (सुख, आनंद वाढविण्याचें साधन झाली आहे). प्रियवस्तु जवळ नसली म्हणजे सामान्यतः सुखदायी पदार्थ दुःखकारक होतात, हा अनुभव सर्वांस आहेच. ४. कलियुगाला. ५. ज्याचें यश तिष्या (कलियुगाला) प्रकंप दे (कांपवी), म्हणजे ज्याचें यशोवर्णन ऐकिलें असतां कलीस (दुष्ट विचाराला) कंप सुटतो, दुष्ट विचार अस्तंगत होतात, तो कलिकल्मषविध्वंसक प्रभु आपल्या प्रियेस मातंगऋषीची शिष्या जी शबरी इचा आपण उद्धार कसा केला हें वृत्त कळविता झाला. व कबंधासुराच्या वधाचें वर्तमान सांगून सीतेस आनंदित केलें. पण या सर्वांहून सीतेस जो जास्त आनंद झाला, तो गोदावरी नदी पाहूनें झाला. कारण उघडच आहे कीं गोदातटाकीं आपल्या भर्त्याबरोबर सीतेनें पुष्कळ दिवस घालविले होते, त्यांची आठवण सीतेस झाली. इष्टजनसमागमामध्यें ज्या स्थळीं आपण सुखानुभव घेतला, तीं स्थळें, आपली साडेसाती संपल्यानंतर पुनः दृष्टीस पडलीं असतां आपल्यास त्या त्या सुखाची विशेष किंमत वाटूं लागते. हा अनुभव कवीनें या पद्यांत ग्रथित केला आहे, त्यावरून मनुष्यस्वभावाची ओळख पंतांस किती उत्कृष्ट होती

वेंदला, 'सति! हे पहावि शाळा रुचिरा पंचवटी महाविशाळा. ॥ ९५
भरिलीं नयनें जटायुतातें; मजला पाहुनि ज्या जटायुतातें, ।
[2]त्यजिले असुहि त्वदर्थ जेणें, महिचें तद्वट हा विलोक लेणें.' ॥ ९६
घटजादिमहीसुरां श्रमातें प्रभु दावी, कळवी पराक्रमातें, ।
मग दाखवि चित्रकूट, अंगा करि रोमांचित दाखवूनि [3]गंगा. ॥ ९७

हें स्पष्ट दिसतें. मनुष्याच्या अंतरंगांत प्रवेश करून तेथून अनुभवसिद्धांतरत्नें बाहेर काढण्याला कौशल्य व बुद्धिप्रखरता लागतात व तीं या कवीस पूर्णत्वानें वश होतीं असें दिसतें.

१. रामचंद्र स्थळांचा निर्देश करितो, 'हे सति! (हे पतिव्रते!) हे रुचिरा (मनोहर) शाला (पर्णकुटी) पहावी; ही महाविशाला (मोठी, विस्तृत) पंचवटी पहावी; येथेंच मजला जटा-युतातें (जटायुक्त, तापसवेष धारण करणारा जो मी त्याला) पाहून जटायु-तातें (जटायुबाबानें) नयनें भरिलीं (अश्रु ढाळिले). दशरथात्मज रामचंद्रानें तापसी वेष धारण केलेला पाहून जटायूस दुःख झालें तें कवीनें थोडक्यांत पण मार्मिकरीतीनें वर्णिलें आहे. अर्थगौरवाविषयीं भारवि कवीचा हातखंडा होता असें म्हणतात. पण पंतांनीं संस्कृत कवींवरही ताण करून टीकाविषयक पद्यांत रामचंद्राला झालेला वनवास, जटायूचा व दशरथाचा स्नेह, इत्यादि अनेक गोष्टी सीतेच्या व वाचकांच्या लक्ष्यांत आणण्याची तजवीज केली आहे. शिवाय जटायुकाकांचें नांव घेतल्याबरोबर सीतेच्या व रामाच्या मनांत किती तरी मनोवृत्ति उचंबळल्या असतील? २. त्या मनोवृत्ति प्रकट करण्याच्या हेतूनें रामचंद्र सीतेस म्हणतो, 'जेणें त्वदर्थ असुही त्यजिले,(तुझ्यासाठीं, तुला रावणाच्या हातून सोडविण्यासाठीं ज्या वृद्ध काकानें आपले प्राणही खर्ची घातले). तद्वत (त्या महात्म्यानें पवित्र केलेला हा वटवृक्ष) विलोक (पहा). हा महीचें (पृथ्वीचें) लेणें (अलंकार, भूषण) होय. येथें रूपक अलंकार आहे. सीते! त्या दुष्ट निशाचराच्या हातून सोडविण्यासाठीं ज्यानें आपल्या प्राणसर्वस्वाचा त्याग केला, त्या महात्म्याचें, त्या दीन दयालूचें, त्या अबलानुकंपी महापुरुषाचें राहण्याचें ठिकाण, राहण्याचें घरटें ज्या वटवृक्षावर असे, तो धन्य वृक्ष हा पहा. असल्या दीनवत्सलालाही ज्यानें आश्रय दिला; किंवा घरटें बांधून जटायु तेथें राहिल्यामुळें जो पवित्र झाला, तो पृथ्वीचें भूषणच होय!' 'प्रिय आणि पवित्र पुरुषांच्या यःकश्चित् वस्तुही आनंददायक आणि वंदनीय होऊन त्या जगास जास्त शोभविणाऱ्या होतात, जगल्ललाम होऊन बसतात हा अनुभवसिद्धांत, कवीची अबलाजनाविषयींची सोत्कंठ अनुकंपा वगैरे पाहून हें पद्यच 'महिचें लेणें' असा कोणता सहृदय वाचक म्हणणार नाहीं! ३. अगस्त्य ऋषीचा आश्रम, चित्रकूट पर्वत वगैरे विमानांतून दाखविल्यावर रामानें श्रीगंगेकडे बोट दाखवून 'ही गंगा' असें सांगितलें; तेव्हां 'सर्व जगास पावन करणाऱ्या' गंगेचें दर्शन झाल्याबरोबर भक्तिभावानें सीतेच्या अंगावर रोमांच उभे राहिले हें ठीकच झालें. शिवाय आपण अयोध्येजवळ आलों, आपल्यावर निःसीम प्रेम करणाऱ्या कौसल्या, सुमित्रा सासुबाईंची व भरत भावोजींची, तसेंच उर्मिला, मांडवी, श्रुतकीर्ति या भगिनींची गांठ पडणार, आपल्या वडीलमातुःश्रींचीही गांठ पडणार, असे विचार मनांत येऊन प्रेमरसानेंही सीतादेवी पुलकिततनु (सरोमांच) झाली असली पाहिजे.

दयितेसह वंदि शावणारी [१]तिसें जी सर्व जगास पावणारी, ।
भरता प्रति मारुतीस धाडी, [२]मुनिपादाब्जरजें नमूनि झाडी. ॥ ९८
निववी घनसा सख्या गुहास, प्रभु आणी बहु तन्मुखीं [३]सुहास. ।
[४]भरता बहु तापल्यास मोर द्रुत येतां करि आपल्या समोर. ॥ ९९
सुखवी गुरुमातृमंत्रिपौर; प्रकटी सद्यश [५]शंभु हासगौर; ।
[६]अभिषेक करूनि घे, रवीतें यश दे, जें जग सर्व [७]घेरवी तें. ॥ १००

---

१. भागीरथीस. २. महान् ऋषिचरणकमलांस नमन करून आपल्या जटायुक्त शिरानें तेथील धूली झाडून टाकली. कोण हा श्रीरामचंद्राचा विनय! ३. आपल्या प्रत्यागमनाचें तोषदायक वृत्त प्रिय भरतास सांगण्याची योजना करून तिकडे एकनिष्ठ भक्तास, मारुतीस धाडिलें. भरद्वाज ऋषीस सविनयपूर्वक नमन केलें आणि आपला सखा, स्नेही, जो गुह त्याला दर्शन देऊन त्याचें शांतवन केलें. 'घनसा' (मेघासारखा) या उपमेनें चातक पक्षी जसा मेघाची वाट पाहत असतो, तशी सखा गुह वाट पाहत होता, असें कवीनें दर्शविलें आहे. गांठ पडल्यानें गुहास आनंद झालाच, पण रामानें वनवासांतील वृत्त म्हणजे खरादि असुरांचा वध, सोन्याचें हरिण, सीतेचें फसणें वगैरे सुखपर्यवसायी गोष्टी सांगितल्या तेव्हां गुह पोट धरधरून हांसला असलाच पाहिजे. ४. आपल्या समोर द्रुत (लवकर लवकर) येतां (येत असतां, येणाऱ्या) बहु तापल्यास भरता (बंधुविरहाग्नीमध्यें दग्धांतःकरण झालेल्या भरताला) मोर करी. ग्रीष्म ऋतूंतील उष्णतापानें दह्यमान होणारा मोर पक्षी जसा आर्द्रमहिषोदराप्रमाणें श्यामल अशा नव मेघाला पाहून 'ये ये' असें बाहून त्याकडे धांव घेतो, तसा संतप्त भरत नवमेघश्याम रामचंद्राला पाहून लगबगीनें येता झाला. काय भरताचा हा सोत्कंठ उत्साह! लंकेहून निघून भरतभेट होईपावेतोंचा वृत्तांत नऊ पद्यांत आणिला आहे (व त्यांतच रामानें सीतेस सर्व परिचित स्थलांचा निर्देश केला आहे.) त्यावरून पुष्पक विमान किती झपाट्यानें चाललें होतें तें सुचविण्याची कवीची युक्ति कोणास मानवणार नाहीं? ५. शंकराच्या हास्याप्रमाणें शुभ्र. ६. आपल्या भेटीनें गुरु (वसिष्ठादिक) मातृ (कौसल्या, सुमित्रा, कैकेयीसुद्धां) मंत्री (सुमंत्रादि सचिव, प्रधान) पौर (नागरिक जन) ह्या सर्वांस सुख देऊन आपुलें शुभ्र यश प्रकट केलें. यश पांढरें असतें हा कविसंकेत होय. रामाचें सद्यश किती पांढरें होतें हें सांगण्यास कवीनें शंभुहास्याची उपमा घेतली आहे. धवलगिरीवर राहणारे शंकर गौरवर्ण आहेत. तेव्हां त्यांचें हास्य तर जास्तच शुभ्र असावयाचें. सारांश रामचंद्राचें यश अत्यंत शुभ्र होतें असें सांगण्याचा कवीचा भाव आहे. राज्याभिषेक रामानें करून घेतला आणि जें यश सर्व जग घेरवी (म्हणजे ज्या यशाचा वेढा सर्व पृथ्वीला पडला, जें यश पृथ्वीवर सर्वत्र पसरलें.) तें यश रवीतें दे (देता झाला.) येथें रवि म्हणजे सूर्यकुलोत्पन्न पुरुषांचें अधिदैवत जो सूर्य त्याचें कुळ असा अर्थ घेतल्यास सर्व सूर्यकुळाला जगत्प्रसिद्ध रामानें शोभा आणिली असें होईल. किंवा सर्व जगाला प्रकाशित करणारा जो सूर्य त्यालाही रामानें आपलें यशोरूपी तेज देऊन सूर्याला जास्त सतेज केलें असाही अर्थ निघेल. ७. यशेंकरून व्यापी.

पैहिल्याचि भजे नृपासना, तें वरि कीर्त्यर्थ महाकृपास नातें; ।
धरि भोग गुणा नवा नरांचा, प्रभुराज्यांत उणा न वानरांचा.॥१०१
बहु दे न कधींच जें मिळालें त्रिजगीं तें सुख वासवा[2] सवास. ।
[3]प्रभुराज्य म्हणे, 'यशास माझ्या चिर मोक्षा! मुख वास वास वास.॥१०२

---

१. पहिल्याचि नृपासना भजे. तें (नृपासन) कीर्त्यर्थं महाकृपास (महाकृप जो रामचंद्र त्याच्याशीं) नातें (संबंध) वरि (संतोषानें घेई)–हा अन्वय. रामचंद्रास राज्याभिषेक झाला तेव्हां त्यानें पितृपितामहापासून विद्यमान असलेल्या सिंहासनाचाच उपयोग केला. पूर्वींच्याच सिंहासनावर राम बसत असे. येणेंप्रमाणें रामाचा व सिंहासनाचा जो संबंध घडला तो त्या सिंहासनाच्या कीर्तीस कारण झाला. कृपासागर जो रामचंद्र याची संगति झाल्यानें 'माळेच्या संबंधें सूत्रालाही घडे शिरीं वास' या न्यायानें 'आपल्यास उन्नतत्व प्राप्त होऊन आपली कीर्ति होईल' या इच्छेनें रामचंद्राशीं सेवकभाव सिंहासनानें मोठ्या आनंदानें पत्करिला. येथें कवीनें रामचंद्राचें पूर्वजांविषयीं प्रेम व रामाची दयाशील न्यायपद्धति यांचें मार्मिकपणानें थोडक्यांत वर्णन केलें आहे. नरांचा नवा भोग गुणा धरि. प्रभुराज्यांत वानरांचा उणा न–हा अन्वय. रामचंद्र राज्य करूं लागल्यावर त्याची नवी कारकीर्द अभिनव गुणांस धारण करिती झाली. प्रजेस रामराज्यांत अपरिमेय सुखप्राप्ति झाली. पंतांनीं रामराज्याचें वर्णन 'षष्ठ स्तोत्ररामायणां'त केलें आहे (का० सं० अंक १७ पहा.) त्यांतील दोनच पद्यांचें येथें अवतरण करितों. 'गोपति रघुवीर करी प्रेमा सर्व प्रजांवरी प्राज्य । प्रभुचें ज्यांत न आधिव्याधिजरामृत्युभय असें राज्य ॥ विश्वाचा जो गोप्ता तो दे दासांसि रामराज गती । वैकुंठाहुनि अधिका झाली सर्वांहि पामरां जगती ॥.' वाल्मिकी-रामायण–उत्तरकांडांत ही रामराज्याचें मनोहर वर्णन आहे, तेंही तज्ज्ञांनीं वाचावें. सारांश पंचमहाभूतांनीं आपलें उत्कृष्ट स्वरूप प्रकट करून कृपाघन रामराजास पृथ्वीवरच नंदनवन उत्पन्न करूं दिलें हें सांगण्याचा कवीचा भाव आहे. सुख किती झालें याला मर्यादा सांगतातः–प्रभुराज्यांत वानरांना सुद्धां कशाची वाण नव्हती. वानर म्हणजे सगळ्या मुलुखाचे आळशी अशी प्रसिद्धि आहे. रात्रौ घर बांधण्याचा बेत करून उजाडलें कीं इतरांच्या खोड्या करण्यास त्यांनीं सुरुवात करावयाची! अशा या आळशी परंतु खोडकर जीवांना सुद्धां प्रभु-राज्यांत अन्नाच्छादनाची ददात नव्हती. शिवाय वानर म्हणजे रामचंद्राला अत्यंत प्रिय. तेव्हां रामराज्यांत वानरांची चैन असणें हें साहजिकच आहे. 'ऋक्ष-वानर-रक्षांसि स्थिता रामस्य शासने । काले वर्षति पर्जन्यः सुभिक्षं विमला दिशः । हृष्टपुष्टजनाकीर्णं पुरं जनपदास्तथा ॥' (वा० रा० उत्तरकांड सर्ग ९९.) रामराज्याचें वर्णन खालील पद्यांतही केलें आहे. २. सूर्यास. ३. त्रिजगीं जें (सुख) कधींच न मिळालें, तें सुख वासवा (आणि) सवास बहु दे. प्रभुराज्य म्हणेः–'मोक्षा! माझ्या यशास मुख चिर वास, वास, वास'–हा अन्वय. तीन्ही लोकांमध्यें म्हणजे स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ लोकांमध्यें ज्या अवर्णनीय सुखाचा कधीं अनुभव मिळाला नव्हता, तसलें सुख वासवा म्हणजे इंद्राला व सवास म्हणजे सूर्याला रामराज्यामध्यें

बहु पुत्रवती तयांत पुत्र त्रिजगीं एकचि अंजना भला वी;[२]।

पुष्कळ प्रमाणानें मिळूं लागलें. रामराज्यामध्यें सर्व प्रजा नीतीनें व धर्मशास्त्रोक्त विधीनें चालत असल्यामुळें यज्ञयागादिक होऊन इंद्रादिदेवांस हविर्भाग यथाकालीं मिळत असत व त्रिकाळ अर्घ्यप्रदान व गायत्रीचा सूर्योपस्थानासह जप होत असल्यामुळें सूर्यालाही पुष्टिकारक उदक मिळत असे. यामुळें ह्या उभयतांसही अनिर्वाच्य सुखाचा लाभ झाला. असा लाभ त्यांस पूर्वीं कधींही मिळाला नव्हता. कवी रामराज्याविषयीं इतकेंच म्हणून थांबत नाहीं. कर्ममार्गाचा अवलंब करून स्वर्गलोकीं अगर पितृलोकीं सुख मिळविण्याच्या आशेनेंच लोक धर्माचें अनुपालन करित होते, असें नाहीं. तर प्रभुराज्याकडून कवि पुढें म्हणवितो: 'हे नित्य पूर्णानंद देणाऱ्या मोक्षा! माझ्या यशाचा, कीर्तीचा प्रभाव असा आहे कीं तुला नेहमीं आपलें तोंड वासून म्हणजे उघडून ठेविलेंच पाहिजे. तात्पर्य, रामराज्यामध्यें राहणाऱ्या सर्व लोकांना मोक्ष मिळावा अशी सर्वांची योग्यता आहे.' असें प्रभुराज्य मोक्षाला म्हणूं लागलें. 'वास' हा शब्द बलात्कारदर्शक, (जबरदस्तीचा प्रयोग) सुचविणारा आहे. पंतांनीं 'वास'शब्दाचा त्रिवार उपयोग केला आहे, यावरून रामराज्याचें सदाचरणसामर्थ्य किती प्रखर होतें, त्याची कल्पना वाचकांस होईल. सारांश रामचंद्र राज्य करित असतां अयोध्येंतील लोकांस केवळ ऐहिक सुख मिळत होतें असें नाहीं, तर ज्याच्या योगें धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष हे चाऱ्ही पुरुषार्थ साध्य होतात असें निर्मल आचरण प्रजेकडून होत असल्यामुळें त्या सर्वांना अभंग असें मोक्षसुख मिळत होतें. रामराज्याच्या प्रभावाचें वर्णन अनेक कवींनीं केलेलें बहुश्रुत वाचकांनीं वाचलेंच असेल. 'जगाच्या अंतकाळीं ईशपुत्र जीजस ख्राइस्ट पुनः अवतीर्ण होऊन सहस्र वर्षेपर्यंत धर्मराज्य करून तत्कालीन सर्व लोकांचें तारण करणार आहे,' अशी ख्रिस्ती लोकांची समजूत आहे ती रामराज्यामध्यें यथार्थ झाली. रामराज्यांतील प्रत्येक मनुष्य प्रभुराज्ययशोदधीमध्यें स्नान करून मुक्त होत होता, असा कवीचा अभिप्राय आहे. पंतांच्या मनांत रामराज्यसुखाचा हर्षातिरेक इतका झाला होता असें दिसतें कीं, त्यांनीं आपला यमकविषयक प्रथम निर्बंधाचा मोक्ष करून अन्यपद्धतीय यमकाकडे भरारी मारिली आहे! ४. उघडा.

१. त्रिजगीं बहु पुत्रवती, तयांत एकचि अंजना भला पुत्र वी; ज्याच्या स्तवा निगमस्तुतही कंजनाभ निजजिव्हे प्रति लावी—हा अन्वय. ह्या सृष्टिमध्यें अनेक स्त्रिया पुत्रवती होतात. म्हणजे पुष्कळ स्त्रियांना मातृपद घेण्याचा, मातुःश्री म्हणवून घेण्याचा, अधिकार प्राप्त होतो. 'पुन्नाम्नो नरकात् पितरं त्रायतेऽसौ पुत्रः' म्हणजे पितरांस 'पुं'नांवाच्या नरकापासून तारणारा तो पुत्र होय. अशाप्रकारचे पुत्र कित्येक स्त्रियांच्या उदरीं जन्मास आले असतील. पण ह्या सर्वांत अंजना म्हणजे मारुतीची जननी श्रेष्ठ होय. कारण तिनें भल्या, चांगल्या पुत्राला जन्म दिला. तो किती चांगला होता, याचें प्रमाण कवी सांगतो:—निगम म्हणजे वेद, सर्वांसच वंदनीय असे जे वेद किंवा उपनिषदें यांनीं ज्याची अहोरात्र स्तुति चालविली आहे असा कंजनाभ (कंज म्हणजे ब्रह्मदेव तो झाला नाभीकमलापासून ज्याच्या असा षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् विष्णु)

निगमस्तुतही स्तवा जयाच्या निजजिव्हेप्रति कंजनाभ लावी. ॥ १०३
कथि हा गुण, भव्य साद देती सुर, सादास सदा निका महर्षी ।
करि पाजुनि रामकीर्तिरूपा सुरसा, दास सदा निकाम हर्षी.॥ १०४

---

त्यानें सुद्धां आपली जिव्हा ज्याच्या स्तवा (ज्या मारुतीच्या स्तुतिप्रीत्यर्थ) उपयोगांत आणिली! तात्पर्य सर्ववंद्य वेदांनीं स्तुत असा जो भगवान् तोही ज्याचें स्तवन करूं लागला, ज्याचें स्तोत्र गाऊं लागला, अशा धन्य पुत्राला ज्या साध्वीनें जन्म दिला, तीच एक माता होय. 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा। ज्याचा तिहीं लोकीं झेंडा।' यावरही ताण करून एकनिष्ठ मारुतीनें आपल्या मातुःश्रीस धन्य केलें! आपल्या स्वामीची निष्काम बुद्धीनें उत्तम सेवा करणारा मारुति धन्य आणि असल्या जगद्भूषण पुत्राला प्रसवणारी अंजनाही विशेषच धन्य होय! स्वामिनिष्ठा आणि निर्लोभता यांचा पंतांच्या कचेरींत केवढा मान मरातब होता आणि प्रत्यक्ष ईश्वरालाही स्तुति करावयास लावणारे पुत्रांस धन्य माता प्रसवूं शकतात हा विचार पंतांच्या मनांत कसा बाणला होता हें ह्या पद्यावरून स्पष्ट दिसतें आहे. मानवीमहत्वाची मर्यादा पंतांनीं किती तरी विस्तृत आंखलेली आहे ही? २. प्रसवे.

१. वेदांनीं स्तुत. २. वाल्मीकि. या पद्यांत दुसरा व चवथा चरण सबंध यमकबद्ध आहेत. ३. हा (रामचंद्रप्रभु. विष्णूचा अवतार) गुण (मारुतीचे गुण) कथि (सांगूं लागला, गाऊं लागला). भव्य सुर (सुंदर व तेजस्वी देव) साद देती. (रामचंद्राची साथ करावयास लागले. ध्रुपद धरूं लागले. रामचंद्र म्हणेल तें आपण म्हणूं लागले.) सादास सदा निका महर्षी रामकीर्तिरूपा सुरसा पाजुनि दास सदा निकाम (व) हर्षी करी. सदैव प्रभुगुण निर्मल मनानें गाण्यास तयार असणारा वाल्मीकि ऋषि, दाशरथी रामाची कीर्ति हाच एक सुरस म्हणजे गोड रस (अमृत) तो पाजून म्हणजे रामयशोदधीचें अमृत पाजून दास म्हणजे भक्त यांना निकाम (विगतकाम, निरिच्छ) आणि हर्षी (आनंदी) करितो. म्हणजे आपल्या भक्ताची स्तुति करणारा जो रामचंद्र त्याचें यश गाण्याविषयीं निर्मलमनानें तत्पर असणाऱ्या वाल्मीकि ऋषीनें 'रामायण' नांवाचें अमृत उत्पन्न केलें. तें अमृत प्यालें असतां भक्त लोकांस आणखी कशाची इच्छा राहत नाहीं आणि म्हणून ते सदैव आनंदामध्यें, निरामय सुखामध्यें डुलत राहतात. येथें कवीनें रामायण हें किती सुरस झालें आहे हें दर्शविलें आहे. अमृताचें सेवन केलें असतां मनुष्य निरिच्छ व आनंदी होतो हें सांगावयास नकोच. दैत्यासवाचें, दारूचें सेवन केलें असतां जर क्षणभर देहस्थितीचा विसर पडून मनुष्य डुलावयास लागतो, तर प्रथमारंभींही गोड आणि शेवटींही गोड असा अमृतरस प्याल्यास मनुष्य चिरंतन सुखांत निमग्न होईल हें सहजच आहे. रामायण हें अमृत आहे तेव्हां त्याचा आस्वाद घेऊन रामचंद्रांनीं जें मानसिक धैर्य व हृद्गत औदार्य वेळोवेळीं दाखविलें त्याचा शतांश जर वाचकांच्या आचरणांत उमटेल तर ते मोक्षाप्रत पावतील, निष्काम होतील व नित्यसुखामध्यें राहतील असें सांगण्याचा कवीचा भाव आहे. 'कीर्तिरूप सुरसा'मध्यें रूपक आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं.

सरमाधव[1] जो नमी पदें त्या परमा राम दयाप्रभाव दावी. ।
न रमापतिसा दयाळु कोणी परमा या प्रभुची प्रभा वदावी. ॥ १०५
शमवी, वमवी कुवासनेला, रमवी धी, गमवी स्वभक्ति भारी ।
धरवी[2] बरवीच रीति नाम, स्मरवी हा, करवी प्रणाम, तारी. ॥ १०६
सकळांसि[3] सुलोकवास तुल्यप्रियकर्ता प्रभु राम दे, वदे 'हा!' ।
बहु मोह तयांचिया विरागा रुचिरा पाहुनि कामदेवदेवा. ॥ १०७

१. जो सरमा-धव (रावणबंधु बिभीषण) पदें नमी (शरण आला) त्या परमा (श्रेष्ठ पुरुषाला, साधूला) राम दयाप्रभाव (आपल्या दयेचें अमोघत्व) दावी (दाखविता झाला). बिभीषण कोण काय हें माहित नसतां, सुग्रीव, अंगद इत्यादिकांनीं 'हा शत्रूकडून कपटहेतूनें आला आहे, हा वधासच योग्य आहे, असें सांगितलें असतांही 'मित्रत्वे-नागतस्य त्यागोऽयुक्तः' असें ज्या औदार्यसागर रामानें म्हटलें, म्हणजे ज्याच्या दयेला आपपर हा विषयच नाहींसा झाला, सारांश सर्वांवर जो मित्रभावानें दया कर-णार (त्या) रमापतिसा (लक्ष्मीपतिसारखा) दयाशील कोणी नाहीं, असेंच म्हणावयास पाहिजे. शत्रुमित्रांशीं दयाळुत्वानें वागणारा रामाशिवाय अन्य कोणीच नाहीं. म्हणून या प्रभूची प्रभा (तेजस्वीपणा, महती) परमा (अतिशय पलीकडील, परमावधीची) व-दावी (म्हणावी. भगवत्तेज परमावधीचें आहे, असें जें म्हणतात व म्हणावें, तें एवढ्याच साठीं कीं त्याच्या येथें शत्रुमित्रभाव मुळींच राहत नाहीं.) 'अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते'. सारांश 'वसुधैव कुटुंबकम्' मानून त्याप्रमाणें आचरण ठेवणारा पुरुष साधु होय, हें तत्व मयूरकवींच्या हृदयांत कसें ठासून बाणलें होतें हें या पद्यांत स्पष्ट दिसत आहे. २. रामयशाचें वर्णन करून कवी रामनामाचा महिमा वर्णन करितातः–नाम (प्रभु राम-चंद्राचें नामामृत) कुवासनेला शमवी (शांत करितें, खालीं बसवितें) वमवी (ओकून बाहेर काढितें; निर्मूल करितें) धी (बुद्धि, अंतःकरण) रमवी (रममाण करितें. आनंदमग्न करितें.) स्वभक्ति (नामभक्ति; नामाविषयीं प्रेम) भारी (पुष्कळ) गमवी (वाटवितें) म्हणजे नामस्मरण हाच परमार्थ असें भजन करणारास वाटूं लागतें. बरवीच (चांगलीच) रीति (आचरणवृत्ति) धरवितें म्हणजे बुद्धिपुरःसर नामस्मरण करणाराचें आचरण शुद्ध, पवित्र होतें. हा (रामप्रभु) स्मरवितें म्हणजे नामस्मरणानें त्या पुण्यश्लोक रामचंद्राची आठवण होते. प्रणाम करवी म्हणजे प्रभुस्मरण झाल्याबरोबर रामचंद्रास नमस्कार करावयाची हौस उत्पन्न होते. आणि तारी (हें नाम भवसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या पुरुषाचें तारण करितें). रामनामाच्या प्रभा-वाविषयीं जास्त लिहावयासच नको आहे! कारण लिहितांच येत नाहीं! येथें दीपक अलंकार आहे. ३. तुल्य-प्रिय-कर्ता रामप्रभु सकळांसि सुलोक-वास दे. तयांचिया रुचिरा विरागा पाहूनि कामदेव-देवा बहुमोह (पडून) तो 'हा!' वदे–हा अन्वय. तुल्यप्रिय म्हणजे निःपक्षपातानें कल्याणकर्ता (करणारा) राजा रामचंद्र आपल्या प्रजेस असें सुख देता झाला कीं त्यायोगें आपण नंदनवनांतच आहों, अयोध्या म्हणजे इंद्रभुवन आहे, असें प्रजेस वाटावयास

प्रभुच्या चरणीं मयूर भावें 'प्रियरामायण' हें नमूनि वाहे, ।
यश हेंचि सुखें सदैव गावें, स्थिरता याचि रसीं मनास आहे. ॥१०८

लागलें; आणि रामसांनिध्य असल्यामुळें त्यांची क्षणभंगुर सुखांपासून विरक्ति झाली ती रुचिरा म्हणजे मनोहर, चित्ताकर्षी होती. क्षणजीवि स्मशानवैराग्य किंवा प्रसूतिवैराग्य नष्ट होऊन पुन: जसें विषयाकडे मन ओढावतें किंवा संसारदु:खांस संतापून कित्येक आतुर संन्यासी शिखासूत्र नष्ट करितात, पण पुन: कांहीं वेळानें प्रपंचांत गुरफटून पडतात तशा-सारखा रामप्रजाजनांचा विराग नव्हता. तो चिरस्थायी होता. अहंकारजन्य मायेचा नाश होऊन खरोखर उपरति झाली आणि दीन लोकांचें दु:ख निवारण करणें हाच खरा धर्म अशी खातरी झाली म्हणजे जें वैराग्य प्राप्त होतें, तें खरें वैराग्य होय. आणि हें वैराग्य अयोध्येच्या लोकांमध्यें स्थिरता पावलें होतें. हें लोकांचें स्वसुखाविषयींचें वैराग्य पाहून कामदेवदेवा म्हणजे प्रपंचामध्यें गुंतविणाऱ्या कामदेवाधिपतीला अत्यंत मोह उत्पन्न झाला. काय करावें हें त्यास सुचेना. म्हणजे मनुष्याला स्वत:च्या सुखाप्रीत्यर्थ झटण्यास लावणारे कामक्रोधादिक विकार यांचा धंदा ठार बुडाला म्हणून त्यांचा बुद्धिभ्रंश होऊन ते 'हा!' 'हा!' असा शोक करूं लागले. ही विचारसरणी पंतांस अनुरूपच होय. सुख मिळत नाहीं म्हणून सुखाचा त्याग करून वैराग्याच्या थापा मारणें ही गोष्ट निराळी आणि सुखसमुद्रामध्यें मनमुरात पोंहावयाची संधी आली असतां दयाशील अंत:करणानें परदु:खनिवारणामध्यें वरील अमोलिक संधीचा उपयोग करून स्वसुखाविषयीं उदासीन व्हावयाचें ही गोष्ट निराळी. पहिल्या वैराग्यांत निराशा असते. दुसऱ्या वैराग्यांत तृप्ति असते. म्हणून पहिलें वैराग्य क्षणजीवि व दुसरें चिरंजीवि, असा प्रकार होतो. सारांश या आपल्या पृथ्वीवर जे अनंत पदार्थ आहेत त्यांचे गुणधर्म समजून घेऊन व त्यांचा उपयोग करून या पृथ्वीसच नंदनवन बनवून सोडावयाचें आणि तेथें मिळणाऱ्या सुखाला जे प्राणी मुकत असतील त्यांस तें सुख, आपल्या सुखाचा त्यागही करून, मिळवून द्यावयाचें, असें जें रुचिर वैराग्य ते अयोध्येच्या लोकांस प्राप्त झालें होतें असें परोक्ष रीतीनें दाखविण्याचा कवीचा उद्देश आहे.

१. शेवटीं परमेशचरणीं लीन होऊन कवी म्हणतात:–'हें **प्रियरामायण** प्रभुच्या चरणीं भावें (भक्तीनें) नमुनि (नमस्कार करून) मयूर वाहे (मी वाहतों. मी अर्पण करितों). दयाघन रामचंद्राला साष्टांग प्रणिपात करून मी मोर हें 'प्रियरामायण' त्याच्या चरणकमलीं अर्पण करितों आणि परमेशापाशीं कर जोडून एक मागणें मागतों तें हें कीं, 'हेंच यश (रामप्रभूचें यश) सुखें सदैव (अहोरात्र) गावें (गाण्यास मिळो)'. 'आनंदानें मीं रामयश अहोरात्र गात बसावें असें कर' ही कवीची प्रार्थना आहे. कारण काय? तर कवी सांगतात:–'याच रसिं (या भक्तिरसामध्यें) मनाला स्थिरता (स्थीरपणा, चांचल्यशून्यता) आहे, मनाची तळमळ, चंचलता नाहींशी करण्याचें सामर्थ्य एक निष्कामभक्तीमध्यें मात्र आहे, म्हणून देवा! तुझें यश गाईन असें कर.' भक्तिरसाचें हें अलौकिक सामर्थ्य लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

प्रभुकीर्तन या करी कवीचें सदयागायन लावि ना शयाला।
म्हणतें यश हें नसे सदा जो सदया गाय मला विनाश याला॥१०९

---

# ४६. सद्वित्तरामायण.

(इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, उपजाति वृत्तें.)

ब्रह्मस्तुत श्रीपति दिङ्मुखातें मारूनि धाया त्रिजगा सुखातें।

---

१. ह्या काव्यपरिशीलनाचें माहात्म्य अगर फलश्रुति सांगतात:—या कवीचें प्रभु-कीर्तन (जो) सदयागायन करी (करील) तो शयाला ना लावि म्हणजे मीं जें हें प्रभुयश आतांपर्यंत गाइलें तें जो पुरुष स+दया (दयेसहित, भक्तिभावानें, कोमल मनानें) गायन करील म्हणजे शुद्ध, प्रेमल भावानें जो हें प्रभुयशकाव्य गाईल, त्याच्यावर कोणत्याही प्रकारचें संकट येणार नाहीं. त्याची दुर्मार्गाकडे कधींही प्रवृत्ति व्हावयाची नाहीं. शय म्हणजे दुरुपयोग, दुर्मार्ग प्रवृत्ति होय. ह्या प्रवृत्तीला तो 'ना' लावी. दुर्मार्गाकडे जात नाहीं, जाणार नाहीं. पण आणखी कवी म्हणतात:—यश (प्रभुयश) म्हणतें, 'सदया मला जो सदा गाय नसे, याला (त्याला) विनाश. म्हणजे म्हणणें असें कीं अनुकंपापूर्ण असें जें प्रभुयश तें जो सदा गाय नसे म्हणजे सदैव जो गाणार नाहीं, गाण्याची ज्याला आवड नाहीं, याला (त्याला) विनाश म्हणजे त्याचा नाश होणार. उघडच आहे, कीं जो कधीं संकटांस भ्याला नाहीं, ज्यानें वडिलांचें बोलणें खरें करण्यासाठीं वनवासाचा अंगीकार केला, सुग्रीव, बिभीषण इत्यादि शरणागत आलेल्यांचें साहाय्य करून दुष्ट खलांचा संहार केला, धर्मराज्य चालू करून सर्व लोकांचें निरंतर कल्याण करणारी राजनीति सुरू केली, कैकेयीसारख्या स्वाभिलाषी मातुश्रीनें केलेला जाच निमूटपणें सहन करून तिचा उद्धार करण्याविषयीं आपल्या वडिलांजवळ रदबदली केली, आपल्या स्त्रीचा अपहार करणारा रावण त्याची उत्तरक्रिया यथासांग करवून त्याला मुक्ति मिळेल अशी व्यवस्था केली, सारांश ज्याच्या उदारवृत्तीच्या परिशीलनानें मनोविकास होऊन धर्माचरणाची खरीं तत्वें कळतात, त्या अद्वितीय रामचंद्राचें यश गाण्याची ज्याला अंतःकरणपूर्वक हौस नाहीं त्या पुरुषास कामक्रोधादि षड्विकारांच्या ताब्यांत राहावें लागून शेवटीं त्याला अधोगति मिळणार, असें सांगण्याचा कवीचा आशय आहे.
२. ब्रह्मदेवानें स्तुति केलेला श्रीपति (लक्ष्मीपति) भगवान् विष्णु. रावण, कुंभकर्ण इत्यादि राक्षसांच्या अनन्वित कृत्यांनीं व गोब्राह्मणच्छलानें अधर्मप्रवृत्ति होऊन पृथ्वीला अधर्मभार सहन होईनासा झाला. तेव्हां सर्व देवांसह ती ब्रह्मदेवास शरण गेली. ब्रह्मदेवासही कांहीं उपाय सुचेना तेव्हां सर्वच जण क्षीरसागरीं जाऊन त्यांनीं ब्रह्मदेवाच्या मुखानें श्रीविष्णूचें स्तवन केलें व त्रैलोक्यास दुःसह झालेल्या राक्षसांचा संहार करण्याविषयीं प्रभूची प्रार्थना केली. तेव्हां 'दशरथगृहीं मी अवतार घेतों, तुम्हींही आपआपल्या अंशानें वानर, अस्वल या योनींत जन्म घेऊन राक्षसवधामध्यें मला सहाय करावें' अशी परमेश्वरानें दिलेली अभ-

[1]दिक्स्यंदनाच्या सदनासि आला, प्रेमें [2]चतुर्मूर्ति [3]यशोर्थ झाला. ॥ १
ठेवी पिता ज्येष्ठसुतासि नाम श्रीराम हें होउनि [4]पूर्णकाम, ।
पुत्रा द्वितीया [5]भरताभिधान स्थापी, तिजा लक्ष्मण [6]सन्निधान. ॥ २
चतुर्थ शत्रुघ्न; [7]कुमार ते ज्या न साम्य त्या दाखविति स्वतेजा ।
न्यावा जसा [8]चंदनवास वातें मागोनियां त्या [9]नरवासवातें. ॥ ३
ने गाधिजन्मा, हित [10]वाट [11]केला रामें पथीं मारुनि ताटकेला ।
[12]रक्षःक्षयें [13]क्रत्ववनें महर्षी झाला [14]फळी पाहुनि [15]नेम [16]हर्षी. ॥ ४
म्हणे [17]पति [18]क्षुब्धमना 'शिला [19]हो'. श्रीशें [20]संतीचा श्रम नाशिला हो ! ।

---

योक्ति ऐकून देव परत गेले, पुढें लवकरच रामावतार झाला. हा अवतार त्रैलोक्यास सुख देण्यासाठीं झाला. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' ही भगवंताची उक्ति बहुश्रुत वाचकांच्या लक्ष्यांत आहेच. ३. रावणाला.

१. दशरथाच्या. २. चार मूर्ति. राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न हे सर्व परमेश्वराचे अंश होते. ३. कीर्तीसाठीं. ४. सर्व इच्छा पूर्ण झालेला असा होऊन. ५. भरत हें नांव. अभिधान=नांव. ६. सत्=चांगले पुरुष किंवा गुण त्यांचें निधान म्हणजे घर. सद्गुणांचें माहेरघर जो लक्ष्मण तो. ७. ते कुमार ज्या स्वतेजा दाखविति त्या साम्य नसे—हा अन्वय. रामलक्ष्मणादि चौघा कुमारांचा तेजस्वीपणा अद्वितीय होता, हें कवीस सांगावयाचें आहे. येथें **अन्वय** अलंकार समजावा. ८. वातें (वायूनें) जसा चंदनवास (चंदनाचा सुगंध) मागोनियां न्यावा, तसा गाधिजन्मा (गाधिजमुनि, विश्वामित्र) हा नरवासवातें (नरेंद्र जो दशरथ त्याजवळून) रामचंद्रास मागून घेऊन गेला. येथें **उपमा** आहे. चंदन जसा लोकोपकारासाठीं झिजतो, तसाच लोककल्याणासाठीं 'स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि । आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा॥' असें म्हणणाऱ्या रामचंद्रास विश्वामित्र घेऊन गेला, असें या उपमेनें सुचविलें आहे. वायु चंदनाचा सुवास पसरविण्यास कारण होतो तशी रामाची धवलकीर्ति प्रसृत करण्यास विश्वामित्र ऋषि कारण झाला. ९. नरेंद्राजवळ, दशरथाजवळ. १०. यज्ञस्थान. ११. पथीं ताटकेला मारुनि रामें वाट (यज्ञस्थान, यज्ञभूमि) हित (निर्वेध) केला. 'वाट'शब्द पुल्लिंगी आहे. विश्वामित्राचा आश्रम मलद देशाजवळ होता. हा देश अयोध्या व मिथिला या देशांच्या मध्यें होता. मलद देशांत ताटका नामक राक्षसी (रावणाची सापत्न भगिनी) इची वसति झाल्यापासून अगदीं उजाड होऊन गेला होता. ताटका, खर इत्यादिकांचा वध झाल्यावर ऋषींचीं यज्ञकर्में निर्वेध झालीं. १२. राक्षससंहारानें. १३. क्रतु+अवन=यज्ञसंरक्षण त्यानें=यज्ञसंरक्षणानें. १४. सफलमनोरथ झालेला गाधिज. १५. शरसंधान. १६. आनंदित. १७. अहल्यापति (गौतम). १८. क्रुद्ध. १९. होणें. २०. अहल्येचा श्रम म्हणजे शापापासून होणारा ताप.

नाशूनियां गौतमविप्रतापा अन्या उणा तो गमवि [1]प्रतापा. ॥ ५
जाणें प्रभूचें [2]मिथिलापुरीतें भाग्यें करी त्या [3]तिथिला पुरी तें; ।
खंडी नृपांच्या [4]स्मरचापला जो, त्या ही म्हणे, 'हा! [5]हरचाप लाजो.' ॥ ६
होतां [6]पित्याचा पण पूर्ण, धन्या [7]श्रीशा स्वकांता वरि भूमिकन्या. ।
तिघांसही तीन सुता [8]विदेहाधिनाथ [9]भूजा जसि तेंवि दे हा. ॥ ७
प्रसाद नाशी [10]अनुगाधि ज्याचा प्रताप वर्णी [11]नृप गाधिजाचा. ।
भाग्यें मिळे [12]दिग्रथ सोयरा ज्या मोठा तया उत्सव होय राजा. ॥ ८
[13]क्षत्रघ्न जो भार्गवराम दापी; त्याच्या प्रभु क्रूरतरा [14]मदा पी; ।
[15]भंगी, करी हृष्ट तथापि [16]त्याला; गायासि लावी स्वकथा [17]पित्याला. ॥ ९
[18]हर्षे, म्हणे ती स्वमना [19]अयोध्या, 'रामा यश प्राज्य असेंच यो, ध्या. ।

---

१. तो (रामचंद्र) अन्या प्रतापा (इतर पराक्रमास) उणा (कमी दरजाचा) करी. या पराक्रमापुढें सर्व पराक्रम तुच्छ दिसूं लागले. येथें **व्यतिरेक** अलंकार आहे. अनाथ स्त्रीस दुर्धर शापामुळें होणारा जो ताप, त्याचें निवारण कोणीं केलें नाहीं, म्हणून इतर सर्वांचे पराक्रम तुच्छ झाले. २. जनकनगरीला. ३. तें प्रभूचें मिथिलापुरीतें जाणें भाग्यें (स्वप्रकाशानें) त्या तिथीला (मिथिलानगरी हीच एक तिथि, तिला) पुरी करी (पौर्णिमा करितें झालें). प्रभूच्या जाण्यानें त्या नगरीच्या भाग्यसागराला भरती आली. येथें **रूपक** आहे. प्रभुगमन हा चंद्र, आणि मिथिलाभाग्य ही तिथि, होत.) ४. मदनाच्या चपळपणाला. जो (रामचंद्र) नृपांच्या स्मरचापाला (कामविकारानें मनास जी उत्कंठा उत्पन्न झाली होती, तिला) खंडी; रामाचें स्वरूप अतिसुंदर असल्यामुळें इतर नृपांची आशा खंडित झाली. रामास टाकून सीता आपल्यास वरणार नाहीं, असा विचार राजांचे मनांत येऊन त्यांचा आशावृक्ष समूळ दग्ध होऊन गेला; त्या रामचंद्राला पाहून सीता 'हा!' म्हणून दीर्घोच्छ्वास टाकूं लागली. तें अत्यंत अवजड शिवधनुष्य रामास कसें उचलणार असें वाटून सीतेच्या पोटांत धस्स झालें व 'हें धनुष्य रामास लाजो, नम्र होवो' अशी ती कुलदेवतेची प्रार्थना करूं लागली. ५. शिवधनुष्य. ६. सीतेचा पिता जनक त्याचा पण पूर्ण झाल्यावर. ७. लक्ष्मीपतीला. ८. जनक राजा. ९. सीता. १०. सेवकांची पीडा. सेवकांस झालेलें दुःख. ११. जनक राजा. १२. दशरथ. १३. क्षत्रियांतक परशुराम. १४. त्याच्या (भार्गवरामाच्या) क्रूरतर (अतिशय उग्र अशा) मदा (गर्वाला) पी (पिऊन टाकी, नाहींसा करी.) परशुरामाचा गर्व रामानें हरण केला. या ओळींत 'क्षत्रघ्न, क्रूरतर मद इ०' साभिप्राय विशेषणें आहेत, म्हणून **परिकर** अलंकार आहे. १५. परशुरामाचा पराजय करी. १६. परशुरामाला. १७. दशरथाला. १८. अयोध्येला हर्ष झाला. १९. अयोध्या स्वमना (आपल्या मनाला) म्हणे:-'रामास असेंच प्राज्य (पुष्कळ, प्रभूत) यश यो (येऊं दे) ध्या हेंच चिंतन करीत बसा.' रामचंद्र अयोध्येस परत आल्यावर लोकांस किती हर्ष झाला त्याचें हें द्योतक आहे.

[1]कोणी पुसेना कवि सत्यलोका साकेत वैकुंठचि सत्य [2]लोका. ॥ १०
नामा युधाजित् [3]पविभृत्प्रभाच्या मतें पुरा ने मग त्या [4]स्वभाच्या. ।
राजाहि योजी [5]अतुळप्रभावा रामासि द्याया [6]युवराजभावा. ॥ ११
तों [7]मंथरादूषितबुद्धि [8]चंडी ती मध्यमा स्त्री पतिचित्त [9]खंडी; ।
मागें दिले जे वर ते [10]वदोन [11]क्ष्वेडोग्र शोकीं बुडवून [12]दोन. ॥ १२
'राज्य स्वपुत्रा वनवास रामा [13]मन्वब्द' मागे पतिच्या [14]विरामा ।
संप्रार्थितां ती न वळेचि [15]रामा न बोलवे [16]सद्व्रततत्परा '[17]मा'. ॥ १३
सत्यव्रतभ्रष्ट पिता नहो [18]तें [19]श्रितां सुधावर्षि [20]वितान होतें ।

---

१. कोणी कवि (समंजस पुरुष) सत्यलोकास पुसेना (विचारीना). कारण साकेतच (अयोध्या) सत्य (खरोखर) वैकुंठ झालें. सत्यलोक हा सर्वांत श्रेष्ठ लोक आहे. उपमानाचें ठायीं न्यूनत्व वर्णिलें असलें म्हणजे **व्यतिरेक** अलंकार होतो. २. पहा. ३. पवि=वज्र, तें धारण करणारा इंद्र, त्या इंद्राप्रमाणें प्रभा (तेज) आहे असा दशरथ. ४. युधाजित् कैकयीचा भाऊ, म्हणून भरत त्याचा भाचा, त्याला. ५. अद्वितीय पराक्रम आहे ज्याचा अशा श्रीरामचंद्राला, ज्येष्ठ पुत्राला. ६. युवराज हें पद देण्यासाठीं. ७. मंथरेनें दूषित केली आहे बुद्धि जीची अशी मध्यमा (दुसरी) स्त्री कैकेयी. ८. तामसी स्त्री. लाडकी असा ही अर्थ आहे. ९. भंग करी. १०. सांगून. ११. विषासारखें उग्र. १२. मागें (शंबराबरोबर इंद्रसाह्यार्थ दशरथ युद्ध करित असतां तो दुर्धर बाणप्रहारानें मूर्च्छित होऊन पडला त्या वेळीं कैकेयीनें त्याचें संरक्षण केलें त्या वेळीं) जे वर दिले ते वदोन (सांगून, आठवण देऊन) व त्याला (पतीला) क्ष्वेडोग्र (विषाप्रमाणें उग्र, दुःसह अशा) शोकीं बुडवून, पतीच्या विरामा (पतीचा मनोभंग करण्यासाठीं) दोन वर मागे (कैकेयीनें मागितले). १३. चवदा वर्षें. १४. मनोभंगाला. १५. स्त्री. १६. सत्यव्रताचे ठायीं तत्पर जो दशरथ त्याला 'नको मागूं' असें म्हणतां येईना. १७. नको. १८. सत्यव्रत (सत्य बोलणें हेंच ज्याचें ब्रीद असा) आपला पिता भ्रष्ट न हो (सत्यच्युत न व्हावा) हा रामचंद्राचा विचार श्रितां (आश्रितांस, देवादिकांस) सुधावर्षि (अमृत वर्षणारें) वितानच झालें. म्हणजे रामानें पित्याचें सत्यव्रत कायम ठेवण्यासाठीं वनवास पत्करला व येणेंकरून राक्षसांचा संहार करण्याची वेळ जवळ आणिली हा प्रकार देवांस अर्थातच अमृतवर्षावाप्रमाणेंच झाला. 'महाजनो येन गतः स पंथाः' या न्यायानें रामाच्या ह्या धीरोदात्त आचरणानें त्याचे भक्तासही सन्मार्गाची गोडी लागून कोणत्याही संकटांस न जुमानतां 'कर्तव्य करणें' हेंच अमृतरसाप्रमाणें मधुर आहे असें ते मानूं लागतात. १९. आश्रितांना. २०. छत, चांदवा.

स्वामी म्हणे, 'न व्रतहानिघाला घालूं यशीं वत्सल! हा निघाला.' ॥ १४
घे वल्कलें, भूषण वस्त्र सोडी; पित्यासि मातेसहि हस्त जोडी. ।
निघे प्रभु त्यागुनि राज्य, भार्या छाया सुटे लक्ष्मणही न आर्या. ॥ १५
न पँत्तिता भूप शके सहाया सांगे सुमंत्रा स्वरथीं वहाया. ।
जातां वना राम पुरी वदे 'हा!' पाहे न गेहा जन तो न देहा. ॥ १६
भेटे सख्या राम गुहा निषादा दे त्यांसि निर्मूनि जटा विषादा. ।
सांगे पित्याच्या सचिवास, 'देवा द्यावा तुवां तोष करूनि सेवा.' ॥ १७
नौकेंत बैसोनि सुरापगेला लंघूनि तेथूनि दुराप गेला. ।
प्रेमें भरद्वाजपदासि वंदी तो देव ज्याचे विधि वेद वंदी. ॥ १८
निघे प्रयागाहुनि राम पाहे श्रीचित्रकूटीं मुनिवृंद राहे. ।
तें सूत सांगे नगरींत राया त्या पुत्रशोकीं न गरीं तराया. ॥ १९

---

१. स्वामी (रामचंद्र) म्हणेः—'हे वत्सल (पुत्रावर अत्यंत ममत्व करणारे तात महाराज!) यशीं (कीर्तीमध्यें, कीर्तीवर) व्रत (सत्यव्रत) त्याची हानि (भंग) हाच कोणीं घाला (हल्ला) घालूं नका (आपलें शुभ्र यश पुत्रवात्सल्याच्या मोहांत सांपडून बुडवूं नका) हा (मी) निघालों!' पित्याच्या सत्याची रामचंद्राला केवढी ही चाड? कुलधनाविषयीं इतकी आस्था बाळगणारे पुरुष खरोखरीच ईश्वराचे अंश होत; यांत शंका नाहीं. २. अलंकार व वस्त्रें टाकून दिलीं. ३. प्रभूनें राज्य सोडिलें, वस्त्रालंकारांचा त्याग केला तथापि छायेसारखी रामाजवळ नित्य राहणारी सीतादेवी न सुटे. (ती रामचंद्राबरोबर तडक निघाली.) लक्ष्मणही न सुटे. (लक्ष्मणही निघाला.) आर्यश्रेष्ठ जो रामचंद्र त्याला त्याच्या पत्नीनें व भावानें सोडलें नाहीं. सीतेस छायेचें रूप देऊन कवीनें स्त्रीधर्माचें वर्णन एका शब्दांत फार मार्मिकपणानें केलें आहे. अर्थात् रूपक अलंकार आहे. ४. वडील भावाला, रामाला. ५. रामाचें पादचारित्व. ६. सहन करण्याला. ७. अष्टप्रधानांपैकीं एक प्रधान, त्याला. ८. लोकांनीं घरेंदारें टाकून दिलीं व ते देहसुखाकडे पाहीनातसे झाले. 'उद्यानानि परित्यज्य गेहानि च सुखानि च' वा० रा०. ९. शृंगवेरपुरीचा राजा, किराताधिपति. हा दशरथाचा स्नेही होता. १०. गुहाला. ११. जटा धारण करून गुहाला दुःख दिलें. १२. सुमंत्राला. १३. दशरथाला. १४. सुर+आपगा=गंगेला. १५. दुष्प्राप, मिळण्यास कठीण. १६. ब्रह्मदेव ज्याचे (वेद) शब्द झेलतो तो भरद्वाजास वंदी! १७. प्रयागापासून १० कोशांवर एक लहानसा पर्वत आहे. १८. गुहास भेटून, भागीरथी वलांडून, व भरद्वाजाचें दर्शन घेऊन रामचंद्र प्रयागास आले व तेथून चित्रकूटास गेले हा वृत्तांत सुमंत्रानें रायास सांगितला तो पुत्रशोक हेंच विष, त्या विषसागरांतून तरून जाण्यासाठीं सांगितला नाहीं, तर बुडण्यासाठींच सांगितला. हा वृत्तांत ऐकून रायाचें समाधान न होतां शोक द्विगुणित वाढून 'हाय राम!' 'हाय राम!' असा विलाप करीतच राजानें प्राण सोडिले. कोण पुत्रशोकाचा जबरदस्त तडाखा हा! १९. पुत्रविरहानें उत्पन्न झालेला शोक हेंच गर (विष) त्यांत.

सत्पुत्रशोकें[1] वरि हानि शाप; स्वर्भानु[2] वाटे नृप हा निशाप[3]. ।
मंत्री तया[4] साधुसि आणवीती; येतांचि पुत्रा कृत[5] जाणवी ती[6]. ॥ २०
दे शोक तातार्यपदानुगां[7] जी तीतें न संकोच धरूनि गांजी[8]. ।
वाढी सुधेतें[9] लवडूनि कांजी ज्ञाता तिची भीड धरील कां? जी! ॥ २१
ज्येष्ठांमना[10] जोडुनि हात दे हा, संतोष संस्कारुनि तातदेहा ।
गुर्वादिसर्वांसह, तो करी ती मातेपुढें जी प्रियतोकरीती[11]. ॥ २२
ज्याच्या[12] न राहे प्रखराघ वातें त्या चित्रकूटस्थित राघवातें ।
भेटे, कथी मृत्युकथा पित्याची; धी तापवी शांत तथापि त्याची[13]. ॥ २३
ताता महातृप्तिदसारतोया[14] दे पादुका सांत्वुनि फार तो[15] या; ।
राहे समानव्रत[16] साधु नंदिग्रामीं, जसा [17]शंभुवियुक्त नंदी. ॥ २४
त्या चित्रकूटा जगदीश सोडी; पुण्याश्रमीं अत्रिस हात जोडी; ।
त्याची सतीवर्णितकीर्ति[18] भार्या दे [19]अंगराग क्षितिजेसि आर्या. ॥ २५

---

१. सत्पुत्रशोकें (पुत्रोत्तंस जो रामचंद्र त्याच्या विरहानें प्रज्वलित झालेल्या शोकानें) हानि (मरण) वरि (घेता झाला.) शाप (श्रावण नामक वैश्यमुनीच्या वृद्ध मातापितरांनीं दिलेला शाप) स्वर्भानु (राहू) व नृप हा निशाप (चंद्र) वाटे. **उत्प्रेक्षा** अलंकार आहे. राहू चंद्रग्रास करितो तद्वत् शापानें राजास गिळून टाकिलें. २. राहु. ३. चंद्र. ४. भरतास. ५. केलेलें. ६. कैकेयी. ७. दशरथ व राम यांच्यावर भक्ति करणाऱ्यांना. ८. निर्भर्त्सना करी, आईची भरतानें यथेच्छ निंदा केली. ९. सुधेतें (अमृताला) लवंडून (पायानें ढकलून देऊन, टाकून देऊन) कांजी (अंबलेली पेज) वाढते, तिची भीड (मर्यादा) ज्ञाता (समंजस पुरुष) कां धरील? येथें **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार आहे. १०. जेष्ठ माता कौसल्या तिच्या मनाला. ११. प्रियबालकाची रीति. १२. ज्या रामाच्या अंगावरून आलेल्या वाऱ्यापुढें प्रखर (उग्र) ही अघ (पाप) राहत नाहीं. १३. रामाची चित्तवृत्ति शांत होती, तथापि वडिलांचें मरण ऐकून त्यास शोक झाला. १४. महा+तृप्तिद (तृप्ति देणारें) जें सार (उत्तम) तोय (तर्पणोदक) तें ताताला दिलें. रामहस्तानें प्राप्त झालेलें उदक अर्थातच अत्यंत समाधान देणारें (कोणतीही आशा शिलक न ठेवणारें) असलें पाहिजे. १५. राम. या (भरताला). १६. रामानें व्रत घेतलें होतें, तेंच व्रत घेऊन. १७. शंभु (शंकर) वियुक्त (शंकरापासून विभक्त झालेला) नंदी जसा वैखानसव्रतानें (वानप्रस्थाश्रमांत, शरीर चालेल इतक्याच बेतानें अन्नपाणी गृहण करून) राहतो, तसा भरत नंदिग्रामीं राहिला. येथील उपमेनें राम व भरत यांमधील संबंध शंकरनंदींचा (सेव्यसेवकत्वाचा) होता हें दर्शविलें आहे. १८. पतिव्रतांनीं गाइली आहे कीर्ति जिची अशी आर्या अनसूया. १९. अंगराग (उटी). कधीं न वाळणारी उटी अनसूयेनें सीतेस दिली.

करी विराधा शुचि राक्षसा जो यशें न कां तो रुचिराक्ष साजो? ।
तें दंडकारण्य असाध्वसत्वें त्या नंदना पूज्य असाध्वसत्वें. ॥ २६
दे हर्ष सर्वांहि तपोनिधीतें झाला न जो प्राप्त तपोनि धीतें; ।
कीं नाम सांगे करि वंदनातें 'आशी' म्हणे 'द्या मज नंदनातें.' ॥ २७
केला अगस्त्याख्य महर्षि तातें ब्रह्याचिया हृष्ट, न हर्षितातें. ।
देह स्फुरे, ब्रह्म महातपा तें पी हालवीनाच पहात पातें. ॥ २८
सखा पित्याचा पितृतुल्य रामा झाला वनीं पूज्य जटायुनामा. ।
गोदेसि मातेसि तसेंचि पाहे. पर्णालयीं पंचवटींत राहे. ॥ २९
गळां पडे शूर्पणखा, परातें पाहे वराया; पण खापरातें ।
तो सद्गुणाचा वरिना करंडा प्रहृष्ट दंडें करि नाक रंडा. ॥ ३०

---

१. हा पूर्वजन्मीं तुंबुरुनामक गंधर्व होता. वैश्रवणाच्या शापामुळें यास राक्षसयोनि प्राप्त झाली. रामानें ह्या गोब्राह्मणास त्रास देणाऱ्या राक्षसास मारिलें व त्यास शापमुक्त केलें. २. शुद्ध, मुक्त. ३. कमलनेत्र राम तो कां न साजो (शोभो)? ४. निर्भयपणामुळें तें नंदनवनाला पूज्य झालें. ५. असाधु-असत्वें=दुष्टांच्या नसणेपणानें, दुष्टांच्या संहारामुळें, दुष्ट राक्षस नाहींसे झाले म्हणून. ६. तप हेंच ज्यांचें धन, ठेवा असे ऋषी त्यांना. ७. बुद्धीला जो तप करून कधींही न झाला. ८. कारण. ९. समाधीमध्येंही जो आनंद प्राप्त होत नाहीं, तो आनंद ऋषिवरास कां झाला, त्याचें कारण सांगतात:-कीं (कारण) प्रत्यक्ष सगुण, साकार परब्रह्म जो रामचंद्र तो आपलें नांव सांगून ऋषींस नमस्कार करिता झाला व 'मज नंदनातें (आपला पुत्र जो मी या मला) आशीर्वाद द्या' असें म्हणूं लागला. समाधींत हा प्रत्यक्ष परिचय कोठून येणार? म्हणून तपोधन जे ऋषी त्यांस अद्वितीय आनंद झाला. येथें निर्गुणाच्या ध्यानापेक्षां भक्ताला सगुण साक्षात्कार विशेष तोषप्रद होतो असें कवीनें दर्शविलें आहे. १०. ब्रह्याचिया तातें अगस्त्याख्य (अगस्त्य नामक) ऋषी हृष्ट (आनंदित) केला. हर्षितातें (अंतःकरणास अत्यंत आनंद झाल्यामुळें) देह न स्फुरे. (शरीराचें स्फुरण राहिलें; सर्व इंद्रियांचें चलनवलन स्तब्ध झालें.) महातपा (तपोनिधि जो अगस्त्य ऋषी तो) तें ब्रह्म (ती साकार परब्रह्ममूर्ति) पहात पी (चक्षुरिंद्रियानें प्राशन करी). पातें हालवीनाच (हें प्राशन त्यानें इतक्या आसोशीनें चालविलें होतें कीं, डोळ्याची पापणी हालविली तर रसास्वादाचें सुख व सांठा कमी होतील, अशा भीतीनें त्यानें डोळ्याचें पातें सुद्धां हालविलें नाहीं!) पहाणें आणि पिणें ह्यांस समानार्थकत्व कवीनें कसें दिलें आहे हें चाणाक्ष वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. आनंदातिरेकानें गात्रें स्तिमित (स्तब्ध) होतात, हा अनुभव सार्वत्रिकच आहे. साक्षात् परमेश्वरदर्शन झालें म्हणजे भक्तांस कोण आनंद होतो त्याचें हें उत्तम प्रदर्शन आहे. ११. रामपिता दशरथ त्याचा. १२. मातेप्रमाणेंच. १३. तो (रामचंद्र) सद्गुणांचा करंडा (सद्गुण ज्यांत सांठविले आहेत असा करंडक) त्या खापरातें (खापरासारखी जी ताटका)

सौमित्रि खड्गें हरि कर्णनासा; ज्याच्या करीती गुणवर्णना सा ।
पावेल त्या केंवि तसी कुशीला? पुण्यें न येतां क्षितिच्या कुशीला. ॥ ३१
खेरा ससैन्या हननार्थ धाडी; लीलेकरूनि प्रभु त्यासि ताडी; ।
छेदी शिरें, सर्व पैरोर फाडी, सेना जनस्थानहि ओस पाडी. ॥ ३२
स्वदुर्गुणें पावुनि ताप, भावा दशानना ती कथि पापभावाः ।
'स्त्रीरत्न घे, होउनि निःस्व साहो न शोक वैरी, मुदिता स्वसा हो'.॥ ३३

---

तिला वरीना (तिचा अंगीकार करीना). **रूपक** अलंकार असून त्यांत रामचंद्राला परस्त्रियां-विषयीं केवढा तिटकारा होता हें दाखविलें आहे. १४. आनंदयुक्त. १५. स्वर्ग. १६. रंडा जी ताटका तिला दंड करून स्वर्गास आनंदित करी. रंडा दंडें असें पद आहे.

१. कान व नाक त्यांला. २. सहा शास्त्रें. ३. दुष्टस्वभावाची. ४. पुण्यें (पूर्वपुण्याईच्या संचितानें) क्षितीच्या (पृथ्वीच्या) कुशीला न येतां (पृथ्वीपासून जन्म न पावतां) तशी (पापरूपी) शीला (दुष्ट आहे शील, स्वभाव जीचा अशी ताटका) ज्याच्या (ज्या रामचंद्राच्या) गुणवर्णना सा (सहा शास्त्रें) करीती, त्या (परब्रह्म रामचंद्राला) कशी पावेल? (कशी मिळवून घेईल?) कामक्रोधादि अभिमानजन्य विकारांनीं पापाचरण करण्यास लावलेली जी ताटका तिला निष्पाप व अनंतगुण असें जें परब्रह्म तें कशाचें मिळतें? परब्रह्माची साक्षात् प्राप्ति करून घ्यावयाची असल्यास सीतादेवीसारखीच पूर्वपुण्याई व निष्पाप आचरण पाहिजे. ५. ताट-केचा भाऊ खरराक्षस त्याला ताटकेनें धाडिलें. ६. पर+उर=शत्रूचें वक्षःस्थळ. ७. सेना (राक्षससैन्य) व जनस्थान (गोदातटाकस्थ प्रदेश) हीं दोन्ही एकदम ओस पाडी (निर्जन करून टाकिता झाला). खराचे अनुचर राक्षस नष्ट झाल्यावरोबर जनस्थानांतील दुष्ट लोक नाहींसे झाले, हें पंतांस सांगावयाचें आहे. येथें **दीपक** अलंकार आहे. एका करणीनें दोन क्रिया झाल्या आहेत. ८. शिक्षा. ९. दशानना (रावणा) भावा (बंधूला, 'रावण ताटकेचा सापत्न भ्राता हें मागें सांगितलेंच आहे). ती (ताटका) पापभावा (पापमूलक वि-काराला) कथी. म्हणजे ताटकेनें रावणाच्या मनांत पापकृत्य करण्याचें भरवून दिलें. ती म्हणतेः—'स्त्रीरत्न (सीतादेवी, सर्व स्त्रियांचें रत्नच, अलौकिक सौंदर्य आहे जीचें अशी सीता) घे (त्या रत्नाचें हरण कर). निःस्व (स्वतःचें कांहींएक राहिलें नाहीं असा) होऊनि (राज्य तर गेलेंच आहे, तूं त्याची बायको आणलीस म्हणजे तो अकिंचन होईल, असा करून). तो वैरी (शत्रु, माझा अपमान केला ज्यानें व राक्षसांचा संहार करण्याचें व्रत ज्याचें असा शत्रु). १०. शोक (पत्नीविरहदुःख) न साहो (स्त्री नाहींशी झाली म्हणजे त्याला अतिशय असह्य दुःख होईल) आणि स्वसा (तुझी बहीण जी मी) ही मुदिता (आनंदित) हो (होऊं दे). आपली पापवासना रामानें पूर्ण केली नाहीं म्हणून त्याला स्त्रीविरहदुःख द्यावयाचें व त्याच्या दुः-खानें आपण आनंदित व्हावयाचें हा ताटकेचा राक्षसी हेतु आहे व तो साध्य करण्यासाठीं ही कुशीला आपल्या भावाच्या मनांत दुष्टविकारांचें प्रोत्साहन करीत आहे. पंतांनीं येथें राक्षसी स्वभावाचें उत्कृष्ट चित्र रेखलें आहे. असले राक्षस मानवयोनींत उत्पन्न होतात म्हणूनच ही संसारयात्रा कित्येक वेळीं अत्यंत दुःसह होते. ११. बहीण.

मारीच मायामृग शत्रु [1]दावी, श्री त्यासि हेमाकृति सत्य [2]भावी; ।
मागे, धराया दयितासि लावी; [3]मनुष्यलीला प्रभुचीच गावी. ॥ ३४
मर्मी [4]तयातें शर राम हाणी, तों तो खळ [5]श्रीरमणाचि वाणी ।
'हा! हा!' असी [6]तारतरार्त वाणी बोले; भ्रमे श्री न जसी [7]शहाणी. ॥ ३५
सौमित्रितें [8]भावुनि घात, [9]भीता 'धांवें' म्हणे '[10]पत्यवनार्थ' सीता. ।
[11]तो जाणवी सत्य भला शमाया [12]त्रास, 'हे देवि! [13]पलाशमाया.' ॥ ३६
कोपें म्हणे ती, 'प्रभुनें मरावें, पापा! तुझा [14]काम मला हरावें; ।
[15]दायाद कीं तूं न [16]चपापशील, क्रौर्यें अघा भी नच पापशील.' ॥ ३७

---

१. सीतेस दाखविला. २. मानिती झाली. ३. प्रभुचीच मनुष्यलीला (मानवासारखें आचरण) गावी. रामचंद्र कांचनमृगाच्या पाठीमागें प्रियपत्नीच्या आग्रहावरून धांवला हें जें त्याचें मानवी आचरण हें गाण्यास फार चांगलें आहे. हा विषय कवींना अत्युत्कृष्ट होय. कारण रामाचें स्वपत्नीवर किती निःसीम प्रेम होतें हें ह्यावरून स्पष्ट होतें. ४. मारीचाला. ५. श्रीरामाचेसारखी. ६. अतिउच्च व पीडायुक्त. ७. वेड्यासारखी. ८. नाश होणार अशी कल्पना करून. ९. भ्यालेली. १०. पतीच्या रक्षणार्थ. ११. भला लक्ष्मण. १२. सीतेला झालेला त्रास शमविण्याला समर्थ होता. तो म्हणाला. १३. राक्षसांचें हें कपट आहे. १४. तुझी इच्छा. 'मला हरावें, माझें हरण करावें' ही तुझी इच्छा दिसते. १५. कोपाविष्ट झालेली सीता साधु लक्ष्मणावर भयंकर अशा कामविकाराचा दुर्धर आरोप करून म्हणते:– 'तूं दायाद कीं (तूं भाऊबंदच आहेस, भावाचा वांटा आपल्यास मिळावा असा दुष्ट हेतु तुझ्या मनांत वास करीत आहे म्हणून) तूं चपापणार नाहींस. (काय वाटेल तें करण्यास तयार होशील.) पापशील (पापवासना ज्यास प्राप्त झाली तो), क्रौर्यें (क्रूरपणानें, उपजतच दुष्ट स्वभाव प्राप्त झाला असतां), अघा (पापाचरण करण्यास), भी नच (निश्चयें करून भीत नाहीं). 'कामातुराणां न भयं न लज्जा' हें सुभाषित सुप्रसिद्धच आहे. शेवटच्या ओळींत **अर्थांतरन्यास**नामक अलंकार आहे. 'सख्खे भाईज आणि पक्के दाईज' ही म्हण पंतांच्या वेळीं चांगलीच प्रचारांत असावी. वाल्मीकिरामायणांत सीतेचें भाषण आहे तें असें:–'अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत्। रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे ॥ नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण! यद्भवेत्। त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु ॥ सुदुष्टस्त्वं वने राममेकमेकोऽनुगच्छसि। मम हेतोः प्रतिच्छन्नः प्रयुक्तो भरतेन वा ॥' मनुष्य क्रोधवश झालें असतां त्याच्या बुद्धीस भ्रंश पडून खरें खोटें त्यास ओळखितां येत नाहीं, याचें हें उत्तम उदाहरण आहे. लक्ष्मण सीतेचें सांत्वन करण्यास गेला तों ती जास्तच चवताळूं लागली म्हणून पंत पुढील पद्यांत सामान्य सिद्धांत सांगतात:–'कीं (कारण) कोपोदयीं (क्रोध उत्पन्न झाला म्हणजे) विवेकीं (चांगलें वाईट यांचें तारतम्य पाहण्याचे कामीं) सत्व उरत नाहीं.' कोप आणि विवेक यांचा उभा दावा आहे. 'Anger is second madness' हें वाक्य अर्थसादृश्यास कसें खासें उतरतें? येथेंही **अर्थांतरन्यास** आहे. १६. भीशील.

सांत्वेंहि[1] तापे, न सती निवे, कीं कोपोदयीं सत्व नुरे विवेकीं. ।
'निघे' वदे[2] 'साधुसहायशास्त्री रक्षीं, न रक्षींहि महायशा स्त्री.' ॥ ३८
प्रजावतीनें[3] बहु खिन्न केला; आर्या[4] कथाया निजदु:ख गेला. ।
तों एकटी श्री उटजांत पाहे; रथीं बळें रावण तीस वाहे. ॥ ३९
'हा राम! हा लक्ष्मण! या शशातें[5] मारूनि रक्षा हरि हो! यशातें'. ।
हाका अशा ऐकुनि गृध्र कोपे; तैं[6] यापुढें रावणतेज लोपे. ॥ ४०
केलाचि वैरी[7] विरथ क्षणानें[8], देहाचिया कंपि[9] तक्षणानें. ।

१. सांत्वन होण्यासारिखें भाषण केलें तरी सीता संतप्त झाली. २. सीता लक्ष्मणाला म्हणाली:—'निघे' (निघून चालता हो.) साधु (संत, सत्पुरुष) यांना साहाय्य देण्यामध्यें शास्त्री (पंडित, कुशल रामचंद्र) त्याचें रक्षण कर. ही महायशा (मोठें आहे यश जीचें) अशी स्त्री इचें रक्षण करण्याकरितां तुला ठेविला होता, पण माझें पातिव्रत्य मला राखील म्हणून हिला (मातें) न रक्षीं (माझें रक्षण करूं नकोस). त्या अनाथवत्सलाचें रक्षण करण्यासाठीं चालता हो. माझ्या रक्षणास कोणी नसलें तरी हरकत नाहीं. पतीचें रक्षण झालें, म्हणजे मला सर्व मिळालें.' पंत 'आर्यारामायणां'त सीतेकडून वदवितात:—'तूं ज्ञातस्त्रीकाम, श्रीकाम भरत तसा, अरे मूढा! । गूढा प्रियनिरता, गुरुघातकरा दुर्नयारूढा ॥ मद्व्रत रक्षिल मज जा, जवळ मनुष्याधमा नसावास ।' यावरून पंतांचा आशय स्पष्ट दिसत आहे. सीतेचें रामावर किती निःसीम प्रेम होतें, हेंही येथें व्यक्त होत आहे. आपल्या स्वतःला एकटी ठेवून ही जी आपल्या पतिसाह्यार्थ आपल्या नाखुष असणाऱ्या दिराला पाठवीत आहे, ती स्त्री पतीच्या योगक्षेमाप्रीत्यर्थ किती जपत असावी हें ओळखितां येण्यासारखें आहे. ३. बंधुस्त्रीनें. ४. रामाला. ५. रावणानें सीतेला बळेंच स्वरथांत घातल्यावर तिचें देहभान जागृत झालें व 'हा राम!' 'हा लक्ष्मण!' अशा हाका मारूं लागली. ती म्हणाली:— 'हे हरि! (हे रामलक्ष्मणरूपी सिंहांनो! या शशास (रावणरूपी सशास) मारुनि यशातें (यशाला, तुमच्या कीर्तीला) रक्षा (तिचें रक्षण करा). येथें रूपक आहे. रामरावणांच्या बलांचें माप वरील रूपकांत कवीनें खासें घातलें आहे. रावण सीतेस (रघुकुलाच्या जणों काय यशासच) नेत आहे असा संबंध आणून कवीनें रामाचें स्त्रीदाक्षिण्य उत्तम प्रकारें वठविलें आहे. ६. तेव्हां. ७. शत्रु (रावण). ८. क्षणमात्रांत रावणाच्या रथाचा चुराडा केला. ९. जटायु देहाच्या तक्षणानें (अनेक शस्त्राघातांनीं शरीर तासलें जात होतें म्हणून कंपित झाला तरी (घाबरला नाहीं, स्त्रीविमोचनाच्या कार्यामध्यें थांबला नाहीं). त्यानें सारखें युद्ध चालविलें होतें. शेवटीं त्यानें रावणास भंगोनि (रावणाचा पराजय करून) सीतेस सोडी (सोडविले). मग (पुढें) रावण अधर्मे (धर्मयुद्धाची रीति सोडून देऊन) खड्गानें जटायूचे पक्ष (पंख) तोडी (तोडिता झाला). 'सामनेवाला अडचणींत सांपडला असतां त्यावर गहजब करूं नये' ही धर्मयुद्धाची रीति होय. रावणानें ती पद्धति सोडली आणि

सीतेसि भंगोनि रणांत सोडी. खड्गें अधर्में मग पक्ष तोडी. ॥ ४१
पंक्षक्षयें गृध्रपयत्न राहे, सतीस आंगें खेपथांत वाहे. ।
नेतां, नगीं वानर पांच पाहे, टाकी अलंकार, म्हणोनि 'हा!' हे. ॥ ४२
लंकेंत नेऊनि अशोकनामीं ठेवी वनीं, तीस न ने स्वधामीं. ।
बंधूक्त दे धैर्य उरों न रामीं म्हणे, 'म्हणों काय तुलाहि बा! मी?' ॥ ४३
बोले कुटी पाहुनि ओस 'हाय!' जो दे मुमुक्षूंप्रति ओ, सहाय, ।
तो दाखवी ताप विलाप रानीं जाणों खरा तापविला परांनीं. ॥ ४४
पाहे तशा तातसखा दवस्था पुसे, 'असी कां घडली अवस्था?' ।

---

जटायूचे पंख तोडिले. विकल झाल्यामुळें जटायूचें कांहीं चाललें नाहीं व रावणानें सीतेला खांद्यावर वाहून नेलें. जटायूनें रावणाचा रथ भग्न केला होता. १० तारुण्यानें.

१. पंख तुटल्यावर जटायूचा प्रयत्न थांबला. २. आकाशमार्गानें. ३. पर्वतीं. ४. सुग्रीवादि पंचायतन. ५. सीता. ६. बंधूक्त (बंधूनें, लक्ष्मणानें सांगितलेली उटजांतील हकीकत ऐकून) रामाचें धैर्य पळालें आणि म्हणाला, 'लक्ष्मणा! तुलाहि मी काय म्हणों?' (तुला तरी काय म्हणावयाचें आहे? तुला तरी मी कसा बोल लावूं?). तिचीं परुषवाक्यें ऐकून तूं सारासार विचार न करितां निघून आलास त्या तुला काय म्हणावें? स्त्रिया कोपवशात् कांहीं बोलल्या तरी त्याकडे लक्ष्य न देतां विचारवंतानें त्यांचें रक्षण करावें ही नीति आहे, तिला सोडून तूं आलास, तेव्हां तुला काय म्हणावें? असाही अर्थ होईल. 'हि' शब्द आहे म्हणून पहिला अर्थ बरा दिसतो. रामचंद्रानें आपल्या प्रारब्धासच दोष दिला आहे. 'तुझ्याकडे काय दोष आहे, माझें प्राक्तनच वाईट आहे' असा रामाच्या बोलण्यांतील भाव आहे. ७. आश्रम, पर्णकुटी. ८. पर्णकुटिका शून्य आहे असें पाहून रामचंद्रानें शोक करण्यास प्रारंभ केला. पंत म्हणतात; 'जो मुमुक्षूंस (निष्कामवृत्ति होऊन मुक्ति मिळविण्याची खटपट करणाऱ्या जनांस) सहाय दे (त्यांची सर्व मनीषा तृप्त होण्यास सहाय होतो) व ओ देतो (त्यांच्या हाकेसरिसा पुढें उभा राहतो)–सारांश सर्वांचें दुःख निवारण करितो–तोच प्रभु सीता नाहींशी झाली म्हणून विलाप करावयास लागला, हें केवढें आश्चर्य आहे? अथवा स्त्रीस्नेहपाशानें बद्ध झालेल्या परमेश्वरानें विलाप करणें हेंही सुसंगतच होय. यांत आश्चर्य नाहीं. त्यानें ताप (संताप) व विलाप (शोक) दाखविला किंवा तापानें उत्पन्न झालेला शोक प्रकट केला, यावरून तो (परब्रह्मस्वरूपी रामचंद्र) परांनीं (स्नेहजन्य दुःखानें व पत्नीहर रावणानें) खरा (खरोखर) तापविला (या उभयतांनीं त्यास फार दुःख दिलें). जाणों! (अशी कल्पना करितां येते). सारांश त्या परब्रह्मास खरोखरच संताप झाला, असें कवीस सांगावयाचें आहे व इष्टजनविरहाचा ताप किती दुःसह आहे हें दाखवावयाचें आहे. ९. काम व रावण या उभयतांनीं. १०. चंचुभंग व पक्षनाश होऊन छिन्नविच्छिन्न झालेला. ११. अरण्यामध्यें राहणाऱ्या अशा.

शोची, निवेदूनि परा, सुनेतें, जें धैर्य होऊनि परासु[1] ने तें. ॥ ४५
अस्वास्थ्य[2] नि:सीम, तथापि त्याची, धरूनि तो साधुपथा, पित्याची ।
तसी, क्रिया सांग करी, रमेला रक्षूनि चिंतूनि शरीर मेला. ॥ ४६
बहूग्र[3] काळाहि[4] परीस खाया धरी कृपासिंधु करीसखा, यां, ।
म्हणे समर्पून, विमान, 'साजें दे, ज्ञान मातें कविमानसा जें.' ॥[5] ४७
तो शक्रसा भास्वररूप[6] सीताविश्लेषदीप्तस्मरबाणभीता,[7] ।
सांगे, 'पहा जा शबरीस[8] आधीं, कीशा[9] सुकंठा[10] मग, कार्य साधीं.' ॥ ४८
भेटोनि आधीं शबरीस, उक्ति[11] प्राशूनि, दे मुक्तिद तीस मुक्ति. ।
श्रीराम सेवूनि मुहूर्त पंपा स्त्रैणत्व[12] दावी मिरवूनि कंपा. ॥ ४९

---

१. परासु होऊनि (गतप्राण होऊन) आपल्या बरोबर जटायु जें धैर्य ने (जें अद्वितीय धैर्य स्वर्गास नेता झाला) तें (त्या धैर्याचा वृत्तांत, आपण रावणाशीं किती धैर्यानें झगडलों हा वृत्तांत) परा (रामचंद्राला) निवेदूनि (सांगून) सुनेतें (सीतेसाठीं) शोची (शोक करिता झाला). ज्या धैर्यानें आपण प्राण जाई पावेतों रावणाशीं लढलों त्या धैर्याची हकीकत रामास सांगून 'माझा निरुपाय झाल्यावर जानकी माझ्या हातांतून हिसकावून नेली!' असा शोक करिता झाला. २. अस्वस्थता. ३. रामाच्या चित्तवृत्तीमध्यें पत्नीविरहानें व जटायूच्या निधनामें नि:सीम (अतिशय) अस्वास्थ्य उत्पन्न झालें होतें तरी साधुपथा धरूनि ('महाजनो येन गतः स पंथाः' या न्यायी व साधुमार्गाचें अवलंबन करून) पित्याची तसी (आपला पिता दशरथ त्याची जशी उत्तरक्रिया यथासांग केली तशी) त्याची (जटायूची) क्रिया सांग (सर्वविधिपूर्वक) करी (रामचंद्र करिता झाला). कारण जटायु मेला तो रमेला (सीतेला) रक्षूनि (रक्षण करण्याची खटपट करून) व शरीर चिंतून (शरीराची काळजीनें खराबी करून) मेला होता. 'सजीवं दहते चिंता' हें प्रसिद्धच आहे. ४. कबंधा. ५. काळापरीस बहूग्र जो कबंध (त्यानें) करीसखा (गजेंद्रमोक्ष करणारा) कृपासिंधु (दयासागर जो रामचंद्र त्याला) खाया धरी (खाण्यासाठीं) धरिलें. तेव्हां या (कबंधाला) विमान समर्पूनि (कबंधास शापमुक्त करून व विमान देऊन) म्हणे (रामचंद्र म्हणाला), 'साजें (तूं शोभिवंत पेस) आणि कविमानसा जें ज्ञान (कवि त्रिकालज्ञ असतात त्यांचें त्रिकालज्ञान) मातें दे (मला दे).' सीता कोणीं नेली व कोठें नेली ह्याचें ज्ञान रामचंद्रास पाहिजे होतें, सारांश सीतेची खबर रामास पाहिजे होती ती कळविण्याबद्दल रामानें कबंधाची प्रार्थना केली. आपल्यास खाण्यासाठीं आलेल्या राक्षसालाही ज्यानें मुक्ति दिली त्याचें कृपासिंधुत्व लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. ६. प्रभायुक्त रूप आहे ज्याचें असा, तेजस्वी असा. विश्वावसु हाच शापग्रस्त झाला म्हणून कबंधाचें स्वरूप त्यास प्राप्त झालें होतें. ७. सीतेच्या विरहानें पेटलेला जो काम त्याला भ्यालेल्यास. ८. प्रसिद्ध भिल्लीण. ९. वानरपति. १०. सुग्रीव. ११. तिचें बोलणें व प्रार्थना ऐकून. १२. स्त्रीविषयीं प्रेम.

प्रार्थी तया लक्ष्मण, 'ऐक आर्या! धैर्यें प्रयत्नें करिसील कार्या. ।
विलाप तेजोहर हा रहावा; सुग्रीव आधीं प्रभुनें पहावा.' ॥ ९०

हितावह स्वानुजबोध तो घे, त्या ऋष्यमूकाप्रति जाति दोघे. ।
सुग्रीव भी पाहुनि चापपाणी, वाळीष्ट ऐसें हृदयांत आणी. ॥ ९१

धाडी पुढें वातसुता स्वयोधा त्याच्या कराया मतिशक्तिशोधा; ।
भेटे तया तापसवेषधारी; तरे स्वयें, त्यां सुगळाहि तारी. ॥ ९२

सुग्रीव रामासह सख्य होय, क्षीर प्रभु, स्वच्छ सुकंठ तोय. ।
तो देव्यलंकार सवस्त्र दावी, त्यांतें प्रभु क्लेशनिमग्न भावी. ॥ ९३

पुसे, 'प्रियेचे नग काय बा! हे?' भ्राता म्हणे, 'नूपुरयुग्म वाहे, ।
आर्यापदाब्जद्वय तेंचि आहे.' साश्रु प्रभु श्रीविरहा न साहे. ॥ ९४

---

१. धैर्यें (धैर्यानें) व प्रयत्नें (प्रयत्न केला असतां) तुझें इष्ट कार्य होईल. आमच्यासारख्या प्राकृतांनीं हा लक्ष्मणकृत उपदेश चिंतन करण्यासारखा आहे. विलाप हा तेजोहर (तेज हरण करणारा) आहे, हेंही विसरतां कामा नये. २. हितकर. ३. रामचंद्र. ४. भ्याला. ५. वाळीचा प्रिय; वाळीचा मित्र. ६. आपला सरदार, त्याला. ७. रामाच्या. ८. रामाचें मानस काय व शक्ति किती याचा शोध करण्यासाठीं. ९. मारुति तपस्वीवेषानें रामास भेटला. १०. साधूंचें वर्तन असें असतें. ते स्वतः तरून जाऊन दुसऱ्यांचेंही तारण करितात. 'भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम्' हें वाक्य किती सार्थ आहे! ११. रामसुग्रीवांचें सख्य कसें होतें तें कवी सांगतात, प्रभु क्षीर (दुग्ध) आणि सुकंठ हा स्वच्छ तोय (स्फटिकतुल्य जल) असा दोघांचा स्नेह झाला. एका सुभाषित श्लोकांत दुग्ध व जल यांच्या मैत्रीचें चमत्कारिक रीतीनें वर्णन केलें आहे, तें वाचकांकरितां येथें देतों:–'क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणा दत्ताः पुरा तेऽखिलाः क्षीरे तापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्मा कृशानौ हुतः । गंतुं पावकमुन्मनस्तदभवद्दृष्ट्वा तु मित्रापदं युक्तं तेन जलेन शाम्यति सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥' १२. सुग्रीव. १३. सीतेचे अलंकार. १४. पाहता झाला. १५. भावाला पुसे. १६. लक्ष्मणाला रामानें 'हे दागिने सीतेचेच काय?' म्हणून विचारलें, तेव्हां सीतेच्या पायांतील नूपुर मात्र लक्ष्मणानें ओळखले. कारण उघडच आहे कीं लक्ष्मण सीतेचें पादवंदन नित्य करीत असे, म्हणून तो दागिना लक्ष्मणाच्या ओळखीचा होता. एक दागिना सीतेचा, तेव्हां बाकीचे अलंकार सीतेचेंच, असें त्यांनीं ठरविलें. ते दागिने पाहून रामास अत्यंत शोक झाला, तें पाहून सुग्रीव म्हणाला, 'मी कपी सुद्धां पत्नीविरहाला सहन करितों, धैर्य सोडीत नाहीं; तर रामचंद्रा! तुझ्यासारख्या महानुभावांनीं असा धैर्यत्याग करणें योग्य नाहीं. विलाप करूं नको; भज पाव (कृपा कर), शील (स्वभाव, धैर्य) सोडूं नको. लवकरच तुझे इष्ट मनोरथ सिद्धीस जातील. मी तुला सर्वप्रकारें मदत करीन'. १७. सीतेच्या विरहाला.

सुग्रीव बोले, 'जरि [1]मी वियोगी; **वाळी** बळें मद्दयितेसि भोगी; ॥ ५५
न 'हा!' म्हणे, धैर्य धरूनि आहें कपीहि; तूं कां त्यजितोसि बा! [2]हें? ॥
म्हणों नको 'हा!' मज [3]पाव; शील त्यागूं नको; बा! प्रिय पावशील. ।
भेटेल यत्नें तुज [4]तूर्ण [5]आर्या; करीन मी या प्रियमित्रकार्या.' ॥ ५६
पुसे प्रभु, '[6]स्वाग्रजही अराती कां?' हे कथा तोहि सविस्तरा ती, ।
सांगे, 'बिळीं [7]दैत्यवधार्थ गेला; बा! हा [8]बिलद्वारप बंधु केला. ॥ ५७
होतों तया सेवित मी बिळाला; [9]वर्षेंहि **वाळी** न मला मिळाला. ।
शिळा बिळीं ठेवुनि साश्रु आलों, [10]मंत्र्याग्रहानें [11]कपिराज झालों. ॥ ५८
[12]ये शत्रु मारूनि, मला न पाहे; शिळा बिळीं, द्वेष मनांत वाहे. ।
फोडी मुठीनेंहि [13]महोपळाला; म्हणे, 'वधावेंचि [14]तया खळाला. ॥ ५९
मातें विलोकी स्वपदीं, न साहे; [15]तत्सांत्वनाला न उपाय राहे, ।
दंडी प्रधानासि, मलाहि पाहे मारूं; कथा तों इतुकीच बा! हे. ॥ ६०
या [16]ऋष्यमूकींच मतंगशापें आहें सुखी तत्सुतपःप्रतापें, ।
मरेन तेथें शिरतांचि **वाळी** म्हणोनि तो [17]यां अचळासि [18]वाळी. ॥ ६१
'स्थानीं घडो मृत्यु म्हणे तुला या,' कीं हा झुगारी असुरा [19]लुलाया; ।
शुद्धाश्रमा दूषिति रक्तबिंदु, ज्ञाता न [20]शापू मग कां न निंदु?' ॥ ६२
**श्रीराम** बोले, 'वधितों खळाला; **वाळी** न वांचेल जरी पळाला.' ।

---

१. मी (सुग्रीव) विरही आहें. २. धैर्य. ३. प्रसन्न हो. ४. लवकर. ५. सीता देवी. ६. तुझा थोरला भाऊ तुझा शत्रु कसा? ७. मायावी नामक राक्षस दुंदुभि नामक दैत्याचा भाऊ. दुंदुभीस (यालाच महिषासुर म्हणतात.) मारल्यावर मायावीशीं वालीचें युद्ध झालें. ८. बिलाच्या दाराचें रक्षण करण्यास मला ठेविलें. ९. सबंध एक वर्ष बसलों तरी. १०. प्रधानांच्या आग्रहास्तव. ११. वानराधिपति. १२. वाली आला. १३. मोठ्या पाषाणाला. १४. दुष्ट, भाऊ त्याला (मला). १५. वालीच्या सांत्वनाला. १६. या ऋष्यमूक पर्वतावर मतंगऋषीचा पवित्र आश्रम होता. वालीनें दुंदुभि (महिष) असुराचा वध करून त्याचें प्रेत फेंकून दिलें तें या ऋषीच्या आश्रमांत पडून सर्व आश्रम दूषित झाला. तेव्हां 'तूं येथें आलास तर मरशील' असा वालीस मतंगानें शाप दिला. सुग्रीवाला ऋष्यमूक पर्वतावर निर्भयपणें राहतां आलें तें या शापामुळेंच होय. १७. ऋष्यमूक पर्वतास. १८. वर्जी. १९. रेड्याला (महिषासुराला). २०. सुग्रीव म्हणतो, 'शुद्धाश्रमाला अशुद्ध (रक्तानें मलीन) करणाऱ्या अधमाला जर ज्ञात्या पुरुषानें शाप दिला नाहीं तर त्या ज्ञात्याची आपण निंदा कां करूं नये? 'सारांश दुष्टास शिक्षा करणें हें न्याय्य आहे.

तत्प्रत्यया[1] दाखवितां बळाला; वैरी[2] गमे[3] काळमुखीं गळाला[4]. ॥ ६३
एकेंचि बाणें हृदयांत ताडी श्रीराम, वाळीस पळांत पाडी. ।
दे बंधुचें राज्य, कलत्र[5], मित्रा[6]. गातात कृत्या कवि या विचित्रा[7]. ॥ ६४
देवांस कीशर्क्ष[8] असंख्य आणी. म्हणे, 'प्रभूची अतितूर्ण राणी ।
शोधूनि मासांतचि याचि; वाणी विलंघितां हे, न चुकेल हाणी[9].' ॥ ६५
जो दक्षिणेला युवराज[10] गेला, तेणें ससैन्यें बहु शोध केला; ।
न नाथदत्तावधि[11] मास राहे काळा करूं पाहति आसरा हे. ॥ ६६
जटायुचा अग्रज[12] गृध्र शोध[13] प्रेमें कथी, हर्षवि सर्व योधें[14]. ।
लंघी मरुन्नंदन सिंधु गावें शत[15] क्षणें, तद्यश भव्य गावें[16]. ॥ ६७
मैनाक[17] ये आश्रय यास देया, 'बा! पावला स्पर्शुनि' हें वदे[18] या[19] ।
वंचूनि हर्षी सुरसेसि[20] घाली, ती सिंहिका[21]ही गिळितां निमाली. ॥ ६८

---

१. आपल्या शरसंधानानें वालीस मारीन हें वचन खरें करून दाखविण्यासाठीं. २. वाली. ३. सुग्रीवाला वाटे. ४. मेला असें. ५. स्त्री. ६. सुग्रीवाला. ७. या विचित्रा (विलक्षण, अपूर्व) कृत्यास कवि गातात. एका बाणानें प्रचंड वाळीचें निर्दालन करणें हें रणशौर्य व मिळालेलें सर्व राज्य सुग्रीवास देणें हें दानशौर्य हीं दोन्हीं अपूर्वच आहेत; तेव्हां यांचें गायन कवी करतीलच करितील. ८. वानर व आस्वलें. ९. ही आज्ञा मोडलीस तर खास शिक्षा होईल. १०. वालीपुत्र, अंगद. ११. नाथ+दत्त+अवधि (स्वामीनें दिलेली मर्यादा). (एक महिन्याच्या आंत सीताशुद्धि करा, नाहीं तर हानी (मरण) चुकणार नाहीं (देहांत शिक्षा होईल)' ही मर्यादा (महिना उलटून गेला) राहिली नाहीं, तेव्हां हे (वानर) काळास आसरा करूं पाहती (मरणाला शरण जाण्याची तयारी करूं लागले). १२. थोरला बंधु संपाति. १३. सीतेचा शोध. १४. वानरमंडळी. १५. शंभर योजनें लांब असा समुद्र. १६. वर्णावें. १७. हा हिमालयाचा ज्येष्ठ पुत्र. इंद्राच्या भीतीनें हा दक्षिण समुद्रांत लपून राहिला होता. मारुति समुद्रलंघन करून-जाणार म्हणून त्यास विश्रांतिस्थान देण्यासाठीं मैनाक पर्वत वाढला. पण मारुतीस तें विघ्नच उत्पन्न झालें असें वाटून त्यानें मैनाकाचें शृंग तोडिलें. पुढें 'तुला विश्रांति देण्यासाठीं मी वर आलों' असें मैनाकानें सांगितल्यावर 'स्वामिकार्य झालें नाहीं तोंपर्यंत आहारविहार वर्ज केले आहेत, तुझा स्पर्श झाला, यांत मला सर्व पावलें' असें त्यास सांगून मारुति निघून गेला. १८. मारुति बोलला. १९. मला. २०. सुरसेसि वंचुनि (फसवूनि हर्षी घाली (तिला आनंद देता झाला). मारुतीचें बलाची परीक्षा करण्यासाठीं देवांनीं राक्षसवेष धारण करणारी नागमाता सुरसा इला पाठविलें. सुरसेनें अक्राळविक्राळ स्वरूप धारण करून मारुतीस 'तुला गिळून टाकीन!' असें सांगून त्याच्या पुढें उभी राहिली. तेव्हां अत्यंत सूक्ष्म स्वरूप धारण करून मारुति तिच्या तोंडांतून निसटला! याप्रमाणें त्यानें तिला फसविलें. २१. सिंहिका नामक राक्षसीनें मारुतीची छाया पकडून त्यास धरिलें! हें तिसरें

शोधूनि लंकेंत, वनीं अशोकीं, पाहोनि 'मी धन्य' म्हणे 'त्रिलोकीं.' ।
प्रार्थी कुधी रात्रि, तयासि दीपी साध्वी; तिची[3] सूक्तिमहासुधा पी. ॥ ६९
चिंती मनीं दुष्टलयार्थ रुद्रा, जातां कुधी[6], दे तिस नाथमुद्रा, ।
सांगे शिव श्राव्य चरित्र पूता [10]संदेश चूडामणि दे स्वदूता. ॥ ७०
वंदूनि सीतेसि, पुसोनि भावें मोडी वन [11]द्वेषि बळप्रभावें, ।
[12]परासु होतां सुत अक्ष, [13]रुष्टें आज्ञापिला [14]ज्येष्ठ कुमार [15]दुष्टें. ॥ ७१
ब्रह्मास्त्र योजी [16]घननाद [17]मानी, त्या [18]सांपडे अस्त्रवरास [19]मानी. ।
बांधूनि नेला अरिंनीं सभेला; तो कौतुकी[20] न प्रकटी [21]प्रभेला. ॥ ७२
म्हणे, 'पचेना प्रभुरत्न चोरा. रे! कोपवावें भुजगें न मोरा[22]; ।
[23]सोमें जगीं होसिल फार गोरा[24] [25]सद्धार्य मुक्तांत सिरोनि दोरा. ॥ ७३
तो आठिव [26]त्र्यंबकचाप, लाजें, मना निवारीं वश चापला जें. ।

---

विघ्न ! मारुतीची पडच्छाया ती गिळूं लागली, तेव्हां मारुतीनें आपलें शरीर विस्तीर्ण करून तिचा नाश केला. सत्कार्य करीत असतांही मारुतीला किती तरी विघ्नें आड आलीं ? पण मुळींच न डगमगतां त्यानें स्वामिकार्य सिद्धीस जाईपर्यंत विश्रांति घेतली नाहीं, यावरून विघ्नपरंपरेला न भितां व निरुत्साह न होतां जो आपलें कर्तव्य करीत राहतो तोच मोठा, किंवा तोच मोठा होतो असें सिद्ध होत नाहीं काय ? 'विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः प्रारभ्य चोत्तमजना न परित्यजंति' हें किती तरी खरें आहे ?

१. भेवडावी. २. सीता. ३. सीतेची. ४. वाक्यामृत. ५. दुराचारी रावण त्याच्या नाशासाठीं. ६. दुष्टबुद्धि रावण. ७. रामाची अंगठी. ८. श्रवण करण्यास योग्य. ९. पवित्र सीता स्वदूत मारुति त्याजवळ निरोप व आपला चूडामणी देती झाली. १०. निरोप. ११. द्वेषि (शत्रु) त्याचें अशोकवन. १२. गतप्राण, रावणपुत्र अक्ष मेल्यावर. १३. क्रुद्धें. १४. थोरला मुलगा इंद्रजित्. १५. क्रुद्ध, रागावलेल्या दुष्टानें (रावणानें). १६. इंद्रजित्. १७. अभिमानी. १८. मारुति सांपडला. १९. सन्मान देता झाला. २०. लीला दाखविणारा. २१. स्वतेजाला. २२. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** व **रूपक** यांची संसृष्टि आहे. भुजग रावण आणि मोर रामचंद्र होत. २३. तह केलास तर. २४. 'गोरा होसील म्हणजे तुझी मोठी कीर्ति होईल. कीर्ति शुभ्र म्हणून ती मिळविणाराही गोराच होतो. शिवाय परदारापहरण करून जें तूं मालिन्य संपादिलें आहेस, तेंही नाहींसें होईल, म्हणजे तूं गोरा होशील,' असें म्हणण्याचा मारुतीचा भाव आहे. २५. सत्+धार्य=साधूंनीं धारण करण्यास योग्य असा. २६. शिवचाप. याचा रामानें भंग केला होता. तुला जें वांकवितां आलें नाहीं तें शिवधनुष्य रामानें भग्न केलें हें विसरूं नको, आणि चापला (चंचलतेला) वश जें मन त्याला निवारीं (आवरून धर, कामवश होऊं देऊं नको).

सुधाघटाच्या नुकरीं बुडाला. रे! उद्धतत्वें खर कीं बुडाला.' ॥ ७४
ये राक्षसांच्या बहु राग राया; पाहे वधाया बळसागरा यां. ।
बिभीषण प्रांजळि पूतभावा वारी स्वयें वर्णुनि दूतभावा, ॥ ७५
म्हणे कुधी, 'दीप्त करूनि पुच्छा सोडा पुरींत भ्रमवूनि तुच्छा.' ।
तैसीच चेष्टा करिती पलाश; क्षोभे. उडे जो तपनीं फलाश. ॥ ७६
बिभीषणाचें गृह मात्र रक्षी; पुच्छाग्नि लंकानगरीस भक्षी. ।
नभीं गमे मारुति तार्क्ष्य पक्षी कांपे, न या राक्षससर्प लक्षी. ॥ ७७
पुच्छाग्नि सिंधूंत करूनि शांत, ध्यानांत आणूनि विभूतिकांत, ।
करी पुन्हा गोष्पद अर्णवातें; संपूजिला तन्मुखवर्ण वातें. ॥ ७८
प्रेमें नमी ऋक्षवरासि आधीं; तो त्या म्हणे, 'कीर्ति असीच साधीं.'
मानी, तया स्वासुपकारभारी; म्हणे, 'फिटेना उपकार भारी.' ॥ ७९

---

१. अमृताच्या घटाच्या बुडाला नुकरीं (न उकरीं, तळ फोडूं नको). अमृत गोड आहे म्हणून. २. तळाला. ३. खर नामक राक्षस. रावणाचा सावत्र भाऊ. ४ येथपर्यंत मारुतीचें बोलणें आहे. ५. मारुतीला. ६. हात जोडून. ७. पूज्य असा वडील भाऊ रावण. ८. दूतपणाला. दूताचा वध करूं नये, अधर्म होतो, असें हात जोडून आपल्या वडील भावास सांगितलें. 'वधं न कुर्वंति परावरज्ञाः दूतस्य संतो वसुधाधिपेंद्राः,' 'राजन्धर्मविरुद्धं च लोकवृत्तेश्च गर्हितम्,' 'दूता न वध्याः समयेषु राजन्सर्वेषु सर्वत्र वदंति संतः,' असें बिभीषण धर्मवाक्य बोलला तरी रावणानें त्याचें ऐकिलें नाहीं. ९. हलकट वानराची गांवांतून धिंड काढा. १०. मांसभक्षक, राक्षस. ११. जो फलाश (फलमूलांवरच निर्वाह होतो ज्याचा असा) तपनीं उडे, सूर्यावर उड्डाण करिता झाला). जन्म झाल्याबरोबर मारुतीनें क्षुधाशमनार्थ सूर्यबिंबावर—तें फल आहे असें समजून—उडी घातली होती ही कथा सुप्रसिद्धच आहे. तो क्षोभे (रागावला). नभीं (आकाशांत) मारुति तार्क्ष्य पक्षी (गरुडपक्षी) गमे (वाटता झाला. गरुडपक्ष्यासारखा दिसला). राक्षससर्प कांपे, या न लक्षी (सर्व राक्षसगण सर्पाप्रमाणें कांपूं लागून त्या गरुडपक्ष्याकडे बघेनासे झाले). कवीनें मारुतीवर गरुडाचें उत्प्रेक्षण केलें आहे व राक्षसांस सर्प केलें आहे म्हणून **उत्प्रेक्षा** अलंकार प्रधान असून **रूपक**ही गौणत्वानें दृग्गोचर होत आहे. कोणी या पंक्तिद्वयांतील अलंकारास भ्रांतिमान् असेंही म्हणतील. १२. सूर्याचे ठायीं. १३. फल अशी इच्छा धरणारा. १४. श्रीपति, रामचंद्र. १५. गाईच्या पावलायेवढा समुद्र करी. म्हणजे समुद्राचें लीलेनें उल्लंघन करी. १६. मानपूर्वक वर्णन केला. १७. जांबुवंतास. १८. जांबुवंत मारुतीला म्हणाला. 'मारुते, अशीच स्वामिसेवा करून कीर्ति मिळीव.' एकनिष्ठतेनें स्वामिसेवा केली असतां कीर्ति मिळतेच मिळते. १९. स्व+असु+उपकार+भारी=आपल्या प्राणावर उपकार करून त्याचें ओझें सर्व ऋक्ष, वानर व वानराधिपति अंगद यांवर घालणारा. २०. अतिशय.

करी सुखी तें बळ [1]संगदानें, [2]सत्कारिला वर्णुनि अंगदानें. ।
वंदूनि चूडामणि दे प्रभूतें; भेटे [3]महें [4]तो कपिला [5]प्रभूतें. ॥ ८०
निघे प्रियेच्या प्रभु हा निरोपें करावया [6]दिङ्मुखहानि [7]रोपें, ।
पयोधितीरा रघुराज पावे यत्पादपद्म [8]द्रुहिणें जपावें. ॥ ८१
'[9]देऊनि साध्वी व्यसनीं तरावें. आर्यें स्मराच्या न भरीं [10]भरावें. ।
[11]बळें विष प्राशन कां करावें? [12]सर्वस्व होतें अनयें परावें. ॥ ८२
एकेंचि केला [13]पुरदाह दूतें. झालींच सैन्यें परि [14]पूर्वभूतें. ।
बा! साम, जैसें अघ [15]गांग, धूतें, नमूनि अर्पी प्रभुच्या वधूतें.' ॥ ८३
म्हणे असें सांगुनि, जो नमो त्या, बोधा न घे, अंध [16]जैसा न मोत्या. ।
धिक्कारुनि [17]क्रव्यभुगीश बोले, जें तें [18]विषासींच सभेंत तोले. ॥ ८४
बिभीषण [19]प्राज्ञ निघे, अरण्या [20]दवावृता त्यागुनि त्या शरण्या; ।
श्रीशा नमी, [21]श्रीगलनिष्क लंका तया समर्पी नति [22]निष्कलंका. ॥ ८५
[23]महास्त्रतेजें बहु ताप पेटे; श्रीशासि तेंव्हां जळराशि भेटे. ।

---

१. आलिंगन देऊन. २. मारुतीचा सत्कार केला. ३. उत्सवें. ४. राम. ५. पुष्कळें-('महें' या शब्दाचें विशेषण.) ६. दशानननाश. ७. बाणें. ८. ब्रह्मदेवें. ९. बिभीषणाचें हें भाषण. १०. आर्यें (महाराज! आपण) स्मराच्या भरीं (कामाच्या सपाट्यांत) न भरावें (गुरफटून जाऊं नये, सांपडूं नये, कामातुर होऊन अधर्म करूं नये). ११. जाणून बुजून. १२. अनयें (अन्यायानें वागलें असतां) सर्वस्व (आपलें असतें तें) परावें (परकी) होतें (अन्यायाचरण करूं लागलें म्हणजे जे आपले असतात, तेच परकी होतात). हें वाक्य सुभाषितरूप आहे. 'अपंथानं तु गच्छंतं सोदरोऽपि विमुंचति' हें संस्कृत वाक्य त्याच अर्थाचें आहे. १३. लंकादहन. १४. पूर्वीं होतीं अशीं झालीं, मेलीं. नामशेष झालीं. १५. गंगोदक. १६. अंध जसा मौक्तिकाचें ग्रहण करित नाहीं, कारण त्याची किंमत त्यास ठाऊक नसते, तसा कामांध रावणानें बिभीषणवाङ्मुक्ताचा स्वीकार केला नाहीं. येथें **उपमा** आहे. 'अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः' हें खरें आहे. १७. क्रव्यभुग् (राक्षस) त्यांचा स्वामी रावण. क्रव्य=कच्चें मांस. *Cars* Flesh. १८. विषास तोलूं लागलें, विषासारखें झालें. १९. शहाणा. २०. अग्नीनें व्याप्त (अधर्मपूर्ण) अशा अरण्याला (रावणाला) टाकून शरण्य जो रामचंद्र (धर्ममूर्ति) त्याकडे बिभीषण गेला. येथें **रूपक** आहे. २१. लक्ष्मीच्या गळ्यांतील पदक. (राम.) २२. शरण आला म्हणून जो धूतपाप (निष्पाप) झाला त्याला. २३. रामचंद्राच्या तेजस्वी अस्त्रांनीं जेव्हां संतप्त होऊन समुद्र पेटला! तेव्हां तो जलराशी (दक्षिण समुद्र) राघवास येऊन भेटला. सारांश, समुद्रास गर्व झाला होता त्याचा परिहार होऊन तो लीन होत्साता

तत्प्रार्थनें तो जगदिष्टहेतु[१] श्रीराम निर्मी वचनेंचि सेतु ! ॥ ८६
श्रीस[२] प्रभूचें धनु, शीर्ष दावी, 'हा! हा!' म्हणाया खळ तीस लावी. ।
बिभीषणस्त्री सरमा निवारी 'माया' असें सांगुनि खेद भारी. ॥ ८७
त्या सेतुमार्गें उतरोनि पारा[३] पावे महाकीशसमूह सारा, ।
चढे सुवेळीं प्रभु, दुर्ग पाहे, सुग्रीव, वैरी[४] दिसतां, न साहे. ॥ ८८
उडोनि गांठूनि खळासि[५] ताडी; त्यातें, तयाच्या मुकुटाहि, पाडी. ।
सामार्थ राम प्रभु दूत[६] धाडी, तो शत्रुतें मान हरूनि नाडी[७]. ॥ ८९
सभेंत राजा परभंगदातें[८] सामान्य हें[९] मानुनि अंगदातें, ।
चौघांसि सांगे, धरवी रयंज्ञा[१०]; उडे, करी हीं[११] परवीरयज्ञा. ॥ ९०
स्वामी[१२] म्हणे, 'त्यां[१३] जरि काम सामीं नसे, नसो; मारिन तामसा मी. ।
हो हेत जो यूथप हो! मनाचा; करा सुखें राक्षसहोम, नाचा. ॥ ९१
आज्ञेसि[१४] माथा बहु मानवे घे, दुर्गीं चमू सिंधुसमान वेघे. ।
आरंभिती ते पर-मारणातें हर्षें, करीती परमा[१५] रणातें. ॥ ९२
निघे स्वयें रावण उद्धतत्वें; न वर्णवे अद्भुत युद्ध तत्त्वें[१६]. ।
रणांगणीं रक्तनद्या वहाती; कबंधनृत्यें अमरी[१७] पहाती. ॥ ९३
प्रहस्त सेनापति मुख्य मेला; रामें लयातें बहु[१८] वीर नेला. ।
भंगोनि[१९] दिक्कंठ फिरोनि गेला, तथापि कांहीं न विचार केला ! ॥ ९४

---

रामचंद्राच्या पादकमलाला शरण गेला. दुःखाचा अतिरेक झाला म्हणजे आपण ईश्वरास शरण जातों, हें अनुभवसिद्धच आहे.

१. जगाच्या कल्याणाचें कारण. २. सीतेला खळ रावण रामाचें धनुष्य व शिर दाखविता झाला. ३. समुद्राला. ४. रावण. ५. रावणाला शीघ्रकोपी सुग्रीवानें ताडन केलें. ६. अंगद. ७. छळ करी. ८. दुसऱ्याचें, शत्रूचें तेज हरण करणाऱ्याला. ९. वालीपुत्र अंगद हा सामान्य वानर आहे असें समजून. १०. वेगज्ञ अंगदाला. ११. अंगद शत्रुवीरांचा होम करिता झाला. १२. रामचंद्र. १३. त्या (रावणाला) सामीं काम नसे (साम करून व गोडीगुलाबीनें तंटा मिटवून टाकण्याची इच्छा) नसे (नाहीं) नसो, (न असो बापडी!); यूथपहो (सेनानायकांनो!) राक्षसहोम करण्याचा जो तुमचा हेत (हेतु) तो सुखें करा व इच्छा पूर्ण झाली म्हणून नाचा (नाचावयास लागा). १४. ही आज्ञा कपिसैन्यास बहु मानवली व सर्वांनीं ती माथा घे (शिरसा वंद्य केली). १५. उत्तम प्रकारच्या. १६. जसें झालें तसें यथार्थ रीतीनें वर्णन करवत नाहीं. अपूर्वच युद्ध तें ! १७. देवस्त्रिया. १८. अनेक योद्धे. एकवचनी प्रयोग ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. १९. पराभव पावून.

दे[1] मेघनाद त्रिदशांसि[2] दैन्य ध्वंसूनि सारें कपिवीरसैन्य. ।
तो[3] नागपाशें प्रभुलाहि बांधी, श्रीची[4] न मोहांत बुडेल कां धी ? ॥ ९५
दे स्वावनाचें यश पक्षिपातें[5], त्याच्या पळाले अहि अक्षिपातें[6], ।
होतां हरि स्वस्थ ससेन, माया सोडूनि येती न ससे नमाया. ॥ ९६
तो कुंभकर्णासि करूनि जागा म्हणे, 'वधीं ते नर कीश जा गा !
भासे कपींला निज काळ साचा, न त्याग केला जरि आळसाचा[7]; ॥ ९७
धरी सुकंठासि बळी न सोडी; सुटोनि तन्नाक सकर्ण तोडी, ।
फिरे[8], गिळी तो सगळेचि कीश, छेदी तदंगें प्रभु जानकीश. ॥ ९८
श्रीरामसौमित्रि ससैन्य यत्नें शल्यार्त केले समरीं सपत्नें[9]. ।
मेघस्वनें योजुनि अस्त्रमाया लोकेशें[10] पावोनि भय भ्रमाया. ॥ ९९
ऋक्षाधिराजें हितबोध केला, अक्षघ्न[11] कैलाससमीप गेला; ।
घेऊनि ओषध्यगशृंग[12] आला; जीवातु[13] रामप्रमुखांसि झाला. ॥ १००
सांगे[14] पित्यातें, 'रथ[15] दिव्य होमीं निर्मूनि वैरी वधितों अहो! मी.' ।
पुन्हाहि तो प्राज्यमद[16] भ्रमाया सारे करी शत्रु अदभ्र[17] माया[18]. ॥ १०१
मायामयी[19] श्री समरांत दावी, मारी; म्हणाया 'बत! हंते[20] !' लावी[21]. ।
बिभीषणें तो भ्रम दूर केला, सौमित्रिनें शत्रु लयासि नेला. ॥ १०२
पावे सुतातें[22] दशकंठ तापा, घे खड्ग चिंतूनि मनांत पापा; ।
सीतावधा जाय महोग्रकर्मा[23], ती भी, स्मरे रामपदा, स्वधर्मा[24]. ॥ १०३
सुज्ञें सुपार्श्वें[25] जरि भंगदायी[26] तो वारिला बोधुनि आततायी[27]. ।

---

१. मेघनादानें (इंद्रजितानें) कपिसैन्याचा ध्वंस केला तेव्हां देवांस फार वाईट वाटलें. ते दीन झाले. २. देवांसि. ३. इंद्रजित्. ४. सीतेची. रामचंद्र नागपाशबद्ध झाले हें पाहून सीतेची बुद्धि स्तब्ध झाली हें सहजच आहे. ५. पक्षिप जो गरुड त्याला स्वतःच्या संरक्षणाचें यश रामचंद्रानें दिलें. ६. दृष्टि फेंकल्याबरोबर. ७. प्रिय निद्रेचा. ८. कुंभकर्ण फिरला. ९. शत्रूनें. १०. रामचंद्र. ११. मारुति. १२. औषधीपर्वताचें एक शिंग. १३. वांचण्याचें औषध. १४. इंद्रजित सांगे. १५. होमानें देवता प्रसन्न करून घेऊन त्यांकडून रथ मिळवितों. १६. पुष्कळ मोठा आहे मद ज्याचा तो इंद्रजित्. १७. पुष्कळ. १८. राक्षसी कपट. १९. खोटी, मायेनें उत्पन्न केलेली. २०. खेदार्थी अव्ययें; 'हाय, हाय.' २१. रामास खेद करावयास लावी. २२. सुतवध झाला म्हणून. २३. मोठें उग्र आहे कर्म ज्याचें. २४. स्त्री-धर्माला. २५. एक रावणमंत्री. २६. अपमान करणारा. २७. साहस करणारा.

शची म्हणे, '[१]तद्व्रत शुद्ध बाई! स्त्री काय या? हा खळ खाय गाई.॥१०४
धाडी वधाया बहुकोटि सेना, [२]जय स्वनेत्रांसि जरी दिसेना. ।
रामें त्रिनेत्रें तसि लोळवीली, काळाकडे सांत्वुनि बोळवीली. ॥ १०५
तो 'हा!' म्हणे [३]राक्षसदार [४]दैन्यें, स्वयें निघे घेउनि सर्व सैन्यें, ।
[५]कल्पांत तैसें भय दे, वसेना तयापुढें [६]ती जसि [७]देवसेना. ॥ १०६
तो शक्तिनें लक्ष्मणवक्ष भेदी, त्या राम भंगी जरि होय [८]खेदी; ।
केला पुन्हा सावध ओखदानें, त्याचि क्षणें [९]श्रीपतितोखदानें. ॥ १०७
सारूनि अन्योन्यबळासि दूर, श्रीराम दिक्कंधर रक्तपूर ।
युद्धांगणीं वाहविती प्रशूर, क्षोणीतळीं भासति दोन [१०]सूर. ॥ १०८
द्रष्टा रथीं, भूवरि [११]नाथ पाहे युद्धांत [१२]देवेश्वर, तें न साहे, ।
प्रेषी निज [१३]स्यंदनें [१४]सूत [१५]तूर्ण, स्वामी [१६]तयाचा करि काम पूर्ण. ॥ १०९
तें युद्ध अत्यद्भुत, साठ [१७]याम [१८]श्रुत्यून, वीरेंद्र दशास्य राम, ।
[१९]अजस्रकोपें करिती, न शस्त्रें रक्तार्द्रही [२०]भग्न कृती, न अस्त्रें. ॥ ११०
शिरें [२१]शत च्छेदुनि राम पाडी, मर्मीं शरांहीं अरि फार ताडी, ।
तरी विराजे दशमस्तकांहीं दिक्कंठ, लाजे [२२]प्रभुहस्त कांहीं. ॥ १११
भेटे [२३]अगस्त्याख्य महातपा या 'आदित्यहृत् स्तोत्र' कथी जपाया, ।
दे दर्शन क्षिप्र [२४]जपावसानीं, [२५]बर्हीस तो हर्ष न पावसांनीं. ॥ ११२

१. सीतेचें पतिव्रत. २. जरी रावणाला ह्या वेळपर्यंत जय मिळाला नव्हता. ३. राक्षसांच्या स्त्रिया. ४. दीनवाणीनें. ५. प्रलयकालाप्रमाणें. ६. वानरसेना उभी राहीना. ७. देवसेना जशी रावणापुढें उभी राहत नसे, तशी वानरसेना उभी राहीना. तिची दाणादाण झाली. ८. दुःखी. ९. श्रीपतीस आनंद देणाऱ्या मारुतीनें. १०. सूर्य. ११. राम. १२. इंद्र. १३. रथ. १४. सारथि, मातली. १५. सत्वर. १६. इंद्राचा. १७. प्रहर. १८. श्रुति+ऊन=वेदाहून उणें, चार उणे साठ प्रहर. १९. अखंड कोपानें. २०. त्यांच्या शस्त्रास्त्रांचें समाधान झालें नाहीं! २१. शंभर वेळ. २२. कार्य होत नाहीं असें पाहून रामहस्त कांहींसा लाजूं लागला. २३. अगस्तिऋषीनें रामचंद्रास 'आदित्यहृत्स्तोत्रा'चा जप करण्यास सांगितलें. या मंत्राचें माहात्म्य मागें सांगितलेंच आहे. जप संपतांच सूर्यानें रामास दर्शन देऊन वर दिला व रावणाचें वक्षःस्थळ भेदण्याविषयीं उपदेश केला. या वेळीं भास्करदर्शनानें रामास आनंद इतका झाला कीं, मेघदर्शन झालें असतां मोरांसही तितका होत नाहीं. पर्जन्यकाल प्राप्त झाला म्हणजे मोरास आनंद होतो व ते 'बहु आदरें करुनियां ये ये असें बाहती' हें अनुभवसिद्धच आहे. २४. जप संपल्यावर. २५. मोरास पावसानें तसा हर्ष होत नाहीं.

श्रीभास्करप्राप्तमहावरानें ब्रह्मास्त्र योजूनि महाशरानें ।
भेदूनि वक्ष प्रभु त्या [1]अशास्या करि [2]व्यसु क्रूरतमा दशास्या. ॥ ११३
[3]जयस्वनें स्वस्तरुपुष्पवर्षे [4]दत्ताभया पूजिति देव हर्षे, ।
गंधर्व गानें, अमरीहि नृत्यें, वर्णूनि देवर्षि [5]उदारकृत्यें. ॥ ११४
क्रिया [6]तयाची करवूनि रामें, बिभीषणाला पद [7]पूर्णकामें, ।
सौमित्रिला सांगुनि देववीलें, छत्रादि [8]सलक्षण सेववीलें. ॥ ११५
[9]शुद्धस्तवा [10]दिव्यं करूनि देवी मग [11]प्रभूत्संगपदासि सेवी, ।
भेटे [12]पितो, जे समरांत मेले जीवंत शक्रें कपि ऋक्ष केले. ॥ ११६
लंकेंत सुग्रीव ससैन्य नेला, बिभीषणें पूजुनि हृष्ट केला, ।
श्रीपुष्पकें श्रीश [13]पुरासि आला, [14]प्रमोद भारी भरतासि झाला. ॥ ११७
न त्या [15]महोला त्रिजगांत जोडा, असे [16]समाधींत परंतु थोडा, ।

---

१. शासन करण्यास अयोग्य अशा. २. गतप्राण. ३. जयघोषानें, जयजय शब्दांनीं. देव जयस्वनें (जयजयकाराचा घोष करून) व स्वस्तरुपुष्पवर्षे (स्वर्गस्थ तरूंच्या पुष्पांचा वर्षाव करून, पुष्पवृष्टि करून) दत्ताभया (अभय देणारा रामचंद्र त्याला) हर्षे (हर्षानें) पूजिति. सद्धर्महंता व अधर्मप्रवर्तक जो रावण त्याचा नाश झाल्यावर सद्गुणाचा उदय इच्छिणाऱ्या देवांनीं रामचंद्राचा जयजयकार केला हें यथायोग्य झालें. ४. दिलें आहे अभय ज्यानें अशा रामचंद्राला. ५. देवांनीं जयजयकार करून पुष्पवृष्टि केली, गंधर्वांनीं गायन व देवांगनांनीं नृत्य केलें आणि देवर्षींनीं रामचरिताचें वर्णन केलें. ६. रावणाची. ७. ज्याची इच्छा सदा पूर्ण म्हणून जो निरिच्छ अशा रामानें. ८. सर्व उपचारांसह. ९. निर्मल आहे कीर्ति जिची अशी. १०. अग्निप्रवेशरूपी दिव्य. ११. प्रभु+उत्संग+पद=रामाचें मांडीरूप जें पद (स्थान) त्यासि सेवी (मांडीवर बसे). १२. दशरथ. १३. अयोध्येस. १४. आनंद. १५. उत्सवाला. १६. समाधींत (ईश्वर आणि मी एकच आहें असा ब्रह्मस्वरूपीं लय लागतो ती अवस्था, तेथें) उत्सव, आनंद असतो; पण तो थोडा आहे, थोडका, अपुरा, असतो. भरत व अयोध्यानिवासी जनांस परमात्म्याचा अवतार जो रामचंद्र याचें साक्षात् दर्शन झाल्यावर जो निरतिशय आनंद झाला त्यापुढें पंतांच्या मतें ब्रह्मानंद हा कांहींच नव्हे! सगुणभक्तीमध्यें हा विशेष आहे. रामभरतांची भेट होऊन अयोध्येंत मोठा उत्सव झाला. या भेटीनें भरताला किती आनंद झाला त्याचें श्लोकांत वर्णन पंत करितात:—'परमेश्वराचें ध्यान करून एकाग्रचित्तानें समाधि लावली म्हणजे आनंद होतो हें खरें; पण भरतासारख्या निःसीम भगवद्भक्ताला कृपाघन प्रभूचें साकार दर्शन साक्षात् झाल्यानें जो परमावधीचा आनंद होतो त्यापुढें समाधीमधील आनंद कांहींच नव्हे. हा समाधिस्थ आनंद फारच थोडा आहे.' पंतांची सगुणभक्ति किती तेजस्वी होती याचें हें एक निदर्शक आहे. याच वृत्तानें पुष्टीकरण करण्यासाठीं पंत आणखी म्हणतात:—'योगा-

अन्योन्य योगी म्हणते न सोडा, दुराग्रहें हें जन हो! न खोडा. ॥ ११८
राज्याभिषेक प्रभुनें विधीनें स्वीकारिला सांग दयानिधीनें, ।
तें फार सिंहासन शोभवीलें, यशोमृतें विष्टप लोभवीलें. ॥ ११९
काळा वदे होउनि राम राजा म्हणे जनातें न खरा! मरा जा. ।
करी प्रजा भावुनि रंजनातें, मानी प्रजा भाउ निरंजनातें. ॥ १२०
पूजी स्वयें त्या स्वजनां कपींना, सुधा यशा सोडुनि नाक पीना, ।

---

भ्यासामध्यें रत असणारे सत्पुरुष अन्योन्य (एकमेकांस) म्हणते कीं हा आनंद सोडूं नका. ह्या साकार, सगुण आणि सकरुण परमेश्वराच्या साक्षात् दर्शनानें झालेल्या आनंदाला सोडूं नका, याच आनंदामध्यें चिरकाल मग्न असा.' पंत आपल्यासारख्या प्राकृत जनाला सांगतातः—'हे जनहो! दुराग्रहानें (हट्टास पेटून) या माझ्या म्हणण्याला खोडूं नका (हरताळ लावूं नका). ईशदर्शनानें होणारा आनंद असामान्य आहे असें जें मी म्हणतों त्याच्यावर विश्वास ठेवा. हें म्हणणें खोटें आहे असें आपण म्हणूं लागाल तर हा आपला निवळ दुराग्रह आहे, असें मी म्हणेन.' पंतांस योगाभ्यासी कर्मठांची केवढी भीति होती हें या पद्यावरून दिसतें. शुद्धप्रेमानें परमेश्वरास भक्तिपूर्वक आठवूं पाहणाऱ्यांच्या वाटेंत बुद्धीच्या जोरावर तर्कजाल पसरणारे व नित्यनैमित्तिकाच्या जोरावर कर्मठपणाचें स्तोम माजविणारे लोक दत्त म्हणून उभे राहून भक्तीचा नूतन पालवूं लागणारा बालतरु उपटून कसे टाकितात ह्याचीं उदाहरणें बहुश्रुत वाचकांस देण्याची जरूरी नाहीं.

१. सर्व अंगांसहित, यथासांग विधीनें. २. कीर्तिरूपी अमृतानें सर्व जग आपलेंसें केलें. ३. जगत्. ४. राम राजा होऊनि काळा (सर्वभक्षक मृत्यूस) वदे (सांगता झाला) कीं, हे खरा काळा! जनांस असें म्हण:—'तुम्ही न मरा, (मरूं नका). जा (रामराज्यांत खुशाल रहा).' ५. आपलीं मुलें आहेत असें समजून प्रजेचें रंजन करिता झाला. प्रजा भावुनि (आपलींच मुलें आहेत, असें समजून) त्यांच्या रंजनातें करी (त्यांस सुख देई). 'प्रजाः प्रजाः स्वा इव रंजयित्वा' याचें इंगित तरी पंत म्हणतात तेंच आहे. आणि प्रजेला निरंजन, निर्विकार जो रामचंद्र तो भावासारखा, भाऊच वाटला, बंधुसारखा प्रियकर वाटला. राजा आणि प्रजा यांच्यामध्यें प्रेमभाव असला म्हणजे तें राज्य स्वर्गापेक्षांही जास्त सुख देतें. ६. आपलेसे झालेले जे वानर त्यांस. ७. नाक (स्वर्गस्थ देव). राहणाऱ्यांच्या ऐवजीं राहण्याच्या ठिकाणाचा उल्लेख केला आहे. यास लक्षणा म्हणतात. 'पुण्याचे लोक पळाले' म्हणण्याचे ऐवजीं 'पुणें पळालें' असा प्रयोग आपण करितों. स्वर्गस्थ देव यशा सोडूनि सुधा पीनात. म्हणजे रामाची कीर्ति इतकी मधुर होती कीं तिला एकीकडे करून अमृतसेवन करणें हें देवांस आवडेनासें झालें. खरेंच आहे. सुधा अजरामरत्व देईल. पण रामयशाचें गायन पापवासना नाहींशी करून परमेश्वरदर्शन घडवितें. तेव्हां सुधारसापेक्षां रामयश जास्त गोड यांत शंकाच नाहीं. नाक (स्वर्ग, लक्षणेनें स्वर्गातील लोक) यश सोडूनि (रामकीर्तीचा त्याग करून) सुधा (अमृत) पीना (पीईनासे झाले). म्हणजे रामयशापुढें अमृताची किंमत अगदींच नाहींशी झाली.

मरुत्सुता राघव दे वरा ज्या ये ऐकतां लाघव देवराजा. ॥ १२१
चौघांस झाले सुत आठ, वाहे त्यां राम सुश्रीस्तुत, आठवा हें ।
दे सर्व सेवीपर मागती तें, राम प्रजा ने परमा गतीतें. ॥ १२२
'सङ्क्षिप्तरामायण' हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणीं प्रेमें वाहिलें कृतवंदनें. ॥ १२३

---

## ४७. गदघ्नरामायण.

( रथोद्धतावृत्त. )

दिग्रथ क्षितिपनाथ तो येजी, श्रीश तत्तनय राम होय जी ! ।
मौलिरत्न करि भानुवंश ज्या, बोलती भरत हें तेदंशजा; ॥ १
लक्ष्मणाभिध अरिघ्न सन्मती, दोन हे भगवदंश जन्मती, ।
या महीं बहु मुदश्रु वर्षले, सर्व देव मुनि, भक्त हर्षले. ॥ २
कौशिक क्रतुविघातशांतिला, ने; नवीनघनसांद्रकांतिला ।

---

खरेंच आहे. अमृतानें अमरपणा येतो, पण रामकीर्तीनें मनाला जो निस्सीम आनंद होतो, तो उत्पन्न करण्याचें सामर्थ्य अमृताला नाहीं. याचें एकच उदाहरण कवि सांगतात:— 'रामांनीं मारुतीस जो वर दिला त्या योगानें इंद्रालाही आपल्यास लघुत्व आलें, असें वाटूं लागलें.' 'मारुते! तुला माझें स्मरण नित्य राहील आणि जोंपर्यंत रामकथा पृथ्वीवर चालू राहील तोंपर्यंत तूं जीवंत राहून रामसंकीर्तनामृताचें आनंददायी सेवन तुला होत जाईल.' काय खऱ्या भक्तिरसाचा महिमा हा ! याच्या पुढें स्वर्ग ठेंगणा झाल्यास त्यांत आश्चर्य तें कोणतें? ८. स्वर्ग.

१. इंद्राला. २. ध्यानांत ठेवा. ३. भक्त. ४. उत्तम. ५. रामसुत. ६. केलें आहे वंदन ज्यानें असा मयूर. (मोरोपंत कवी). ७. रथोद्धता वृत्तांत र, न, र गण असून एक लघु व शेवटचें गुरु अशीं दोन अक्षरें असतात. यांत ११ अक्षरें व १४ मात्रा असतात. ८. राजांचा राजा, सार्वभौम राजा. ९. यज्ञ करी. १०. शिरोरत्न. ११. ज्या रामाला भानुवंश (सूर्यवंश शिरोरत्न करी, जो सूर्यकुलाचा मुकुटमणी होय. १२. भगवदंशापासून झालेला, त्याला भरत म्हणत. १३. शत्रुघ्न. १४. भगवत्+अंश. १५. आनंदाश्रु. १६. यज्ञविघ्नाच्या नाशाला, यज्ञविघ्ननिवारणाला. १७. नवमेघ सजल असला म्हणजे त्याचा वर्ण असतो तशी आहे कांति ज्याची, नवमेघश्याम. या नवीन घनसांद्रकांतीला (नवमेघश्यामसुंदर रामाला) तपोनिधी (तपोधन विश्वामित्र) शतालधन (शंभर अर्बें हेंच धन) देता झाला. प्रभु (रामचंद्र) मंत्रा (मंत्राला) जपोनि (गुरुदत्त मंत्राचा जप करून) धी (विश्वामित्राच्या बुद्धीला) हर्षवी (आनंद देता झाला). वाल्मीकी रामायणावर रामकृत 'तिलक'व्याख्या आहे त्यांत

दे शतास्त्र धन; [1]या तपोनिधी, हर्षवि प्रभुवचा जपोनि धी. ॥ ३
[2]गौतमर्षिदयितेसि [3]पद्रजा, देव दे, म्हणति साधु [4]भद्र [5]ज्या, ।
तत्क्षणीं [6]करुण उद्धरी तितें, गाति या सुकवि [7]शुद्धरीतितें. ॥ ४
ज्या [8]जगें [9]स्वकरयुग्म जोडिलें, रुद्रकार्मुक सलील [10]मोडिलें. ।
भूमिजा प्रभुगुणासि लोभली, [11]स्वप्रिया वरुनि फार शोभली. ॥ ५
कौशिकें जनकभूप बोधिला, [12]याज्ञवल्क्य मुनिनेंहि शोधिला; ।
दे तिघांस निज कन्यका, मना, ज्याचिया न तिल अन्य कामना. ॥ ६
[13]क्षत्रकाळ धरि मार्ग वाघसा, देखतां कुपित भार्गवा [14]घसा ।

---

पुढील वाक्य २७ व्या सर्गाच्या शेवटीं आढळतें:–'यद्यपि भगवतो रामस्य सर्वं विदितमेव, तथापि विद्या गुरूपदेशगृहीतैव फलदा नान्यथेति लोकान् बोधयितुं विश्वामित्रोपदेशग्रहणमिति बोध्यम्.' विश्वामित्रास आनंद झाला तो कां हें स्पष्टच आहे.

१. रामास. २. अहल्येस. ३. पत्+रज=पायधूलीला. ४. मंगलप्रद. ५. ज्या पदरेणूला. ६. दीनवत्सल. ७. या शुद्धरीतितें सुकवि गाति. चांगले कवी या शुद्धरीतीचें स्तवन करितात. रामचंद्रानें आपलें दीनवात्सल्य प्रकट करून गौतमजायेला तत्क्षणीं मुक्त केलें ही शुद्धरीति होय. विश्वामित्रानें 'ही साध्वी स्त्री उग्रशापाचें भयंकर दुःख फार दिवस अनुभवित आहे' असें सांगितल्याबरोबर परदुःखानें दुःखित होणारा रामचंद्र एकदम आपलें कर्तव्य करण्यास प्रवृत्त झाला ही शुद्धरीति. लाभप्राप्तीसाठीं आपण सामान्य जन परोपकार करितों. पण यत्किंचितही लाभ नसतां परदुःखदुःखित होऊन ताबडतोब दुःखविमोचन करावयास प्रवृत्त होणें हेंच शुद्ध औदार्य होय. ८. विश्वानें. ९. हस्तद्वय. १०. रामानें शिवधनुष्य भंगिलें. ११. रामास वरून. १२. याज्ञवल्क्य हा उत्तम आचारसंपन्न असा एक ब्रह्मनिष्ठ ऋषि होता. वाजसनीशाखेचा हा संपादक होय. दैवरात जनक हा याच याज्ञवल्क्याचा शिष्य होय. गुरूनें बोध केल्यामुळें जनकाचें अंतःकरण निर्मळ झालें होतें. विवाहसमारंभ करण्याच्या आधीं काहीं श्राद्धें व गोदानें करावीं असें सांगितलें आहे त्यांत 'गोदानं चौलवत्कार्यं षोडशेऽब्दे तदुच्यते....' इत्यादि समावर्तन पूर्वांग सांगून 'वेदव्रतानि वापारं नीत्वा ह्युभयमेव वा । गुरवे तु वरं दत्वा स्नायीत तदनुज्ञया ॥' असा उत्तरांगविधि याज्ञवल्क्यानें सांगितला आहे; तो लक्ष्यांत ठेऊन 'याज्ञवल्क्य मुनीनेंहि शोधिला' असें लिहिलें असेल. पहिला अर्थ विशेष चांगला, कारण जनक राजा निर्मळ अंतःकरणाचा झाला होता; याचेंच समर्थन 'ज्याचिया मना न तिळ अन्य कामना' (आपल्याजवळ आहे तें ईश्वरसमर्पण करावयाचें याशिवाय अन्य इच्छाच जनकाला नव्हती) असें पंतांनीं केलें आहे. रामचंद्रास सीता अर्पण प्रतिज्ञेप्रमाणेंच केली होती. लक्ष्मणादि तिघांस ऊर्मिलादि तिघी मुली दिल्या. १३. परशुराम. १४. कंठ.

दाटला दशरथ क्षमापन, प्राज्ञही करुं शके क्षमाप न. ॥ ७
जाणवि स्मय लहान टाकवी, गाति या बहु महानटा कवी; ।
कीर्ति शीतकरकांत बाण वी, स्वामिचा मुनिस शांति बाणवी. ॥ ८
तो यशें करुनि निस्व कापुरा, पुत्रयुक्त नृप ये स्वका पुरा ।
हृष्ट पौरहि सुवर्ण वेंचिती, उत्सवस्थिति न वर्णवेचि ती. ॥ ९
साधु मातुलपुरा युधाजितस्नेहसिंधु भरता युधाजित ।

---

१. क्षत्रकाळ (क्षत्रियांचा काळ, मृत्यु जो भार्गवराम) तो वाघसा (वाघाप्रमाणें) मार्ग धरी (मार्ग आडविता झाला). हें पाहून व भार्गवाला कुपित (रागावलेला पाहून) दशरथाचा घसा दाटला, त्याला बोलतां येईना. क्षमाप (पृथ्वीचें पालन करणारा) दशरथ प्राज्ञही (शहाणा असतांही, काश्यपाच्या आज्ञेनें परशुरामानें क्षत्रियसत्राचें उद्वर्जन करून शांतीचा मार्ग अवलंबिला होता हें माहित असतांही) क्षमापन (परशुरामाकरवीं रामाला क्षमेस पात्र करून देण्याचें काम) करूं न शके. दशरथास सद्गद कंठानें बोलतां येत नव्हतें तरी बरेंच बोलला; पण त्या क्षत्रियांतकाचें मन वळलें नाहीं व त्यानें रामावर दया केली नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्याला वैष्णवचाप सज्ज करावयास सांगून द्वंद्वयुद्धाचें पाचारण केलें, तेव्हां लहान (धाकटा राघवकुलोत्पन्न रामचंद्र) परशुरामास आपलें सामर्थ्य जाणवि (आपलें सामर्थ्य त्यास दाखविता झाला), व त्याकडून स्मय (गर्व, उद्धटपणा) टाकवी, (म्हणजे परशुरामाचा गर्वपरिहार रामानें केला). तेव्हां अर्थातच त्या महानटा (लीलावेषधारी परमेश्वराला) कवी (सुज्ञ, शहाणे लोक) गाती. स्वामिचा (रामचंद्र प्रभु त्याचा) शीतकरकांत (चंद्रकांत) बाण (चंद्रकांतमण्याप्रमाणें सुख देणारा बाण) कीर्ति (यश) वी (विता झाला). रामचंद्रानें जो अमोघ बाण टाकिला त्या योगानें दुःख उत्पन्न न होतां कीर्ति (शुभयश) उत्पन्न झालें; आणि त्या योगानें मुनिस शांति बाणवि (परशुरामऋषीच्या मनांत अखंड वाहणाऱ्या शांतिरसानें आपलें कायमचें बिऱ्हाड ठेविलें. तात्पर्य, परशुरामानें क्षात्रकर्माचा परित्याग करून द्विजास योग्य असा शांति देणारा आत्मानात्मविचार, त्याचा दृढपणानें अंगीकार केला). अपकार करणाऱ्या शत्रूचा पराभव करून त्यास पादाक्रांत करणारे व त्यास नामशेष करणारे अनेक वीर निपजतात; पण आपल्या प्रभावानें शत्रूच्या मनांतील दुष्ट विकारांचें निर्मूलन करून त्यांस परमार्थाची गोडी लावून देणारा रामचंद्रासारखा पुण्यश्लोक धर्मवीर एखादाच निर्माण होतो. त्याचें चरित्र कवी गातात यांत काय आश्चर्य आहे? असो येथें ८ व्या श्लोकाच्या तृतीय पंक्तींत **पंतानीं विषम** अलंकार योजून रामचंद्राच्या उदात्तचरिताचें स्वरूप उज्वलित केलें आहे. २. कापुरा (कापुराला) निस्व (गरीब, भिकारी) करूनि. स्वयशाच्या धवलत्वानें कापुराचा पांढरेपणा फिका पाडून. येथें **व्यतिरेक** अलंकार आहे. ३. स्वकीया. ४. पौरजनांनीं सुवर्णपुष्पें उधळलीं. ५. युधाजित (भरताचा मामा) साधु, युधाजितस्नेहसिंधु (सत्वस्थ आणि युद्धामध्यें जिंकलेले जे शत्रु त्यांस स्नेहाचा सागर होणाऱ्या शत्रूस अतिप्रेमानें

ने गृहा करुनि यत्न सानुजा, मानवे ससुर रत्नसानु ज्या. ॥ १०
नंदनासि[1] युवराजभाव[2] दे, तों हठा धरुनि वल्लभा[3] वदे, ।
'मुख्यलोकहित[4] सत्य रक्ष यां[5], कीर्ति यास्तवचि होय अक्षया. ॥ ११
'दोन देइन वर' स्वयें[6] कृपा दाखवूनि वदलासि, हें नृपा! ।
यौवराज्य भरता बरें असो, रामही मनुसमा[7] वनीं वसो; ॥ १२
वल्कली[8], जटिल, वन्यसेवनीं, होउ सादर मुनी जसे वनीं.' ।
स्त्री[9] धरी कुगतिचीच[10] वाट, ती मृत्यु होय नृपतीस वाटती[11]. ॥ १३
यावया करिहि तो दया स्तव[12], ज्ञानवान् तरि हितोदयास्तव[13], ।

---

वागविणाऱ्या) सानुजा (शत्रुघ्न जो भाऊ त्यासह) भरतास मातुलपुरा गृहा (आजोळीं) यत्न करुनि (आग्रह करून, राजा दशरथ भरताला तिकडे पाठविण्यास खुष नव्हता म्हणून आग्रह करून) ने (नेता झाला). ज्या (ज्या भरताला) ससुर (देवांसहित) रत्नसानु (रत्नें आहेत ज्याच्या उन्नतपृष्ठावर असा मेरुपर्वत) मानवे (मान तुकवित असे, सन्मान देत असे). भरताचें तेज इतकें देदीप्यमान होतें कीं, देवादिकांचें वासस्थान जो मेरू हा तेजस्वी पर्वत सुद्धां भरततेजापुढें फिक्का पडला आणि म्हणून त्यास मान देऊं लागला. सप्तमंत्ररामायणांत (पृष्ठ ३५ भाग ४) पंत म्हणतात:—'म्हणे त्यां लोक 'रवीसीं तेजें चंद्रसभा तुळे' । मनोज्ञरूपा भरता शत्रुघ्ना देखते जन । वदले 'गोमटें याचें ऐसें तें लेख (देव) तेज न. ॥'

१. रामचंद्रास. २. यौवराज्य. ३. कैकेयी. ४. मुख्य लोकांचें (पितृलोकांचें) हित होतें ज्यापासून असें सत्य तें रक्षण कर. ५. या वेळीं. 'सत्यच्युत जो नर काजा तो । मुख्या चुकला नरका जातो ॥.' कल्याणरामायण—पृष्ठ १२० पहा. ६. तूं स्वतःच. ७. चवदा वर्षें. ८. वल्कली (वल्कलें नेसणारा), जटिल (जटा धारण करणारा), असा वन्यसेवनीं (वनामध्यें उत्पन्न होणाऱ्या फलमूलादि पदार्थांचें सेवन करण्यामध्यें) सादर होउ (रामचंद्रास सादर होऊं दे). जसे मुनी वल्कलें नेसून जटाधारीपणानें रानटी फलमूलांवर आपला उदरनिर्वाह करितात तसें रामाला करूं द्या. सारांश, त्यास वनवासांत जाऊं द्या. झाडांच्या सालींचीं वस्रें, जटा व फलमूलें हे आदिकालीन मनुष्याचे उपभोग्य पदार्थ होत. वनवास, ग्रामवास आणि नगरवास हे मनुष्याच्या विविध स्थिति दर्शविणारे आश्रम आहेत. कोणत्या आश्रमांत सुखातिशय आहे हें सांगणें कठीणच होय. तथापि मनुष्य आपली परिस्थिति आपल्या उद्योगानें बदलतो व परिस्थितीच्या योगानें आपण स्वतः बदलतो येवढें बरीक खरें. ९. कैकेयी. १०. दुष्ट मार्गाची. ११. राजास ती प्रत्यक्ष मृत्यूप्रमाणेंच वाटली. वाटती होय= वाटती झाली. १२. स्तुति. १३. तो (दशरथ राजा) ज्ञानवान् (मोठा शहाणा होता) तरी हितोदयास्तव (कल्याण व्हावें, मंगलाचा उदय व्हावा यास्तव) तिला दया यावया (तिच्या मनांत दयेचा पाझर फुटेल या इच्छेनें) तिची स्तुति करी. 'अनृतं साहसं माया मूर्खत्वं अतिलोभता । अशौचं निर्दयत्वं च स्त्रीणां दोषाः स्वभावजाः ॥' हें जरी दशरथास अवगत होतें

बोलिली न अनघा ‘बरें’ न ती, घे न सांत्वि मन, घाबरे न ती. ॥ १४
ऐकतांचि अभिषेक सोडुनि, श्रीश हस्त जननीस[1] जोडुनी ।
भ्रातृदारयुत[2] जाय हा वना, पावना[3] पितृवरव्रतावना[4]. ॥ १५
दुःख तें जनमनीं न[5]माय हो, बोलिले, ‘असि परा न माय हो[6]!’ ।
बोलती धृतिसहाय[7] ‘हा!’ यती, कां पुरी न म्हणुं ‘हाय! हाय!’ ती[8]? ॥ १६
पत्ति[9] होय, अटवीपथा[10] वरी, त्या सुमंत्र बसवी रथावरी; ।
जाय भेटुनि निषादपा[11] वना, त्या शिवेचि न विषाद पावना[12]. ॥ १७
जी करी शुचि सुरापगा[13] तितें जाय, जें हित सुराप[14] गाति तें; ।
तोय सेवुनि[15] रची जटा विती, त्या सुशांतिस मवा दटावि ती. ॥ १८

---

तरी स्वकल्याणासाठीं कैकेयीची त्यानें स्तुति केली. आदिकवी वाल्मीकिऋषि हे स्त्रियांविषयीं हल्लींच्या आपणां इतके अनुदार नाहींत. ‘धिगस्तु योषितो नाम शठाः स्वार्थपरायणाः । न ब्रवीमि स्त्रियः सर्वा भरतस्येव मातरम् ॥’ असें वाक्य त्यांनीं योजिलें आहे. स्त्रियांवर भडिमार करितांना सीता, सावित्री, दमयंती, द्रौपदी, रुक्मिणी, अनसूया, अरुंधती, गार्गी, मैत्रेयी इत्यादि स्त्रिया आपल्या येथेंच उत्पन्न झाल्या होत्या हें विसरूं नये. ती न अनघा (निष्पाप नव्हे अशी, दुष्ट) ‘बरें’ असें न बोलली (बोलली नाहीं. दशरथानें इतकीं आर्जवें केलीं तरी त्या लोभाविष्ट स्त्रीच्या तोंडांतून ‘बरें; मी आपला हट्ट सोडून देतें’ असे शब्द आले नाहींत; इतकेंच नव्हे तर तिचें मन सांत्वि (शांतवृत्ति) न घे (तिचें शांतवन, समाधान झालें नाहीं), व ‘राम वनवासास गेला असतां मी जीवंत राहणार नाहीं,’ असें निक्षून सांगितलें तरी ती घाबरली नाहीं. अतिलोभ व साहस यांचा हा परिणाम!

१. कौसल्येस. २. लक्ष्मण व सीतेसह. ३. पवित्र. ४. पित्याचें श्रेष्ठ व्रत जें सत्यव्रत त्याच्या रक्षणासाठीं. ५. मावलें नाहीं. ६. असली दुसरी एखादी आई आपण कोठें पाहिली नाहीं. ७. धृति (धैर्य) आहे साहाय्यास ज्यांच्या असे यती सुद्धां ‘हा!’ बोलती (दुःख करूं लागले). ८. पुरी. ९. पायानें चालणारा. १०. अरण्यमार्गाला. ११. निषादराजा गुह. १२. पवित्र अशा रामाला. १३. देवनदी भागीरथी. १४. देव. १५. तोय सेवुनि (भागीरथीच्या पुण्योदकानें आपल्यास पूत करून) विती जटा रची (वटवृक्षाच्या चिकानें आपल्या केशांच्या जटा वीत वीत भर लांब केल्या). ती (जटा) त्या सुशांतिस (सुमंत्र सचिवाला व मवा, मवाशी निषाद लोकांचा मुख्य जो गुह त्याला दटावी (भीति उत्पन्न करिती झाली). ‘मवा’ आहे तेथें ‘मवासास’ असें पाहिजे होतें, परंतु वृत्तसुखासाठीं पंतांस ‘मवा’ असाच प्रयोग करावा लागला असें दिसतें. आर्यारामायणांत ‘गुहसचिवांच्या हृदयीं होय मुनिश्री कटारचि’ असा उल्लेख आहे. क्षात्रकुलोत्पन्न श्रीराम दशरथाचा ज्येष्ठ मुलगा यानें राजकीय वेष सोडून देऊन वैखानस (तापस) वृत्तीचा अंगीकार केला हें पाहून रामावर प्रेम करणाऱ्या पुरुषांना दुःख व्हावें हें साहजिकच होय.

जो प्रधान बसवी रथावरी, तन्मनासि रघुवीर [1]थांवरी, ।
[2]पाठवी जनकसेवना; वदे त्या गुहासि मग [3]देव, '[4]नाव दे.' ॥ १९
'स्वर्णदी [5]उतरित्या! गुहा! [6]सहा ताप' यापरि वदे सुहास [7]हां. ।
भेटवी प्रभुवरा तया भरद्वाजिनाममुनितें दयाभर. ॥ २०
[8]चित्रकूटरचितोटजीं हरी तापसव्रत निवास तो करी, ।
वर्तमान गुह सर्व आणवी; तें सुमंत्र नृपतीस जाणवी. ॥ २१
तापला [9]बहु देवांत तापतो नाग तेंवि, [10]महिषीस शाप तो ।
ऐकवी, स्मरुनियां [11]परा सुता, पावला नरपती [12]परासुता. ॥ २२
श्रीवसिष्ठ भरतासि आणवी, [13]त्यांसि [14]माय कृतकार्य जाणवी, ।
फार तीजवरि [15]धीर कोपला, जी करी मृदुल [16]हीरकोपला. ॥ २३
तो म्हणे स्वजननीस, 'हा [17]जडे!' आठवूनि [18]सुतवत्सला रडे; ।
पिंड दे, मग [19]निजाग्रजाकडे जाय, [20]दंडसम त्यापुढें पडे. ॥ २४
शुद्ध बुद्ध गतशोक आयतें [21]ब्रह्म केवळ, तथापि 'हाय!' तें ।

---

१. स्थिर करी, शांत करी. २. सुमंत्रास वडिलांची सेवा करण्यास पाठविलें. ३. रामचंद्र. ४. नौका. ५. उतरणाऱ्या. ६. सोस. ७. हा सुहास (चांगलें आहे हास्य ज्याचें असा श्रीराम) बोलला. ८. चित्रकूट+रचित+उटज=चित्रकूट पर्वताच्या ठायीं रचिलेल्या पर्णशालेंत तापसव्रत तो. हरी (मुनिवेषधारी राम) निवास करी. ९. बहु (रखरखीत) दवांत (अग्नींत) नाग (सर्प) तडफड करितो त्याप्रमाणें. १०. कैकेयीस. ११. उत्तम, श्रेष्ठ. १२. मरण. १३. भरतासि. १४. कैकेयी. १५. भरत धैर्यवान् होता तरी रागावला. १६. हीरक+उपल=हीरकपाषाणाला ही मऊ करणारी (कठिणपणांत मागें सारणारी) जी कठोर कैकेयी तिजवर भरत रागावला. येथें **विरोध** व **प्रतीप** अलंकार आहेत. १७. मूर्खे! जड पदार्थावर आसक्ति ठेवणारे! १८. सुतवत्सल (पुत्रवत्सल) जो दशरथ त्यास. १९. थोरल्या भावाकडे (रामाकडे). २०. दंडासारखा, एकदम. २१. ब्रह्म हें (शुद्ध, बुद्ध, नित्य आणि मुक्त) म्हणजे निर्विकार, सर्वज्ञ, सर्वकालस्थित आणि उपाधिरहित असें आहे. हाच आशय कवीनें 'शुद्ध, बुद्ध, गतशोक (मुक्त) आणि आयतें (नित्य, सहजस्थितीनें असणारें) या शब्दांनीं व्यक्त केला आहे. तें ब्रह्म सुद्धां (रामचंद्र) केवळ (उपाधिरहित) असतांही 'हाय!' बोलिलें. (पितृनिधन ऐकून शोकपूर्ण झालें.) रामचंद्रानें पित्यास तर्पणोदक देऊन शोक केला. प्रत्यक्ष सर्वज्ञ आणि उपाधिरहित अशा ब्रह्माच्या डोळ्यांतून अश्रु काढणारा पितृशोक किती प्रबल असला पाहिजे? पंत म्हणतातः—'हे सुज्ञ जनहो! प्रभूच्या या तर्पणादि मानवलीलारूपी अमृताचें प्राशन करून निवा म्हणजे शांत व्हा. जर तुम्हांला भवसागरांतून उत्तीर्ण होऊन शांति मिळवावयाची आहे तर रामचंद्रानें स्वकर्तव्य करण्याविषयींचा जो धडा घालून दिला आहे तो काळजीपूर्वक वळवा, स्वकर्तव्यास जागृत रहा, म्हणजे तुम्हांला शांति मिळेल.'

बोलिलें करुनियां निवाप[1], या प्राशुनि ज्ञजन[2] हो! निवा पया. ॥ २५
त्या म्हणे भरत, 'पात्रपावना! या[3] वना न भज विश्व[4]भावना! ।
पीडितो विरह बा! पुरा सदा, रसदा[5]! परचमूदुरासदा[6]!' ॥ २६
त्या[7] म्हणे प्रभु असें, 'नर क्षण त्यागु धर्मगतिचें न रक्षण; ।
न स्मरोनि निजजन्मलालन त्यागिजे जनकवाक्यपालन. ॥ २७
बा! चतुर्दश[8]समा वनांत मी लोटितों[9], न[10] बुडवीं मना तमीं.' ।
'दे' म्हणे भरत[11] 'पादुका, नया जाणती, धरुत बा! दुकान या. ॥ २८
अन्यथा[12] करिल कायहोम[13] हीं[14], या पदांपरिस काय हो! महा[15]? ।
भक्तवत्सल म्हणे, 'अवश्य[16] हो.' कीं न तो सुसुकृता अवश्य[17] हो! ॥ २९
घे शिरींच भरत प्रभावहा[18] पादुका, मग महाप्रभाव[19] हा ।
वास बाहिरचि[20] तापसाहुनी चालवी नियम ताप[21] साहुनी. ॥ ३०
चालतां म्हणवि पत्रिपा[22] दहा वेळ 'हाय!' धरि अत्रिपाद हीं[23], ।

---

१. पितृतर्पण. २. ज्ञाते जनहो! ३. या वनांत राहूं नको. ४. विश्वरक्षका, विश्ववर्धका. ५. आनंद देणाऱ्या. ६. कठीण, दुःसाध्य. ७. त्या (भरता) प्रभु (राम) असें (पुढें सांगितल्याप्रमाणें) म्हणेः—धर्मगतिचें रक्षण (धर्मपालन) नर (मनुष्य) क्षण (क्षणभर सुद्धां) न त्यागु (न टाको). निजजन्मलालन (आम्हांस जन्म देऊन आमचें लालनपालन केलें) तें स्मरून जनक (पित्याचें) वाक्यपालन (आज्ञापालन) न त्यागिजे (टाकूं नये). अर्थ स्पष्ट आहे. धर्माविषयीं व पित्याची आज्ञा शब्दशः खरी करून दाखविण्याविषयीं रामचंद्राचा कोण निग्रह हा! ८. चौदा वर्षे. ९. कंठितों. १०. मनाला अज्ञानरूपी अंधःकारांत बुडवूं नको. ११. भरत म्हणे, 'पादुका दे, बा! या नया जाणती, व या दुकान धरुत.' भरतानें रामचंद्र अयोध्येस परत जाण्यास तयार नाहीं व वडिलांची आज्ञा शिरसा वंद्य करून अक्षरशः खरी करणार, असें जेव्हां पाहिलें, तेव्हां तो म्हणाला, 'अहो रामचंद्र! आपण आपल्या पादुका द्या; त्या सिंहासनावर ठेवून मी आपल्या नांवानें राज्यकारभार चालवीन. या पादुकांस न्याय अन्याय कसा असतो हें माहित आहे. या पादुकाच दुकान धरुत म्हणजे राज्यकारभाराचें अवघड काम यांच्याकडूनच सिद्धीस जावो.' याचप्रमाणें पंत पंचशतीरामायण—पृष्ठ ४१ साकी ७० यामध्यें भरताकडून वदवितात. 'श्रीचरणानुगृहीता द्याव्या, बा! पादुका, न यातें । धर्मातें पाहुत, रक्षुत जें बापा! दुकान यातें ॥' अनुष्टुप्‌रामायणांतही सामान्यतः अशाच अर्थाचा श्लोक पृष्ठ ६ मध्यें वाचकांस सांपडेल. १२. न आला तर. १३. देहाचा होम, अग्निप्रवेश. १४. मी भरत. १५. मोठें. १६. अगत्यपूर्वक. १७. वश नव्हे असा न, म्हणजे वश झाला. राम पुण्यकर्त्यांना वश झाला. १८. तेज धरणाऱ्या अशा. १९. महाप्रतापी भरत. २०. नंदिग्रामीं. २१. उष्ण सहन करून. २२. गरुडाला अनेक वेळ 'हाय!' म्हणाण्यास लाविलें. गरुड विष्णूचें वाहन व राम तर पायांनीं चालला होता, म्हणून गरुडास वाईट वाटलें. २३. राम.

श्री[1]मनासि मुनिची [2]महासती दे समर्चुनि वनीं [3]महास ती. ॥ ३१
राघवें मग विराध तारिला, [4]तन्महोग्रतर शाप वारिला. ।
नाशिला सुचिर [5]ताप सांचला, देवता म्हणति तापसां, 'चला, ॥ ३२
हृष्ट संप्रति न जीव कां? चला.' 'कां' विमान म्हणतात 'कांचला?' ।
सर्व निर्भय मुनींद्र बोलती; [6]रामदर्शनसुतृप्त डोलती. ॥ ३३
जो स्वतातसख त्या [7]जटायुतें तो नमी प्रभु शिरें [8]जटायुतें. ।
पीति याचि कवि साधुरीतितें जी [9]सुधा न असि माधुरी तितें. ॥ ३४
जी सुरांसि कथि [10]धौतें मी नद्या, स्वर्ग यांसि जिणि गौतमी नद्या, ।
तत्तटीं प्रभु रची [11]दलालया, नाक जो [12]कवि म्हणे [13]पलाल या. ॥ ३५
जो अलभ्य इतरां [14]परस्वसा; त्या म्हणे वरिन मी [15]परस्वसा, ।
घेववी अजित [16]कान नाक हा, तैं म्हणेल अजि कां न [17]नाक 'हा!'? ॥ ३६

---

१. सीतेच्या मनास. २. महापतिव्रता अनसूया हिनें पूजा करून. ३. आनंदास. ४. तत्+महा+उग्र+तर=त्याचा (विराधाचा) मोठा उग्र असा शाप. ५. सुचिर (फार दिवस) सांचला (सांचलेला) ताप (तपस्वीजनांस ताप देणारा जो विराधराक्षस त्यास) नाशिला (नाहींसा केला). 'ताप देणारा' या अर्थी लक्षणेनें 'ताप' ह्या शब्दाचा प्रयोग केला आहे. देवता तापसां (ऋषींना) म्हणती, 'चला. संप्रति जीव हृष्ट न कां? चला. हे ऋषींनो! विराधादि राक्षसांचा संहार रामानें केला; आतां तपश्चर्या करण्यासाठीं खुशाल चला. तुम्हांस आनंद झाला नाहीं काय? चला.' विमान (विमानें) म्हणतात, 'अरे! कांचला (भ्यालां कां)? आतां निर्वेधपणानें तपश्चर्या करा म्हणजे तुम्हांस विमानांतून स्वर्लोकीं जातां येईल.' ६. रामदर्शनानें ज्यांच्या इच्छा तृप्त झाल्या आहेत असे. ७. जटायु पक्ष्यास. ८. जटा-युतें हें 'शिरें' या शब्दाचें विशेषण. जटायुक्त आपलें शिर त्यानें शिरसाष्टांग नमस्कार घातला. ९. याचि साधुरीतितें (रामाच्या या सन्मान्य अशा वर्तनरूपी अमृताला) कवि (शहाणे लोक) पीति; कारण जी सुधा तितें (प्रत्यक्ष जें अमृत त्याला) अशी गोडी नाहीं. सुज्ञ लोक रामचरित्रामृताचें आसोशीनें प्राशन करितात त्याचें कारण देवांच्या अमृतामध्यें इतकी गोडी नाहीं. जटायु हा पक्षी, परंतु दशरथाचा स्नेही म्हणून आपल्यास वडिलासमान आहे, असें समजून पराक्रमी रामानें त्याला शिरसाष्टांग नमस्कार केला. हें रामाचें सौजन्य पाहून अर्थातच साधुलोकांस परमावधीचा आनंद झाला. ह्या आनंदापुढें अमृतपानाचें सुख यः-कश्चित् आहे हें सांगावयास पाहिजे काय? **प्रतीप** अलंकार आहे. १०. शुद्ध. ही पंक्ति चांगलीशी बसत नाहीं. कोणी रसिकवाचक इचा सुसंगत अर्थ लावील काय? ११. दल+आलय=पर्णशालेला. १२. शहाणे लोक रामाच्या पर्णकुटिकेला स्वर्ग म्हणून स्वर्गास पलाल म्हणूं लागले. १३. कडवा, चाटुक. १४. परद्रव्यसा. १५. शत्रुभगिनी शूर्पणखा. १६. अजित (रामचंद्र) शूर्पणखेचे कान नाक घेववी (लक्ष्मणास कापावयास सांगे). १७. स्वर्ग आनंदानें 'हा!' म्हणाले, कारण रावणवधाची वेळ जवळ येत होती.

ये सराक्षससमूह [1]आहवा, 'जा' म्हणे अरिसि '[2]अंतपा हवा.' ।
[3]त्या वधूनि रुधिरांत वाहवी; शत्रु एकहि न राम राहवी. ॥ ३७
दाखवी कथुनि ती [4]नरा [5]वणा, साहवे तसि दशा न रावणा, ।
आयके युवतिरत्नसानुजा (?) त्यासहि प्रणत [6]रत्नसानु ज्या. ॥ ३८
दाखवी [7]कनककुरंकु तो अरी; श्री म्हणे, 'मृग धरा, [8]प्रभा बरी.' ।
त्या हरी अनुसरे [9]जसा [10]हरी, [11]अभ्रचंद्रगतिरीति [12]तो धरी. ॥ ३९
शत्रु जाणुनि [13]शरासनी, [14]शरी, [15]श्रीश विद्ध [16]गहनीं तया करी; ।
'हा प्रिये!' खळ म्हणे, [17]गमे खरी राघवोक्ति, भय भूमिजा वरी. ॥ ४०
[18]ईशशक्तिचरितार्थ तीहि भी, [19]यूथपाकुळरवें जसी [20]इभी. ।
[21]देवराशि कथि, 'धांव बा! पहा धर्म, जा, मज शिवो न ताप [22]हो.' ॥ ४१
[23]तो म्हणे, 'सति! न मान सत्य या राक्षसोक्तिस; करील [24]अत्यया ।
कोण [25]शूरमणिच्या नवा? उगी. मद्गिरा सुमति! हे न [26]वांउगी.' ॥ ४२
श्री वदे, 'मदभिलाष नांदतो त्वन्मनांत, परि कांत चांद तो; ।
तूं कुधी, मलिन, काजवा खरा, रे! न होय असिकाज [27]वोखरा. ॥ ४३
खोटजांतुनि निघोनि जाचि' ती त्या म्हणे, बहुत होय [28]जाचिती. ।

---

१. युद्धा. २. यमाला. ३. खरासुराला. ४. रामाला कथुनि, रामवृत्तांत सांगून. ५. जखमा दाखवी. ६. मेरु. ज्या रत्नसानु प्रणत (नम्र असे) त्यासहि (या रावणासही) अम्नानुजा (खालच्या प्रदेशांत, क्षेत्रांत उत्पन्न झालेली) युवतिरत्न आयके (आयकवी). मेरुपर्वतावर रत्नसंचय आहे हें प्रसिद्ध आहे. तो मेरुपर्वत ज्या रावणास नम्र झाला म्हणजे सर्व प्रकारच्या रत्नसंग्रहाचा स्वामी झाला, त्यासही माहित नाहीं अशा निम्नक्षेत्रांत उत्पन्न झालेल्या युवतिरत्नाची कीर्ति शूर्पणखेनें सांगितली. ७. सुवर्णमृग. ८. त्याचें तेज चांगलें आहे. ९. पाठीमागें जाई. १०. सिंह. ११. अभ्रामध्यें भ्रमणारा जो चंद्र त्याची गति (पळणें) त्याची रीति तो कनकमृग दाखवी. पावसाळ्यांत अभ्रांनीं अडविलेला चंद्र कसा पळतो हें लहान मुलांस सुद्धां ठाऊक असतें. १२. मारीचराक्षस. १३. धनुष्ययुक्त. १४. बाणयुक्त. १५. राम. रामाला कळलें कीं आपण पाठलाग करितों हा हरण नसून राक्षस (शत्रु) आहे, तेव्हां. १६. अरण्यांत. १७. सीतेस खरी वाटे. १८. ईश (रामचंद्र) त्याची शक्ति (सामर्थ्य) त्याच्या चरितार्थ (अयाच्या संबंधानें) ती (सीता) भ्याली. १९. गजनायकाच्या व्याकुळ स्वरानें. २०. हत्तीण. २१. दीराला, लक्ष्मणाला. २२. पतिवियोगजन्य ताप. २३. लक्ष्मण. २४. मरणा. २५. वीरश्रेष्ठाच्या हननाला नवा कोण वीर जन्मेल!. २६. माझी वाणी व्यर्थ नव्हे. २७. शेतकीचें एक आयुध. येथें अप्रस्तुतप्रशंसा अलंकार. २८. जाच करणारी.

साश्रु वंदुनि म्हणोनि 'हा!' निघे, ती वदे कटु म्हणोनि हानि[1] वे. ।। ४४
जो दशास्य खळ होय तो यती, दे भला म्हणुनि पीठ तोय ती,[2] ।
तों करी प्रकट हा[3] निजाकृती, मानिती सुकृतहानि ज्या कृती.[4] ।। ४५
जानकीस खळ घे रथावरी आग्रहें, मग नभःपथा[5] वरी, ।
जी दया न करि हा कदापि ती, होय मारुनिहि हाक दापिती. ।। ४६
हाक ऐकुनि जटायु ये, 'रहा, रे!' म्हणे 'करि अधर्म येर हा.[6]' ।
मोडितां [7]स्वरथ खड्ग तो[8] धरी, पक्ष तोडुनि पुन्हा सेती[9] हरी. ।। ४७
आक्रमी गगन, चोर तो पळे, [10]पर्वतस्थकपिपंचका कळे, ।
[11]स्वोत्तरीयपटबद्ध भूषणें, त्यांत ती त्यजि निरस्तदूषणें.[12] ।। ४८
तीस ने खळ पुरींत आपल्या; देवता म्हणति 'हंत[13]!' तापल्या. ।
तो अशोकवनिकेंत [14]रोधवी, राक्षसींस कथि पाप, बोधवी. ।। ४९
काननीं प्रभुसि [15]बंधु भेटला, शोकवन्हि हृदयांत पेटला. ।
जेधवां उटज शून्य देखिलें, विश्वही निपट[16] शून्य लेखिलें. ।। ५०
जो [17]चराचरनिवास 'हा सये!' तो म्हणे, बहु शिवा[18]स हास ये. ।
वर्णिती सुर सदा विलाप हा, कीं म्हणे, '[19]सुरस दाविला पहा.' ।। ५१
शोधितां वन जटायु देखिला, वत्सलें[20] परम घात लेखिला; ।
बोलिला, '[21]क्षतअसावधान 'हा[22]!' योग्य मद्गुरु असा वधा न हा.' ।। ५२
गृध्रपा करुनि राम सावध, 'प्राप्त [23]घातकरतामसा वध ।
हो.' म्हणे, मग पुसे तया परा,[24] रावणा कळवि तो दयापरा.[25] ।। ५३
'रावणें हरिलि जानकी' असें सांगतां खग रडे दयारसें. ।

---

१. त्याला वाईट वाटलें. २. ती सीता त्यास साधु समजून पीठपाणी देती झाली. ३. रावण. ४. कृती (सज्जन लोक) ज्या (या रावणाच्या कपटाला) सुकृतहानि (पुण्यनाश) मानितात. असल्या कृत्यांनीं पुण्यनाश होणार असें त्यांस ठाऊक असतें. ५. आकाशमार्ग. ६. रावण अधर्म करितो आहे. ७. रावणरथ. ८. रावण. ९. सीता. १०. ऋष्यमूकपर्वतावर असलेले सुग्रीवादि पांच वानरांस. ११. शेल्यांत बांधलेले अलंकार. १२. टाकिला दोष ज्यांनीं अशीं. 'भूषणें' या शब्दाचें विशेषण. १३. हाय हाय. १४. कोंडून ठेवी. १५. लक्ष्मण. १६. सर्वप्रकारें. १७. स्थिरचर वस्तुमात्र ज्याचे ठायीं असतात तो परमेश्वर. १८. मग्न रडूं लागले म्हणून शंकर हसले! १९. मधुररस. २०. दयाळु रामानें. २१. जखमेच्या योगानें ज्याचें देहभान नष्ट झालें आहे असा माझा गुरु (वडिलासारखा) जटायु. २२. हाय. २३. घात करणाऱ्या दुष्ट राक्षसाला. २४. श्रेष्ठाला. २५. करुणाशीलाला.

पाहतां [1]स्वसुखमूर्तिस त्यजी देह, ती [2]कुशलपूर्ति सत्य जी. ॥ ५
पुत्रसाचि करि राम तत्क्रिया, तातसाचि वरि गृध्र सत्क्रिया. ।
गाति या सुकवि रामरीतितें, जी सुधा म्हणति [3]पामरी तितें. ॥ ५
[4]योजनायुतभुज [5]प्रभा हरी, सानुजप्रभुसि राहुसा धरी; ।
त्या करूनि वध राम उद्धरी, शुद्धरीति कविबुद्धि [6]मोहरी. ॥ ५
गोड रीति शबरीसि तारि ती, हें करी यश बरी [7]सिता रिती, ।
पाडिली किति सुधाहि ताकसी, होय हो! मग बुधाहिता कसी! ॥ ५
'[8]पं' असा प्रथम वर्ण, 'पा' मग स्पष्ट [9]दोनेंचि [10]यदीयनामग, ।
होय ती [11]सुसरसीहि तापदा, त्या [12]पयोधिजनिच्या हिता, पदा. ॥ ५
मारुति प्रथम भेटला, [13]भलें, सागरांत [14]गुरु [15]बेट लाभलें; ।
सूर्यनंदन [16]सुकंठ तोखदा पावला; [17]सगद जेंवि ओखदा. ॥ ५
त्या सखा करि कपीस [18]हरी मग, क्षिप्र ते सपट दाखवी [19]नगे, ।
ऐकवी प्रभुसि विस्तरें कथा, तो समव्यसन [20]मानसीव्यथा. ॥ ६
ज्या खळें हरुनि दार [21]वाळिला, [22]बंधु, त्या मथि मदांधवाळिला, ।
दे सख्यासि कपिराज्यसंपदा, होय ती दशमुखासि [23]कंपदा. ॥ ६

---

१. मूर्तिमंत निजानंदस्वरूप जो राम त्यास. २. सुखाची परमावधि. रामाच्या सं‍नि मृत्यु येणें हें सुखसर्वस्वच होय. ३. जी सुधा तितें पामरी (भिकार, कुचकामाची) असें म्‍णती. ४. योजनभर लांब आहेत भुज ज्याचे असा कबंध. ५. प्रभुतेज. ६. विकसित कर शुद्धरीतीचें स्तवन करी. ७. साखर रिती (कमी) बरी (पुष्कळशी) करी. साखरेची माधु व शुभ्रता कमी झाली. येथें एकादशाक्षरी पद्यांत पंतांनीं सप्ताक्षरी यमक साधला आहे! व खालच्या पद्यांत **व्यतिरेक** अलंकार आहे. ८. पंपा. ९. वर्णद्वय. १०. नामदर्शि ११. चांगलें सरोवर, आनंद देणारा जलसंचय. सुसरीप्रमाणें ताप देणारी झाली, असा ‍ होईल. पण प्रथम अर्धांतला **विरोध**चमत्कार नष्ट होतो. १२. समुद्रोद्भव लक्ष्मीचें हित ( ल्याण) करणाऱ्या आश्रयस्थानाला. १३. चांगलें, हितकर. १४. मोठें. १५. दुःखार्णवांत निवाऱ्याची जागा (बेट) सांपडण्याचा योग आला. **रूपक** आहे. १६. सूर्यपुत्र सुग्रीव खदा (आनंद देणाऱ्या रामाप्रत) पावला (दोघांची गांठ पडली). **उपमा** बहारीची आ १७. रोगी. १८. राम. १९. वस्त्रासहित अलंकार. २०. चित्तांतील चिंता. 'समान लव्यसनेषु सख्यम्' याचा पंतांनीं कसा उपयोग करून घेतला आहे बरें! २१. वर्जि बाहेर काढला. सुग्रीवाच्या बायकोचा अपहार करून वाळीनें त्यास बाहेर काढिलें हे २२. सुग्रीव. २३. भेडावणारी.

शोधितां कपिसमूह भागला, शोधं[1] मारुतिस मात्र लागला; ।
तोयराशि शतयोजनें उडे, न प्रभु स्मरुनि संकटीं[2] पडे. ॥ ६२
लंकिका[3] हुडकिली मनोजवें[4], घेतलें वपु कपीश्वरें[5] नवें; ।
श्री अशोकवनिकेंत देखिली, जी सुभक्तहृदयांत रेखिली[6]. ॥ ६३
तों दशास्य खळ कामदास[7] ये, 'हो' म्हणे 'सुमुखि! कामदा[8] सये!' ।
श्री वदे, 'उचित रामराज यां[9], पावसील नच पामरा! जया[10].' ॥ ६४
श्रीसुधिक्कृत[11] निघोनि तो खलाधीश[12] जाय. बहु कीश[13] तोषला[14]; ।
मुद्रिका स्तवुनि शुद्धभाव[15] दे, तीहि युक्त[16] अतिशुद्धभा[17] वदे. ॥ ६५
दे शिरोमणि, कथी निरोप ती, 'काळसा खळबळीं शिरो पती[18].' ।
बोलिला मुख[19] 'न दोन मास खा,' येउं सत्वर वदो 'न मास खा.' ॥ ६६
बोलिला कपि, 'मनोगदा[20] सहा, योग्य शत्रुदलनीं न दास[21] हा. ।
कोटि कोटि कपिसैन्य आणिल, स्वामिराज खलराज्य खोणिल[22].' ॥ ६७
तो अशोकवनवर्तिसन्नगां[23] संहरी, गरुड जेंवि पन्नगां. ।
मारुती वधुनि अक्ष[24], मारि तें सैन्य, होय वश अक्षमारितें[25]. ॥ ६८

---

१. सीतेचा शोध. २. प्रभुस्मरण केल्यामुळें संकटांत पडला नाहीं. ३. लंका. ४. मनोवेगानें, लवकर. ५. मारुतीनें माशीचें स्वरूप घेतलें होतें. ६. हृत्पट्टिकेवर खोदली गेली. 'रेखणें,' 'चितारणें,' हीं 'रेखा काढणें,' 'चित्र काढणें' यांपासून झालेलीं क्रियापदें होत. ७. मदनवश झालेला. ८. इच्छापूर्ति करणारी. ९. या शरीराला. १०. कार्यसिद्धीला. ११. सीतेनें ज्ञरमस्ति रीतीनें धिक्कार केला आहे ज्याचा असा. १२. दुष्टांचा राजा. १३. मारुति. १४. संतोषला. १५. सीतेच्या निष्पाप मनाची स्तुति करून. १६. योग्य. १७. अतिशय शुद्ध आहे तेज जीचें अशी सीता. १८. माझा पति रामचंद्र. १९. मुख (दशमुख. येथील राजा. मुख=मुख्य) बोलिला (आपल्या राक्षसींस त्यानें सांगितलें आहे कीं) दोन मास (दोन महिने) न खा (सीतेला दोन महिनेपर्यंत खाऊं नका. दोन महिन्यांच्या अवधींत जर सीता माझी भार्या झाली नाहीं तर हे राक्षसीहो! तुम्ही हिला खाऊन टाका. तोंपर्यंत खाऊं नका). सत्वर (लवकर) येऊं (माझा पति श्रीरामचंद्र येऊंदे. आणि 'मास न खा' असें वदो (रामचंद्र येथें येऊन त्यानें रावणाचा पराभव केल्यावर त्याला अर्थातच सांगतां येईल कीं, सीतेचें मांस खाऊं नका. सीतेस सोडविल्यावर मांस खाण्याचा प्रश्नच राहणार नाहीं हा भावार्थ होय). मुळांत असेंच आहे:–'द्वाभ्यामूर्ध्वं तु मासाभ्यां भर्तारं मामनिच्छतीम् । मम त्वां प्रातराशार्थं सूदाश्छेत्स्यंति खंडशः ॥' (सुंदरकांड–२२ सर्गः). २०. मनोव्याधीला. २१. हा सेवक रावणसंहार करण्यास योग्य नव्हे. २२. खणून टाकील. २३. महावृक्षांना. २४. एक रावणपुत्र. २५. अक्षम+अरितें=क्रूर अशा शत्रूतें.

त्या म्हणे कपि, 'अरे दशानन! प्रार्थु ती तुज अरे! दशा न न । 
वांचला न विषयांसि लोभला, शोभलाहि न सुशील तो भला. ॥ ६९
भस्म होसिल महासतीव्रतें, दाखवीलचि महास; तीव्र तें, । 
रक्षि तो प्रभु पदानता, रितें भाग्य तों धृतमदा न तारि तें. ॥ ७०
धिक्करूनि कपिसत्तमा, रणा ऐकुनीहि, अतिमत्त मारणा । 
खड्ग घे, निशिचरेंद्र काळसा, व्याळसा, कुपित मूढबाळसा. ॥ ७१
त्या बिभीषण म्हणे, 'अजी! अहो वध्य दूत न, अधर्म बा! न हो. । 
जाणते न वधितीच बा चरा; जें यशा उचित, तेंचि आचरा.' ॥ ७२
जो अनंतबळ विश्व चेष्टवी तत्प्रियैकसुतपुच्छ वेष्टवी; । 
त्यासि अग्नि दशकंठ भेटवी, तैल सिंचुनि बळेंचि पेटवी. ॥ ७३
राक्षसांसि कथि कीं, 'अशास न क्रूरतेस्तव असो अशासन; । 
न्या पुरींत, फिरवा बरा, धरा पापबुद्धि, मग मुक्त हा करा.' ॥ ७४
स्थूलदीर्घगुणबद्धबाहु ती द्विट्पुरी शिखिमुखांत आहुती । 
तो करी, सुटुनि वीर टोळसे जाहले किति पलाश कोळसे. ॥ ७५
बोलिले दशमुखादि तुच्छ 'हीं!' सागरांत विझवी स्वपुच्छ हीं. । 
श्रीस वाचिक पुन्हा नमूनि घे; लाजवूनि पलभुक्चमू निघे. ॥ ७६
सिंधु लंघुनि सलील पातला, वानरौघ सुमहांत घातला; । 

---

१. अरे रावणा! तुज ती दशा (विषयांधांस प्राप्त होणारी दुर्दशा) न प्रार्थु. तुझी ती दुर्दशा न होवो! निश्चयानें दुर्दशा होणार हें दाखविण्यासाठीं 'न'ची द्विरुक्ति आहे. २. लोभावलेला. ३. महापतिव्रता सीता. ४. तेजाला. परदारापहरणाचें पाप केवढें आहे तें पहा! ५. पदाशीं (पायाला) आनत (नम्र) झालेल्याला. ६. भाग्यशून्यता. ७. उन्मत्ताला. ८. लढाई होणार असें समजलें असूनही. ९. मदोन्मत्त रावण. १०. मारण्यासाठीं. ११. राक्षसपति. १२. सर्पासारखा. येथें तीन उपमा आहेत म्हणून **मालोपमा** अलंकार. अनुप्रासही आहे. १३. सेवका. १४. अनंत आहे बळ ज्याचें असा वायु. १५. हालायला चालायला लावितो. १६. वायूची प्रियपत्नी जी अंजना तिचा एकुलता एक मुलगा. १७. रावण मारुतीच्या शेपटाला चिंध्या गुंडाळी. १८. ह्यानें आपली बाग मोडून विध्वंस केला या क्रूरपणासाठीं, अशास (मारुतीस) अशासन न असो (याला शासन करावें). १९. निष्ठुर व्हा. २०. लांब, रुंद व चोहींकडून तटांनीं वेष्टित अशी लंका. २१. शत्रुनगरी. २२. अग्नींत. २३. टोळाप्रमाणें कित्येक राक्षस वीर त्यानें धुडकावून दिले ते. २४. मांस खाणारे राक्षस. २५. हाय. २६. मारुति. २७. सीतेस. २८. निरोप. २९. लीलेनें. ३०. वानरचमू. ३१. मोठ्या आनंदात, उत्सवात.

तज्जयें प्रभुहि पावला सुखा, भेटला, निरखि [1]तातसा मुखा. ॥ ७७
दे शिरोमणि, कथी निरोप [2]हा बोलिला प्रभु 'न तेहि [3]रोपें हा.' ।
ऋक्षवानरबळाब्धि नावरे [4]तो म्हणे प्रभुसि, 'चाल, पाव रे!' ॥ ७८
जाय सिंधुवरि सिंधुसा, [6]महा दे सुरांसि जगदीश राम हा. ।
'दाखवी' म्हणति '[7]आर्य साधिता कीं उपायचि न [8]कार्यसाधिता?' ॥ ७९
जे विलंघिति कुधी सदा नया ते सुतादि, कथिती [9]अदान या, ।
तों बिभीषण म्हणे, 'अघा तरे, नीतिनें हित, [10]तिचा न घात रे! ॥ ८०
साम जें हित करील आजि [11]तें, रे! मरालचि करूनि [12]ओजितें. ।
भव्य धर्म, [13]नय होय, राजया! दे न बंधु, सुत, [14]सोयरा [15]जया. ॥ ८१
[16]पंडिता! कपिचमू न [17]साबळी, [18]ते महाबळ, तुम्हीं [19]नसा बळी. ।
जीवनप्रद दुजा उपाय न [20]क्ष्मासुतेसचि करीं [21]उपायन. ॥ ८२
दूत एक [22]कपि तोहि नावरे! [23]संगरांत बुडवाल [24]नाव रे! ।
भ्याचि ऐकुनि नरा [25]खराहवा. हें करा कुळ न राख, [26]राहवा.' ॥ ८३
'[27]वांचती न नर, वानर क्षण; स्वामिचें उचित [28]मानरक्षण. ।
तूं [29]मृतीस [30]जडनायका! तरें नीघ, जाचि, हित काय [31]कातरें.' ॥ ८४

---

१. बाप पराक्रमी मुलाकडे पाहतो तसा. २. मारुति. ३. बाणच आहे, शिरोमणी व निरोप नव्हेत. ४. तो वानरसैन्यसमुद्र. ५. पाय प्राप्त होणें, पायधूळ पडणें, प्रसन्न होणें, हा 'पावणें' शब्दाचा अर्थ. ६. उत्साहा. ७. आधियुक्तपणा. ८. कार्य साधणारा उपायच नाहीं? ९. देऊं नका, सीता परत देऊं नका असें रावणाला सांगती. १०. नीतीचा घात करूं नको रे! नीतीनें हित होतें हें सुभाषित होय. ११. तेंच हित तुम्हांस आज प्राप्त होईल. १२. युद्धातें. १३. नीति हाच खरा व कल्याणकारक धर्म होय. १४. 'स्वीय' शब्दापासून 'सोयरा' झाला. स्वीय=आपला. 'सोय पाहील तो सोयरा' ही म्हण जगविश्रुतच आहे. १५. यश देणें हें बंधु वगैरेच्या स्वाधीन नाहीं. १६. हे व्यवहारचतुरा! रणपंडित असें सेनेचें विशेषणही होईल. १७. भोळी. १८. रामलक्ष्मण. १९. नाहीं आहां, नाहीं. २०. पृथ्वीसुता जानकी. २१. नजराणा. २२. मारुति. २३. युद्धांत. २४. नौका. 'अभ्र' असाही अर्थ शक्य आहे. २५. खराशीं युद्ध झालें त्याचा वृत्तांत ऐकून नरा (मनुष्यरूप धारण करणाऱ्या रामाला) भ्या. बिभीषणाचा उपदेश किती नीतिप्रद आहे! पण हें अमृत मरणास तयार झालेल्या रावणास काय होय? २६. जिवंत असूंद्या. २७. रावणोक्ति आहे. २८. मानाचें रक्षण करणें हेंच राजाला योग्य आहे. षष्ठीविभक्तीचा अर्थ चतुर्थीसारखा होतो याचें हें उदाहरण 'स्वामिचें' उचित आहे. २९. मृत्यूस. ३०. बुद्धिमंदा! ३१. भिण्यानें येथें राहिल्यानें काय नफा व्हावयाचा आहे?

त्या म्हणे, 'नमिन मी नरा महा राजभक्ष मृग मी, न राम हा, ।
ठाउके सकळ देव वेद या[1] हे ने कीं यतिस देववे दया?[2] ॥ ८५

'धिक्' सभेंत म्हणतांहि तो[3] कवी [4]शांतकोप न दुरुक्त[5] ओकवी. ।
ये [6]जगद्गुरुकडेचि [7]तापला जावया सकळ ताप आपला. ॥ ८६
पावला गज दवार्त या नदा, मानला [9]अहितबंधु [10]मानदा, ।
दे पदों न शरणागता रितीं[11], [12]अन्य या प्रभु असा न तारिता. ॥ ८७
दुःख होय [13]सुख जें निवेदिलें, तोहि, राज्यपदही, निवे, दिलें. ।
भक्ति देउनि म्हणे, '[14]उशीं रहा स्वस्थ; राम न करी [15]उशीर हा.' ॥ ८८
सागरें [16]अचळसेतु वाहिला, भास्करें [17]भुजंगसाचि पाहिला. ।
[18]नीळवारिरुहहार वाटला; त्रस्त सागर [19]उरांत फाटला, ॥ ८९
लांब सेतु शत योजनें, दहा रुंद, सुंदर विलोकितां, महा[20] ।
विस्मया [21]त्रिदश पावले, 'अहा! वर्णवे न' म्हणति 'प्रताप हा.' ॥ ९०
त्या तशा [22]गुरुपथेंहि ती अहोरात्र तीन उतरे चमू अहो! ।
[23]श्रीस रामशरचाप [24]दाखवी, [25]कांतशोकविष दुष्ट चाखवी. ॥ ९१

---

१. रावणाला. २. 'यतिस दया न देववे हें कीं.' सर्व वेदोक्तधर्म ठाऊक असणाऱ्या रावणाला व फिरून यतीचा वेष धारण केलेल्या रावणाला दया दाखवितां येऊं नये हें काय? असा अर्थ संभवतो आहे. अन्य अर्थ निघाल्यास चांगलेंच. ३. बिभीषण. ४. विचारानें शांत झाला आहे कोप ज्याचा. ५. इतकें तुटून बोलले तरी त्या शांतिसागराच्या तोंडांतून एकही वाईट शब्द गेला नाहीं. ६. जगद्वंद्य जो रामचंद्र त्याकडे. ७. पोळलेला बिभीषण. ८. येथें रूपक आहे. ९. रावणबंधु. १०. मान देणारा जो रामचंद्र त्याला मान्य झाला. ११. रिकामा. १२. या प्रभूसारखा तारण करणारा दुसरा कोणी नाहीं. पंतांची रामभक्ति असल्या ठिकाणीं प्रकट व्हावयाचीच. १३. जें सुख निवेदिलें तें दुःख होय. सीतेच्या सुखासमाधानाचें वर्तमान म्हणून जें बिभीषणानें सांगितलें, तें रामचंद्राला दुःखप्रदच झालें. तथापि तोही (रामचंद्र सुद्धां) निवे (शांत झाला) व बिभीषणास त्यानें राज्यपदही दिलें (लंकेचें राज्य अर्पण केलें). या ओळींतील शब्दव्यवस्था अमळ बिकटच खरी! १४. सुखरूप. १५. विलंब, अवकाश. १६. न हलणारा. १७. सूर्याला वरून दिसलें कीं एक मोठा लांबच्या लांब सर्पच पसरला आहे! कोण उदात्त कल्पना ही! **भ्रांति** अलंकार. १८. नीळ्या उत्पलांचा हार. १९. किंवा जर्जर झालेला समुद्र उरांतच फाटून गेला. दुभंग झाला. या दोन्ही **उत्प्रेक्षा** आहेत. २०. 'महा' हें 'विस्मया'चें विशेषण. २१. देव. २२. एवढा थोरला विस्तृत (रुंद) मार्ग होता तरी तीन अहोरात्र दिवस समुद्र उल्लंघन करावयास लागले! २३. सीतेला. २४. दुष्ट रावणपुत्र दाखवी. २५. कांतसंबंधीं जो शोक हेंच विष तो दुष्ट इंद्रजित् त्या महासती सीतादेवीला चाखवी, चाखण्यास लावी. सारांश, तिला विषपान करिता झाला.

जी [1]बिभीषणवधू महासती शोक सर्वहि हरी [2]सहास ती; ।
होय आश्रय [3]महाविभूतिला, 'श्री' म्हणे 'बहु [4]वहावि' [5]भू 'तिला.' ॥ ९२
[6]सिंधुपारग सुवेळनाम या पर्वतीं सुगळ ने [7]अनामया, ।
बैसला प्रभु पहात [8]दुर्ग ते ज्यापुढें सुरपुरेंहि [9]दुर्गतें. ॥ ९३
दुर्गवर्ति दशकंठ देखिला, [10]कीशपें परम तुच्छ लेखिला; ।
[11]कोपनें उडुनि [12]शत्रु ताडिला; शीघ्र तन्मुकुट तोहि पाडिला. ॥ ९४
[13]वेष्टवी [14]अजित शत्रुची पुरी; तेधवां बहुत हर्षल्या [15]सुरी. ।
पाठवी कथुनि राम अंगद [16]न्यायधर्मपटु शत्रुभंगद. ॥ ९५
[17]त्या म्हणे, 'शिव सदा विवेक[18] वी; रे! पदें न भुजगा शिवे [19]कवी. ।
न्याय धर्म [20]निपटूनि सोडिले! दोष [21]काय समजोनि जोडिले? ॥ ९६
सोड खोड, यश शुद्ध जोड, बा! [22]भव्य सद्गुणमणीस हो डबा; ।
दे हिरण्यकशिपूसि [23]तो [24]तुला व्याघ्र काय न गिळील [25]ओतुला? ॥ ९७
श्रीविदेहतनयेसि सोडुन, प्राणद प्रभुसि हस्त जोडुन, ।
वांच, कां [26]चळसि? शत्रु आंच ती लागतां [27]सदिषुची, न [28]वांचती.' ॥ ९८
[29]तो वदे '[30]स्वअसु रक्ष, माकडा! मेरुचा तुज न लंघ्य हा कडा. ।
शत्रुला [31]भजुनि साश्रु हो; पित्या काय रे! म्हणति [32]घास ओपित्या? ॥ ९९

---

१. सरमा. २. हांसून. ३. मोठ्या योग्यतेची सीता तिला. ४. भूमि (पृथ्वी) आपल्या कन्येला, सरमा सुख देत आहे असें पाहून म्हणे, 'तिला (सरमेला) बहु (पुष्कळ) श्री (मानमरातब, योग्यता, ऐश्वर्य) वहावी (अर्पण करावी, द्यावी). 'पाहिजे' या अर्थी 'व्हावी' हा अपभ्रष्ट शब्द 'वहावी'चाच गोत्रज नसेल ना? ५. भूमि म्हणे. ६. समुद्र उल्लंघन करून गेल्यावर सुग्रीवानें. ७. निर्विकार अशा रामाला. ८. रावणप्रासादाचीं गगनचुंबी शिखरें. ९. दरिद्रें. १०. वानरेश जो सुग्रीव त्यानें. ११. स्वभावतःच रागीट जो सुग्रीव त्यानें. 'रागानें', 'क्रोधानें' असाही अर्थ होईल. १२. रावण. १३. वेढा घाली. १४. राम. १५. देवांगना. १६. न्याय आणि धर्म यांत प्रवीण. १७. रावणाला अंगद म्हणतो. १८. विवेक सदा शिव (कल्याण) वी—हा अन्वय. १९. शहाणा. २०. कांहीं एक अवशेष मागें न ठेवितां वर्ज केले. तात्पर्य, सगळेच्या सगळे टाकून दिले. २१. काय, कसला विचार करून. २२. कल्याणकारक. **परंपरितरूपक** आहे. सद्गुण हे मणी (रत्नें) आणि रावण हा डबा. २३. श्रीराम. २४. बरोबरी. २५. मांजरास. २६. कां फसतोस? गडबड कां करतोस? २७. उत्तम बाणाची. २८. 'शत्रु' हें या क्रियापदाचें कर्म. २९. रावण. ३०. आपले प्राण. ३१. रामाला (पित्याच्या शत्रूला) भजून (याची चाकरी) करितोस म्हणून लाज असूं दे. ३२. अरे आपल्या बापास श्राद्धान्न देणाऱ्या! काय म्हणतोस?

लाजतास [1]उलतास दार ते, ज्यांसमेत चुलता सदा रते ।
त्याहि तत्प्रियसखाहि तार या, किं त्वया जड! तया हि तारया?' ॥ १००
'[2]मत्त केवळ म्हणोनि [3]मारिला, वारिला सकळ दोष तारिला. ।
हा जगद्गुरु [4]अघा [5]असा धुतो, जो असें न [6]समजे, असाधु तो. ॥ १०१
शुद्ध ये [7]प्रभुचिया मनास जें, शुद्धिची धरुनि [8]कामना [9]सजें. ।
तूं हि हो प्रणत, पातका तरें; जोडिजे प्रभुसि हात [10]कांतरें. ॥ १०२
'[11]मत्प्रभावजित तर्क टाकिती देव, मर्त्यबळ मर्कटा! किती? ।
बोलसि प्रभुपुढें [12]असार, हा दुर्गुण त्यजुन, तूं [13]असा रहा.' ॥ १०३
'[14]सोडुं वालिशतशासनक्षमा? रे सुबालिश! तशास न क्षमा. ।
बोल पावुनि न खेद? हा! शिरे, ऱ्हींत[15] न त्यज सखे! दहा [16]शिरें. ॥ १०४

१. ज्या (तारेबरोबर) चुलता (सुग्रीव) सदा रते, ते दार (तुझी आई पाहून) तूं (शुद्धीवर असतास तर) लाजतास व उलतास (दुःखानें फुटून गेला असतास). तर त्याही (वाळीला) व तत्प्रियसख (जो मी रावण) यांस तार (यांचें नांव मळवूं नको). हे मूर्खा! तुला तारेला घेऊन काय करावयाचें आहे? २. अंगदोक्ति आहे. ३. वालीला मारिला. व्याकरणकार असल्या प्रयोगांस 'कर्मणी' म्हणतात. ४. पातकाला. ५. याप्रमाणें. ६. असें जो रामचंद्राला समजत नाहीं तो दुष्ट होय. ७. प्रभूच्या मनास जें ये (येतें. प्रभूला जें आवडतें) तें शुद्ध (निष्पाप असतें). 'प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः' ही कालिदासाची उक्ति प्रसिद्धच आहे. ८. इच्छा. ९. तयार हो. १०. संसारतापानें जिगजिगलेल्या माणसानें प्रभूस शरण जावें. ११. रावणाचें उत्तर. माझ्या पराक्रमानें जिंकलेले देव जेथें माझें बळ किती आहे याचा अदमास करण्याचा तर्क सुद्धां टाकून देतात तेथें. **अर्थापत्ति** अलंकार. १२. ज्यांत अर्थ नाहीं असें. १३. जिवंत. १४. अंगद म्हणतो, 'रे सुबालिश! (रे मूर्खा!) वालिशतशासनक्षमा सोडूं? (वालीसारखे शंभर आले तरी त्यांस शिक्षा करावयास समर्थ अशा रामचंद्रास सोडूं? अशा शूर आणि नीतिविशारद पुरुषाचा त्याग करूं?) मूर्खा! तशास (असें अनीतीचें कर्म करतात त्यास) क्षमा नाहीं (त्याच्या असल्या राजद्रोही व धर्मद्रोही आचरणाला क्षमा होणार नाहीं. समजलास?) बोल पावुनि (इतकें मी रामाशीनें सांगितलें हें ऐकून) ही तुझ्या मनांत खेद न शिरे! (तुला वाईट वाटत नाहीं!) हा! (हाय! हाय! ही दुःखाची गोष्ट आहे.) रावणा! ऱ्हींत (लज्जेमध्यें आपण केलें तें आतां कसें मोडावें अशा अभिमानामध्यें गुरफटून जाऊन) हे सखे! (मित्रा!) आपलीं दशशिरें (आपले प्राण) "न त्यज" (टाकून देऊं नको. सारांश, व्यर्थ अभिमानास पेटून मरूं नको).' हा उपदेश अर्थातच योग्य आहे. पण तो रावणास मानवला नाहीं. येथील यमकचमत्कार पाहण्यासारखा आहे. एकादशाक्षरात्मक वृत्तांत पंतांनीं 'बवयोरभेदः' याचा फायदा घेऊन नवाक्षरी यमक साधलं आहे! व या अपूर्व यमकानें अर्थहानी बिलकुल झाली नाहीं, इतकेंच नव्हे, तर अर्थगौरवानें ह्या पंक्ति भारवती मात्र झाल्या आहेत! १५. लज्जेंत. १६. मस्तकें.

कोपला बहु कुधी[1], म्हणे, 'धरा.' चार[2] झोंबति जसे फणी[3] धरा[4]. ।
वीर अंगद उडे, बळी पुरा; बाहु झाडुनि करी तयां[5] चुरा. ॥ १०५
तद्भरें[6] परसभाहि[7] फाटली; ती तदा पविहताचि[8] वाटली! ।
लाज राक्षसपतीस लागली[9]; तन्मनीं तसि बळींहि[10] वागली. ॥ १०६
वाळिसूनु कळवी असाम[11], या 'छद्म गर्व न[12] असे अ-सामया. ।
सिद्ध होय, रघुसत्तमा! रणें[13] बा! तुला उचित मत्तमारणें[14].' ॥ १०७
देखती कपिपती मुखाकडे[15], त्यांस हीं[16] प्रभुनिदेश[17] सांपडे; ।
'व्हा घरट्ट[18], परे[19] ते नवे गहूं पिष्ट होउत, धरा न वेगें[20], हूं! ॥ १०८
राक्षसप्लवगवीरयुद्ध तें मांडिलें परिभवार्थ[21] उद्धतें. ।
रक्तपूर बहु दूर वाहिले ज्यांत अश्व गजही न राहिले[22]. ॥ १०९
[23]भंगला दशमुख स्वयें, तरी मूढ युद्धचि पुनः पुन्हा करी; ।
त्या रणीं बहु कबंधनर्तनें; वीरपादभुजशीर्षकर्तनें[24]. ॥ ११०
मेघनाद[25] सुरपाळ[26] जो धरी, सानुजप्रभुसि[27] बद्ध[28] तो करी; ।
नागपाश खगपाळ[29] ते हरी जानकीस बहु शोक दे अरी[30]. ॥ १११
कुंभकर्ण उठवूनि सर्व तें वृत्त ऐकवुनि, दोषपर्वतें[31] ।

---

१. रावण. २. सेवक किंवा चार राक्षस. ३. सर्प. ४. पर्वताला. ५. त्यांचा. ६. त्याच्या भारानें. ७. शत्रुसभा. ८. इंद्रवज्रानें पाडलेली अशी. **उत्प्रेक्षा** अलंकार. ९. 'लाज लागणें' हा प्रयोग चिंतनीय आहे. १०. रावणसैन्यामध्येंही विद्यमान होती झाली. ११. तह होत नाहीं असें या रामास कळवी. १२. असामया (निरोगी असतो त्याला. सारांश, ज्याचें चित्त शुद्धीवर त्यास) छद्म व गर्व न असे (नसतो). रावण शुद्धीवर नाहीं म्हणून त्यास गर्व झाला आहे व कपट करावयासही तो पाहत आहे. रामाचें सामवचन न ऐकणें हा गर्व व अंगदास धरणें हें छद्म! १३. रणामध्यें. १४. उन्मत्तांचें हनन करणें. १५. राममुखाकडे. १६. त्यावेळीं सांगितलेला. १७. प्रभूची आज्ञा. १८. घिरट, जांतें. ह्या रूपकानें राक्षसवध कसा झाला असेल याची कल्पना उत्तम करितां येईल. १९. शत्रु. २०. वाईट वाटूं देऊं नका. हूं=चला. २१. पराभव करून घेण्यासाठीं मदोन्मत्त रावणानें. २२. हत्तींना सुद्धां उभें राहतां येईना यावरून पूर केवढा होता हें समजतें व त्याचा वेगही समजतो. **पर्यायोक्ति** आहे. २३. पराभव पावला तरी. २४. कापाकापी. २५. इंद्रजित्. २६. इंद्र. २७. सलक्ष्मण रामाला. २८. नागपाशानें बद्ध करी. २९. गरुड. ३०. शत्रु. ३१. दोषांचा पर्वत जो रावण त्यानें.

धाडिला, जरि धरूनि आळसा[1] ये, गमे तरि कपींस काळसा. ॥ ११२
संगरीं बहुत तो वधी हरी; पाडुनि प्लवगपाळका[3] धरी. ।
हा[4] हरी[5] सुटुनि कर्ण नासिका, निर्जरांसि कथि 'वर्णना सिका.'[6] ॥ ११३
तो सकोप शतशः कपी गिळी; सर्व वानरचमू पडे शिळी.[7] ।
तों करि प्रभु तदंगकर्तन.[8] स्वःसदांत[9] बहु होय नर्तन![10] ॥ ११४
ऐकतां खळ म्हणे, 'असावध स्पष्ट[11] तो, तरिच हा असा वध; ।
घोळिता हरिस लक्षहायन.'[12] स्वाननीं[13] शिरवि दक्ष 'हाय!' न, ॥ ११५
धैर्य दे दशमुखा, मिशा पिळी, मेघनाद सबळा[14] अजा खिळी. ।
जिष्णुस[15] प्रळयकाळ वाटवी; तोय तो यममुखस्थ[16] आटवी. ॥ ११६
आणि मारुति महौषधि क्ष्माभृन्महाशिखर,[17] त्या हरि[18] श्रमा. ।
सर्व होउनि विशल्य[19] कोपले; त्यां पुढें अहितवीर[20] लोपले. ॥ ११७
तो[21] रणीं कपटजानकी वधी, फार 'हा!' म्हणवि, ज्या न कींवधी[22] ।
त्या बिभीषण खळास[23] मारवी;[24] होय लक्ष्मण तया तमा रवी.[25] ॥ ११८
घे दशास्य बहु तापला[26] असी;[27] 'जी[28] विनाश करि आपला असी[29] ।

---

१. आळसतच आला तरी. २. वानर. ३. वानरपति सुग्रीव त्याला. ४. सुग्रीव कुंभकर्णाचे कर्ण व नाक तोडिता झाला. ५. हरण करी. ६. शिका. वर्णन करायला शिका. कारण हें अश्रुतपूर्व कृत्य होतें. ७. थंड पडली, निरुत्साह झाली. 'शिळी पडणें' हा प्रयोग स्मरणीय आहे. ८. कुंभकर्णाच्या अंगाचें. ९. स्वर्गसंबंधी सभेंत. १०. कुंभकर्ण मेल्यावर देवांच्या आनंदास काय विचारावें? नाचायला लागले झालें! ११. कुंभकर्ण झोंपेमध्यें असावध होता म्हणून असा (अशा प्रकारचा) वध झाला. १२. जागेपणीं लक्ष वर्षें. १३. दक्ष (रावण, सावध व तत्पर रावण) आपल्या तोंडांत हाय न शिरवि. १४. सैन्यासकट रामाला. 'मेघनाद' हा 'दे,' 'पिळी,' 'खिळी' यांचा कर्ता. १५. इंद्राला. १६. यमाच्या तोंडचें पाणी पळालें! रामचंद्रावर देवांची केवढी भिस्त होती बरें? १७. क्षमाभृत्+महाशिखर=पर्वताचें मोठें शिखर, द्रोणागिरी पर्वत. १८. त्या श्रमास नाहींसा करिता झाला. १९. सर्व जखमा भरून आल्यावर. २०. शत्रूचे वीर गतप्रभ झाले. They were thrown into the shade. २१. इंद्रजित्. २२. ज्याला दयेची बुद्धि नाहीं असा इंद्रजित् मायारूपी जानकीस वधिता झाला. २३. त्या इंद्रजितास. २४. मराठींतील प्रयोजकभेदी क्रियापदें 'विणें'='प्रसूत करविणें' या क्रियापदाच्या साहाय्यानें प्रथम उत्पन्न झालीं असावींत काय? व्याकरणवेत्ते या कल्पनेचा विचार करोत. २५. रवीचा उदय तमोनाशक होतो असाच लक्ष्मण शत्रुनाश करणारा झाला. रूपक अलंकार आहे. २६. पुत्रशोकानें व पराभवानें संतापलेला. २७. खड्ग. २८. सीता. २९. याप्रकारें.

हे वधाविच.' म्हणे; सतीहि भी; सिंह पाहुनि पुढें जसी ईभी[1]. ॥ ११९
तो सुपार्श्वसचिवें निवारिला. आयु वांचवि तया शिवारिला[2]. ।
तत्प्रयुक्त बळ[3] ये समक्ष, या[4] पाठवी हरतसा यमक्षया[5]. ॥ १२०
'मारणेंचि मरणेंचि'[6] हा पण, स्वाननें करि, निघोन[7] आपण, ।
ऋक्षवानरमहाबळ क्षया लागतां, यश मिळे वलक्ष[8] या[9]. ॥ १२१
शक्ति हाणुनि उरांत लोळवी लक्ष्मणास, तनुभान बोळवी[10], ।
शृंग[11] लक्ष्मणहिता तदाहि[12] तें आणिलें पवनजें सदाहितें[13]. ॥ १२२
राम भूमिवरि, तो रथीं अरी, यास्तव स्वरथ पाठवी हरी[14]; ।
मानद[15] प्रभु चढे तयावरी; निस्तुलाहव[16] सुरारिशीं करी. ॥ १२३
राम रावण रणांत कोपले, तों परस्पर बळौघ[17] लोपले. ।
पाहणार बहु दूर थोपले[18], आधिनें सुरमुनींद्र चोपले[19]. ॥ १२४
रामरावणकृता[20]रणा कवी रामरावणरणापरि स्तवी, ।
'रीति दाखविलि अद्भुता नवी, आजि आजिसुमखीं'[21] म्हणे रवी. ॥ १२५
एक एक शतदा असीं देहा[22] तोडिलीं, तरि तसींच तीं! महा ।
विस्मय प्रभुहि पावला. 'अहा' बोलिलाहि कुतुकी महा[23] महा[24]. ॥ १२६
भेटला घटज[25] पूर्ण जो तपें; 'भानुचें हृदय'[26] दे म्हणे, 'जपें' ।
सुप्रसन्न रवि होय यावर, क्षिप्र दे करुनियां[27] दया वर. ॥ १२७

१. हत्तीण. २. कल्याणाचा शत्रु अशा रावणाला. सीतादेवीच्या उग्र पातिव्रत्याच्या प्रखर तेजाच्या संनिध रावणरूपी पापी पतंग भस्मच व्हावयाचा; पण रावणाच्या आयुष्याची दोरी बळकट होती म्हणून व रामहस्तानें याचा वध व्हावयाचा होता म्हणून या वेळीं तो बचावला गेला. ३. राक्षससैन्य. ४. त्या सैन्याला. ५. मरण्यासाठीं. ६. 'मरेन किंवा मारीन' हा पण. ७. आपण स्वतः बाहेर निघून. ८. शुभ्र, पांढरें. ९. रावणास. १०. पोहोंचवी, नाहींसें करी. ११. द्रोणागिरीचें औषधीयुक्त शिखर. १२. तेव्हांही. १३. रामाचें सदैव हित, कल्याण करणारा त्यानें. १४. इंद्र. १५. हें विशेषण सहेतुक आहे. १६. अप्रतिम युद्ध. १७. एकमेकांचे सेनासागर आटले! १८. पाहणारे आश्चर्यचकित व भयचकित झाले. १९. आणि काळजीनें देव, ऋषी सुकून गेले. 'चोपणें' हा 'सुकून जाणें,' 'निस्तेज होणें' याला चांगला शब्द आहे. २०. 'रामरावणयोर्युद्धम्' हें सर्वांस ठाऊकच आहे. २१. युद्धरूप उत्तम यज्ञांत. २२. दहा मुखें. २३. मोठा. (कुतुकी=चमत्कार करणारा, सर्वज्ञ असतांही मनुष्याप्रमाणें वागणारा.) २४. (भक्तांस) सुख देण्यासाठीं. २५. तपोनिधि, अगस्तिऋषी. २६. या नांवाचा मंत्र. २७. दया करून वर देता झाला.

[1]ब्राह्म योजुनि महाबळें शरें भेदिलें [2]दशमुखोर मावरें; ।
पाडिलाहि; पवनें जसा [3]नग, [4]स्वस्थ होय बहु सर्वही जग. ॥ १२८
पुष्पवृष्टि जगदीश्वरीं पडे, स्तोत्रगाननटनें चहूंकडे. ।
दुंदुभिप्रमुख [5]वाद्य वाजलें, गाजलें सुयश, विश्व [6]साजलें. ॥ १२९
[7]तत्प्रताप बहुवार वानिला श्रीवरें, [8]मग न शत्रु मानिला, ।
तत्क्रिया [9]तदनुजाचिया करें सांग [10]चालविलि त्या दयाकरें. ॥ १३०
तो बिभीषण तया पदावर स्थापुनि, '[11]स्थिर असें सदा' वर ।
दे असा प्रभु महादयाकर, [12]स्वारि ते, जुळिति जे न या कर. ॥ १३१
पाठवी पवनजा [13]सतीकडे; श्रीस हर्ष [14]जयसेवनें घडे. ।
[15]तत्प्रिय प्रभुसि [16]कीश जाणवी, [17]यातुपा कथुनि तीस आणवी. ॥ १३२
श्रीस ईश्वर म्हणे, 'यशीं(शा?) [18]रुची-सेंचि सत्वर करावया शुची ।
युद्धें, लाविन तुला न हात मी, कीं न मग्न कुळ हो महातमीं. ॥ १३३
शुद्धि तों परवशीं न राहुन स्त्रीस, चाखिल सुधा न राहु न. ।
जा रुचेल तुज जो तया वर, क्रोध जानकि! करीं न [20]यांवर.' ॥ १३४
[21]ऐकतांचि धरि फार कांप ती, श्री म्हणे, 'कठिन आजि कां पती?' ।

---

१. ब्रह्मास्त्र. २. रावणाचें ऊर. ३. वृक्ष. उपमा अलंकार. ४. सुखी, निश्चित. राम व जग हीं निश्चित झालीं. सहोक्ति अलंकार आहे. ५. अनेकवचनार्थी एकवचनी प्रयोग. हा बोलण्यांतही येतो. 'काय आंबा आला आहे बाजारांत आज!' ६. शोभूं लागलें, अलंकृत झालें. ७. रावणाचा पराक्रम. ८. मेल्यावर. 'मरणान्तानि वैराणि' या न्यायानें व शत्रुभाव विसरून. ९. त्याच्या धाकट्या भावाच्या हातून. १०. समग्र करविली. ११. चिरंजीव हो असा वर. १२. या (रामास) जे कर न जुळिति (जे शरण येत नाहींत, नम्र होत नाहींत) ते स्वारि (स्वतःचे शत्रु आत्मघाती) होत. १३. सीतेकडे. १४. जयाचा वृत्तांत ऐकून. १५. रामास भेटण्याची सीतेची इच्छा. १६. मारुति. १७. राक्षसराजास. १८. तेजाप्रमाणें शुद्ध करण्यासाठीं. १९. राम म्हणाला:–'रघुकुलाचें धवल यश तुला चोरून नेल्यामुळें मलिन झालें होतें, तें लवकर परिटघडीसारखें स्वच्छ करण्यासाठीं मीं युद्ध केलें व यश निर्मळ केलें. पण मी तुझा अंगिकार करणार नाहीं. कारण तूं दुसऱ्याच्या घरीं राहिलीस. परवशीं राहून स्त्रियांस शुद्धि नाहीं. स्त्रिया शुद्ध राहत नाहींत. उघडच आहे, राहूस अमृत मिळालें तर तो जसा चाखल्याशिवाय राहणार नाहीं, तद्वत् तुझें पातिव्रत्य भंग केल्याशिवाय रावण राहिला नसेल. म्हणून तुझा अंगिकार करून मी आपलें कुल अपकीर्तिमध्यें बुडवीत नाहीं. तुला पाहिजे तिकडे जा. मजवर रागावूं नकोस.' २०. मजवर (रामावर). २१. हा दारुण वज्रपातासारखा निर्घृण वाक्प्रहार त्या बिचाऱ्या दीन आणि पतिदर्शनासाठीं उत्सुक झालेल्या

उग्र दिव्य करि साधुबुद्धि[1] तें,[2] जें जगाहि कळवी स्वशुद्धितें. ॥ १३५
पावकांत न उटीहि वाळली, कुंडपंकजकुटी हिंवाळली[3] ! ।
माळसी गमलि ! वर्णिली अजें, शंकरें, सुरमुनीश्वरव्रजें. ॥ १३६
अग्नि तो जनकसा विवाहसा,[4] दिव्य काळ वदला 'निवा, हसा,' ।
ये, करी अंगवदंकगा[5] तितें; जावया सकळ पंक[6] गाति तें. ॥ १३७
भेट शक्रसख[7] दे परा सुता, ती मृषाचि गमली परासुता[8] ! ।
बोलिले कवि, 'यशा निवाल या सेवितां बहु महाशिवालया.[9]' ॥ १३८
सर्व युद्धमृतवीर वांचवी; सूर्यसा यश महेंद्र सांचवी; ।
हें चरित्र कवणा न लांचवी[10] ? वाटलें नृपति पुत्र पांचवी[11] ! ॥ १३९
पूजना विनवि यातुराज या; जो जगा अतिभयातुरा[12] जया ।
लाविता[13] हरुनि ताप, गावया, जावया भव लया, भजावया. ॥ १४०
कंद मूळ फळ शाक भक्षि तो, त्या म्हणे, 'भरत मार्ग[14] लक्षितो, ।
दर्शनार्थचि[15] असूंसि रक्षितो, केवळ प्रिय मदीय अक्षि[16] तो. ॥ १४१
त्याविणें मज नकोचि अर्हणा[17]; जेंवि मानिपुरुषासि[18] गर्हणा, ।

---

अबलेनें कसा सहन करावा? तिला कंप सुटला. वाचा स्तब्ध झाली. 'माझ्यावर काय कोप हा!' हे शब्द मात्र तिच्या सद्गदित झालेल्या कंठांतून निघाले! व ती दिव्य करण्यास तयार झाली. परमेश्वरा! काय पातक स्त्रियांनीं केलें आहे म्हणून त्यांच्यावर—सीतेसारख्या स्त्रीवर—रामचंद्रासारख्या दयाकरानें सुद्धां आग पाखडावी! 'यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः' हाच न्याय सर्वत्र लागू पडावा ना? मर्जी तुझी!

१. सीता (जिच्या मनांत दुसऱ्याची निंदा करणें याचें स्वप्न सुद्धां नाहीं म्हणून साधुबुद्धि). २. जें दिव्य 'आपण शुद्ध झालों!' असें जगास कळवितें झालें! पतिव्रतातेजाचा काय प्रभाव पहा! सीता माईच्या अंगाला लावलेली उटी वाळली सुद्धां नाहीं इतकेंच नव्हे, तर प्रखर अग्निकुंडामध्यें झगझगित व लाल अशा हुताशनरूपी कमलाच्या ज्वाला सुद्धां थंडगार झाल्या व त्या गार ज्वाला सीतेला माळेसारख्या शोभा देत्या झाल्या. **विरोधमूलक-अतिशयोक्ति** आहे. ३. हिंवाप्रमाणें गार होणें. ४. दिव्य करावयाचे वेळीं विवाहहोमासारखा बापाप्रमाणें पालन करणारा अग्नि तोषप्रद होऊन म्हणाला. ५. रामाच्या मांडीवर बसलेली. ६. पापरूपी मळ. ७. दशरथ. ८. मरण खोटें वाटलें! ९. या कल्याणाचें घर अशा यशाला. १०. लोभ उत्पन्न करीत नाहीं? ११. रामचरित्र हा पांचवा पुत्रच! ही **उत्प्रेक्षा.** १२. 'जगा'चें विशेषण. १३. 'लाविता'चा अन्वय जया, गावया, जावया व भजावया इकडे घ्यावा. १४. वाट पाहतो. १५. माझें दर्शन व्हावें म्हणूनच प्राण ठेवितो. १६. डोळा. १७. पूजा. १८. 'संभावितस्याकीर्तिर्मरणादतिरिच्यते.'

मी [1]ससैन्य सुगळार्चनें [2]मही भेटवीं भरत, रक्षु [3]नेमही.' ॥ १४२
गौरवी प्लवगनायका, मग श्रेष्ठ पुष्पक विमान [4]कामग ।
दे, तयांत [5]नुति [6]आयकों बसे, [7]कंदसाचि विभु, भक्त कोंवसे. ॥ १४३
जी [8]प्रियालि सरमा तिची [9]कळा, कन्यका, हितकरी, गुणोज्वळा; ।
ती त्रिवर्णसहिता [10]जटा बरी, तो सुपार्श्व, वर दे [11]तयां हरी. ॥ १४४
आक्रमी वर विमान तें नभा, भानुहूनि मिरवी [12]उणी न भा, ।
अंकिं घेउनि रमेसि राम, तो स्वानुजासह सुवीर [13]वानितो. ॥ १४५
श्रीस दाखवि [14]रणाध्वरावनी, तीपरीस हरिची [15]वरावनी ।
[16]तन्मनासि न गमेच, सेतुला त्या म्हणे मग 'तुला नसे [17]तुळा.' ॥ १४६
जें बिभीषणसमागमस्थळ श्रीस दावि हरिता [18]मनोमळ, ।
ऋष्यमूक मग दाखवी, वदे, 'या नगीं मज [19]सखा रडों न दे.' ॥ १४७
गाय [20]मित्रमणिच्या सुरीतिला, दाखवी प्रभु [21]गुहा, पुरी तिला, ।
[22]अंगदारणिस [23]भूमिजानि घे पुष्पकीं, मग पुरा निजा निघे. ॥ १४८
'चिंतिलें पुरविता [24]महामणी, या स्थळीं [25]द्विडसुवायुचा [26]फणी ।
भेटला पवनपुत्र, हा [27]खणी आधितें, म्हणुनि मी तुझा [28]धणी!' ॥ १४९
हें कथूनि [29]सरसीहि पाहवी, जी मुहूर्तभरि अश्रु राहवी, ।
प्रेमराशि शबरी तिची कथा ऐकवी, नुरवि जी [30]भवव्यथा. ॥ १५०
'खावया धरि कबंध देवरा, यातुच्या [31]हृतमनोगदे! [32]वरा ।

---

१. सैन्यासहित सुग्रीवाची पूजा करतो आहेस येणेंकरून मी संतुष्ट झालों. २. उत्साहयुक्त. ३. भरतास दिलेलें वचन. ४. इच्छेनुसार जाणारें. ५. स्तुति. ६. ऐकण्यासाठीं. ७. ही उपमा अति समर्पक आहे. ८. प्रियसखी. ९. अंश, कन्या. १०. त्रियुक्तजटा, त्रिजटा. ११. या सर्वांस. १२. सूर्याहून भा (तेज) उणी (कमी) न मिरवी. १३. चांगल्या वीरांची स्तुति करितो. १४. रणयज्ञभूमी. १५. श्रेष्ठभूमी, इंद्रलोक. १६. सीतेच्या मनास येईना. १७. तुलना, उपमा. १८. मनांतील पापाचें हरण करणारा. १९. सुग्रीव. २०. मित्रभेटाच्या. २१. राम राहिले होते ती गुहा व सुग्रीवाची नगरी. २२. अंगदमाता, तारेस. २३. भूमिपति. (राम.) २४. चिंतामणी. २५. द्विट्+असु+वायु=शत्रूच्या प्राणवायूचा. २६. शत्रुरूपी वायु भक्षण करणारा नागरूपी मारुति. २७. खणून टाकी, नाहींशी करी. २८. तूं मला भेटलीस याचें कारण मारुतीची सेवा होय. या श्लोकांत स्तुति झाली आहे अशी भक्ताची यजमानानें स्तुति केल्यावर मग आणखी काय पाहिजे? २९. पंपासरोवर. येथें रामानें सीतेसाठीं फार शोक केला होता. ३०. संसारताप. ३१. हरण केली अंतःकरणसंबंधी व्यथा जीणें अशी हे सीते. ३२. यातुच्या वरा–असा अन्वय.

मारितां वरुनि शापमुक्तितें, [1]तो कथी वि[2]रहशांतियुक्तितें. ॥ १५१
गौतमी सुमुखि! हे पहा, नमीं, मुक्ति 'जीहुनि' म्हणे 'लहान मी.' ।
पापतापहर साधुसे वट, प्रार्थितां करिति गोड सेवट. ॥ १५२
जो तुझा श्वशुर गृध्रराज, तो देवि! शक्रभवनीं विराजतो; ।
हा तदीय सति मित्रसा वड, '[3]प्राज्य पुण्य' म्हण यासि '[4]सावड.' ॥ १५३
कुंभजाश्रम सुलोचने! पहा, अत्रिचा सुमुखि! सन्निवास हा, ।
चित्रकूट, सखि! पोषि तो [5]महा, हा प्रयाग म्हणतो मला 'रहा'. ॥ १५४
ती दिसे नि[6]जपुरी पहा सये! जींत नित्य [7]भरतें [8]महास ये. ।
तातमित्रमुनिपादवंदना, पुष्पका! उतर [9]साधुनंदना! ॥ १५५
जोडें[10] हस्त; यमुना, सरस्वती, जान्हवी अवनिचें [11]वरस्व ती ।
[12]बाहती, खगरवें खुणाविती, प्रीति फेनहसितें दुणाविती.' ॥ १५६
स्वाश्रमीं प्रभुसि राहवी मुनी, तीहि [13]तत्पदभवा [14]महाधुनी. ।
वातपुत्र भरता, गुहाकडे पाठवि प्रभु; [15]यथोक्त तें घडे. ॥ १५७
मारुति प्रचुर हर्ष दे गुहा, भानुचा कर जसा सरोरुहा. ।
राममेघरव शीत वात कीं होय तो भरतबाळचातकीं! ॥ १५८
तो यथोक्त वनवास [16]सारुनी, [17]स्वर्गिभूमिसुरताप वारुनी, ।
घे निरोप मुनिचा, निघे हरी, त्या गुहासि पहिलें सुखी करी. ॥ १५९
मो[18]रसा भरत भक्त वाटला, मेघसा प्रभु रसेंचि दाटला, ।
भेटला करुनि यत्न(?) सानुजा [19]स्वांघ्रिपद्मरज रत्नसानु ज्या. ॥ १६०
हर्षले, विषयसेवना [20]गरं [21]मानिते अवनिदेव, नागर ।

---

१. कबंध. २. विरहदुःख कमी करण्याच्या युक्तीला. ३. पुष्कळ. ४. जमा कर. कारण पुष्कळ साधुसंत याच्या आश्रयास राहावयाचे. ५. आनंदाला, सुखाला. ६. अयोध्या. ७. भरती, पूर्णता. ८. उत्सवास किंवा आनंदास. ९. साधूंस आनंद देणाऱ्या! १०. पुनः सीतेस उद्देशून म्हणतो. ११. श्रेष्ठद्रव्य. १२. बोलावतात. पक्ष्यांच्या कर्णमधुर आलापांनीं खुणा करितात आणि फेन(फेंस)रूपी हसण्याच्या योगानें ममता दुप्पट वाढवितात. १३. परमेश्वराच्या पायापासून झालेली गंगा. १४. महानदी. १५. भरतास वचन दिलें होतें त्याप्रमाणें सर्व प्रकार घडून आले. १६. संपवून. १७. स्वर्गामध्यें व पृथ्वीवर होणारा देवब्राह्मणांचा ताप नाहींसा करून. १८. ही मेघमयूराची उपमा रामभरतांस किती तरी शोभते! १९. स्वतःच्या चरणकमलाचे रजःकण ज्या भरतशत्रुघ्नांस रत्नाकर मेरुपर्वतापेक्षांही श्रेष्ठ वाटतात. २०. विष. २१. मानणारे; अवनिदेव (ब्राह्मण) व नागर (अयोध्येचे लोक) हर्षले.

वेंचले विरहकुत्स वासर, हा म्हणे इतरउत्सवा 'सर.' ॥ १६१
वाद्य, गान, बहु नृत्य माजलें, उत्सवें पुर उदंड साजलें. ।
यासि देवैंपुर सर्व लाजलें; कीं यशें पैर असें न गाजलें. ॥ १६२
श्रीवसिष्ठ गुरु फार हर्षला; त्यांसि भेटुनि मुदश्रु वर्षला. ।
कीश यातुपति भेटले तया बंधुयुक्त भरता महोदया. ॥ १६३
श्रीस, कौशपवधूस दाविती प्रेम, तुल्यचि मनांत भाविती, ।
फार गौरविति सर्व सासवा, ज्या मता अदितिशाचि वासवा. ॥ १६४
बंधुयातुकपिराज शोभवी राम, कौम नयनेंहि लोभवी, ।
वेष घेउनि पुरीं, कळेवरीं जीवसाचि शिरला, प्रभा धरी. ॥ १६५
श्रीवरीं गुरुमुखर्षि हर्षले, तीर्थतोय विधियुक्त वर्षले, ।
राजराज विभु होय, कामितें दे, समर्पिल उदार कां मितें? ॥ १६६
यौवराज्य भरतासि देव दे, मारुतिप्रति 'अभीष्ट घे' वदे, ।
तो यशःश्रवण तोंचि सासुता, हें वरी, प्रभुहि दे जसा सुता. ॥ १६७
प्रीति नित्य बरवि प्रजावनीं, त्यांत चित्त वरविप्र ज्या वनीं, ।
सर्वदा नवनवा, सेवा सजीं, सेवुं दे न वन वासवास जी. ॥ १६८
श्रीरिपुघ्न लवणासुरा रणीं संहरी, पुरवि विप्रपारणीं; ।

---

१. विरहानें दोषास्पद झालेले दिवस संपले. २. पुष्कळ. ३. स्वर्गनगरी. ४. कारण. ५. इतर नगर. ६. राम, सीता, लक्ष्मणादिकांस. ७. आनंदाश्रु. ८. सुग्रीव, अंगदादि वानरपति, व यातुपति=बिभीषण. ९. सुखाचा उदय झाला आहे ज्याच्यामध्यें असा भरत. मोठी महोदयाचीच पर्वणी ही! १०. तारेस. ११. कौसल्यादि सर्व. १२. इंद्राला अदिती जशी मान्य तशाच या राममाता त्याला मान्य होत्या. अदिती ही इंद्राची मातुश्री. १३. रामचंद्र सर्वांस शोभविता झाला. १४. रामास पाहून सौंदर्याधिपती जो मदन यासही मोह उत्पन्न झाला आणि तो कळेवरा(प्रेता)प्रमाणें झालेली अयोध्यानगरी, हींत प्रत्यक्ष जीवस्वरूपी होऊन शिरला व त्या नगरीस शोभा देता झाला. १५. श्रीपति रामचंद्र यावर. १६. वसिष्ठप्रमुख ऋषी. १७. राज्याभिषेक विधियुक्त केला. १८. सार्वभौमराजा. १९. इष्ट वस्तु. २०. उदार रामचंद्र थोडथोडक्यांत समाधान मानून घ्या, असें कां म्हणेल? २१. तो मारुति. २२. स+असुता=सप्राणता=जोंपर्यंत प्राण आहेत तोंपर्यंत यश श्रवण व्हावें किंवा जोंपर्यंत रामकथा-गायन होत आहे तोंपर्यंत प्राण असावे. २३. प्रजा+अवन=जन+रक्षण. २४. श्रेष्ठ ब्राह्मण. २५. यज्ञ. २६. शत्रुघ्न.

तीनकोटि भरतेंहि मारिले[1] मत्त शत्रु, बहु साधु तारिले. ॥ १६९

(शार्दूलविक्रीडित छंद.)

झाले पुत्र कुशादि आठ, दिधलीं त्यां आठ राज्यें नवीं,
केलें धन्य चरित्र, हस्त बुडतां[2] सर्वांसि दे तें भवीं; ।
स्फारीं[3] गांगसुधारसीं गुण वसे जो तोचि नांदे लवीं[4],
सारें पाप समूळ भस्म करितें हे शक्ति नाहीं देवीं[5]. ॥ १७०

(अनुष्टुभ्वृत्त.)

'गदघ्नरामायण' हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणीं भावें अर्पिलें कृतवंदनें. ॥ १७१

---

## ४८. सुरामायण.

(भुजंगप्रयात छंद.)

रमाकांत घे ब्रह्मवाक्यें रवीच्या कुळीं जन्म, काव्यार्थ आद्या[6] कवीच्या; ।
करी दिग्रथाच्या[7] तिघी धन्य भार्या, सुरेंद्रादिकार्या करायासि आर्या[8]. ॥ १
सुत ज्येष्ठ जो तो घनश्याम राम; द्वितीया 'भरा'[9]न्तीं 'त' हें रम्य नाम; ।
तिजा लक्ष्मण ख्यात[10]; शत्रुघ्ननामा चतुर्थ; प्रभा देति हे[11] तातधामा. ॥ २
गुरु श्रीवसिष्ठ स्वयें वेद[12] दे हा, न होतां मना[13] आनना खेद देहा; ।
पितो[14] योग्य जाणूनि तोकां विवाहा, न चिंतील चित्तांत तो कां विवोहा[15]. ॥ ३

---

१. उन्मत्त शत्रु मारिले. २. 'बुडत्यासि हात द्यावा' या न्यायानें तें चरित्र संसारसागरांत गटकळ्या खाणाऱ्या लोकांस हात देऊन तारितें. ३. फार, पुष्कळ. ४. भगवच्चरित्राच्या एका लवामध्यें. ५. अग्नीमध्यें. ६. आद्यकवि जे वाल्मिकऋषी त्यांनीं रामायण केलें त्यांत 'विष्णु रविकुलामध्यें अवतार घेतील' असें विधान केलें होतें, तें सत्य करण्यास्तव; अगर कवि वाल्मिकास रामावतारीं काव्यस्फूर्ति होणार होती, ती सफल करण्यासाठीं. ७. दशरथाच्या. दिशा दहा म्हणून दशरथासच दिग्रथ म्हणतात. ८. श्रेष्ठकार्यास, करावयासाठीं. ९. 'भ, र' याच्या शेवटीं 'त' म्हणून 'भरत.' १०. या नांवाचा, या नांवानें प्रसिद्ध. ११. चौघे पुत्र बापाच्या घराला शोभा देते झाले. १२. वेदादि विद्या वसिष्ठानें स्वतः शिकविली. १३. विद्यादानाची वसिष्ठपद्धति आलीकडील पंतोजींनीं ध्यानांत ठेवावी. मनाला, तोंडाला, किंवा शरीराला कष्ट न देतां, गुरुजींनीं शिष्यास विद्यापारंगत केलें. १४. तोकां (मुलांस) विवाहायोग्य जाणूनि तो पिता (दशरथ) चित्तांत विवाहा कां न चिंतील? यांचा विवाह व्हावा म्हणून श्रीलक्ष्मीनारायणाचें चिंतन त्यानें सुरू केलें. १५. गरुडवाहनाला विष्णूला.

[1]मखाच्या मनीं सिद्धिचा [2]आधि ज्याला, पिता दोन दे पुत्र त्या गाधिजाला; ।
[3]शत [4]स्वानुगा रामभद्रास अस्त्रें मुनी दे जशीं शर्मशोभार्थ वस्त्रें. ॥ ४
पथीं ताटकाख्य द्विजत्रास वारी; वधी सर्व सिद्धाश्रमीं [5]वासवारी. ।
करी सिद्ध हर्षे [6]मुनीश [7]क्रतूतें, वदे, 'राघवा! आर्जवू [8]शक्र तूतें.' ॥ ५
न मोहांत दुःखें [9]कणेना शिला जी, तिचा [10]तो कृपेच्या कणें नाशिला जी! ।
हरी जो रजाच्याहि [11]उग्राघ वातें, स्तवी त्या [12]दयातोयमुग्राघवातें. ॥ ६
[13]चुरी [14]पार्वतीजानिच्या कार्मुकातें; वरी जानकी [15]श्रीदयावार्मुकातें. ।
तिघींनीं तिघांलाहि दे [16]तो [17]महातें; करी जो स्वरूपीं [18]भिदाहोम हातें. ॥ ७
दिसेना [19]जयाच्या परा मार्ग [20]वातें, रघूत्तंस भंगी तया भार्गवातें. ।
यशें या करी दीन तो [21]कापुराला, [22]सुखें दे, जसा तात तोका, पुराला. ॥ ८
[23]युधाजित् स्वगेहासि ने [24]भानुजाला, स्तवी त्या स्वसेच्या [25]सुता [26]सानुजाला. ।
'[27]क्ष्मानंदना आपला भाव देतों,' असें वृद्ध राजा मुखें 'हा!' वदे तों ॥ ९
रुसे [28]मध्यमा स्त्री, करी आग्रहातें, [29]स्वसौभाग्य नाशावया [30]सांग्र हातें; ।
पतीच्याहि ती तापवी [31]विग्रहातें, नि(न?)घे [32]निग्रहातें करी [33]विग्रहातें. ॥ १०

---

१. यज्ञाच्या सिद्धीचा. २. काळजी. ३. शंभर. ४. आपल्या पाठीमागून जाणारास. ५. इंद्राचे शत्रु. ६. विश्वामित्र. ७. यज्ञ, मख. ८. 'तुझें बल पाहून इंद्रही तुझें आर्जव करो,' असा आशीर्वाद दिला. ९. कुंथेना, ओरडेना. १०. मोह; शाप. ११. भयंकर पातक पदरजःकणाचे वाऱ्यानें हरण करितो. १२. दया+तोय+मुक्+राघव=दयारूप उदकाला सोडणाऱ्या राममेघातें. १३. मोडी, चूर करी. १४. पार्वतीपति महादेवाच्या. १५. लक्ष्मी आणि अनुकंपा हें जल तें वर्षणारा मेघ जो रामचंद्र त्याला. १६. जनक. १७. आनंदाला. १८. भेदहोम. द्वैताची आहुती जो हातानें ब्रह्मस्वरूपाग्नीमध्यें टाकिता झाला. जनक राजा जीवन्मुक्त होता, हें प्रसिद्ध आहे. १९. ज्याच्या पलीकडे. २०. भयंकर वारा सुटला होता म्हणून. 'तत्र वायुः प्रादुर्बभूव ह.' (वा० रा० बालकांडे चतुःसप्ततितमः सर्गः.) २१. कापुराला स्वयशानें दीन करणें. हा प्रतीप अलंकार. २२. तात तोकां (मुलांना) सुखें देतो, तसा रामचंद्र पुराला (अयोध्येला) सुखें देता झाला. २३. कैकेयीचा भाऊ. २४. भरताला. २५. भरत. २६. शत्रुघ्नासह. २७. 'पृथ्वीला आनंद देणाऱ्या रामाला मी आपला भाव (आपला अधिकार) देतों' असें दशरथ म्हणूं लागला. राम जांवई म्हणून व राम सद्गुणी म्हणून पृथ्वीस आनंद देणारा राम होता. २८. मधली स्त्री कैकेयी. २९. स्वतःचें सौभाग्य (कुंकू, कंकणें इत्यादि सुवासिनीचे अलंकार; तात्पर्य आपला पति) हातानें नासण्यासाठीं आग्रह करी. स्त्रियांच्या मूर्ख आग्रहाचा परिणाम पहा. ३०. सर्व. ३१. शरीरातें. ३२. निग्रहातें न घे=कोणाचें ऐकेना. आहे असाच पाठ ठेवल्यास कैदेंत जाण्यास निघे. (तयार झाली.) पहिला पाठ बरा. यमकरचना पहा. ३३. वैरातें.

म्हणे, 'जाणसी धर्म तूं, देव! दोने[1] स्वयें जे दिले ते न जी दे [2]वदोन, ।
तया दंड; हें जाणिजे पामरांनीं, वसावाचि चौदा [3]समा राम रानीं. ॥ ११
भजो यौवराज्या पदा वत्स माजा, द्वितीयें वरें; मान्य हो [4]सत्समाजा; ।
न निष्ठा बरी सत्यधर्मी नरा ज्या, [5]इहामुत्र त्या भाग [6]शर्मी न राजा!' ॥ १२
जरी प्रार्थिली बायको [7]कामदानें, न ती आयके सर्वथा [8]सामदानें. ।
[9]नसाया [10]चिरं क्षमापती, सासु 'नेस' स्वयें 'वल्कलातें' म्हणे [11]मासुनेस. ॥ १३
[12]भिडेनें उरासींच ने सून [13]ती [14]तें; वसिष्ठें दिलें वल्क नेसूं [15]न तीतें. ।
नमी राम [16]वक्रांत '[17]हाँ!' स्थापि त्यातें, धरूनि [18]स्वधर्मींच आस्था, पित्यातें. ॥ १४
निघे राम तो लक्ष्मणस्त्रीसहाय, म्हणायास लावी [19]पुरश्रीस 'हाय!' ।
पथीं [20]पत्ति पाहोनियां नंदनातें बसायास धाडी नृप स्यंदनातें. ॥ १५
रडे, राममातेच्चिया जाय गेहा, म्हणे, 'घातकर्ता नव्हे काय गे!' [21]हों?' ।
वृथा सेविलें त्वां कृतघ्ना [22]अशाला, [23]नशाला हिता जी प्रिये! ती [24]अशाला.' ॥ १६
निजेल्या स्थळीं पौर जोडूनि [25]पाणी [26]त्यजी, जाय मीनांस सोडूनि [27]पाणी! ।
सखा राम भेटे गुहाख्या निषादा, तयाच्या निवारी विचारें [28]विषादा. ॥ १७

---

१. दोन वर. २. 'दिले' असें म्हणून. ३. वर्षे. 'संवत्सरो वत्सरोऽब्दो हायनोऽस्त्री शरत्समा:' इत्यमरः. ४. साधुपुरुषांना तूं मान्य व्हावेंस. चांगलें आचरण करावेंस. ५. इह+अमुत्र. येथें व स्वर्गलोकीं. ६. कल्याणांत, सुखांत वांटा नाहीं मिळत. ७. त्या स्त्रैण राजानें. स्त्री मागेल तें देणाऱ्या राजानें. ८. सामदानाला ती ऐकेना. ९. क्षमापती (पृथ्वीपति राजा दशरथ) चिर नसावा यासाठीं सासु (कैकेयी) स्वयें सासुनेस 'वल्कलातें नेस' म्हणे. हा एक अन्वय; किंवा क्षमापती चिर सासु (सप्राण) नसाया, स्वयें (कैकेयी स्वतः) सासुनेस 'वल्कलातें नेस' म्हणे. अर्थ एकच. व्याकरणदृष्ट्या भेद आहे. स्वयें हें सीतेकडेही लावितां येईल. स्वयें (स्वतः) नेस. पण यांत मजा नाहीं. सीतेला वल्कलें नेसविणें याचाच अर्थ दशरथाचा प्राण जाणें असा व्हावयाचा होता! १०. बहुकाळ. ११. लक्ष्मी जी सून तीस. १२. सासूच्या आग्रहाची भीड पडली म्हणून. १३. सीता. १४. वल्कल. १५. सीतेला नेसूं दिलें न. १६. मुखांत 'हाय हाय' असे शब्दाचें बिऱ्हाड ज्यानें केलें आहे अशा पित्याला राम नमी. १७. हाय! १८. पुत्रधर्मांचे ठायीं आस्था ठेवून. १९. अयोध्येच्या शोभेस. **पर्यायोक्ति** आहे. शोभा नष्ट झाली असें सांगावयाचें होतें. २०. पादचारी. २१. हा मी दशरथ. २२. मी जो असा त्याला. २३. नाश करण्याला जी हिता (अनुकूल). २४. शाला नव्हे. २५. हात. २६. रामानें त्याग केला. पौरजन निजले होते त्यांस नमस्कार करून राम निघून गेला. पुढील **दृष्टांत** मनोहर आहे. २७. जल. २८. सामोपचाराच्या गोष्टी सांगून खिन्नतेला अस्तंगत केलें.

रचीती वटाच्या पयें[1] ते जटा कीं; म्हणे वेष त्यांचा 'परा[2]! तेज टाकीं.'।
तरे स्वर्धुनीतें, वरी देव नौका, वनीं वाट याला बरी दे[3] वनौका[4]. ॥ १८
भरद्वाज जो त्या करी राम हर्षी, स्मरेनाचि[5] तेंव्हां शरीरा महर्षी. ।
तदुक्तें पथें चित्रकूटासि गेला, खळाचें असत्कर्म आलें सिगेला[6]. ॥ १९
पुरीं तोंड झांकूनि ये[7], हात जोडी, कथी सूत वृत्त; प्रभु[8] स्नेह[9] तोडी; ।
वदे शाप देवीस[10], नामींच[11] गोडी धरी, चिंतितां राम तो प्राण सोडी. ॥ २०
वसिष्ठें सुत[12] क्षिप्र तो आणवीला; तिणें[13] घातही अर्थसा जाणवीला: ।
म्हणे साधु[14] 'तो 'धिक्' तितें, आपणातें. तिच्या सुज्ञ चालों नदे हा पणातें[15].२१
स्वनिर्लोभता ज्येष्ठराजप्रियेतें[16] कथी तो, करी सांग तातक्रियेतें[17]. ।
'वरीं राज्य हें' आर्य[18] तोखें वदे त्यां, शिवों दे तयातें[19] न, तो खेंव[20] देत्या.[21] ॥ २२
न झालीच मान्या तदाज्ञा[22] तया, तें तदौद्धत्य[23] दे श्री तदा ज्ञातियातें[24]; ।
निघे पौर घेऊनि आंगें अरण्या, अयोध्येसि आणावया त्या शरण्या[25]. ॥ २३
कळे स्पष्ट तद्भक्ति सत्या[26] गुहातें, म्हणे, 'जें सुजीवित्व न त्यांगु हा तें[27].' ।

---

१. चिकानें. २. षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताला. 'शत्रूला' असाही अर्थ होईल. **प्रतीप** अलंकार आहे. ३. चांगली दाखविली. ४. वन+ओक=वनामध्यें रहाणारा (गुहक) तो. 'वनौका:'चा विसर्ग जाऊन 'वनौका' झाला. ५. देहभान महर्षी विसरला. काय आनंदातिरेक हा! ६. कांठोकांठ भरण्याला. शिगेस येणें=पूर्ण होणें. **लोकोक्ति** आहे. पापाचा घडा पूर्ण भरला, म्हणून राम चित्रकूटास आले! It came to a head याचा अर्थ 'शिगेस येणें' होय. ७. सुमंत्र सारथी तोंड झांकून आला. ८. दशरथ. ९. माया, ममता टाकिता झाला. १०. कैकेयीस. ११. अंतकालीं नामस्मरणाचा महिमा फार सांगितला आहे. १२. पुत्र भरत. १३. कैकेयीनें. १४. लाभच आहे असें सांगूं लागली. १५. 'भरतास राज्यावर स्थापीन' हा तिचा पण त्याला. १६. वडील राजभार्या (कौसल्या). १७. बापाची और्ध्वदेहिक क्रिया तिला. १८. गुरुवसिष्ठ. यांचा आनंद उसनाच आणलेला असला पाहिजे. १९. भरताला. २०. राज्याला. २१. खेंव देत्या=दुर्दैव उत्पन्न करणाऱ्या राज्याला तो शिवों न दे. म्हणजे ज्यापासून बाप मरणें, भाऊ वनवासास जाणें, वगैरे दुष्ट गोष्टी घडल्या त्या राज्याला भरत शिवला सुद्धां नाहीं. खेंव=आलिंगन असा अर्थ केल्यास ह्याचा संबंध दोन्हीकडे घेऊन अर्थ करावा लागेल. पण हा गौण पक्ष होय. २२. वसिष्ठाची आज्ञा. २३. तत्+औद्धत्य=त्या भरताचा उद्धटपणा. २४. शहाण्या लोकांस उत्साह प्राप्त झाला. भरताचा गुर्वाज्ञाभंग साधूंस आनंद देता झाला. **विरोध** आहे. 'देवभेटीं जेणें घडे अंतराय। हो कां बाप माय त्यजावीं ते ॥.' २५. शरण जाण्यास योग्य अशा श्रीरामास. २६. सन्मार्गानें चालणाऱ्या, सत्यप्रिय. २७. 'हा भरत आपले प्राण न टाको.' राम परत येणार नाहीं हें गुहास ठाऊक होतें म्हणून तो असें बोलत आहे.

तया[1] वाट गंगेंत दे तो[2] ससेना, सुभक्ता जगीं विघ्नकर्ता असेना[3]. ॥ २४
भरद्वाज जाणे न हें[4] मत्त, 'पाहो' म्हणे 'सिद्धि, सार्थक्य या मत्तपा हो'. ।
नमस्कारि तो[4] धीर सिंहासनातें[5], पित्याचेंचि दे वीर[6]सिंहास नातें. ॥ २५
धरी, जेंवि भेटों नदा[7] याद[8] वाटे[9], भला लक्ष्मणा तो[4] न दायाद वाटे. ।
तया तापल्या[10], 'स्वस्थ हो' राम हातें[11] म्हणे, पातला भव्य[12] होरा महातें. ॥ २६
तनुत्राण[13] देहें, करें चाप, दास[4] त्यजी; तो धरी अग्रजाच्या पदास. ।
पित्याच्या कथीं साश्रु हा वर्तमाना; क्षण भ्रांतिदा[14] त्यांस आवर्त[15] माना. ॥ २७
जयाच्या नसे स्थान तापा दुकानीं, करी तो सुखी त्या नता पादुकानीं. ।
करी जो यशें धन्य विश्वा सदा, त्या निघे भक्त वंदूनि विश्वासदा[16]त्या. ॥ २८
न राहे पुरीं त्या; न तो खेद सोडी; न घे[17] वल्कधारी, न तो खेद[18]सोडी. ।
विकारा[19] भुजंगा दिसे वीन भा जी, न ती जाय; कंदादि सेवी, न भाजी. ॥ २९
निवाया जसा मानसा [20]हंसपत्री, तया(सा?) जाय[21] त्या आश्रमा ज्यांत अत्री. ।
शिवे काम कोपाग्निची ज्या न [22]कीला समर्ची[23] तयाची सती[24] जानकीला. ॥ ३०
वधी दंडकारण्यविघ्ना विराधा, म्हणे तो ऋषींतें 'न धाकें विरा[25], धा.' ।

---

१. भरताला. २. गुह. ३. येथें **अर्थांतरन्यास** आहे. या पद्यांतील चतुर्थचरणानें पंतांचें भक्तत्व, ईश्वरावर निष्ठा आणि आयुष्यांतील उत्साह व्यक्त होतात. ४. भरत. ५. सिंहाचें आसन घालून बसलेल्या रामाला. ६. रामास हें विशेषण शोभा देतें. बापाप्रमाणें रामास भरतानें नमस्कार केला. येथील यमकचमत्कार संस्मरणीय आहेत. ७. मोठी नदी. ८. जलचर. ९. मार्गाला धरी. १०. संतापलेल्या. ११. हातानें खुणाविलें. भरत लांब होता अजून. १२. कल्याणकारक वेळ (मुहूर्त) अमृतसिद्धियोगाप्रत पावली. होरा हा दिवसाचा चोविसावा भाग आहे. ही विभागपद्धति **खाल्डियन** लोकांपासून आपण सुमारें ख्रि० श० पूर्वी दहाव्या शतकाच्या अगोदर घेतली असा कै० **शं० बा०** दीक्षित यांचा अभिप्राय आहे. 'अहोरात्र' यांतील अवत्र काढले म्हणजे होरा होतो असें वराहमिहिराचें म्हणणें आहे. १३. देहसंरक्षण देहानें सोडिलें, हातानें चाप सोडिलें! १४. भ्रांति उत्पन्न करणाऱ्या वर्तमानास. १५. भोंवरा. शोक देणारें संसारचक्र. १६. विश्वास उत्पन्न करणाऱ्या त्या रामास वंदून भक्त (भरत) निघाला. १७. कांहीं उपभोग घेईना. १८. काडीभर सुद्धां. दशा याचें क्षुल्लकतादर्शक रूप. १९. विकाराविना (विषावांचून) भुजंगा जी भा दिसे (शोभा दिसते) ती कदा न जाय. उत्तम शस्त्र म्हणजे विष नाहींसें झालें असतां भुजंग जसा निस्तेज दिसतो, तसा भरत रामावांचून निस्तेज दिसूं लागला. त्याचें संन्यासीत्व याच ओळींत आहे. २०. हंसपक्षी. २१. राम जाय (गेला). २२. ज्वाळा. २३. पूजा करी. २४. अनसूया. २५. धाकानें विरघळून जाऊं नका. धा=समाधानांत असा.

तया ईश्वरा पूजिती विप्र भावें, न ज्याचीं कधींही यशें [1]विप्रभावें. ॥ ३१
अगस्त्यर्षि तो राघवें वंदिला हो, म्हणे, 'नम्र' जो [2]जिष्णुच्या [3]मंदिला 'हो'. ।
[4]सुराधीश्वरस्थापितें विष्णुशस्त्रें दिलीं, कुंभजें जेंवि पूजार्थ वस्त्रें[5]. ॥ ३२
प्रभु प्रार्थिला कीं, 'सदा [6]मत्तपानें न जे भस्म केले [7]कुधी मत्त [8]पानें ।
वधावेचि; लीला करावि; प्रभो! गा, म्हणावें कवींतें; हरा [9]विप्रभोगा.' ॥ ३३
पित्याचा सखा जो जटायु, प्रभूतें वनीं जाहला वंद्य भाग्यें [10]प्रभूतें; ।
म्हणे त्या, 'तुझी सून सीता वनांत स्वयें रक्ष; बा! कीर्ति [11]भीतावनांत. ॥ ३४
करी [12]आश्रय ब्रह्म गोदावरीतें, स्वयें सच्चिदानंद मोदा [13]वरीतें! ।
शुभ स्थान जें पंचवट्याख्य, शाला रची त्यांत सौमित्रि रम्या विशाला. ॥ ३५
[14]स्वसा रावणाची सजी [15]आं(अं?)गलीला, [16]मनुष्या म्हणे, 'घे मला चांगलीला;' ।
प्रिया जी [17]सुजीवातुसी ताप तीतें [18]कुधी दे, करी क्रुद्ध सीतापतीतें. ॥ ३६
जयाच्या करीती सदा वर्णना [19]सां, [20]तयां लंघितां हारवी कर्णनासा. ।
[21]तिचें ये वधा सैन्य कैवारि तें [22]हो! म्हणे त्या प्रभु, '[23]क्षीणदैवा! रितें हो.'॥३७
कथी रावणा ती, 'तुला जी वश स्त्री करायासि गेल्यें, तिचा [24]जीव शस्त्री ।
करी हे दशा, प्राण [25]तांवी, रमाया हरीं [26]रत्न, तूं जाणता वीर [27]माया.' ॥ ३८
कुधी पाठवी हेमवर्णा कुरंगा; म्हणे [28]श्री, 'धरा, शीघ्र नेऊं [29]सुरंगा.' ।

---

१. विगतप्रभाव अशीं. २. इंद्राच्या. ३. मंदील हें शिरोभूषण आहे. येथें **पर्यायोक्ति** असून रामचंद्राच्या नम्रताशीलत्वाचा **ध्वनि** आहे. ४. इंद्रानें दिलेलीं. वा० रा० 'अरण्य-कांड–सर्ग १२ श्लोक ३२-३३ पहा. ५. **उत्प्रेक्षा** आहे. जणूं राक्षसवधाचीं वस्त्रेंच समर्पण केलीं! ६. माझ्या तपोबलानें. ७. वाईट बुद्धीचे राक्षस. ८. मद्यपानानें. Drinking व पान हे शब्द मद्यपानच सुचवितात हें आश्चर्य आहे! ९. ब्राह्मणताप हरण करा. १०. पुष्कळें. 'भाग्यें' या शब्दाचें विशेषण. जटायूचें हें भाग्य! ११. भीत+अवन=भीतांचें रक्षणांत. आम्हीं पिरामचिन्हें दिलीं आहेत त्यांवरून तुझी दीनदयाळूमध्यें कीर्ति होईल, असा अर्थ निघतो. १२. राहण्याचें ठिकाण, आधार. १३. येथील **विरोध** गमतीचा आहे. शब्दवाच्य नाहीं. १४. रावणभगिनी शूर्पणखा. १५. अंगविक्षेप. १६. रामाला. १७. उत्तम बांचण्याचें औषधशी सीता तिला. १८. राक्षसी. १९. सहा शास्त्रें. २०. त्या शास्त्रांचें उल्लंघन केल्याबरोबर, अन्याय्य वर्तन केल्याबरोबर. २१. तिचें कैवारी (तिचा पक्ष उचलणारें) सैन्य वधा ये. २२. अहो. २३. क्षीण भाग्य झालें आहे ज्याचें अशा सैन्या! आतां रितें (कमी, नाहींसें) हो. २४. प्राण, प्राणपति, नवरा. २५. प्राण खर्च कर. हें रत्न हवें असेल तर, उत्तम यत्न कर. २६. सीतारत्न. २७. कपटवीर तूं आहेस. २८. सीता. २९. चांगला आहे वर्ण ज्याचा. कुरंगसुरंगयोग मनोरम होय.

निघे शूर, ने दूर मारीच राया, शरें शत्रुच्या राम मारी [1]चरा या. ॥ ३९
प्रभूसाचि मारी कुधी हाक, दापी विवेका, न लोपे जरी हो कदापी, ।
क्षण क्षिप्र लोपोनि दे कांप तीतें, न मानील [3]अत्यार्त ती कां पतीतें? ॥ ४०
म्हणे लक्ष्मणा, 'रक्ष, बा! दे[4]वेरा! जा, उपेक्षूं [5]नये संकटीं देव राजा.' ।
वदे तो सुधी, 'देवि! हे होय माया, कथी ते[6]ज कीं नम्र तूं हो यमा या?॥ ४१
महीजा म्हणे, 'रामभद्रें मरावें, हरावें मला, आत्मपत्नी [7]करावें; ।
असें त्वां कसें पाप चित्तीं धरावें? [8]सरावें न हें, न [9]प्रजेशें तरावें.' ॥ ४२
असी सज्जना जाचिती होय, 'शाला, न सेवीं,' म्हणे 'जाचि' ती हो [10]यशाला ।
न [11]बाळासि दे वीज सीता पहा या, [12]महाशोक देवी जसी ताप हाया. ॥ ४३
उडे धैर्य त्याचें, जसें [13]पर्ण वातें, भजों जाय तो मीन त्या अर्णवातें, ।
जया सर्परूपापुढें भेकलीला [14]परी ये, हरी [15]उग्र तो एकलीला. ॥ ४४
[16]स्वहंसास मारूनि हाका '[17]वळा हो!' म्हणे, 'शीघ्र या, भग्न हा कावळा हो. ।
जटायु स्वयें सून कां सोडवीना?' गमे फार तत्कर्म तें गोड [18]वीना. ॥ ४५

---

१. शत्रूच्या या दूता. २. जरी सीतेचा विवेक कधीं लुप्त झाला नाहीं, तरी या वेळीं त्याच्यावर दाब बसला! ही राक्षसी माया! ३. अतिपीडित. भ्रम झाल्यावर असें वाटणें सहजच आहे. ४. 'दीर' हा 'देवरा'पासूनच झाला. ५. संकटकाळीं देवास व राजास सोडूं नये. याचें नांव धर्मनिष्ठा व राजनिष्ठा. ६. चाकूची धार. **अप्रस्तुतप्रशंसा** हृदयंगम आहे. चाकूनें यमाला नम्र हो म्हणणें आणि कुरंगानें रामास घाबरें करणें सारखेंच होय. ७. व्याकरणकारांनीं हा प्रयोग पहावा. ८. हें पाप कधीं संपणार नाहीं. अनंत काल-पर्यंत दुःख देणारें हें पाप आहे. ९. रामाची सुटका यानें होणार नाहीं. प्रजेश म्हणजे दशरथ घेतल्यास तुझे पूर्वज पातकांत पडतील अशी भीति सीता घालीत आहे. १०. लक्ष्मण म्हणजे प्रत्यक्ष यशच त्याला तिनें घालविलें. लक्ष्मण सद्गुणी म्हणून 'यश' शब्दानें **अतिशयोक्ति** झाली. शिवाय यश गेल्यावर रावणानें तिचा अपहार केला म्हणून 'यश' म्हणजे सौभाग्य होईल. ११. मुलाला. येथें यमकचमत्कार आहे. १२. पहा कीं जशी देवी सीता या (लक्ष्मणाली) महाशोक (अत्यंत शोक) ताप व हायाला देती झाली, तशी वीज बाळाला ताप देत नाहीं; असा अन्वयार्थ दिसतो. यमकरचनेसाठीं दूरान्वय झाला आहे असें वाटतें. दुसरा अन्वयार्थ निघाल्यास उत्तम! १३. **उपमा** समर्पक होय. भजों=भजण्यासाठीं. मीनार्णवाचें **रूपक**ही उत्तम होय. ज्या प्रत्यक्ष सर्पापुढें. भेक=बेडुक. १४. पाठीमागें होतात, नाहींशा होतात असा रावण? १५. राक्षस. १६. आपले जे प्राण रामलक्ष्मण त्यांस हाका मारून. हंसकावळा यांचें वैर स्पष्टच आहे. **रूपक** आहे. १७. फिरा. १८. वी+इना= जटायूस हें कर्म फार गोड वाटलें.

रथातें स्वचंचुप्रहारेंचि चूर प्रतापें करी वृद्ध तो फार शूर. ।
[1]कृपाणें [2]तया दुष्ट दिक्कंठ ताडी, अधर्मे रणीं भग्न हो[3]ऊन पाडी. ॥ ४६
[4]क्षतांहीं, भयें, कश्मलेंही गळाला, तरी श्रीस घेऊनि वेगें पळाला, ।
अळंकारवस्त्र प्लवंगांत [5]सोडी, नभामाजि हाका स्वनाथासि [6]फोडी. ॥ ४७
समुद्रासि लंघूनि लंकेंत देवी अशोकीं वनीं दुष्ट दिक्कंठ ठेवी. ।
कथी साश्रु सौमित्रि तें वृत्त, राम प्रभु क्षिप्र ये, शून्य पाहे [7]स्वधाम. ॥ ४८
तसा हाहि बोले जसा 'हाय!' [8]कामी, म्हणों प्रे[9]मळा काय? तें आयका मी, ।
वनीं जानकीतें म्हणे 'हाय!' [10]शोधी, विलोकी [11]तशा गृध्रपा हा यशोधी.॥४९
पुसे राम, पक्षी कथी खेदें[12]; '[13]शास्यें वधू नेलि, केली दशा [14]हे दशास्यें!' ।
प्रभूच्या त्यजी देह तो गृध्र अंकीं, बुडों दे [15]जडा नाम ज्याचें न पंकीं. ॥ ५०
पि[16]त्र्यांची तसी तत्क्रिया सांग केली, लयातें [17]कबंधार्ति तत्काळ नेली. ।
दिली सद्गती क्षिप्र भिल्लीस, कंपा जरी [18]हे, तरी होय धन्याचि पंपा. ॥ ५१
जया जन्म देतां वरी अंजना [19]भा, हनूमान् वनीं भेटला [20]कंजनाभा. ।
सुकंठासि तो भेटवी जानकीशा, [21]अभी ऋष्यमूकाविना ज्या न [22]कीशा.॥५२

---

१. तरवारीनें. 'करवालः कृपाणवत्' इत्यमरः. २. त्या जटायूला. ३. होववून, करून. ४. पापाचरणाची कोण दुर्दशा ही! रावणाला जखमा झाल्या, रामाची भीति उत्पन्न झाली व आपण पाप केलें असें त्यास त्याचें मनच टोंचूं लागलें. येणेंकरून तो थकून गेला तरी. 'कामातुराणां न भयं न लज्जा' हा अनुभवच नेहमीं येतो० काय? ५. सीता सोडती झाली. ६. फोडी या शब्दानें अनाथ गाईची आठवण होते; नाहीं बरें? पण काय, अरण्यरुदितच हें! ७. आपलें गृह. ८. कामी पुरुष पत्नीविरहानें हाय म्हणतो तसा. ९. मी प्रेमळा (प्रेमपूर्ण रामाला) काय म्हणों? जें म्हणतों तें आयका. मी त्याला कामी म्हटलें! 'प्रेमालय'पासून 'प्रेमळ' झाला. कामी हा शब्द रामचंद्रास लाविला म्हणून कवीस संकोच वाटत आहे. १०. जानकीतें शोधी. ११. मरणासन्न झालेल्या. १२. खेदकारक गोष्ट. १३. शासन करण्यास योग्य अशा. १४. ही माझी दशा. १५. ज्याचें नाम सुद्धां जडा पंकीं बुडों न दे! नामाचा हा महिमा तर प्रभुसमक्ष, प्रभूच्या अंकावर, जटायूसारख्याला मरण येणें हें केवढें भाग्य! तो तरावयाचाच, मुक्तीच्याच घरीं जाणार तो! १६. वडिलांसारखी. १७. कबंध+आर्ति=कबंधदैत्यरूपी पीडा. किंवा कबंधाची शापरूपी पीडा. १८. ही पंपा कंप देणारी तरी रामदर्शनानें धन्यच. १९. तेज. २०. कंज (कमल) आहे नाभीमध्यें ज्याच्या असा विष्णु, राम त्याला. २१. निर्भयपणा. वालीला ऋष्यमूकपर्वतावर येतां येत नव्हतें म्हणून तो निर्भय. २२. वानरश्रेष्ठा. (सुग्रीवा.)

[१]अळंकार दे प्रेमपात्रा सखा [२]तो, म्हणे, 'बा! मला वाळिचा त्रास [३]खातो.' ।
कथा या [४]सख्या हा निवेदी [५]नयज्ञा, पहातां समृद्धा [६]निवे दीन यज्ञा. ॥ ९३
वधी वाळिला, [७]भानुजा राज्य दे हा, [८]तयाच्या वरी श्रीसुख प्राज्य देहा; ।
म्हणे, 'दुःख कांहीं वहावें न [९]दीनें, [१०]श्रितां तृप्ति द्याया वहावें [११]नदीनें. ॥ ९४
दिशा तीन शोधूनि मासांत मागें कपि क्षिप्र आले [१२]असंस्पृष्ट [१३]आगें. ।
[१४]न ते [१५]दक्षिणाशेसि जे पाठवीले, तिहीं स्वापराध स्वयें आठवीले. ॥ ९५
असें बोलिले, पावले कीश मोहा, 'स्वजीवाहिचा [१६]आधिकेकी शमो हा. ।
जटायू वरी कीर्तिहारा, मराया जगीं जन्मलों व्यर्थ! हा रामराया!' ॥ ९६
महेंद्राचळीं गृध्र [१७]संपातिनामा पुसे, स्वानुजा तोय दे, गाय रामा; ।
कथी अब्धि [१८]ऐशीं पुढें वीस गांवें, दिसे स्पष्ट लंकेंत ती जीस गावें. ॥ ९७
कथी तो स्वपक्षांचिया [१९]अत्ययातें, तदुत्पत्तिनें दे [२०]तयां प्रत्ययातें, ।
स्तवें जांबवान् वाढवी मारुतीतें, म्हणे, 'रक्ष, न क्लेश बा! मारु [२१]तीतें.' ॥ ९८
उडे, त्यासि सिंधूंत [२२]उत्साह तारी, वरी [२३]वीशाही [२४]पक्षकुत्सा हतारी. ।

---

१. सीतेनें टाकिलेले. श्लोक ४७ पहा. २. सुग्रीव. ३. उघडच आहे. 'सजीवं दहते चिंता.' ४. या रामाला आपली मूळकथा हा सुग्रीव सांगता झाला. ५. राजनीतिविशारदाला. ६. समृद्धा यज्ञा (विष्णूला) पाहतां दीन निवतोच. मग सुग्रीवसमाधान होण्याला काय अडचण आहे? 'यज्ञो ह वै विष्णुः.' ७. सुग्रीवाला. हा=राम. ८. सुग्रीवाच्या देहा श्रीसुख (राज्यसुख) प्राज्य (पुष्कळ) वरी. ९. रामचंद्रानें. काय चमत्कार आहे? जो सुग्रीव वालीवधापूर्वीं दीन होता तोच रामचंद्रानें वाली मारल्याबरोबर रामास गोष्टी सांगू लागला! १०. आश्रिता. ११. गंगेनें. **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १२. न स्पर्शिलेले. १३. अपराधें. महिन्याच्या आंत परत नाहीं आले तर वानरांस शिक्षा करूं म्हणून सांगितलें होतें. १४. आले नाहींत. १५. दक्षिण+आशा=दक्षिणदिशेस. १६. तापत्रय हा केकी (मोर) शमवो. स्वजीव हाच सर्प होय. १७. जटायूचा थोरला भाऊ. १८. गांव=चार कोश. ऐंशी+वीस=शंभर गांवें समुद्र आहे असें सांगे. १९. नाशातें. संपातीचे पक्ष जळून भस्म झाले होते. वानरदर्शन झाल्याबरोबर पुनः ते फुटले. २०. वानरांना प्रचीती आली. २१. सीतेला क्लेश होऊन मरण न येवो! २२. कोणत्याही अवघड कृत्यांत उत्साह Enthusiasm तारण करणारा होतो, हा अनुभव सर्वत्र आहे. २३. वि+ईश=पक्षिश्रेष्ठ गरुड. २४. हतारी (मारिले आहेत शत्रु ज्यानें) असा वीशही पक्षकुत्सा (आपल्या पंखाविषयीं तिरस्कार) वरी. म्हणजे मारुतीच्या उड्डाणाचा प्रचंड वेग असा आश्चर्यकारक होता कीं गरुडासही आपल्या पंखांचा तिरस्कार उत्पन्न झाला. **प्रतीप** अलंकार आहे.

म्हणे लंघितां 'धन्य! मै[1]नाकरीती.' स्तवातें सु[2]री जेंवि मैना करीती. ॥ ५९
करी तोंड [3]जी योजनें पांच वीस, गमे जेविला हा[4] तिच्या पांचवीस! ।
मुखीं नागमातेचिया हा रिघाला; लवें सूक्ष्म होऊनि वेगें निघाला! ॥ ६०
गिळी सिं[5]हिका जी धरी सावलीला, जळीं त्या सु[6]दुर्बुद्धिच्या मावलीला ।
वधी [7]धीर तोडूनि त[8]त्काळजाला; पुन्हा लंघिता सिंधु तत्काळ जा[9]ला. ॥ ६१
न [10]लंका वळे, तीस तो हा[11]त दावी; करी तोंड हुं[12]कार तें 'हा!' तदा वी. ।
पुरी रात्रि शोधी, विलोकी अशोकीं; म्हणे, 'सर्व नासे अ[13]धर्में पशाहे! कीं. ॥ ६२
विलोकी [14]सतीधिक्कृता यातुपातें, म्हणे, 'राम व्हावा शि[15]खी या तुपातें.' ।
[16]दयेच्या स्तवी रामराया समुद्रा, क[17]वी दे तिला ती निवायास मुद्रा. ॥ ६३
स्वचूडामणी श्रीहि दे, तोख पावे, म्हणे, 'शत्रु माझ्या करें तों खपावे.' ।
चुरी वृक्ष, मर्दी बळें, युद्धदक्षा वधी रावणाच्या कुमाराहि अक्षा. ॥ ६४
रणीं [18]इंद्रजित्संज्ञ जो, तो पळानें करी बद्ध जें ब्रा[19]ह्म त्याच्या बळानें. ।
न जाणे महास्त्रा, तया मान दे हें, वरावा ये[20]शा बंध हा कां न देहें? ॥ ६५
धरी वैरि भा[21]हानिच्या कामनेळा, सभेमाजि तो द्यावया धा[22]म नेला. ।
बळें आवरी चि[23]त्तसें पुच्छ, मौ[24]नी म्हणे, 'धिक् खळा!' रावणा तुच्छ मानी. ॥

---

१. मैनाक मारुतीचें आदरातिथ्य करावयास आला होता. २. देवांगना मैनेसारख्या स्तुति करूं लागल्या. ३. सुरसानामक नागमाता. ४. मारुती तिच्या पांचवीला जेवलेला! **लोकोक्ति** आहे. ५. एक राक्षसी. ६. दुष्टतम बुद्धि आहे जिची अशीच्या आईला. अतिदुष्टबुद्धि राक्षसीला. ७. मारुती. ८. सिंहिकेच्या काळिजाला तोडून तो मारुती तीस वधी. ९. समुद्राचा काळ झाला. लागलींच समुद्रलंघन करिता झाला. हा अर्थ प्रशस्त आहे. १०. लंका देवी. ११. हात दाखविणें, समाचार घेणें. पुनः **लोकोक्ति** आहे. १२. तें (तिचें) तोंड हुंकार (गुरगुर) करी व 'हा!' वी (म्हणायला लागलें). १३. भगवद्गीता–अ० १ श्लो० ४०-४३ पहा. १४. सतीनें (सीतेनें) धिकृत (धिक्कार केला ज्याचा) अशा राक्षसपति रावणाला. १५. अग्नि. 'शिखी वह्नौ वृक्षे, केतुग्रहे, शरे । चूडावति बलीवर्दे मयूरे कुक्कुटे हयः ॥' इति हैमः. तुपाला अग्नि मारकच आहे. **रूपक** आहे. १६. दयेच्या समुद्रा रामराया. १७. शहाणा. १८. इंद्रजित् नांवाचा. १९. अस्त्रविशेष. २०. यशा(साठीं) हा बंध देहें कां न वरावा? यश मिळविण्यासाठीं कधीं कधीं बंधनही सोसावें लागतें. Some falls are means better to rise, stooping to conquer हीं वाक्यें हाच अर्थ दर्शवितात. याला अस्त्रानें मान दिला! २१. तेजाची हानी करावयाची अशा इच्छेला शत्रु धरी. २२. अग्नि द्यायला? २३. मनोनिग्रह केला व पुच्छही आंवरिलें. २४. अभिमानी.

कुधी पेटवी दूतदंडार्थ पुच्छ, प्रदीप्ताग्नि झाला [१]सुता पुष्पगुच्छ! ।
करीत [२]प्रहासासि होती सभा जी, सुटोनि [३]प्रतापार्क तो [४]तीस भाजी. ॥ ६७
जळे, होय लंका [५]अलंका; [६]रमा ती निवे, सर्व झाला अलंकार [७]माती. ।
तिचा धूम [८]अंडीं, तसा 'हाय!' कोंदे, न नाकींहि तो बोलणें आयकों दे! ॥ ६८
दिला युक्त त्या पातका दंड, कानें न घे सूक्त या [९]घातका दंडकानें; ।
[१०]पुरीच्या फळे लेश सत्ताप दाहें, गमे लागली काळलत्ता पदा [११]हे. ॥ ६९
[१२]सहायांसि हा भेट आधीं तराया; कथी खूण, दे रत्न [१३]आधींत [१४]राया. ।
[१५]फणी चंदना तापतो(ला?) खेंव देतो, तसा वायुजा [१६]मांप तोखें वदे तो, ॥ ७०
'अनंतोपकाराचिया जाण [१७]दामीं तुझ्या बांधलों सर्वदा प्राणदा! मी.' ।
करी यापरी रंजना, भान राहे न [१८]यां, [१९]सूक्ति ये कंजनाभा नरा हे. ॥ ७१
निघे राम सौमित्रिसुग्रीवयुक्त स्वशुद्धें यशें [२०]व्हावया भक्त मुक्त; ।
नमी पाय जो, त्या [२१]दशास्यानुजाला सुख प्राज्य दे, राज्य न [२२]ग्लानि ज्याला; ७२
नळाच्या करें सागरीं सेतु बांधी, प्रतापें निजें [२३]अद्रिसीं अद्रि सांधी! ।

---

१. मारुतीला कीं दोऱ्याला? पेटलेला अग्नि मारुतीला पुष्पाच्या झुबक्यासारखा वाटला. अग्नीनें त्यास ताप दिला नाहीं. कारण आपला मित्र वायु त्याचा हा पुत्र तेव्हां आपलाच पुत्र असें अग्नीस वाटलें. २. अत्यंत हास्याला. ३. प्रतापाचा अर्क=सूर्य; असा मारुति. ४. सभेस. ५. लंका नव्हेसी. ६. लक्ष्मीचें समाधान झालें, कारण ती सुटली. ७. राख. ८. ब्रह्मांडांत धूर कोंदे. 'हाय! हाय!' शब्दही कोंदला तो इतका कीं स्वर्गांत कोणाचें बोलणें कोणास ऐकूं येईना! **काव्यलिंग** अलंकार आहे. ९. कानें सूक्त (चांगलें, पथ्यकर उपदेश) न घे, त्या घातका पातका (घात करणाऱ्या व करून घेणाऱ्या पातकी) रावणाला या दंडकानें (दंड करणाऱ्या मारुतीनें) युक्त दंड केला. १०. पुरीच्या दाहानें संतांस दिलेल्या तापाचें थोडेंसें फळ रावणास मिळालें. ११. ही काळाची लाथ आपल्या राज्याला लागली असें रावणास वाटलें. **उत्प्रेक्षा** अलंकार आहे. १२. आपले वानर सखे होते ते तरावे (मरूं नयेत) म्हणून त्यांस आधीं (प्रथम) भेट देता झाला. १३. दुःखांत असणाऱ्या रामास खुण सांगून त्यास रत्न दिलें, अर्थात् त्याच्या दुःखाचा उपशम मारुति करिता झाला. १४. रामचंद्राला. १५. नाग तापतो व चंदनाला आलिंगन देतो. आनंदसूचक **उपमा** आहे. यमकचमत्कार किती वेळ सांगावा! १६. लक्ष्मीपति (राम). १७. माळेमध्यें; उपकारांच्या आवलीमध्यें. In the never-ending series of obligations. रामचंद्राची उक्ति आहे. १८. रामाला आनंदातिशयांत भान राहिलें नाहीं. १९. कंजनाभ जो मानवरूपी रामचंद्र त्याच्या तोंडून ही उत्तम वाणी, भान नव्हतें तरी, आली. २०. होण्यासाठीं, करण्यासाठीं निघे. २१. बिभीषण. २२. व ज्याला क्षय नाहीं असें राज्य देता झाला. **दीपक** अलंकार आहे. २३. धोंड्यास धोंडा सांधता झाला!

दहा रुंद तो लांबही सेतु [1]गावें शत, [2]प्राज्य हें कर्म [3]धीहेतु, [4]गावें. ॥ ७३
[5]सुराराति मूर्धाधनु श्रीस दावी; [6]करी शोक मायेसि ती सत्य [7]भावी. ।
दिलें राज्य ज्या [8]तत्प्रिया [9]तत्व सांगे, 'छळातें सये ! मानिसी सत्य कां ? गे !' ७४
कपींचें महासैन्य घेऊनि हर्षें समुद्रासि लंघी प्रतापप्रकर्षें; ।
सुवेळीं चढे, [10]राम लंकेसि पाहे. [11]द्विषद्दर्शनातें न सुग्रीव साहे. ॥ ७५
उडे [12]तार्क्ष्यसा, त्या [13]भुजंगासि ताडी, तळीं तत्किरीटा, तयातेंहि पाडी. ।
करी अंगदा दूत, सामार्थ धाडी प्रभु; क्षिप्र तोही [14]हरी तेज नाडी. ॥ ७६
रणीं [15]मारितांही प्रहस्तादिसेना, म्हणे, 'मर्त्य माराचि' भी ज्या दिसेना. ।
स्वयें भंग पावे, तरी तो [16]लवेना, तया [17]दुर्मदासी दुजा तोलवेना ! ॥ ७७
रणीं शक्रजित् सर्पपाशांत बांधी, [18]महाभू तीची भी, हरीची न कां [19]धी ? ।
गरुत्मान् करी दूर त्या संकटातें, सुतेजाचिया लेववी [20]कंकटातें. ॥ ७८
प्रवीरायुतें [21]दोदिसां जागवीला, न [22]वज्रप्रहारें रणीं भागवीला, ।
यमेंही(?) प्रसंगांत जो आठवीला, दिगास्यें [23]महावीर तो पाठवीला. ॥ ७९
सुकंठा धरी, [24]तो हरी नाक कान, स्तवातें तयाच्या करी [25]नाक कां न ? ।

---

१. योजन अगर चार कोश म्हणजे एक गांव. २. मोठें, अघटित. ३. बुद्धिहेतु. बुद्धीनें निर्माण झालेलें! अगर बुद्धीस आश्चर्यचकित करून तिला उद्दीपित करणारें कर्म! ४. गायन करावें. ५. देवशत्रु रावण. सीतेस रामशिर व रामधनुष्य दाखवी. ६. सीता शोक करी. ७. मानी. शोकग्रस्त झाल्यामुळें राक्षसी कपटाला तिनें खरें मानिलें. प्रचारांतही आपण शोकमोहग्रस्त झालों म्हणजे संसारास खरें मानितों असें वैराग्य प्राप्त झालेले वेदांती म्हणतात. ८. तत्+प्रिया= त्या बिभीषणाची स्त्री (सरमा) ती. ९. खरा प्रकार. १०. राम हा घेणें, लंघणें, चढणें व पहाणें यांचा कर्ता. ११. रावणाचे दर्शनाला. १२. 'गरुत्मान्गरुडस्तार्क्ष्यो वैनतेयः' इत्यमरः. १३. रावणाला, जारकर्म करूं इच्छिणाराला; गरुडपक्षी सर्पाला ठोक देता झाला. जाराचा येथें ध्वनि श्लेषानें होत आहे म्हणून **समासोक्ति** अलंकार करावा. १४. 'हरी' म्हणजे 'वानर' असा अर्थ घेऊन तेज (रावणाचें प्रभुत्व) नाडी (लुटून नेई) असें समजावें. अगर तोही, अंगद, रावणाची तेज-नाडी (प्रभुत्वाचा समुदाय, प्रभुत्वचक्र) हरी (हरण करी). तात्पर्य एकच आहे. १५. 'मेले असतांही' असा अर्थ 'रामानें मारितांही' असा अन्वय घेऊन करावा. म्हणे=रावण म्हणतो. १६. भंगला तरी लवला नाहीं, हा **विरोध** होय. १७. दुष्ट आहे मद ज्याचा अशा रावणाला उपमाच नाहीं दुसरी! १८. महाभू तिची धी भी, मग हरीची कां न भी? १९. बुद्धि कां भिणार नाहीं? २०. कवचातें. २१. दोन दिवसांनीं दहा हजार राक्षसवीरांच्या साह्यानें जागा केला. २२. वज्राच्या अमोघ आघातानें किंवा प्रहार करणाऱ्या इंद्रानें रणांत भागविला न. २३. कुंभकर्ण. २४. सुग्रीव. २५. स्वर्ग.

रणामाजि [1]कुंभाचिया सर्व [2]तातें कपि त्रासिले, [3]ही दिली पर्वतातें! ॥ ८०
न मानीच रामा [4]महाबाहुला, जो महाशक्ति दावी, म्हणे, 'राहु लाजो'. ।
[6]यशांचा रणीं त्याहि तो राशि खंडी, फणीचा न साहेचि [7]तोरा [8]शिखंडी. ॥८१
करी ज्या सदा गर्व [9]थारा, वणातें पवीच्या धरी, [10]सर्वथा रावणातें ।
कळे चापिं त्याचें वच, प्रत्ययाला बरें ये, न जें वाटलें सत्य याला. ॥ ८२
कथा कुंभकर्णाचिया [11]अत्ययाची कथी दूत; मानी न धी सत्य [12]याची; ।
म्हणे, 'हा न म्हावा शता [13]हायनांहीं, अकस्मात् कसा जाहला हाय! [14]नांहीं. ॥८३
रडे जेंवि [15]कुंभा तसा हा निकुंभा, 'सुधेच्या' म्हणे, 'जाहली हानि कुंभा.' ।
त्रिशीर्षादि जे पुत्र त्यां [16]आपल्याला स्मरे, 'हा!' म्हणे, तो महाताप त्याला. ८४
करी इंद्रजित् काळसा नाश मायाबळें, मानि [17]मापाळ [18]सांना शमाया. ।
प्रतापाग्निनें वीर भाजी, वसेना [19]क्रिया, न प्रकाशीच भा, जीव, सेना. ॥ ८५

---

१. कुंभ हा कुंभकर्णाचा पुत्र; त्याचा तात तो कुंभकर्णच त्यानें. २. त्रासविले! ३. पर्वतास लज्जा दिली! **व्यतिरेक** अलंकार. ४. मोठे आहेत बाहू ज्याचे असा. रामाचेंच विशेषण करावें, म्हणजे **परिकर** होईल. ५. हा ग्रह सूर्यचंद्रांचा ग्रास करणारा, राम सूर्यवंशी. तेव्हां राहूस लाजवून **प्रतीप** अलंकार करावयाचा म्हणजे रामलक्ष्मणांस ठार मारावयाचें! ६. यशांचा राशि=रामचंद्र. विशेषणानें विशेष्याचा बोध करावयाचा म्हणजे एक **लक्षणा** होते. 'यशोराशि' हें विशेषण समर्पक आहे. खंडी=मारून टाकी. त्याहि=कुंभकर्णाला सुद्धां. ७. तोरा=ऐट. **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. **दृष्टांत** नाहीं. ८. मोर. ९. ज्याला गर्व सदा थारा करी म्हणजे सर्वदा गर्विष्ठ असे. 'अतिगर्वेण रावणः' हें प्रसिद्धच आहे. व ज्याच्या अंगावर वज्राघाताच्या खुणा होत्या त्या रावणाला. १०. सर्व प्रकारानें रामचंद्राचा पराक्रम व त्याचें बोलणें रामाच्या धनुर्धारित्वावरून कळलें. अनुभवास आलें व जें खोटें वाटत होतें तें सत्य असें रावणास कळून त्याचा गर्व कमी होऊं लागला. ११. नाशाची. १२. रावणाची बुद्धि सत्य मानीना. १३. वर्षांहीं. शंभर वर्षांतीं सुद्धां मरूं नये. १४. नाहीं असा कसा झाला? मेला कसा? हाय! हाय! व रावण, कुंभनिकुंभाप्रमाणें (कुंभकर्णपुत्र) रडला. रावणाचें कुंभकर्णावर विशेष प्रेम होतें. व कुंभकर्णाचा मोठा आधारही त्याला होता. **सुधेच्या** (अमृताच्या) कुंभाला हानि झाली, अमृतघट फुटला असें म्हणे. **रूपक** आहे. १५. नामविशेष. कुंभकर्णाचे पुत्रांप्रमाणें शोक करी. १६. आपले जे त्रिशीर्षादि पुत्र त्यांना. षष्ठीला पुनः द्वितीयेचा प्रत्यय हा प्रयोग सुमार होय. तो=रावण. संताप हेंच त्याचें कवच झालें! १७. लक्ष्मीपति. १८. लहान. रामचंद्र क्षुल्लक आहे असें मानी. १९. क्रिया वसेना (चालेना?) सेना जीव, भा (जिवंतपणा, तेज) प्रकाशीच न (म्हणजे सेनेमध्यें जीव किंवा तेज राहिलें आहे, असें दिसेना).

रणीं राम, सौमित्रि, सुग्रीव विद्ध[1]; क्षणें ते[2] करी मारुती[3] युद्धसिद्ध. ।
महौषध्यगाचें सुधी शृंग आणी. सुधाबंधु[4] तद्रंध(?)शल्यार्ति[5] खाणी. ॥ ८६
'कुढे शत्रु कां? भाविना शाप हा?' तो म्हणे, 'शापिला, भाविनाशा पहातो,[6] ।
तरी देचिना मान सामा, रणाला सजे, वाढवी मानसा मारणाला.' ॥ ८७
करी रत्नहेमें[7] घना दभ्र, मायामहीजा वधी[8] मेघनाद प्रमाया.[9] ।
मथी त्यासि सौमित्रि, दे वासवाला सुख प्राज्य, सर्वांहि देवां सवाला. ॥ ८८
रडे पुत्रशोकें सुरारातिं,[10] मोहें पडे, पाप योजी मनामाजि तो हें; ।
'घडे जीमुळें नाश हा, ती वधावी. जडे या न कंठा, कृपाणा[12] बधावी.[13]'[11] ॥ ८९
अकस्मात् पुढें देखतां खड्गपाणी भयें राघवाची[14] म्हणे, 'हाय!' राणी. ।
सुपार्श्व प्रधान स्वयें त्यासि वारी;[15] फिरे वायुनें मेघसा वासवारी. ॥ ९०
'वधा राम, सौमित्रि, सुग्रीव, भक्षा' म्हणे[16] राक्षसांतें, 'निघा, राज्य रक्षा; ।
उठा, दाव[17] व्हा शत्रुच्या सैन्यकक्षा,[18] भिडा, जानकीचें जडो वक्ष[19] वक्षा.' ॥ ९१
बळा धाडि हीं नीच मूढा लयाला;[21] गळे, देचि हानी चमू, ढाल[22] याला,[20] ।

---

१. विद्ध (जखमी झालेले). २. त्यांस. युद्धाला तयार करी. ३. उत्कृष्ट बुद्धिवान् मारुति. ४. अमृताचा बंधु जो मारुति. ५. 'रंध्रशल्यार्ति' असा पाठ असला पाहिजे. तद्रंध्रशल्यार्ति (रंध्रें पडून जखमा झाल्या त्यांचें दुःख) खाणी (खणून काढी). ६. मनांत कां आणीत नाहीं? तो=राम. भाविनाश=पुढें होणारा नाश पहातो तरी साम करीत नाहीं. अभिमानाप्रमाणेंच संहार वाढवित आहे. ७. रत्नसुवर्णादिकांनीं सुशोभित झालेला रथ घना (अंधकाराला) दभ्र (लहान, नाहींसा) करी. **प्रतीप** आहे, कारण अंधकार सर्वव्यापी आहे. ८. रामलक्ष्मणांस मोह पाडण्यासाठीं मायासीता वधी. ९. पुष्कळ. वासवाला, देवांना व यज्ञास (यज्ञकर्म करणारे याज्ञिकांस) सुख दे. **दीपक** आहे. १०. सुरद्वेष्टा रावण. रडला, मोह पावून पडला व नंतर त्यानें एका पाप (अघोर) कृत्याची योजना केली. ११. 'जी (सीता) या (माझ्या) कंठाला वश होत नाहीं ती कृपाणाला वधावी (वश करून घ्यावी) कारण तीमुळें सर्व नाश होत आहे. तस्मात् ती मारून टाकावी.' १२. तरवारीला. १३. वश व्हावी. १४. राघवाची राणी भयानें 'हाय!' म्हणाली. तरवार पुढें घेऊन आलेल्या दुष्टाला पाहून ती घाबरली यांत काय आश्चर्य आहे! १५. वारण करी, 'नको करूं' असें सांगे. 'वृ=आच्छादणें' पासून हा शब्द झाला. पुढील **उपमा** चांगली आहे. १६. रावणाचे हुकूम आहेत हे सगळे. १७. वणवा. १८. सेनारूप गवतास. **रूपक** आहे. १९. छाति. जानकी मला प्राप्त होवो. २०. नीच रावण मूढ सैन्याला पाठवी. २१. नाश करून घेण्याला २२. निशाण. निशाण पडलें व चमू पडली यामुळें रावणाची हानि झाली. **सहोक्ति** आहे **दीपक**ही आहे. यमकचमत्कार कसा आहे पहा!

हराक्षि स्मरा अग्निचे लोळे[3] वीतें; धनु स्वामिचें त्या बळा, लोळवी तें. ॥ ९२
न त्या ऐकवे नायकांच्या विलापा; न [6]कंठे पुरीं राक्षसांच्या ईलापा; ।
मनाचा खचे सर्व धीरा; मराया, वधाया, निघे सर्वथा रामराया. ॥ ९३
करी रावण क्रव्यभुक् सर्व गोळा; म्हणे, 'हूं! वधा वीर हो! शत्रु, घोळा.' ।
वदे त्यांसि सुग्रीव, 'धूळींत लोळा; रणीं भग्न व्हा; दांत खा; हात चोळा.'॥९४
बळा लक्ष्मणाच्या नदे[11] वारित्याच्या उरीं; शक्ति वक्षांत देवारि त्याच्या, ।
बुडाया भ्रमीं देव, शस्त्रीश हाणी, करी[12] त्यासि जैसी वश स्त्री[13] शहाणी. ॥ ९५
जयाची[14] प्रसू अंजना, [15]भानुजातें कथी[16] ज्ञान तो [17]कंजनाभानुजातें; ।
पुन्हा शृंग आणून दे स्वस्थता; तें[18] [19]तयाच्या मुखीं स्थापिलें स्वस्थ[20] तातें.॥ ९६
[21]द्विषद्बुद्धि सोडून जो [22]संग रामीं, तयाच्या कथूं त्या कसा संगरा मी ? ।

---

१. महादेवाचा नेत्र. २. सवेग जे अग्नीचे कल्लोळ ते. ३. प्रसवतें. ४. हराक्षि स्मरा (मदनाला जाळण्यासाठीं) अग्नीचे लोळ वीतें, तसें स्वामीचें (रामाचें) धनु रावण-सैन्याला मारण्यासाठीं शररूपी अग्नि प्रसवूं लागलें! व स्वामीच्या धनुष्यानें तें रावणसैन्य लोळविलें (भूमिगत केलें; ठार मारिलें). ५. रावणाला. ६. राक्षसांच्या पुरींत राहणें सोसवेना. 'कंठ' (दुःखांत असणें) ह्यापासून 'कंठणें'. चैन पडेना. ७. पृथ्वीपति जो रावण त्याला. ८. धीर. रावण निराश होऊन मरण्याला किंवा मारण्याला निघाला. सर्वथा=सर्व प्रकारांनीं. ९. मांसभक्षक (राक्षस). १०. घुसळा, ठोकून काढा. रावण वेडा झाल्याकारणानें प्रथम 'वधा' व नंतर 'घोळा' असे हुकूम सोडतो आहे! सुग्रीवही रागानें वेडा झाल्यामुळें तशाच प्रकारचें परंतु चीड आणणारें भाषण बोलत आहे. हात चोळणें, दांत खाणें हीं निराशा दाखविणारीं चिन्हें. ११. वारणारा, स्वसंरक्षण करणारा लक्ष्मण त्याच्या बळाला उरूं दिलें नाहीं व रावणानें त्याच्या छातींत शक्ति फेंकली. त्याचा परिणाम असा झाला कीं शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ जो रावण त्यानें शक्ति हाटल्याबरोबर देव (रामचंद्र) भ्रमसागरांत बुडाला! **विरोधमूलक असंगति** अलंकार आहे. १२. लक्ष्मणास. १३. हुषार. येथें 'मोह घालणारी' असाही अर्थ होईल! १४. आई, माता. १५. सूर्यवंशीय लक्ष्मण त्याला. 'कंजनाभानुजातें'कडे संबंध. हाच अन्वय इष्ट आहे. १६. उपाय. १७. कंजनाभ+अनुज=पद्मनाभ जो राम, त्याच्या कनिष्ठ बंधु लक्ष्मणातें? १८. हनुमद्यश. १९. लक्ष्मणाच्या. २०. मारुतीनें. प्रियकर पुरुषाला तात म्हणण्याची वहिवाट आहे. मारुतीनें लक्ष्मणाच्या मुखांत आपले यशाची स्थापना केली. लक्ष्मण मारुतीचें यश गाऊं लागला हें पर्यायानें सांगितलें; म्हणून **पर्यायोक्ति**. 'तातें' याचा अर्थ 'रामानें' असाही होईल. रामानें लक्ष्मणास सर्व इतिहास सांगितला. स्वस्थ=अचलपणानें. २१. शत्रुबुद्धि. २२. जो संग (सदाचार) सोडून रामीं द्विषद्बुद्धि–असा अन्वय घ्यावा. पंतांस रामशत्रूचा कोण द्वेष हा!

[1]बळें शक्र रामासि दे स्यंदनातें, वधाया रणीं [2]कैकसीनंदनातें. ॥ ९७
चहूंनीं उणे लोटले साठ [3]याम, [4]शत छेदितांही शिरें तींच राम ।
विलोकी; [5]विरे, [6]कुंभभू मंत्र बोधी; म्हणे सूर्य, 'वत्सा! जयें स्वस्थ [7]हो धी.'॥९८
कथी मातली '[8]कंजजास्त्रप्रयोगा क्षणें संहराया खळा [9]विश्वरोगा. ।
[10]तयां दे यश, श्रीश मंत्रूनि सोडी शर, क्षिप्र [11]सुक्रूर शत्रूर फोडी. ॥ ९९
अरीची तनू भूतळीं, पुष्पवृष्टी प्रभूच्या [12]शिरोब्जीं, [13]सुखीं सर्व सृष्टी ।
पडे एकदां, वासुरीं जेंवि [14]गृष्टी [15]द्रवे कीर्ति भक्तीं, निवे शक्रदृष्टी. ॥ १००
नभीं वाजले निर्जरांचे नगारे, विधाता म्हणे, 'नांद हर्षें [16]नगारे!' ।
कथी शंभु, 'गा याचि, अन्या न गारे,' वदे कीर्ति, 'चित्तीं, न हो म्लान [17]गारे!॥
यशाचा जगा तारि आलाप हा, या सुधासिंधुतप्तांसि आला पहाया! ।
गजास्याचिया गर्वदानी [18]रदातें कथी, भूलवी सर्वदा नारदातें. ॥ १०२
न केलेंचि रंभोर्वशीमेनकांहीं तसें नृत्य, हें सांगतां ये न कांहीं. ।
सुरर्षी यशा [19]भासुरा गात नानापरीनें करी [20]त्यां सुरागा तनाना. ॥ १०३
म्हणे [21]जो गुणातें, 'सुखें मातवा हे जन क्षिप्र सारे' असा वात वाहे. ।
विधाता वदे, 'युद्ध पात्र [22]स्तवा हो, व्यथा हो यशा, [23]बुद्बुदपा(?)त्रस्त वाहो.'॥१०४
दिगास्या [24]जळादि स्वयें देववी तो, यशें तारितो विश्व जो [25]देवें वीतो. ।

---

१. रामाची इच्छा नसतांही. २. कैकसी ही रावणाची माता, सुमालीराक्षसाची कन्या व विश्रवानामक ब्रह्मदेवाच्या नातवाची स्त्री. ३. प्रहर. साठ प्रहारांला चार उणे. ४. शंभर वेळ. ५. विरघळला. ६. अगस्त्यऋषी. ७. होऊं दे. ८. कंज+ज+अस्त्र+प्रयोग=ब्रह्मास्त्राच्या प्रयोगा. ९. सर्व जगांचा रोग (नाश करणारा). १०. मातलीला? त्याला यश दिलें म्हणजे त्याचें ऐकिलें! किंवा त्या ब्रह्मास्त्राला यश दिलें? ११. क्रियाविशेषण केल्यास अत्यंत क्रूरतेनें असा व 'उरा'चें विशेषण केल्यास 'अत्यंत क्रूर उर' असा अर्थ होईल. दुसरा पक्ष बरा. १२. शिरकमलावर. १३. सर्व जगें सुखामध्यें. एकदां=एकाच वेळीं. **सहोक्ति** अलंकाराचा ध्वनि असून **दीपक** मुख्यत्वानें आहे. एकंदर पद्य मनोहर झालें आहे. १४. एक वेळ व्यालेली गाई. १५. 'द्रवे' याचा संबंध 'वासुरीं' व 'भक्तीं' (भक्तामध्यें) या दोहींकडे आहे. ईश्वरकीर्ति ही माता. ही **उपमा** निरुपम आहे. १६. नग+अरि=हे पर्वतशत्रो (इंद्रा!). १७. स्फटिक. १८. दंताला गर्व टाकून दे असें सांगे. १९. शोभिवंत. २०. प्रसिद्धा. २१. जो वात गुणाला (स्पर्शगुणाला) म्हणे. २२. स्तुतीस पात्र होवो. २३. नदी आहे काय? २४. तर्पणोदक. २५. जो देव विश्वास उत्पन्न करितो तोच त्यास आपल्या स्वयशरूपी नौकेनें भवसागरांतून सुखरूप नेतो.

तया दे पद श्रीश पादानतातें[1]; प्रकाशी सुधासत्प्रपादानता[2] तें. ॥ १०५
करी दिव्य देवादिची आइ शीता[3], तिला मायसी अग्निची खाइ[4] शीता[5]. ।
उठे सर्वही प्रेत[6] होता तसाची. द्रवे, दाखवी रीति तो तातसा ची. ॥ १०६
बसे पुष्पकीं तो सदार[7], क्षणांत प्लवंगांसि[8] घाली सदा रक्षणांत, ।
प्रजांच्या श्रमें जो[9], तया दे वदावी[10] तसी भेटि, मोठी दया देव दावी.॥ १०७
तपोग्नींत योगी शरीराज्य[11] होमी जयाकारणें, तो करी राज्य हो! मी ।
वदों काय? भव्यास[12] दावि, प्रजा तें प(व!)री, ध्याति नव्या सदा विप्र ज्यातें. ॥
श्वधीच्याहि[13] जो सारि खेदा, समाना दया दे, सुता[14]सारिखा दासमाना; ।
सुधेचा स्वतां यां[15] गमे घांस, मोर स्वयें होय हो यागमेघांसमोर. ॥ १०९

---

१. पायाचे ठायीं नम्र झालेल्या त्या रावणाला. २. अमृताच्या उत्तम पोईची उदार दानबुद्धि प्रकाशित करितें झालें. त्या पदानें आपलें उत्कृष्ट दातृत्व प्रगट केलें. ३. सीता, देवादिकांची माता. ४. सती इत्यादिकांनीं आंत प्रवेश करण्याकरितां जी अंगारांनीं युक्त खळी ती, आईसारखी. ५. थंड झाली! **विरोध** अलंकार. आई थंड असते त्याप्रमाणें थंड झाली. ६. वानरांचीं प्रेतें उठलीं. 'प्रेत'शब्दाचा पुल्लिंगी प्रयोग आहे. रामचंद्र द्रवला आणि पितृवात्सल्याची रीति त्यानें दाखविली. 'साची' हें 'रीती'चें विशेषण केलें तरी हरकत नाहीं. मात्र **उपमा** जाऊन **रूपक** अलंकार होतो हें विसरूं नये. ७. सीतेसह. ८. वानरांस तो सदा (सदैव) रक्षणांत (रक्षण करण्याच्या कलमामध्यें, मथळ्याखालीं घाली). म्हणजे वानरांना सुद्धां त्यानें प्रजेप्रमाणें वागविण्याचा निश्चय केला. ९. जो भरत प्रजापालनाच्या कामीं श्रमला होता. १०. बोलल्याप्रमाणें, प्रतिज्ञा सत्य करून भेट त्याला दिली. ११. शरीररूपी घृत. **रूपक** संगृहणीय आहे. ज्याच्याकरितां योगी तपानें आपले शरीराचा लय करितात, तोच परमात्मा लोकरक्षणास्तव राज्य करिता झाला! हा **विरोध** सगुणभक्तीचा अनुवाद करीत नाहीं काय? १२. सुखाला, आनंदाला. प्रजा नव्या भव्यास दावी तें काय वदों? अनुपम, अनिर्वाच्य आहे झालें. ज्यास विप्र सदा ध्याती. (नवीनाचें ध्यान आपण करितों हें प्रसिद्धच आहे.) 'परी' हा पाठ ठेवल्यास अर्थाची फारच तारंबळ होत आहे. १३. कुतऱ्याच्या बुद्धीचाहि. वाल्मीकिरामायणांतील उत्तरकांडांत ५९ सर्गाच्या पुढें तीन प्रक्षिप्त सर्ग आहेत, त्यांत श्वान व ब्राह्मण यांची एक मनोहर गोष्ट आहे ती तज्ज्ञांनीं अवश्य वाचावी. श्वानास निरर्थक मारल्याबद्दल ब्राह्मणास दंड मोठ्या युक्तीनें केला आहे. १४. पुत्राप्रमाणेंच जो दासमानांस (चाकरमान्यांस) वागवी. १५. या (दासांस) स्वतां (स्वतः) सुधेचा घांस गमे. रामराज्य अमृताचा घांस आहे असें दासांस वाटलें. आणि याग(यज्ञ)रूपी मेघांच्या समोर स्वतःच मोर होय म्हणजे मोराला जशी मेघांची आवड असते त्याप्रमाणेंच रामचंद्राला यज्ञयागादिकांची आवड होती. **रूपक** आहे.

यथाबुद्धि वंदूनि जी उक्ति दास स्तवाची वदे, ती रुचे [1]मुक्तिदास. ।
तसी धी न जीवा, [2]नेसे वासवास; स्वनामेंचि दे मान, सेवा, सवास. ॥ ११०
न [3]याहूनि [4]हा अन्य कांहींच जाणे, दुजा अर्थ चित्तांत याच्या न बाणे ।
मयूर स्वसेवा बरी [5]यांत पाहे, 'सुरामायण' श्रीशरामासि वाहे. ॥ १११

---

## ४९. हररमणीरामायण.

(तो[6]टकवृत्त.)

'[7]दशपूर्वरथ क्षितिपाळ भला;' जगदीश म्हणे, 'मम तात, मला.' ।
मग होय तदीयकुमारमणी, स्तवि सद्गुरुचीहि उमा रमणी. ॥ १
नि[8]जमूर्तिचतुष्टय रम्य करी, प्रभु 'राम' असें [9]शुभ नाम धरी; ।
[10]मधुचा भरताभिध होय अरी, मग लक्ष्मण आणि [11]अरिघ्न हरी. ॥ २
गुरुवर्य वसिष्ठमुनीस करी; प्रभु [12]गाधिसुताध्वरविघ्न हरी. ।
[13]मुनिची दयिता [14]उपलत्व वरी, विभुपादरजें परि होय बरी. ॥ ३
[15]प्रबळा तिळ जें न चळे अजि! तें, [16]प्रभुचें धनु मोडियलें [17]अजितें. ।
जनकक्षितिपाळसुता वरिली, [18]शरदिंदुरुची स्वयशें हरिली. ॥ ४
प्रभुच्या अनुजांसि [19]सुता जनकें दिधल्या, बहु शोभविल्या [20]कनकें; ।
जन केंवि न धन्य म्हणे? [21]सनकें स्तविलें [22]असकृद् यश, [23]तज्जनकें. ॥ ५

---

१. मुक्ति देणारा जो रामचंद्र त्याला. २. अशा प्रकारची बुद्धि सामान्य जीवांस नाहीं इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष इंद्रासही नाहीं. शिवाय रामचंद्रानें स्वनामप्रतापाच्या योगेंकरून सवास (सूर्यास) मान दिला व सेवा दिली म्हणजे लोक सूर्याला पूज्य मानूं लागले व त्याची उपासना करूं लागले. हा रामचंद्र सूर्यकुलांत उत्पन्न झाला म्हणून होय. ३. रामाहून. ४. पंत आपल्यासंबंधानें म्हणतात. ५. रामस्तवनांत. ६. 'सगण स्फुट चार लिहीशिल रे; तरि **तोटक**वृत्तचि होय खरें.' लेले यांचें 'साहित्यशास्त्र.' या वृत्ताचें दुसरें नांव '**रमणी**' असें अन्यत्र आढळतें. ७. 'दश' आहे पूर्वी ज्याच्या असा 'रथ'=दशरथ. ८. आपल्या मूर्तींचें चतुष्टय (चौकडी). ९. मंगलदायक. १०. मधुनामक दैत्याचा अरि भरत. ११. शत्रुघ्न. १२. विश्वामित्राच्या यज्ञाचें विघ्न. १३. गौतमाची स्त्री अहल्या. १४. पाषाणत्व. १५. अत्यंत बळकट मनुष्याला तिळभरही जें शिवधनुष्य हलत नव्हतें. १६. शंकराचें. १७. रामानें. १८. शरत्कालच्या चंद्राची शोभा हरण केली. **व्यतिरेक** अलंकार. १९. कन्या. २०. सुवर्णानें, अलंकारांनीं. २१. सनक, सनंदन वगैरे चार मानसपुत्र निवृत्तिमार्ग स्थापन करण्यासाठीं निर्माण केले होते. २२. असकृत=वारंवार. २३. तत्+जनक=त्या सनकाचा बाप जो ब्रह्मा त्यानें.

धरवी प्रभु मार्ग, वरा म[1]हितव्रत दे, करि भार्गवरामहित; ।
[2]परमाभ्युदयें सुखवी पुर; तें 'नि[3]जभाग्य' म्हणे 'त्रिजगीं पुरतें.' ॥ ६
[4]नृप '[5]कोसलराजसुतातनया [6]युवराज करीन' म्हणे 'सनया.' ।
परि केकयजा अडवी रमणी; बहु होय तदा [7]जड [8]वीरमणी. ॥ ७
वदली, "दिधले वर, हेंच वदा, 'वन आदरुं राम [9]समां चवदा;' ।
'युवराज करा द्रुत मत्तनया,' वचना [10]बुध रक्षिति; मत्त न या." ॥ ८
मरणा [11]स्ववियोगकथा पितया, मळ लागुं न देचि तथापि तया. ।
प्रभु होय [12]पदेस्थितिस त्यजिता, द्रुत कीं [13]गति, कीर्तिहि, [14]सत्यजिता. ॥ ९
धरि वल्क, सबंधु सदार [15]मुनिव्रत होय, पुरींहि सदा रमुनि; ।
वनवास सुखेंचि रमाधव घे; परि लोक पुरीं [16]रडले अवघे. ॥ १०
[17]अजिना वरि टाकुनि राजपटा, रचि राम [18]वटांगपयें सुजटा. ।
सुसखा गुह सांत्वुनि, [19]तातसखा नमि, दे बळ [20]तापसवृंदमखा. ॥ ११
प्रभु 'चित्र[21]'पदोत्तर 'कूट'नगा करि आश्रय, आश्रय [22]जो त्रिजगा. ।

---

१. पूज्य, आदरणीयव्रत वरा (श्रेष्ठ परशुरामाला) दे. दशरथ मार्ग सोडून जात होता म्हणून मार्ग धरवी असें म्हटलें. २. मोठ्या उत्सवानें. ३. तें पुर म्हणूं लागलें कीं, 'माझें भाग्य तीन्ही लोकांस पुरलें आहे' म्हणजे माझी त्रैलोक्यांत कीर्ति झाली. ४. दशरथ. ५. कौसल्यापुत्र राम त्यास. ६. राजा जिवंत असतांनाच आपल्या ज्या पुत्रास कांहीं राज्याधिकार देतो त्याला 'युवराजा' म्हणतात. Crown Prince. ७. कुंठितमति? ८. दशरथ. ९. वर्षें. १०. 'अंगीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति'. हें असेंच सुभाषित होय. ११. स्व-वियोग-कथा पितया मरणा (मरण देणारी होती), तथापि तया (दशरथाला) मळ (अपकीर्तीचा डाग) लागूं न दे—हा अन्वय. पित्यापेक्षांही त्याच्या शुभ्र यशाची रामाची काळजी लोकोत्तर आहे. १२. यौवराज्यपदास. १३. उत्तम गति. १४. सत्य संभाळणारास मोक्ष व कीर्ति लवकर मिळतात. १५. ऋषीचें व्रत, अरण्यवासीयांचें व्रत, वैखानसव्रत. पुष्कळ काळपर्यंत नागरिक व्रतानें आयुष्य घालविलें होतें तें सोडून देऊन प्रभूनें भावासह आणि बायकोसह वैखानसव्रताचा अंगिकार केला. बालवयांत असें होणें अशक्य, सबब **विरोध** अलंकार. १६. वनवासाचें दुःख रामास नाहीं झालें तर नगरवाशांस झालें. म्हणून **असंगति** अलंकार. १७. कृष्णमृगचर्म परिधान केलें; व राजवस्त्रें टाकून दिलीं. १८. वटवृक्षाच्या दुधें. १९. भरद्वाजास. २०. ऋषींच्या यज्ञांस बळ देता झाला. याशिकांस धीर येऊन त्यांनीं याग करण्यास सुरुवात केली. २१. चित्रकूटपर्वतास. २२. त्रिजगाला जो आश्रय, त्रैलोक्याचें जो आश्रयस्थान त्याला आज चित्रकूटानें आश्रय दिला. **अतिशयोक्ति** आहे. कोणी यास **विचित्र** अलंकार म्हणतील.

व्यसु होय [1]नृपाळ सुत स्मरता, गुरु आणवि [2]मातुळगा भरता. ॥ १२
जननीप्रति निंदुनि, [3]तातहिता करि, सोडुनि राज्यपदा [4]महिता; ।
नमि [5]अग्रभवा महिजासहिता, कळवी क्षिति त्या [6]क्षितिभृद्रहिता. ॥ १३
पितृकार्य करी प्रभु, त्या 'परता प्रभुजी!' म्हणतां [7]रडतां भरता ।
समजावुनि राम तया फिरवी, मिरवी [8]यश ज्याप्रति सेवि रवी. ॥ १४
वरि अत्रिमुनीश्वरपर्णकुटी, [9]अहिताहि [10]यदस्त्रसुपर्ण [11]कुटी. ।
क्षितिजेसि [12]सती [13]असि लावि उटी, सुगुणासि जिच्या न कदापि तुटी. १५
करि शापविमुक्त विराध वनीं; शरभंग महामुनि हृष्ट मनीं. ।
प्रभु [14]दंडक कानन तें निववी; [15]रजनीचरकोटि यशें भिववी. ॥ १६
[16]कलशोद्भव दे धनु, बाण, [17]असी, 'करि सत्कृति, शत्रुवधार्थ' असी, ।
पितृमित्रजटायुस तो सुखवी, प्रभु दंडुनि शूर्पणखा [18]दुखवी. ॥ १७
दिधली खर मारुनि सैन्यसह प्रभुनें [19]क्षितिदेववशातासि [20]मह. ।
मृग पाठवि रावण हंसमय, क्षितिजामन तो हरि [21]हीतनय. ॥ १८
महिजा वदली, 'रघुवंशवरा! कुतुकार्थ सुरंग कुरंग धरा'. ।
[22]दयिताप्रिय लक्ष्मुनि शस्त्रधर, प्रभु होय वनीं हरिणानुचर. ॥ १९
पळतां [23]तदुरीं शर शीघ्र भरी, खळ [24]आर्तरव प्रभुतेंवि करी. ।
व्यसनाकुळ राम असें [25]गमवी; क्षितिजाहृदयासि [26]परें भ्रमवी. ॥ २०

---

१. दशरथ. २. मामाकडे, युधाजिताकडे गेलेल्या भरतास. ३. वडिलांची क्रिया करी. कारणासाठीं कार्यनिर्देश आहे. क्रिया केली म्हणजे मनुष्य मुक्त होतो. ४. पूज्य अशा. ५. आधीं जन्मलेल्या रामास. ६. राजरहित राज्य झालें आहे असें त्यांस कळविलें. या वाक्यांत दशरथ मेला, मी राज्य ग्रहण करीत नाहीं असें **पर्यायोक्ती**नें व थोडक्या शब्दांनीं सुचविलें आहे. ७. रडणाऱ्या भरताला. ८. ज्या यशाची सेवा सूर्य करील असें यश संपादन केलें. **प्रतीप** अलंकार. ९. शत्रुसर्प. १०. ज्याचा अस्त्ररूप गरुड. **परंपरितरूपक** आहे. ११. ठेंचून, मारून टाकितें. १२. अनसूया. १३. अशा प्रकारची कीं जिचा वास कधींच तुटला नाहीं. १४. दंडकारण्य. १५. अनंत राक्षस निवळ कीर्तीनेंच भेडावून टाकिले. युद्ध होण्याच्या आधींच त्यांचा पराजय झाला! शिवाय रात्रीं संचार करणाऱ्या लोकांस सूर्यासारखा ज्या यशाचा प्रकाश तेथें भीतीच वाटायची! १६. अगस्ति. १७. खड्ग. १८. तिचें नाककान कापिले. १९. पृथ्वीचे देव जे ब्राह्मण त्यांस. २०. उत्साह. २१. टाकिली नीति ज्यानें असा. हंसमय (सुवर्णमय) मृग मारीच सीतेचें मन हरण करिता झाला. २२. बायकोची आवड पाहून. २३. त्याच्या उरांत. २४. प्रभूसारखा दीनस्वर. २५. वाटवी. २६. शत्रु मारीच.

तिस तो अनुकूळ न दीर वदे, भय त्या [1]द्रुसि जेंवि [2]नदीरव दे. ।
कटु बोलुनि ती सुगुणा दवडी, त्यजि मौक्तिक[3] मानुनियां कवडी. ॥ २१
दशकंधर तोंचि सतीस हरी; [4]क्षणभग्न जटायु तयासि करी. ।
अरि [5]पक्षति तोडुनि गृध्रवरा, करि मूर्छित; कंपित होय [6]धरा. ॥ २२
स्वपुरीं तिस ठेवि अशोकवनीं, प्रभु दुःशकुनें धरि [7]आधि मनीं. ।
तंव लक्ष्मण भेटुनि वृत्त कथी, करि ताप [8]सखा निज दाशरथी. ॥ २३
द्रुत धांवुनि ये, [9]असुखा वसती करि धी उटजीं दिसतां न सती, ।
प्रभु शोधि, करीत विलाप, वनें, बहु ताप [10]हिमेंहि दिला, पवनें. ॥ २४
क्षतमूर्छित पाहुनि तातसखा, प्रभु 'हाय!' म्हणे करि[11]अंत्यमखा. ।
धरि [12]योजनबाहु कबंध; तया गति दे रघुवीर करूनि [13]दया. ॥ २५
फळ, पुष्प, पदावर दे शबरी; करि कीर्ति तिची [14]वरदेश बरी. ।
पद दे, [15]अरि मारुनियां, सुगळा, यश हें म्हणतें 'अमृता [16]उगळा.' ॥ २६
करि सिंधुसि [17]गोष्पद [18]वातजनी, खुण दे, निववी [19]क्षितिजेसि मनीं. ।
तरु, राक्षस, भंगुनि सर्व [20]सुरी सुखवी कपि जाळुनि शत्रुपुरी. ॥ २७
म्हणतात जया शिव, विप्र, '[21]भुला,' [22]पवनांश तया निववी प्रभुला! ।
कपिदत्त शिरोमणि राम [23]तिचा करि आश्रय [24]भव्य बरा मतिचा. ॥ २८
सबळ प्रभु जाय समुद्रतटा, करि [25]रंगनटीच [26]सुरर्षिजटा; ।
कथि जो [27]बुधसंमत साम हित, त्यजिला [28]कुजनें गुरुसा [29]महित; ॥ २९

---

१. वृक्षास. २. नदीची गर्जना. ३. मोत्याला कवडी समजून टाकून देती झाली. **भ्रांतिमान** अलंकार व **दृष्टांत** आहे. ४. क्षणामध्यें किंवा क्षणभर पराभूत करी. ५. पिसांचीं मुळें. ६. पृथ्वी सकंप झाली, कारण तिचीच मुलगी निराश्रित झाली! ७. चिंता, काळजी. ८. दाशरथी रामचंद्र हा ताप निजसखा करी. म्हणजे त्यास अति संताप झाला. ९. उटजीं सती न दिसतां धी (बुद्धि) असुखा (दुःखाला) वसती करि—हा अन्वय. १०. थंडीनें ताप दिला! हा **विरोध.** पवनें=वायूनें. 'हिमें' हें 'वना'चेंही विशेषण करावें. ११. उत्तरकार्याला. १२. चार कोस लांब हाताचा. १३. अपकार करणारावर उपकार करणें हें साधूंचें लक्षण होय. १४. वर देणाऱ्यांत श्रेष्ठ. 'ऋण मुष्टीभर पोहे' ही गीति पहा. १५. वाली. १६. थुंकून टाका. १७. गाईच्या पावलाएवढा लहान. १८. मारुती. १९. सीतेस. २०. देवस्त्रिया. २१. ज्याच्या संबंधानें 'भुला' असे शिव म्हणतो. २२. पवनसुत मारुति. २३. सीतेचा शिरोमणी. २४. कल्याणप्रद बुद्धीचा. २५. नर्तकी. २६. नारदाची जटा. हा आनंदातिरेक होय. २७. साधुमान्य जो साम. २८. रावणानें. २९. दुष्ट मनुष्य प्रसिद्ध गुरूचा त्याग करितो त्याप्रमाणें.

अभयार्थ बिभीषण पाय धरी, प्रभु राक्षसराज तयासि करी। ।
उदधींतहि वाट तदा बरवी नळकीशकरें भगवान् करवी. ॥ ३०
कपिसैन्य अनंत, सुखें उतरे, अहितासि म्हणे, 'न मर्दें उंत[1] रे!' ।
दिसतां खळ कीशवरें कुटिला[2], वदले सुर पाहुनि 'हा कुटिला!' ॥ ३१
प्रभुनें हृदयीं नय आठविला; परभंगद[3] अंगद पाठविला. ।
कटुही[4] हित हें न तया[5] समजे, अहिता धरितीहि तयासम जे. ॥ ३२
पर मर्दि सुखेंचि, न मूठ[6] वळी, कथि 'योग्य तयाप्रति[7] मूठ' बळी. ।
'वरि साम न, दंड करा महित[8]'. स्तवि[9] तो खळदंडक राम हित. ॥ ३३
कमळें[10] तशि शत्रुशिरें खुडवी; दशकंठबळें प्रभु तो बुडवी. ।
प्रभुमारुत[11] शत्रुतृणें उडवी; खळसस्यचि[12] रामकरी[13] तुडवी. ॥ ३४
करवे वश न प्रभु तो कपटें, धरवे न नभोभव[14] तोकपटें[15]. ।
अतियुद्ध[16] न जायचि तें कथिलें[17], प्रभु वन्हि, दशास्यबळें कथिलें. ॥ ३५
घटकर्ण महाबळ लोळविला. प्रभुनें घननादहि बोळविला. ।
दशकंठ मनीं बहु पोळविला, हरिच्या[18] हृदयीं जय घोळविला. ॥ ३६
दिधलें यश वातसुता कपिला[19], हरिची[20] बहु लाजविली कपिला[21]. ।
'वरें[22] देउनियां पर मारविला,' असि कीर्तिहि दे परमा रविला. ॥ ३७
खळशक्तिशमे बहु मातलि[23], तें, यश दे हरिसारथि[24]मातलितें, ।
कथि कीं न कुधी असुखा उतटा, मजगानपितां असुखा उतटा. ॥ ३८
न सुवाद्य, सुगीत, सुनृत्य, शमे[25]. प्रभुच्या विजयीं शिवचित्त रमे. ।

---

१. उताला येऊं नको. २. सुग्रीवानें ठेंचला, मारला. ३. दुसऱ्याचा पराभव करणारा. यमक पहा. ४. 'अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः' रावणासारखी दुष्ट बुद्धि धरितात त्यास हें समजत नाहीं. ५. रावणाला. ६. मूठ सुद्धां वळायला लागली नाहीं, सहज थपडांनींच काम झालें. ७. रामाप्रत बलिष्ठ अंगद सांगता झाला कीं रावणास 'मूठच (शासनच) योग्य आहे. पण येथें अर्थाविषयीं आम्हास संशय आहे. ८. मोठा. ९. राम मित्रास, अंगदास स्तवी. १०. उपमा फार योग्य. ११. रूपकें समर्पक आहेत. १२. धान्यची. १३. रामरूपी हत्ती. १४. वायु. 'आकाशाद् वायुः.' १५. अल्प पटें. वस्त्रानें. दृष्टांत आहे. १६. मोठें युद्ध. वन्हि व कथिल यांचें रूपक उत्तम आहे. १७. सांगितलें जात नाहीं; सांगतां येत नाहीं. १८. इंद्राच्या. इंद्रजित् मेला म्हणून. दीपक अलंकार. १९. वानरा. २०. इंद्राची. २१. कामधेनु. प्रतीप आहे. २२. सूर्यानें वर दिला त्यास अनुलक्षून हें वाक्य आहे. २३. माजलेली रावणाची शक्ति. २४. इंद्रसारथि मातली. ज्यास इंद्रानें रामसाह्यार्थ पाठविलें होतें. २५. खळ पडला नाहीं.

सकळाहि जगा सुख फार गमे, [1]सहजारिसमूह कुशीळ वमे. ॥ ३९
प्रभुचा अरिही वरि [2]कीर्तिगती, [3]चिर होय बिभीषण [4]यातुपती. ।
करि दिव्य [5]सती, तिस देव 'रहा पहिली तसि' यापरि दे वर हा. ॥ ४०
करि भेटुनि [6]तात सुखी तनया, [7]वन [8]याद म्हणे मिळण्या जन या. ।
उठवी [9]समरव्यसु सैन्य [10]हरी; हरिला यश देउनि दैन्य हरी. ॥ ४१
करि पुष्पकयानवरीं [11]बसका, [12]व्यवहार सतीस कथी [13]असका. ।
अवलोकुनि सेतु करी नमनें, स्तवि ती बहु, जेंवि [14]करीन, मनें. ॥ ४२
अनुभूत [15]सुखासुख आयकवी, स्थल दाखवि तें रघुराय कवी, ।
भरताप्रभुभेटिं [16]मना! समया न विलंघुनि, ओपि घनासम या. ॥ ४३
अभिषेकमहोत्सव होय दयानिधिचा, म्हणती कवि, 'तोयद' या, ।
'अमरादिकजीव मयूर; मही [17]सरसी; सुख तें जळ, ताप अही.' ॥ ४४
[18]परवाद नसे, वसुची परवा; नर वा सुर घे विरसा न, रवा. ।
बरवा प्रभु तो [19]स्वगुणा वरवा, '[20]भर वारुनि, शर्म' [21]म्हणे 'भरवा.' ॥ ४५
शिशुच्या न रुचे [22]शमनास मना, जन शिक्षि; न तू वदना! वद 'ना,' ।
वचके न निराशमना! [23]शमना, [24]वनवृत्ति भजे, भवनाभ वना. ॥ ४६
प्रभुचें यश सेव्य [25]सुधासरसें भुलवी अबुधास, बुधास, रसें. ।
पशु पी रघुपाळकथा [26]नरसा; वरि सोडुनि बाळक [27]थानरसा. ॥ ४७

---

१. राक्षस हे देवांचे जन्मवैरी त्यांच्या समुदायाकडून प्रभूनें दुष्ट स्वभाव ओकवून टाकिला; रक्त ओकण्यावर ही **अतिशयोक्ति** आहे. २. कीर्ति देणारी गति. म्हणजे मोक्ष. ३. सर्वकाळ. ४. राक्षसपति. ५. सीता. ६. दशरथ रामास सुखी करी. ७. उदक. ८. मासा. ९. युद्धांत गतप्राण झालेले. १०. इंद्र. ११. बैठक. १२. वृत्तांत. १३. सर्व. १४. गजेंद्र. १५. सुख दुःख. १६. रामभरतांच्या भेटीच्या समयाला मागें न घेतां व वेळ न चुकवितां पर्जन्याप्रमाणें त्या ठिकाणीं आपलें सर्वस्व अर्पण कर. असा अर्थ होतो. त्याच प्रमाणें प्रस्तुत प्रसंगास अनुसरून दुसरा अर्थ असा होतो कीं, चवदा वर्षें संपल्याबरोबर चकोरास जसें मेघ समाधान देतात त्याप्रमाणें रामचंद्र भरतास भेटला. १७. सरोवर. येथील **रूपक** अतिमनोहर आहे. कवी इतकें म्हणतात. १८. परनिंदा नव्हती, द्रव्याची परवा नव्हती. देव मनुष्यांस दुःख नव्हतें. सर्वत्र आनंद होता. येथें पंतांनीं शब्दचमत्काराची हौस फेडून घेतली आहे. १९. आपल्या गुणाकडून बरवा. येथून श्रोत्यांस उपदेश आहे. २०. भूभार. २१. जो प्रभु म्हणतो. २२. शांतिनाश. (दांडगाई.) २३. यमाला वचकूं नको. २४. तपस्विता. २५. अमृताहून श्रेष्ठ. २६. मनुष्यासारखेंच पशूही कथापान करील. २७. मातेच्या दुधाला टाकून देऊन.

अरिहा हरि हृद्गत जो सुरसा[1]; हरि सेववि आत्मरसा सुरसा. ।
करि विश्वहिता[2]स्तव सासु रसा; बरि अर्पिलि त्या कृति हे सुरसा[3]. ॥ ४८

---

## ५०. वरदरामायण.

(प्रमिताक्षरा[4]वृत्त.)

त्रिजगींनगीं[5] अखिल जो कनक; स्तविती जया शिव, विधी, शौनक[6], ।
निजतत्वबोधनिधिचा खनक[7], प्रभु तो करी दशरथा जनक. ॥ १
शुभ 'राम' हें रुचिर नाम धरी, अनुज स्वयें भरत होय हरी, ।
मग लक्ष्मण प्रभु अरिघ्नहि, तें करि सचतुष्टय समस्तहितें[8]. ॥ २
करि गाधिजक्रतुसुरक्षण हो[9]! वदले जयें बहु सुर 'क्षण[10] हो[11].' ।
प्रभु उद्धरी मुनिवधू कुशिला[12] यश फार दे जननिच्या कुशिला[13]. ॥ ३
त्रिपुरारिचें सकळयोधनुतें[14], मग मोडिलें प्रथित[15] जें धनु तें. ।
धरिली रमा जनकजा नवरी, नव रीति जी न, इतरा[16] न वरी. ॥ ४
मग लक्ष्मणासि जनकात्मभवा[17] वरि ऊर्मिळा सुगुणसिद्धिभवा[18]. ।
करि मांडवीहि भरतासि पती, श्रुतकीर्तिही चवथियासि सती. ॥ ५
भृगुराम कोप करि, त्या कळवी निज भव्य तेज, भजनीं वळवी; ।
निज धर्ममार्ग हितं[19] तो धरवी परवीरहृत्तिमिरयोधरवी[20]. ॥ ६
निववि प्रभु स्वविजयें पुरें[21] तें, सुख दाखवी गुरुजना[22] पुरतें. ।
भरतासि मातुळ, पुसोनि नृपा, स्वपुराशि ने, करि उदंड कृपा. ॥ ७

---

१. देवासारखा आपलें हृद्गत हरण करितो. २. लोककल्याणासाठीं परमेश्वरानें पृथ्वीचें मामात्व पत्करिलें. ३. हा अर्पणविधिही सुरसच झाला आहे. ४. 'प्रमिताक्षरा सजससैः कथिता' (छंदोमंजरी.) ५. अखिल (सर्व) त्रैलोक्यरूप अलंकारीं जें सुवर्ण. ६. ब्रह्मदेवाच्या चार ब्रह्मनिष्ठ पुत्रांपैकीं एक. ७. खणणारा, उघडणारा. ८. सार्वजनिक कल्याण. ९. अहो. १०. उत्सव. ११. होवो. १२. वाईट शिला (दगड) होऊन पडलेली अहल्या. १३. कुसव्याला. १४. सर्व योध्यांनीं स्तविलेल्या रामानें. १५. प्रसिद्ध. १६. इतरा न धरी (रमेनें इतरांस वरिलें नाहीं.) ही नवी रीति न. (पतिव्रताच ती.) १७. जनकापासून उत्पन्न झालेली. १८. सद्गुणाची सिद्धीच मूर्तिमंत असणारा लक्ष्मण त्याला. १९. मंगलकारक जो स्वधर्म तो. २०. शत्रूच्या वीरांच्या हृदयांतील अंधकाराचा जो योधरूपी सूर्य. 'रामा'चें हें विशेषण ज्ञान व पराक्रमसूचक आहे. २१. अयोध्या. २२. आपल्या वर्तनानें वडील माणसांस पूर्ण सुख देई.

'युवराज' राम करितां, खवळे भरतप्रसू, विनवितां न वळे. ।
वर घे दिले[1], 'स्वसुत राज्य करूं,' 'मनु[2] अब्द राम वनवास वरूं.' ॥ ८
नृप सत्य[3]पुत्रविरहीं अडला. बहु वृद्ध तो[4] म्हणुनि हा रडला. ।
वनवास मानुनि बरा मनिं, घे गुरुचा निरोप, रघुराम निघे.' ॥ ९
त्यजि[5] लक्ष्मण क्षितिसुताहि न ती, प्रभु घे तयांसि करितां विनती. ।
करि शोक फार निघतांचि तिघें, 'हृदया!' म्हणे नृप 'तमांत[6] रिघें.'॥ १०
पुर 'हा!' वदे. निरखि पंक्ति[7] पथीं, बसवी सुमंत्र नरनाथ रथीं. ।
प्रभुतें सखा गुह सजी सुतरी[8], अमरापगापरतटीं[9] उतरी. ॥ ११
फिरवूनि सूत[10], निजधर्ममखादृतचित्तवृत्ति[11], कवि, तातसखा, ।
सुमुनि प्रयागगत[12] हर्षविला; स्वशिरीं दृगंबु[13] बहु वर्षविला. ॥ १२
मग चित्रकूटनग[14] धन्य करी, निववी न[15] विप्र, हरि, वन्य[16] करी[17]. ।
कथि तें सुमंत्र; करितां[18] स्मरण प्रभुचें नृपास घडलें मरण. ॥ १३
भरतासि ते सचिव आणविती; जननी तया अहित जाणवि ती. ।
तिस, आपणाहि, बहु निंदुनि घे, परि तद्यशस्तवनें[19] इंदु निघे. ॥ १४
नमि कोसलेंद्रतनयेसि कवी, कथि साश्रु, 'हें[20] न,' तिस हें सिकवी. ।
धरि पोटिसीं[21] दृढ सती, निववी, करि साधु[22] बोध, भरता जिववी. ॥ १५
करुनि क्रिया, उचित साधुनि घे; फिरवावया प्रभुसि साधु[23] निघे. ।

---

१. पूर्वीं दिलेले. २. चवदा मनु आहेत म्हणून मनु म्हणजे चवदा. अब्द=वर्षें. ३. सत्य (वचन राखणें) व पुत्रविरह यांतून कोणतें पत्करावें हें राजास समजेना. He was in a fix. ४. दशरथ फार म्हातारा म्हणून रामास वाईट वाटलें. ह्यापेक्षां दशरथ म्हातारा झाला होता म्हणून राजा 'हाय!' करून रडला असा अर्थ विशेष मनोहर आहे. ५. सगळ्यांनीं टाकलें पण लक्ष्मणानें व जानकीनें मात्र नाहीं. ६. शोकरूपी अंधकारांत शीर. **परिणाम** अलंकार आहे. ७. पादचारी. ८. उत्तम नौका. ९. भागीरथीच्या परतीराला. १०. सुमंत्र. ११. स्वधर्म जो यज्ञ त्यानें सादर झाली आहे चित्तवृत्ति ज्याची असा शहाणा व बापाचा मित्र. १२. प्रयागक्षेत्रीं राहणारा. १३. दृष्टिरूपी पर्जन्याचा वर्षाव. बहारीचें **रूपक** व **पर्यायोक्ति** आहेत. १४. चित्रकूट पर्वत. १५. केवळ विप्रांसच संतोष दिला नाहीं. तर हत्ती व सिंह व्याघ्र व वानरें यांसही सुख दिलें. १६. अरण्यवासी. १७. हत्ती. १८. स्मरण करितां करितां; करित असतांना. १९. भरतयशाचें स्तवन करण्यास चंद्र लागला! **प्रतीप** अलंकार. भरताची मातृनिंदा त्याच्या कीर्तीस कारण झाली! **असंगति** अलंकारही होतो. २०. 'मीं या कामांत नव्हतों' असें. २१. पोटाशीं धरणें हें अत्यंत ममत्वसूचक होय. २२. चांगला. २३. भरत.

धरि घाट[1] जो गुह, तया वळवी; शपथादिकें[2] स्वशुचिता कळवी. ॥ १६
नमुनि प्रयागगतसन्मुनितें, सुख दे अभीष्ट बहु जन्मुनि तें. ।
मग भेटुनि प्रभुसि साश्रु करी; पितृतर्पणावधि[3]च धैर्य धरी. ॥ १७
प्रभुपादपद्मयुग तो कवळी; परि सत्यसंधमतितें[4] न वळी. ।
समजाविती सुमुनि जे जवळी; प्रभुही यशें त्रिभुवना धवळी[5]. ॥ १८
'पितृसत्यवागवन[6] तूंहि करीं, पण तों[7] शिरीं अवनिभार धरीं.' ।
प्रभु यापरि प्रिय[8], यथार्थ, वदे, निजपादुकामिष महोत्सव[9] दे. ॥ १९
परते, परंतु नगरीं न वसे, गणि राज्यभोग हृदयीं शवसे[10]. ।
प्रभु अत्रितें नमि, तदीय सती करि जानकीस चिर मुद्वसती[11]. ॥ २०
वधिला विराध[12] परि उद्धरिला, ऋषिनीं प्रहर्ष हृदयीं धरिला. ।
शरभंग, कुंभज, सुतीक्ष्ण मुनी प्रभुनें वनीं निवविले नमुनी. ॥ २१
बहु मानिला गुरुतसाचि जगज्जनकें पितृप्रिय जटायु खग. ।
धरि जीपुढें न दुरिताद्रि[13] तुंग[14] क्षण, गौतमी वरिलि सिंधु[15] मग. ॥ २२
दलगेह[16] पंचवटिकेंत रची, सजि राक्षसी[17] स्ववपु जेंवि शची. ।
प्रभुलाहि दावि कुच पीन, कटी; करि धीर[18] लक्ष्मण तिला नकटी.॥ २३
खवळे तिचा कुमति भाउ खर, प्रभुनें ससैन्य वधिला प्रखर. ।
दशकंठ हेममृग दावि वनीं, धरवी सती धरुनि लोभ मनीं. ॥ २४
प्रभु धांवतां सभय एणें[19] पळे; करि विद्ध, राक्षस मनांत कळे. ।
प्रभुच्या स्वरें खेंचर[20] 'हाय!' वदे, धृति देवरोक्ति[21] महिजेसि न दे. ॥ २५

---

१. नदीचा कीं डोंगराचा? २. पूर्वी वचनाची सत्यता दाखविण्यास शपथा कराव्या लागत; व अजूनही सामान्य लोकांत व न्यायकचेऱ्यांत लागतात. स्वशुचिता=आपल्या मनाची शुद्धता व निष्पापता. ३. वडिलाला तर्पणोदक देईपर्यंतच. ४. प्रतिज्ञा खरी करण्याचा दृढ निश्चय झाला आहे अशा रामाला वळवूं शकला नाहीं. ५. शुभ्र करी. **परिणाम** अलंकार होय. ६. पितृ+सत्य+वाक्+अवन=बापाच्या सत्य भाषणाचें रक्षण. ७. तोंपर्यंत मस्तकावर राज्यभार घे. ८. प्रिय व सत्य भाषण फार थोडे ठिकाणीं सांपडतें. ९. पादुका मिळाल्या म्हणून भरतास आनंद झाला. १०. प्रेतासारखे! काय विदेहीपणा हा! ११. मुद्+वसति=आनंदाचें स्थान. येथें जानकीस उटी व माळा मिळाल्या होत्या. १२. हा **विरोध** पहा. प्रहर्ष=अत्यानंदानें. १३. पापपर्वत. १४. धीर. १५. महानदी. १६. पर्णशाला. १७. शूर्पणखा. इंद्राणीसारखी सुंदर झाली. १८. धीट. १९. हरिण. २०. राक्षस? 'खेचरा'साठीं तर 'खचर' नाहीं! २१. दीराची वाणी.

‘नसता तुझ्या मदभिलाष मनीं, न उपेक्षितासि पतिघात वनीं.’ ।
वदली असें जनकजा कटु तें; करि साश्रु, खिन्न, दवडी [1]पटुतें. ॥ २६
निघतांचि लक्ष्मण, सतीस हरी दशकंठ, जेंवि हरिणीस [2]हेरी. ।
करि भंग, सोडवि जटायु; परी खगपक्ष तोडि, तिस नेचि [3]अरी. ॥ २७
प्रभु पावला प्रियतमाविरहा, वदला वनीं हुडकितां चिर ‘[4]हैं !’ ।
कळवि [5]क्षतार्त खग, ‘हानि [6]धना घडली’ वरीहि मग [7]हीं निधना. ॥ २८
प्रभु ‘हा !’[8]कृतातिखळकुत्स वदे. [9]मुनिमानसासि बहु उत्सव दे. ।
करुनि क्रिया [10]पितृसखा सुखवी, [11]शिवें [12]नंदनस्थ न असें [13]रुख [14]वी. ॥२९
धरि जो कबंध [15]अशनार्थ तया प्रभु उद्धरी, करि [16]असीम दया. ।
[17]अनुगा मतंगमुनिची शबरी, गति दे तिला त्रिजगदीश बरी. ॥ ३०
सुख [18]वातज प्रथम दे हरितें. धृतिनें भरी [19]सुगळदेह रितें. ।
प्रभु त्या म्हणे, ‘न मुख [20]वाळिव, [21]धो;’ करि तत्प्रियार्थ खळवाळिवधा.॥ ३१
म्हणता यमासि, ‘गिळिल्या [22]उगळ !’ प्रभु तो कपीश्वर करी सुगळ. ।
श्रमले [23]नदेखतिच योधकपी; स्वयशासि मारुतिच शोधक पी. ॥ ३२
गणि वीर [24]गोष्पदचि तो जळधी; सुखवी रमेसि, दुखवी खळधी. ।
हर हर्षवी [25]परपुरीभसितें; [26]स्वसितें यशें करि जगें हसितें. ॥ ३३
मनिं जी म्हणे, ‘श्रम विरो’ पतिचा, प्रभुला कथी हित निरोप तिचा. ।
कपि दे शिरोमणि, पदीं नमनें करि, हर्षवी बहु [27]अदीनमनें. ॥ ३४

१. शहाण्यालाही. २. सिंह. **उपमा** समर्पक आहे. ३. रावण. ४. हाय. ५. जखमांनीं व्याकुल झालेला. ६. पूर्वींच्या काळीं रामयुगांत स्त्रीची योग्यता काय होती ती पहा. ७. जटायु. ८. कृत+अति+खळ+कुत्स=केली आहे अत्यंत खळांनीं निंदा ज्याची असा. ९. राम रागावला म्हणजे राक्षसनाश होईल हें मुनींस माहित होतें म्हणून त्यांस आनंद झाला. कारण न सांगतां कार्य सांगितलें म्हणून **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार. १०. जटायूला; तर्पणोदक मिळालें असतां मनुष्य स्वर्गसुखाला पात्र होतो, अशी समजूत आहे. ११. कल्याण. १२. नंदनवनांतील. १३. वृक्ष. १४. प्रसवे. **प्रतीप** अलंकार. १५. भक्षणार्थ. १६. अनंत. १७. शिष्यीण. १८. मारुति. १९. सुग्रीव निराश झाला होता त्यास धीर दिला. ‘देह’शब्द नपुंसक आहे. २०. तोंड वाळवूं नको. ही **लोकोक्ति** होय. २१. तृप्त हो. २२. ओकून टाक, मेलेल्यास जिवंत कर. असें म्हणाला असता. २३. सीता त्यास सांपडली नाहीं त्या वेळीं संपातीनें सीतेचें ठिकाण सांगितलें. पुढें जांबुवंतानें मारुतीची स्तुति केली त्याला अनुलक्षून हें म्हणणें आहे. २४. गाईच्या पावलायेवढा. २५. भस्म करण्यानें. २६. स्वतःच्या शुभ्र यशानें. २७. धीरांचीं मनें. ‘बहुत दीन मनें’ असा पाठ असेल काय?

चिर भेटला प्रभु तया कपिला; न असी सुतींहि सदया कपिला.[1] ।
श्रुतिगीत[2] तो, कविसम स्तवि त्या, गुरुसाचि दासहि समस्तविल्या.[3] ॥ ३५
कपि जाणवी, 'अरि असामकर,[4] प्रसिता नसे परि असा मकर. ।
सजला कुधी, धरुनि काम, रणा, प्रभुजी! असत्तरु[5] निका मरणा.' ॥ ३६
अमिता[6]मरांशकपिसैन्ययुत प्रभु घे सखा सुगळ, सूर्यसुत. ।
द्रुत[7] जाय सागरतटीं, 'उतरे;' अरितें म्हणे, 'सकळ हो हुत[8] रे!' ॥ ३७
अपमानिला[9] हित बरें कथिता; नमि तो बिभीषण गुणप्रथिता.[10] ।
शिवतां पदांशि, पदें[11] दे व्यथिता[12] प्रभु जो स्मरा[13]द्यरिचमूमथिता. ॥ ३८
प्रभु भीतसिंधुवचनें वळला, प्रणतीं न कोपुनि कधीं मळला.[14] ।
करवूनि सेतु, कुतुकें उतरे; वदला अरीस 'न मदें उते[15] रे! ॥ ३९
खळ[16] दावि चाप शिरही लटिकें, धृतितें सती मनिं म्हणे 'न टिकें.' ।
समजे सती न कपटा परमा, कळवी बिभीषणवधू सरमा. ॥ ४०
प्रभुचा सखा,[17] निरखितां अरितें, करि तें, रुचे बहुत जें हरितें. ।
उरगीं जसा गरुड तेंवि पडे, क्षण या पुढें [18]अहिततेज दडे. ॥ ४१
न [19]लवे दशास्य, कथि अंगद या, 'प्रभुची न वांछि तव भंग दया.[20]' ।
कर साम, आजिस[21] न राम सजो, बुडतो अधर्मरत[22] तामस जो. ॥ ४२

---

१. गाय. **व्यतिरेक** अलंकार. २. वेदांनीं गाइलेला तो रामचंद्र स्तुति करणाऱ्या भाटाप्रमाणें कपीची स्तुति करी. ३. जगदुत्पादक गुरूची दास (शिष्य) स्तुति करितो त्याप्रमाणें. काय मारुतीचें भाग्य हें व काय रामचंद्राची विनयशीलता ही! ४. रुहन करणारा. गजेंद्राचा पाय धरणारा मकर सुद्धां असा नसे. काय समजून हा **दृष्टांत** आणला आहे नकळे. गजेंद्राची प्रार्थना त्यानें ऐकली नाहीं, तसाच रावण साम कबूल करणार नाहीं असा भाव दिसतो. ५. विषवृक्ष. **निदर्शना** अलंकार. निका=खरोखर. ६. अनंत देवांच्या अंशानें उत्पन्न झालेल्या वानरांचे सैन्यासह. ७. शीघ्र. ८. जळून खाक होऊं दे. ९. रावणानें अपमान केला. १०. दुसऱ्याचे गुण प्रसिद्धीस आणणारा रामचंद्र त्याला. ११. राज्यपद, मोक्षपदही. १२. संकटांत सांपडलेल्यास. १३. स्मर+आदि+अरि+चमू=कामादि शत्रुसेना. १४. हें **अर्थांतरन्यासा**चें उदाहरण. १५. मदानें उतून जाऊं नकोस, मदोन्मत्त होऊं नकोस. १६. रावण सीतेस शिर व चाप दाखवी व सीता धीर सोडी. **पर्यायोक्ति** आहे. १७. सुग्रीवानें रावणास चावून व ओरबाडून उपद्रव दिला म्हणून वानरांस हर्ष झाला. १८. शत्रुतेज लपलें! १९. नम्र झाला नाहीं. २०. प्रभुची दया तव भंग (तुझा पराभव, तुझा मृत्यु) इच्छित नाहीं. २१. युद्धास. २२. पापमग्न तामसगुणी खळ बुडतो. **अर्थांतरन्यास** व **अप्रस्तुतप्रशंसा** आहेत.

दशतुंड पुंड खवळे, धरवी. परवीर ते वधुनि ‘हा!’[1] करवी. ।
प्रभुसीं भिडे. वरमदें[2] खळ हा, बळहानिहेतु[3] उभवी कलहा. ॥ ४३
बळप[4] प्रहस्त पहिला खपला. घटकर्णही, जरि बरा तपला[5]. ।
न घनध्वनीस जय ये कपटें, ज्वलदग्निबंधन[6] घडे न पटें. ॥ ४४
अहिपाश पक्षिपतिनें[7] हरिला, बळभंग दुःखित करी अरिला. ।
उडवी मरुज्ज[8] अगदें[9] सबलप्रभुशल्यमोह जरिहि प्रबळ. ॥ ४५
जनकात्मजानिधन दाखविलें; प्रभुलाहि शोकविष चाखविलें. ।
वधि लक्ष्मण त्रिदशपत्यरितें[10], पडतें कुबुद्धि मह सत्य रितें ॥ ४६
सुतशोकतप्त दशकंठ ‘असी न बरी’ म्हणे, धरि वधार्थ असी[11]. ।
फिरवी करूनि सचिव स्तुतितें, जगवि प्रभुस्मरणवस्तु[12] तितें. ॥ ४७
अरिनें मृत स्वकुळ आठविलें, प्रभुच्या वधा कटक पाठविलें; ।
प्रभुसीं बरेंचि समरीं झटलें, विशिरस्कही[13] अतिरसें[14] नटलें. ॥ ४८
बुडतांहि संतति दशानन, ती[15], करि भेटतां तशि दशा, न नती, ।
न विलोकि आयुध[16] न, हा लवला, न धरूनि आयु धन हालवला; ॥ ४९
बहु कोटि मर्दुनि रणांत हरी प्रकटी महाप्रलयरीति[18] खरी. ।

---

१. हाय. अंगद परवीरांस त्रास देई. २. ब्रह्मदेवाच्या वरानें उन्मत्त होऊन. ३. सैन्याच्या नाशाचा हेतु जो कलह त्यास उभा करी. ४. सेनापति. ५. कुंभकर्णानें जरी पुष्कळ तपश्चर्या केली होती अगर युद्धांत पुष्कळ खटपट केली तरी तोही मेला. ६. पेटलेला विस्तव वस्त्रानें बांधितां येत नाहीं. **दृष्टांत** समर्पक आहे. ७. नागपाश इंद्रजितानें उत्पन्न केले होते, त्यांचा नाश गरुडानें केला. ८. वायुपुत्र (मारुती) उडविता झाला. मोह नाहींसा करिता झाला. ९. औषधानें. १०. इंद्रजितातें. त्रिदश (देव) त्यांचा स्वामी इंद्र त्याचा शत्रु (इंद्रजित्). पुढच्या पंक्तींत पुनः **अर्थांतरन्यास** आहे. कुबुद्धिमह=दुष्टाच्या बुद्धीचा प्रभाव. ११. सीतावधार्थ खड्ग. १२. रामचंद्राचें प्रेम यावरून व्यक्त होतें. प्रभूच्या स्मरणीचें कारण जी सीता. १३. मस्तकरहितहि. १४. वीररसातिशयानें. १५. ती तशि दशा भेटतां करि नती करी, दशानन संतति बुडतांहि नति न करि—असा अन्वय असावासें वाटतें. गजेंद्राची संतति बुडून स्वतःवरही मरण्याची पाळी आली तेव्हां तो नम्र झाला. पण दशानन नम्र झाला नाहीं असा अर्थ होत आहे. अर्थात् येथें दूरान्वय बराच आहे, पण याशिवाय गत्यंतर नाहीं असें वाटतें. हा अर्थ घेतला तर ‘पशूला कळणारी गोष्ट’ रावणासारख्याला कळली नाहीं, असा **विरोध** अलंकार होईल. १६. आपल्या हातांत शस्त्र काय आहे तें त्यानें पाहिलें नाहीं. १७. आयुष्य व धन हीं रावणास तुच्छ झालीं. त्यानें त्यांच्यासाठीं मुळींच हालचाल केली नाहीं. १८. प्रलयकाळचा संहारविधि.

[1]परमेश्वरानुजनिवक्ष अरी खरशक्तिनें दृढहि विद्ध करी. ॥ ९०
कपि [2]त्या सदोषधिरसें जगवी; मग [3]वीरराजधृतितें [4]तगवी. ।
जग वीतसे सहज जो अज, [5]यो रज याचिता [6]हरि गमे अजया; ॥ ९१
[7]पविभृद्रथीं बसुनियां रिपुला निजशक्ति दाखवि रणीं विपुला; ।
दिन सप्त रात्रिहि करी समर, प्रभु त्या म्हणे [8]मरुदरीस 'मर.' ॥ ९२
शत मस्तकें उडवि राम, तरी दिसतीं तसींच, न मरेचि, अरी. ।
प्रभु आधितें स्वहृदयांत धरी, उपदेश [9]कुंभज जयार्थ करी. ॥ ९३
रवि दे दशास्य[10]दलनार्थ वर, प्रभु [11]पद्मजास्त्रयुत योजि शर. ।
हृदया विदारुनि वधी अरितें, निववी रमेश [12]हरितें, [13]अरितें. ॥ ९४
वर दुंदुभिध्वनि उठे, करिती सुर पुष्पवृष्टि, [14]नुति आदरिती, ।
[15]अमरी विजेसि बहु लाजविती, [16]पटु गाति, वाद्यशत वाजविती. ॥ ९५
वदले महेश विधि नारद या, 'प्रभुचीच तोषविति फार दया.' ।
'रति देचि ना असि [17]वसु [18]स्वरगा; प्रभु नाशितो अशिव, सुस्वर गा!' ॥९६
[19]अरिदारशोक पहिला हरवी, मग तत्क्रियाहि बरवी करवी, ।
शरणागता चिर पदीं मिरवी, प्रभु पौर गौरवि, तयां निरवी. ॥ ९७
करि [20]दिव्य कीर्तिकर [21]भूतनया, स्तविती सुरर्षि बहु [22]पूतनया. ।
'म्हणती,' 'स्तुती न' कवि 'नूतन या, नसती अशा [23]दुरित [24]धूत [25]नया.' ॥९८
मग भेटला दशरथ स्वसुता, अमृतें [26]हरी [27]हरिबळव्यसुता, ।
प्रभुच्या बिभीषण पदा विनवी, अणु रीति तो [28]नत न दावि नवी; ॥ ९९
प्रभु पूजवी कपिचमूपतितें, करि तो बिभीषण महामति तें, ।
मग पुष्पकांत बसवी प्रभुला, वदले, 'यशा' [29]सुरें सविप्र 'भुला.' ॥ ६०
[30]कपियातुप प्लवगही अवघे, निजपुष्पकीं [31]जनकजाधव घे, ।

---

१. रामाच्या धाकट्या भावाचें भक्ष्य. २. लक्ष्मणाला चांगल्या औषधींच्या रसानें. ३. रामाच्या धैर्यातें. ४. संरक्षी. ५. मारुतीला येवढेंसें मागणारा हरि (रामचंद्र) पराभवाला पावला असें वाटलें. असा अर्थ करावा काय? ६. पराभव हरिता कपि गमला. ७. पवि-भृत्+रथ=इंद्राच्या रथीं. ८. देवशत्रु, रावण. ९. अगस्त्य. १०. नाशार्थ. ११. ब्रह्मास्त्रयुक्त. १२. इंद्रातें. १३. सुदर्शनचक्रातें. १४. स्तुति. १५. देवांगना. १६. कुशल, मधुर. १७. राहूं. १८. कल्पवृक्षानें दिलेली संपत्ति. १९. रावणाच्या बायकोचा शोक. २०. शपथ. २१. सीता. २२. पवित्राचरणा. २३. पाप. २४. धुतात, क्षाळितात. २५. नद्या. २६. इंद्र. २७. कपिसैन्यप्रेतत्व. २८. शरणागत. २९. देव. ३०. सुगळ, बिभीषण. ३१. राम.

मग तो निघे प्रभु स[1]सीत नया, जसि कीर्ति, भूमिचि तसी तनया. ॥ ६१
परमादरें निरखि सेतुस ती, समजे तया [2]विजयहेतु सती. ।
स्तवि वायुजा [3]स्वभजनानळसा, नगणी मनीं पटु दुजा नळसा. ॥ ६२
प्रभुच्या मुखें रणकथा परिसे, [4]स्ववियोगवासरहि जे अरिसे, ।
विजयें निवे, बहु धरी रुचितें, तिस शोभवी यश [5]महाशुचि तें. ॥ ६३
[6]सुगळप्रियेसहि विमानवरीं, बसवी समीपचि धरूनि करीं, ।
भरतासि मारुतिमुखें कळवी, प्रभु दर्शनें [7]तदसुखा पळवी. ॥ ६४
अभिषिक्त होउनि पदीं बसला प्रभु, तो महोत्सव जगीं वसला, ।
भरतासि राम युवराज करी, सुयशें [8]जगद्धृदयवृत्ति हरी. ॥ ६५
स्वरिपूसि 'होउनि परासु, गळा,' म्हणत्या सख्या हितपरा सुगळा, ।
करि पूजुनि स्तवुनि धन्यतम. प्रभु नाशिता [9]प्रकृतिजन्य तम. ॥ ६६
कवि ते मयूर नटवी, निववी, श्रितचातकांसि [10]अमृतें जिववी, ।
भरि [11]अंजनाभवनदास महादय कंजनाभ [12]वनदासम हा. ॥ ६७

---

# ५१. रमणीयरामायण.

([13]सारंगवृत्त.)

श्रीशें कराया यशें धन्य विश्वास[14], ज्यास[15] श्रुति[16] ब्राह्मणाचाचि[17] विश्वास, ।
केला [18]अजाचा सुत [19]क्ष्मीप तो तात, कीं सर्व[20] दिक्कंठ[21]संत्रस्त होतात. ॥ १
श्रीकौसलेशात्मजापुत्र तो राम ये केकयाच्या तनूजोदरा धाम[22] ।
त्या तात ठेंवी [23]स्वसच्चित्तविश्राम, आधीं 'भ' मध्यें 'र' अंतीं 'त' हें नाम.॥२
जी दिग्रथस्त्री सुमित्रा तिला होय, तो लक्ष्मण स्वाग्रजाची धरी सोय[24]. ।

---

१. सीतेसह. २. विजयाचें कारण. ३. निजसेवातत्पर. ४. शत्रूसारखे भासणारे आपल्या वियोगाचे दिवस रामाकडून विरहवृत्तांतही ऐकून घेत आहे. ५. अत्यंत पवित्र. ६. तारेला. ७. त्याच्या दुःखाला. ८. लोकांचीं मनें. ९. मायेनें उत्पन्न झालेलें. १०. उदकानें. ११. मारुतिरूप नदास. १२. मेघासम. १३. येथें चार 'त'गण असतात. 'अंत्य लघू तो तगण म्हणावा.' १४. सृष्टीला. १५. ज्या दशरथास. १६. वेद. १७. ब्राह्मण हे यज्ञयागामधील विधींचे मीमांसापर ग्रंथ आहेत. 'द्विज' असाही अर्थ घ्यावा. १८. राजविशेष, त्याचा पुत्र. (दशरथ.) १९. पृथ्वीपति (दशरथ) तो. २०. कारण. २१. रावणापासून त्रास पावतात. २२. ब्रह्मरूप तेज (भरतरूप). २३. स्वतःच्या उत्कृष्ट चित्तास विश्रांति देणारें. २४. सोय धरणें=आश्रयास असणें, दुसऱ्यास सुख होईल असें करणें.

शत्रुघ्न तैसाचि राहों नदे खेद. चारी जगत्पूज्य झाले, जसे वेद. ॥ ३
केलें वसिष्ठें द्विज[१], ज्ञान वेदांत तें तोंचि ये, जों[२] न आले नवे दांत. ।
जाणे महानंद तो देवपुत्रास, ज्याचें षडूर्मीसही[३] दे वपु त्रास. ॥ ४
जों भूप चित्तांत चिंती विवाहास, तों गाधिचा पुत्र मागे विहास[४]. ।
यज्ञावना ने, पथीं दे तया अस्त्र, शीतातपार्तास[५] द्यावें जसें वस्त्र. ॥ ५
जी ताटका मार्ग रोधी, तिच्या बाण वेगें, उरीं राम हाणी, हरि प्राण. ।
सिद्धाश्रमीं जाय, रक्षोबळा 'हाय!' हें बोलवी; त्या जया सत्सभा गाय. ॥ ६
नाशी अहल्यासतीचा महाशाप; वोढूनि मोडी उमाजानिचा[६] चाप; ।
सीतामनींचा निवारी क्षणें ताप[७], दे भार्गवा शांति, जी संहरी पाप. ॥ ७
'सोडूनि राज्यास, जावें अरण्यास,' माता[८] म्हणे; आवडे तें शरण्यास[९]; ।
वल्की[१०] निघे लक्ष्मणा त्याहि सीतेस घेऊनियां राम विश्लेषभीतेस[११]. ॥ ८
झाले श्रमी लोक, यां नावरे शोक, संपन्न जें ओक[१२], तें भासलें ओक[१३]. ।
भेटे गुहाला, रडे तो जसा मुग्ध[१४], मागे[१५] वळाया जटा जेधवां दुग्ध. ॥ ९
रामें भरद्वाज केला सुखी फार; तो चित्रकूटाद्रिही तापसाधार[१६]. ।
शोकेंचि सोडी धरेचा[१७] धणी[१८] काय[१९]. निंदी प्रसूतें[२०] स्वयें सत्सभाराय[२१]. ॥ १०
संस्कारुनि क्षोणिच्या पाळका तोय दे, रामपादांबुजीं भृंग[२२] तो होय. ।
घे पादुका, आग्रहें तो फिरे; भक्त झाला न त्या दुर्लभींही[२३] पदीं सक्त. ॥ ११

---

१. वसिष्ठानें त्यांस द्विज (ब्राह्मण) केलें! त्यांस ब्राह्मणज्ञान सर्व शिकविलें. 'विप्रक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्या द्विजा: स्मृता:.' २. आठ नऊ वर्षांच्या आंतच. ३. कामक्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, यांसहि ज्याचें वपु त्रास देतें झालें. ४. वि+वाह=गरुडावर बसून जाणाऱ्यास. ५. थंडीवारा, ऊन यांनीं त्रस्त झालेल्यास. ही दानपद्धति किती श्रेष्ठ! **उपमा** आहे. ६. महादेवाचा. ७. 'अहह! दारुण ताप! तुझा...पण' ही कविता परिचितच आहे. ८. कैकेयी. ९. सर्वांनीं शरण जाण्याचें स्थान. १०. वल्कलें धारण करणारा. ११. वियोगाला भ्यालेलीस. १२. गृह. १३. वांतीसारखें किळस उत्पन्न करणारें लोकांस वैराग्य झालें होतें त्याचा पंतांनीं एका शब्दांत निर्देश केला आहे. पण तो किती हृदयभेदी आहे! १४. वेड्यासारखा. १५. जटा बांधायला चीक मागितला तेव्हां. १६. तपस्व्यांचें ठिकाण. १७. पृथ्वीपती. १८. दशरथ. १९. देह. २०. मातेतें (कैकेयीतें). २१. भरत. साधूंचा राजा. २२. या उत्तम **रूपका**नें भरताचें नमन सांगितलें. २३. दुर्मिळ पदालाही भरत भक्त सुद्धां सक्त झाला नाहीं. कारण लोकरक्षणाचें कर्तव्य स्वसुखापेक्षां जास्त मोलवान् आहे. **विरोधाभास** आहे.

अत्रीस भेटे प्रभु, ज्ञानिगीतेस[1] दे तत्प्रिया[2] अंगरागादि[3] सीतेस. ।
स्वर्गास धाडी विराधा रहायास, कीं देखवेना निराधार हीं यास. ॥ १२
श्रीदंडकारण्य, जे या पवित्रास[6] होते निषेवूनि[7]; निष्पाप, वित्रास[8], ।
ते बाणभंगादि[9] भेटूनियां सर्व केले; तयां स्वर्गही भासला खर्व[10]. ॥ १३
ज्याचा तपश्रीप्रियेसीं[11] सदा रास[12] तो कुंभभू साधु पूजी सदारास[13]. ।
दे विष्णु[14] तो ह्या दशास्यादि भंगास, जो मोह[15] नाशार्थ दे आत्मसंगास.॥ १४
भेटे पित्याचा सखा गृध्र जो त्यास तत्प्रेमहर्म्याचिया[16] भव्यजोत्यास[17]. ।
त्याच्या विचारेंचि गोदावरी तीर पावूनि, तेथें वसे तो महावीर. ॥ १५
राहे; वसायास अन्यत्र आस्था न; पाहे बरें पंचवट्यालय हा स्थान. ।
सौमित्रिनें[18] पर्णशाळा बरी थोर केली; वसे तींत विश्वाहिचा[19] दोर. ॥ १६
पावे कुधी रावणाची स्वसा[20] दंड; मेला खर क्रूरकर्मा महाचंड. ।
ऐकूनि झाले तपस्वी मनीं थंड, शोधी[21] जनस्थान मोडूनि तें बंड. ॥ १७
ती दुर्दशा स्वस्वसेची महामाय[22], पाहे, जळे फार कोपे, म्हणे हाय; ।
मायामृगें[23] तींकडे तीन तत्काळ आधीं करी, तो हरी श्रीस सत्काळ[24]. ॥ १८
भासे शिखी[25] प्राशितो या तुपा, सून ती सोडवी गृध्र तो यातुपासून[26]. ।
तत्पक्ष खड्गें दशग्रीव तोडून ने विश्व मातेसि दुष्कीर्ति[27] जोडून. ॥ १९

---

१. ज्ञानी लोकांनीं जिची स्तुती केली आहे अशी सीता. २. अरुंधती. ३. चंदनाची उटी इत्यादि. ४. राम. ५. विराधास. ६. पवित्र अरण्यास. ७. सेवून. ८. त्रास नाहीं असे. ९. शरभंगादि. १०. ऱ्हस्व, ठेंगणा. **प्रतीप** अलंकार. ११. तपश्रीरूप स्त्रीसी. १२. क्रीडा. तपावर अगस्ति ऋषीचें प्रेम पहा. रास हा खेळ गवळ्याच्या स्त्रिया खेळतात. १३. सीतापत्नीसह रामचंद्रास. १४. अस्त्रविशेष रामास दे. १५. जो राम. **विनियम** अलंकार. १६. रामाच्या प्रेमरूप गृहाच्या. १७. मोठ्या चौथऱ्यास. हें **रूपक** गृध्राचें विशेषण आहे. १८. पूर्वी मोठ्या लोकांस 'लहान' समजलेले धंदे करण्याची हौस असे, व एकदोन कला प्रत्येक कुलीन पुरुष शिके. कृष्ण, नल, शल्य यांचें सारथ्य, भीमाचा पाक वगैरे गोष्टी प्रसिद्धच आहेत. हल्लींच कर्मेंद्रियांचें महत्व जाऊन ज्ञानेंद्रियांस विशेष महत्व आपल्या देशांत आलें आहे व त्याचा परिणाम कर्म व ज्ञान यांचा लोप हा होय. कुंड्या करून विकणाऱ्या साहेबांची समंजस म्हणविणाऱ्या पुरुषांनीं किती वेळ तरी थट्टा मनांत केली आहे! १९. विश्व सर्पाची रज्जु. ब्रह्मावर हें **रूपक** आहे. २०. भगिनी. (शूर्पणखा.) २१. शुद्ध करी. २२. कपटपटु रावण. २३. तीन दिशेकडे तिघांस (राम, लक्ष्मण, सीता यांस). २४. साधूंचा छळ करणारा; त्यांचा अंत करणारा. २५. अग्निरूपी रावण तूपरूपी सीतेस प्राशी (हरण करी). **अतिशयोक्ति** आहे. २६. राक्षसापासून. २७. रावणानें परस्त्री हरण केली हें तर

सीता प्लवंगांत टाकी अलंकार, 'हा! राम!' 'हा! नाथ!' ऐसें म्हणे फार. ।
ठेवी अशोकीं वनीं तीस लंकेंत, नष्टायु दिकंठ तो; धी न शंकेंत. ॥ २०
सौमित्रि सीतोक्त सांगे; म्हणे 'हाय!' शोकें रघूंचा सुतेजाहि तो राय. ।
धांवूनि ये खोटजा पांच सा कोस, मोहीं बुडे राम पाहूनि तें ओस. ॥ २१
पाहे, प्रियेचा करीतां वनीं शोध. मूर्छाकुळा तातमित्रा महायोध. ।
पाजी तया तोय तैशाहि शोकांत, तो कां तगेना सुवाद त्रिलोकांत? ॥ २२
सीतेसि शोधीत जातां, धरी घोर, केली कबंधीं कृपा श्रीवरें थोर. ।
धन्या मतंगर्षिशिष्या वनीं होय, सेवूनियां क्षाळुनि श्रीपदें तोय. ॥ २३
पंपातटीं 'है!' वदे, आठवी रत्न; सौमित्रि सांत्वी; 'करावा' म्हणे 'यत्न.' ।
सूर्यात्मजासीं हनूमान् करी भेट. तत्सख्य तें जेंवि सिंधूदरीं बेट. ॥ २४
दावी अलंकार सुग्रीव, दे हर्ष; तद्दर्शना राम मानी सुधावर्ष. ।
वाळीस एकेचि बाणें वधी, प्राज्य दे त्या सुकंठासि तारादि तद्राज्य. ॥ २५
प्रेषी पहायासि सीतेसि तो कीश व्हाया सखा हृष्ट राम त्रिलोकीश. ।
सांगीतला गृध्रराजाग्रजें शोध, लंघी समुद्रा हनूमान् महायोध. ॥ २६
मारूनियां सिंहिकेतें तटा जाय; लंकाधिदेवीस तो बोलवी 'हाय!' ।
शोधूनि लंका अशोकीं वनीं कीश पाहे सतीतें, सुधेतें जसा वीश. ॥ २७

---

पाप केलेंच. पण सर्वांची माता जी सीता तीस अभिलाषबुद्धीनें नेणाऱ्या रावणावर मात्रागमनाचाही आरोप कवीनें आणला आहे व तो खरा आहे.

१. वानरांत. २. 'संशयात्मा विनश्यति' या न्यायानें कीं काय? 'शंका' म्हणजे 'भीति' असाही अर्थ आहे. ३. रघूंचा राय (राणा). ४. जटायूला. ५. परोपकाराची ही सुकीर्ति. ६. भयंकर कबंध रामास धरिता झाला. ७. शबरी. ८. रामाच्या पदांनीं शुद्ध झालेलें तोय सेवून. 'क्षाळुनि'च्या ऐवजीं 'क्षाळिलें' असें असेल काय? ९. हाय! १०. सीतारत्न. ११. सुग्रीवाला. १२. सागराच्या उदरांतील बेट जसें चोहींकडून जलानें व्याप्त असतें तद्वत्. ही पंतांची उपमा त्यांच्या बुद्धीचा जोरकसपणा दाखविणारी होय. हा 'बेट'शब्द कोठून आला असावा? 'वेष्टन' यापासून तर नाहीं? १३. अमृताचा पर्जन्य. सीतेचे अलंकार पाहून सीता जिवंत आहे अशी रामास आशा उत्पन्न झाली. या जगांत आशा हें किती उत्कृष्ट अमृत आहे! १४. विस्तृत असें राज्य. १५. जटायूचा थोरला भाऊ संपाती यानें. १६. एक समुद्रांत आडवी आलेली राक्षसी. १७. लंकादेवीशीं युद्ध करून मारुतीनें तिचा पराभव केला. १८. गरुड. यानें मातुःश्रीच्या सुटकेसाठीं अमृत नेलें होतें.

केला तिणें [1]रावणाचा मनोभंग; तेणें निवे **वायुच्या सूनुचें** अंग. ।
**दिक्कंठ** जातांचि मुद्रा तिला [2]धीर अर्पी, कथी वृत्त, तो वाढवी [3]धीर. ॥ २८
आनंद त्या **वायुजाचा** [4]निवेदीन, तत्काळ अत्यंत जैसा निवे दीन. ।
पावूनियां वांछिता संनिधानास, त्याच्याहि भाग्योदयें [5]सन्निधानास. ॥ २९
चूडामणी दे, कथी भव्य [6]संदेश, 'या, न्या मला शीघ्र, मारूनि [7]मंदेश.' ।
वंदी, निघे साधु, पावे प्रभा, वायुसा तो हरी वृक्ष, [8]भव्यप्रभावायु. ॥ ३०
मारी रणीं मांस भुक्कोटि; [9]केकीश सर्पांत जैसा, तसा तो टिके कीश. ।
गांठी **दशास्यात्मजन्मा** महादक्ष तो मारिला **वायुच्या** नंदनें **अक्ष.** ॥ ३१
कीशाग्नि त्या [10]सैन्यकक्षासि चाटून तो सांपडे **मे**घनादासि दाटून; ।
हर्षूनि नेला सभेमाजि बांधून ते बोलती, 'दुष्ट खावा, न [11]रांधून. ॥ ३२
हाणूनि वाग्बाण **दिक्कंठ**मर्मांत, बोले तदज्ञान जें नीतिधर्मांत; ।
दूषी तदभ्यास जो पापकर्मांत. [13]देवर्षिधी तो करी मग्न शर्मांत. ॥ ३३
पाहे वधाया [14]तैया [15]तो जसा भूत, तद्बंधु बोले, 'नव्हे वध्य कीं दूत.' ।
**दिक्कंठ** 'याचें' म्हणे, 'पेटवा पुच्छ; **लं**केंत ताडीत हा हिंडवा तुच्छ.' ॥ ३४
तैसेंच आरंभितां त्या खळांहीं न झाला [16]महाकौतुकी तो कळाहीन. ।
[17]पोळी, पळामाजि घोळी [18]अरिव्रात, होळी पुरी होय; [19]चोळी कुधी हात.॥ ३५
एवं [20]**दशास्योग्रगर्वाद्रि** भंगून, वेगें करी तो मना हीन पंगू न, ।
लंघूनियां दुस्तराब्धीस येवून देवास दे हर्ष ती खूण ठेवून. ॥ ३६

---

१. रावण सीतेस वळविण्यासाठीं आला होता तेव्हां. २. धैर्ययुक्त (मारुती). ३. धैर्य, भरंवसा. ४. मी सांगतों असें **पं**त म्हणतात. तो तत्काळ निवे, जसा अत्यंत दीन निवतो. ५. इष्ट असा जो सत्संग पावून मारुतीच्या भाग्योदयानें जवळ येण्याचें केलें. त्यांचें नशीब जोरावर झालें. ६. निरोप. ७. मूर्खांचा राजा. (रावण.) ८. मंगलदायक असा जो विशेष भाव (प्रेम) हेंच आहे आयुष्य ज्याचें असा मारुति. ९. केकि+ईश=मोर. **उपमा** पहा. १०. सैन्यरूप गवतास. **रूपक** हृदयंगम आहे. ११. राक्षसच ते! स्वयंपाकाच्या भानगडींत तरी कशाला पडतील? १२. नीतीचा व धर्माचा अंत करणारें जें अज्ञान तें सांगे. १३. जितका रावणाचा पाणउतारा, तितकें देव आणि ऋषींस जास्त सुख! रावणानें यांस किती नेभळे केले होते! १४. मारुतीस. १५. रावण. भूतांना धर्मनीति काय? १६. महानाटकी. (मारुति.) १७. जाळी. १८. शत्रुसमुदाय. १९. हात चोळल्यानें क्रोधाविर्भाव व दुःखातिशय यांचा बोध होतो. २०. येणेंप्रमाणें रावणाचा उग्र असा गर्वपर्वत.

सप्रेम आलिंगिला श्रीवरें दूत, केला महा धन्य, झाला महापूत. ।
मानी तया [1]सूपकारा, महाभार वानी, '[2]महोदार' ऐसें वदे सार. ॥ ३७
संगें असंख्यात घेऊनियां वीर, पाहे प्रभूत्तंस पाथोधिचें तीर. ।
तों या शरण्यास वंदी निवेदून तापा [3]दशास्यानुजन्मा, निवे [4]दून ॥ ३८
त्या राज्य तत्काळ दे राक्षसांचें, न अल्पीं म्हणे श्रीनदीतेंचि सांचेन ।
सेना समुद्रीं तराया करी सेतु, पापार्णवींहि [5]प्रजाशुद्धिचा हेतु. ॥ ३९
[6]त्यांतें दशास्यानुजन्मा धरी. पार जाऊनि सोडी [7]चरांतें [8]दयाधार. ।
तें [9]वर्णिती सैन्यसंख्या महायोधनामादि. दिक्कंठ ऐके. करी क्रोध. ॥ ४०
सीतेसि दिक्कंठ दावी शिरश्चाप, माया न जाणूनि पावे सती ताप. ।
होता जरी [10]गोपुरांग्रीं कुधी दूर सोडी [11]सुवेळाग्र, कोपें उडे शूर. ॥ ४१
ताडी तया [12]सौरिकालाहिला [13]वीन, तैसा, म्हणे, 'धाक कालाहि लावीन.'।
सामार्थ [14]राजा करी अंगदा दूत, [15]तो त्या म्हणे, 'रे! मदानें न तूं ऊत.॥ ४२
दे जानकी, सर्व जातें [16]मुधा, राहुं रे! [17]दुर्दर्शापात्र पीतां सुधा राहु.' ।
इत्यादि ऐकूनि 'मारा' म्हणे पुंड, [18]कीळा वमे तुंड त्याचें जसें कुंड ॥ ४३
जे झोंबले मूढ ते अंगदानाच मेले जयें बोलिले अंगदा 'नाच.' ।
युद्धीं प्रहस्तादि गेले लया योध, मत्तागजांहीं हरीचा नव्हे [19]रोध. ॥ ४४
धांवे करी जो लवें [20]नागपा शांत, भारी तया काय हो! [21]नागपाशांत? ।
[22]कुंभश्रवाही [23]मधुघ्नापुढें काय? ज्याचा म्हणे पर्वतातें '[24]कुंढें [25]कोय.' ॥ ४५

---

१. सु+उपकारा=उत्तम उपकार करणाऱ्यास. मारुतीला मान देई. २. यापेक्षां जास्त शिफारस काय हवी? ३. बिभीषण. ४. संतप्त. ५. पापसमुद्रामध्यें मग्न झालेल्या प्रजेला शुद्ध करण्याचें कारण जो रामचंद्र तो सेतु करी. ख्राइस्टनें आपलें शरीर दान करून प्रजेस पापविमुक्त होण्यास उपाय शोधून काढला असें ख्रिस्ती समजतात व रामचंद्रानें सेतु बांधून तो हेतु सिद्धीस नेला असें पंत म्हणतात. ६. दूतांस. ७. दूतांतें. ८. दयानिधान जो रामचंद्र. ९. दूत. १०. शिखरावर. ११. सुवेळापर्वतावर रामसेना राहिली होती. सुग्रीव येथून उडाला. १२. सूर्यपुत्र (सुग्रीव). १३. गरुड. १४. राम. १५. अंगद रावणास म्हणे. १६. व्यर्थ. सर्व नाश व्यर्थ होतो, राहूं दे. १७. संकटाला पात्र राहू अमृत प्याल्यामुळें झाला. **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १८. ज्वाला. पाण्याचे शब्द म्हणजे अग्निज्वालाच. १९. **दृष्टांत** खासा आहे. २०. गजेंद्राला क्षणांत शांत करी. २१. इंद्रजितानें रामलक्ष्मणांस नागपाशानें बांधिलें होतें. कवि विचारतात, 'यांत भारी (अवघड) काय?' २२. कुंभकर्णहि. २३. मधुदैत्याला मारणारा जो विष्णु त्यापुढें. २४. झाडाचा अंकुर. २५. ज्याचा देह.

दुर्वासनाशल्य ज्याचें[1] हरी नाम, तो प्राकृतें काय शल्यें श्रमी राम? ।
या मेघनादासही दे प्रभु ख्याति, याच्या प्रसादेंचि वातात्मजा गाति. ॥ ४६
औषध्यगाचें[2] महाशृंग खाणून[3], तत्काळ अत्यंत दूरूनि आणून ।
केले विशल्य प्रभू ते चमूयुक्त, वातात्मजाच्या यशा वर्णिती मुक्त[4]. ॥ ४७
होतांही बंधुप्रधानात्मज प्रेत, सामाकडे तो न दिक्कंठ दे चेत! ।
घाली सेतीकंठनाळीं[5] रणीं घाय, दे शक्रजित् सर्वसेनामुखीं 'हाय!' ॥ ४८
माया असें जाणवी, हर्ष न स्तोक[6] दे कुंभकर्णानुजन्मा[7] हरी शोक, ।
श्रीलक्ष्मणें मारिला तो महामाय[8], आनंद लोकत्रयींही न हा माय. ॥ ४९
ज्येष्ठात्मजाच्या विनाशें म्हणे, 'हाय!', दिक्कंठ सीतेसि मारावया जाय. ।
त्या शापिती आंठ[10] वीरा मरायास लोकेश; ती आठवी रामरायास. ॥ ५०
केला सुपार्श्वें[11] प्रधानें बरा बोध; तो वारिला. पुत्रशोकार्त, सक्रोध, ।
धाडी पुन्हा मूढ रामक्षया सैन्य, तेंही मरे; सर्व पावे पुरी दैन्य. ॥ ५१
घे सर्व सेना, स्वयें होउनि क्रुद्ध, दिक्कंधर क्रूरकर्मा करी युद्ध; ।
पाडी रणीं लक्ष्मणा, शक्तिनें वक्ष वेगें विदारूनि तो कांपवी लक्ष[12]. ॥ ५२
[13]भंगी खळा, 'शक्ति काढीं' म्हणे 'हंत[14]! राम प्रभूत्तंस! गाती असे संत. ।
त्या काळजी होय काळाहिचा दंत, वाटे महाप्रेमळा[15] होतसे अंत ॥ ५३
तें ओषधीक्ष्माधराचें[16] पुन्हा शृंग आणी, जसा सारसाच्या[17] रसा भृंग. ।
देतांचि दिव्यौषधींच्या रसें नस्य[18], तेणें उटे क्षिप्र, वर्षे[19] जसें सस्य[20]. ॥ ५४
श्रीरामदिक्कंठ यांसीं महायुद्ध वातार्कभा[21] होय बाणव्रजें[22] रुद्ध. ।

---

१. जो आपल्या नाममात्रेंकरून पापाचें मूळ जी दुर्वासना ती नाहींशी करितो. रामचंद्रानें इतरांची कीर्ति व्हावी यासाठीं प्राकृतासारखें आचरण केलें असें म्हणण्याचा कवीचा भाव आहे. २. द्रोणागिरीचें. ३. खणून काढून. ४. बरे झालेले. ५. सीतेच्या गळ्यावर घाव घाली व सैन्याच्या तोंडीं 'हाय!' घाली. **दीपक** आहे. ६. अल्प. ७. बिभीषण. ८. महाकपटी इंद्रजित्. ९. सामावे. १०. अष्टदिक्पाल कीं काय? ११. एक रावणमंत्री. ही एक 'भांगेंत तुळस' म्हणायची! १२. हजारों लोक भयानें कांपूं लागले. १३. रावणाचा पराभव करी. १४. खेदार्थी अव्यय. सर्वशक्तिमान् प्रभु सुद्धां 'हंत' म्हणूं लागला! १५. रामाला काळजी ही काळसर्पाच्या दांताप्रमाणें वाटली. **उत्प्रेक्षा** अलंकार. १६. महा ममत्वशील रामाला. १७. कमलाच्या. येथील **उपमा** सरस आहे! १८. नाकामध्यें घालणें व ओढणें इत्यादि उपयोगीं औषध तें. १९. उदकवृष्टीनें. २०. धान्य. **उपमा** योग्यच आहे. २१. वायु आणि सूर्यप्रकाश. २२. बाणाच्या समूहें.

ते व्याघ्रहस्तीहरीश्येनसे क्रुद्ध, यांचें यश [1]क्षीरराशींदुसें शुद्ध. ॥ ५५
वृत्रारिच्या स्यंदनीं बैसला राम संपूर्ण त्याचा कराया रणीं काम।
[2]तो [3]यापुढें कुंभ पक्कापुढें [4]आम, तैसा गमे, वर्णवेनाचि तें [5]धाम. ॥ ५६
दोघांसही जाहलें शोणितस्नान, झालें भयें निर्जरांचें मुख म्लान. ।
देखावया शंभु ये सोडुनि ध्यान, [6]सज्ञानही तज्जया निश्चयस्थान. ॥ ५७
लोटे अहोरात्र तत्सप्तक स्पष्ट, दोघेहि युद्धीं न ते पावले कष्ट. ।
सामर्थ्य झालें शरांचें गमे नष्ट रामास. लोकेशही [7]धाकले अष्ट. ॥ ५८
एकैक [8]मूर्धा दहादां असे राम तोडी शत [9]क्षिप्रकारी घनश्याम; ।
झाले यथापूर्व तेव्हां करी राग; खंडूनि [10]हृत्पद्म पाडी [11]शरीराग. ॥ ५९
तें दे यश स्वर्द्विषद्भेक[12]कालाहि, राम द्विजेंद्रा, दिवानायकालाहि; ।
जो जिष्णुचा [13]सूत या मातलीलाहि, काळाननीं [14]द्विट्चमू घातलीलाहि. ॥ ६०
जें पीडितें [15]यक्षनाथादिसल्लक्ष, तें मारितां वक्ष भेदूनियां [16]रक्ष. ।
जो [17]आत्मभूकक्षदावाग्निदृक्, दक्षशास्ता, [18]स्वसत्पक्ष तो हर्षला त्र्यक्ष. ॥ ६१
[19]नानाविधोच्चस्वनें हर्ष दे वाद्य, रामीं करी पुष्पसद्वर्ष [20]देवाद्य. ।
गंधर्वराजेंहि तें गाइलें कृत्य, देवांगनांनींहि केलें सुखें नृत्य. ॥ ६२
होतां द्विषद्धात कोंदे जगीं [21]शात, वाहे गुणी वात; धाके [22]खळव्रात; ।
झाले महोदाररामस्तव [23]स्फार; वृत्रारिचे [24]दार या सज्जयें गार. ॥ ६३

---

१. क्षीरसागरोत्पन्न चंद्रासारखें. दोघांनीं धर्मयुद्ध केलें. दोघेही वाघ, हत्ती, वानर, सिंह, श्येन यांप्रमाणें रागावले होते. २. रावण. ३. रामापुढें. ४. कच्चा घडा. ५. तेज. ६. सज्ञान (ज्ञानी, भूतभविष्यवर्तमान जाणणारे) निश्चयस्थान (मनाची खातरी सोडून, संशयाकुल होऊन) त्याला जय यावा म्हणून आले. तज्जयानिश्चयस्थान=त्याच्या जयाविषयीं साशंक होऊन आले. ७. भ्याले. ८. मस्तक. ९. लवकर बाण सोडणारा घनश्याम (राम.) १०. क्ष्मास्थळ भेदून. येथें अमृताची कुपी होती ती फोडली. ११. शरीरवृक्ष. १२. स्वर्गशत्रु रावणरूपी बेडकाला कालसर्पाप्रमाणें झालेलें रावणवधाचें यश अगस्तिऋषीला व सूर्याला तसेंच मातलीला व राक्षसांना देता झाला. अगस्तीनें 'रविहृदय' सांगितलें होतें व रवीनें वर दिला होता. १३. सारथी. १४. शत्रुसैन्य. १५. कुबेरादि सज्जन लक्ष. १६. राक्षस (रावण). 'रक्षः'शब्द नपुंसक आहे." १७. मदनरूपी गवताचा जो दृग्रूपी दावाग्नि. शंकरानें मदनास भस्म केलें होतें. १८. रामाचा मित्र. १९. नानाविध+उच्च+स्वन=नानाप्रकारच्या उंच स्वरानें. २०. देवादि सर्व. २१. सुख. २२. दुर्जनसमुदाय. २३. पुष्कळ. २४. इंद्रपत्नी. 'दार'शब्द पुल्लिंगी व अनेकवचनी असतो. एका रावणवधानें किती गोष्टी झाल्या? **कार्यदीपक**च अलंकार.

त्या **कुंभकर्णानुजातें** म्हणे **राम**, 'मंदोदरीतें मिळो त्वन्मुखें [1]साम. ।
जैसा तुझा तेंवि [2]माझाहि हा होय, या [3]शेवटींचें करीं कृत्य, दे तोय. ॥ ६४
संस्कारिला [4]ज्येष्ठ त्या साधुनें नीट, चित्तीं न राहूं दिला लेशही [5]वीट. ।
**लंका**पदीं स्थापवी **राम** [6]सभ्यास, धर्मीं, नयीं, सद्गुणीं, ज्यास अभ्यास. ॥ ६५
होऊं नये स्थान लोकापवादास नाणून नेत्रांत [7]शोकाप बा! दास; ।
या कारणें दिव्य [8]देवी, जसी काय [9]हैमी, जिचा दीप्ति दे वीजसी [10]कांय. ॥ ६६
अग्नींत सोडी; गमे [11]माणिका [12]भा न, [13]देवां त्यजी तें न कां आणिका **भान**? ।
डोहीं करी काय धन्या सती रास, [14]नेती भवाब्धींत अन्यास [15]तीरास. ॥ ६७
स्वीकारिली [16]**श्रीहु**ताशेश्वराद्युक्ति मानूनि **रामें**; जसी तज्जनें मुक्ति. ।
ते ऊठवी स्वामिच्या सेवना [17]कीश, पीयूष वर्षुनि तो देव [18]नाकीश. ॥ ६८
दूरूनि पाहों शके ज्या न [19]**की**नाश, पाहे तया शत्रुचा **जा**नकी नाश. ।
बैसूनियां **पुष्पकीं** सेतु पाहून, वर्णी प्रतापासि [20]रोमांच वाहून. ॥ ६९
भेटे **द**शास्यानुजन्मा सखा वीर जेथें, स्वयें **राम** तें दाखवी तीर. ।
दावी **सु**कंठाचिया भेटिचा [21]गोत्र, **वा**ळीक्षयस्थान तो [22]सत्कृतस्तोत्र. ॥ ७०
**वा**तात्मजप्राप्तिचेंही तदा स्थान दावी स्वकांतेसि; मोडी [23]तेंदास्थान. ।
**पंपा**, [24]शबर्याश्रम, **श्री**स दावून [25]पीयूषें पाडी सुवृत्तें सदा [26]ऊन. ॥ ७१
नामेंचि जो वारितो शोकबंधास, सांगे स्वयें तारिल्या तो **क**बंधास. ।
**गो**दावरी**पंच**वट्याश्रमस्थान, दावी, कथी **गृ**ध्रपा जें दिलें [27]दान. ॥ ७२
जीं (तीं?) **कुं**भजादिस्थळें दाखवी; तीस आश्चर्य दे; कौतुकें लाख [28]वीतीस. ।

---

१. समाधान. २. माझा बंधु. काय औदार्य हें? ३. उत्तरक्रिया. ४. रावण. ५. वीट=घाण असा अर्थ आहे. ६. सभेंत बसणारा तो सभ्यच असला पाहिजे. त्याचे गुण सांगितलेच आहेत. ७. शोकाश्रु. ८. सीता. ९. पार्वती. सोन्याची पुतळी. 'हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा.' १०. जिचा देह. ११. माणिकरत्नाचें तेज लोपलें! १२. कांति. १३. प्रत्यक्ष देवाचेंच **भान** भोलें मग आणिकाची काय कथा! ती पाण्याच्या डोहांतच क्रीडा करिते कीं काय असा भास झाला! १४. नेणारी. १५. कडेला. १६. अग्नि आदि देवांच्या बोलण्यास मान देऊन. पुढील **उपमा** स्पष्टच आहे. १७. वानर. १८. इंद्र. १९. यम. रावणाकडे पाहूं शकत नव्हता. २०. रोमांच वाहणें=धारण करणें, सरोमांच होणें. २१. पर्वत. २२. साधूंनीं कीर्ति गाइलेला रामचंद्र. २३. तिनें विचारलेले काळजीपूर्वक प्रश्न हा मोडित नव्हता. २४. शबरीचा आश्रम. २५. अमृत. **प्रतीप** अलंकार. २६. उणें. २७. तर्पणोदक व मुक्ति. २८. लाखों कौतुकें विणारीस. आदिमायाच ती!

तें अत्रिचें स्थान पाहे; [1]रसें [2]माय मानूनि लोकीं न माहे[3]रसें माय. ॥ ७३
तो चित्रकूटाद्रितें दाखवी श्रीस, [4]सद्दृष्टि ज्या, मक्षिका जेंवि [5]मिश्रीस. ।
अत्युत्सवें त्या न दावी प्रयागा न, [6]ते ऐकवीती तदा विप्र या गान. ॥ ७४
धाडूनियां दूत [7]तोयस्वभावास, जीवप्रद श्रीस होय स्वभावास. ।
संदेश हा त्या क्षुधार्तास सुग्रास, कीं त्या मिळे चातका [8]वारिमुग्रास. ॥ ७५
वंदी भरद्वाजपादांस, 'मी राम;' ऐसें कथी स्वाननें आपलें नाम. ।
ठेवी स्वयें, ठेववी [9]देवरा, [10]शीस पायीं रमा; त्यासि [11]तो दे वराशीस. ॥ ७६
त्या ऐकवी [12]भव्यभा साधु वादास, तेजें म्हणे, 'नव्य भासा, [13]धुवा दास. ।
लंकेश, कीशेंद्र, झाला भला गार, सोडूं नये [14]त्यांस वाटे दलागार. ॥ ७७
घेऊनि आज्ञा, वर, श्रीश हर्षोन, वेगें निघे प्रेमपीयूष वर्षोन. ।
भक्तीं गुहीं भेट, शुद्धस्वभावास दे होउनि [15]स्नेहरुद्ध स्वभावास. ॥ ७८
'आयुष्य' वाटे वियोगीं 'सरोज्यांस' भेटे तयां भानु जैसा [16]सरोजांस. ।
कीं मेघ तो त्या मयूरांस, कीं [17]सोम तो त्या चकोरास, दीनांस कीं [18]सोम. ॥ ७९
श्रीरामराज्याभिषेकोत्सवीं लोक झाले सुखी; सर्व गेला लया शोक. ।
अर्कोदय स्पष्ट, तो देव, ते लोक, कीं राम तात स्वयें, विश्व तें [19]तोक. ॥ ८०

---

## ५२. विचित्ररामायण.

(जलोद्धतगतिवृत्त.)

भवाब्धि [20]सुकवी, [21]कविप्रिय करी, [22]करीशतम [23]हो [24]महादय हरी. ।

---

१. प्रेमरसानें. २. आई. ३. सामावे. व्यवहारांत माहेरीं सुद्धां इतकें प्रेम नसतें. ४. सज्जनाची दृष्टि ज्या चित्रकूटावर प्रेमानें ठरते. पुढील **उपमा** लहान मुलांस सुद्धां सुगम आहे. ५. खडेसाखरेस. मिसर देशांतून ही आली काय? ६. प्रयागतीरस्थ ऋषी. ७. पाण्यासारख्या निर्मळ अशा आपल्या बंधूस. ८. वारिमुक्+रास=मेघसमुदाय. दोन **निदर्शना** आहेत. ९. लक्ष्मणा. १०. मस्तक. ११. भरद्वाज. १२. भव्य आहे शोभा ज्याची. १३. भक्तांस पवित्र करा. १४. सुग्रीव, बिभीषणांस दलागार (अयोध्या) सोडूं नये असें वाटे. दलागार=भरद्वाजाश्रम ही होईल. १५. प्रेमबद्ध होऊन. चौदा वर्षांनीं भेट ही! १६. कमलांस. १७. चंद्र. **उल्लेख** अलंकार. १८. महादेव. हा दीनवत्सल आहे. १९. बालक. पुनः **उल्लेख** आहे. २०. शोषून टाकतो. २१. कवींस गाण्यासाठीं कीर्तिप्रद कार्यें करितो. २२. करि+ईश+तम=गजेंद्राचें अज्ञान व संकट हरण करितो. २३. राम. २४. मोठा दयाळु.

सुकीर्ति परमा [1]रमाप मिरवी [2]रवीडितमहा [3]महास्पद [4]नवी. ॥ १
[5]अजात्मजनु [6]तो [7]नुतोदय [8]भवें [9]भवें करि [10]मही [11]महीष्ट [12]विभवें. ।
[13]शं दे [14]मुनिसवास वारुनि अरी अरीति [15]धरिते [16]रिते प्रभु करी. ॥ २
करी मुनिसतीस [17]तीर्थचि [18]हरी हरी अघनगा, न गाति [19]दुसरी ।
उमादिक [20]सुरी सुरीति; नवरी वरी धनुस तो [21]संतोषहि चुरी. ॥ ३
[22]जिणी भृगुवरा [23]वराभयद; [24]यां दया त्यजवि [25]भूविभूति [26]सदया. ।
वरी [27]सदवना वनासि; नमुनी मुनी रमविता [28]विता [29]सुरधुनी. ॥ ४
त्यजी [30]असु [31]पिता, [32]पिता गुण; [33]सुतासु तापवि [34]कुधी; [35]कु [36]धीरविनुता ।
न मोहि भरता; [37]रता स्वभजनीं जनीं रघुप या पया पय मनी. ॥ ५
[38]तपस्विजनता न तापपद, या दयालु नमनें मनें धरि [39]अया. ।
म्हणे 'स्वसुख गा' [40]खगा; न [41]खचरी चरित्र वरि; [42]ती रिती प्रभु करी. ॥ ६
वधी प्रभु [43]खरा [44]खरा [45]कनकसा [46]कसा मिरविता [47]विता [48]भ्रमरसा. ।

---

१. लक्ष्मीपति. २. रवि+ईडित+महा=रवीसारिखें स्तुति करण्यास योग्य किंवा रवीनें स्तुति करण्यास योग्य तेज ज्याचें असा. **उपमा** किंवा **प्रतीप** अलंकार. ३. मह+आस्पद=आनंदाचें किंवा उत्सवाचें स्थान असा. ('रमाप' या शब्दाचें विशेषण.) ४. नवी सुकीर्ति. ५. अज+आत्मजनु=अजराजाच्या पुत्राचा पुत्र. ६. दशरथपुत्र. ७. नुत+उदय=स्तविली वृद्धि ज्याची असा. ८. महादेवें. ९. कल्याणरूपें. ('विभवें' या शब्दाचें विशेषण.) १०. आनंदी असा. ('अजात्मजनु' या शब्दाचें विशेषण). ११. महि+इष्ट=पृथिवीचें इष्ट. १२. ऐश्वर्यानें. १३. कल्याण. १४. विश्वामित्राच्या यज्ञास. १५. धरणारे, वाईट चालीचे. १६. रिकामे. १७. पावन होण्याचें स्थल. १८. पापपर्वताचें हरण करी. १९. दुसरी साध्वी स्त्री स्तुति करण्यास मिळाली नाहीं. २०. देवस्त्रिया. २१. आनंदयुक्तहि, लीलेनें. २२. जिंकी. २३. वर आणि अभय देणारा राम तो. २४. रामाला. २५. पृथ्वीचें ऐश्वर्य. २६. दयायुक्त अशा. ('या' या शब्दांचें विशेषण.) २७. सत्+अवन=साधूंच्या रक्षणासाठीं. २८. प्रसवता. २९. भागीरथी. विष्णुपदकमलापासून भागीरथी निघाली हें प्रसिद्ध आहे. ३०. प्राण. ३१. बाप दशरथ. ३२. प्राशनकर्ता. ३३. पुत्र जो भरत त्याचे प्राण. ३४. दुर्बुद्धि कैकेयी. ३५. पृथ्वी. ३६. धीर (शहाणे लोकांनीं) स्तुति केलेल्या भरताला. ३७. आसक्ता. ('भरता' या शब्दाचें विशेषण.) ३८. तपस्विजनसमूह. ३९. शुभदैवाला. त्या दयाळु रामानें तपस्व्यांस नमस्कार केला, व यानें शुभदैव मिळेल असें मनांत मानिता झाला. ४०. जटायूला. ४१. राक्षसी (शूर्पणखा). ४२. तिला प्रभूनें रिती केली (नाक कान कापून टाकलें). ४३. खरराक्षसाला. ४४. खरोखर. ४५. सुवर्णसा. ४६. कसोटीला. ४७. प्रसवता. ४८. भ्रांतिरसा.

[1]रसाजनिमना [2]मनाक् [3]मृगपणें [4]पणें [5]हरितया [6]तया [7]बळकणें. ॥ ७
[8]स्वपत्यवरजा रजापरिस ती सती लघु करी करीश्वरगती ।
तशांत जपला पलाशन [9]तिळा [10]तिलांपरुचि नेचि नेष्टगतिला. ॥ ८
जटायु शरणा रणा करि परा पराभवि नया न यातुप बरा. ।
[11]उपध्यनवधी वधी पळविती विती जग परापराधि गिळिती. ॥ ९
कपींत [12]जगतीगति त्यजि [13]नगा [14]नगावरि बरा बरा रचि लगा ।
पुरींत वसती सतीस करि तें रितें गृह अही अहीन हरितें. ॥ १०
[15]अवाच्य कविला विलाप नरसा [16]रसाजनिप हा पहात सहसा. ।
वनीं [17]पितृसखास [18]खांजिरनटा नटाकि महिगा हि गाय सुभटा. ॥ ११
[19]सहाश्रुलव देव दे जळ [20]पित्यां [21]पित्या सुखग ती गती बहु वित्या. ।
[22]कबंध [23]सुकृती [24]कृतीश शबरी बरी [25]धृतिमती मति स्मृति धरी. ॥ १२
सुकीर्ति [26]सरसी [27]रसी [28]पवनभू [29]नभूषितन ती [30]नतीष्टवन भू ।
[31]सुकंठनियती [32]यतीशमहिता हिता गमलि वालिवानरचिता. ॥ १३
गणी [28]पवनभू न [33]भूमिवसना [34]सनाथनगरा [35]गराग्निहसना. ।
[36]सुखर्धि समुदी [37]मुदी सतिस दे [38]सदेव अज या जया बहु वदे. ॥ १४
मणी नमुनि घे निघे अघनगां नगांजि न महामहा हरि जगां ।

---

१. सीतेच्या मना. २. किंचित्. ३. मृगत्वरूपपणानें. ४. कोणत्याही कार्याकरितां केला जो प्रतिज्ञापूर्वक नियम त्याणें. ५. हरण करणाऱ्या. ६. मारीचा. ७. किंचित् बळानें. ८. लक्ष्मणास. ९. सीतेला. १०. तिलोदकाची रुची. ११. उपधि+अनवधि=अमर्याद कपट. १२. सीता. १३. अलंकाराला. १४. पर्वतावरि. १५. न बोलण्यासारिखा. १६. पृथ्वीपासून झाली जी सीता तिचा रक्षक राम तो. १७. दशरथाचा सखा जो जटायु त्याला. १८. आकाशरूप आंगण्यासंबंधी नट असा. ('खाजिरनटा' या शब्दाचें विशेषण.) १९. सह+अश्रु+लव=रोदनोदकाचा जो सूक्ष्मांश तत्सहित. २०. प्राशनकर्त्या. २१. बापासारिखा जो जटायु त्याला. २२. राक्षसविशेष. २३. पुण्यवान्. २४. कृति+ईश=कुशलांमध्यें श्रेष्ठ असी. २५. धैर्ययुक्त असी. ('शबरी' या शब्दाचें विशेषण.) २६. तळें. २७. दोरी. २८. मारुती. २९. 'विभूषित' असा अन्यपाठ आहे. ३०. नति+इष्ट+वन=नमस्कार करण्यास योग्य अरण्य जीचें असी. ('भू' या शब्दाचें विशेषण.) ३१. सुग्रीवाचें दैव. ३२. यति+ईश+महिता=योगिश्रेष्ठांनीं पूजित असी. ('सुकंठनियति' या शब्दाचें विशेषण.) ३३. समुद्रा. ३४. ज्याला नाथ आहे अशा नगरा. ३५. विषाग्नीस हसणारें. ('सनाथनगरा' या शब्दाचें विशेषण.) ३६. सुख+ऋद्धि=सुखाची समृद्धि. ('मुदी' या शब्दाचें विशेषण.) ३७. आंगठी. ३८. सदैव.

यशीं प्रभु रमे; रमेशमहिमा हिमागगुरु[1]; तो रुतोचि अधमा. ॥ १५
अपारबल हा लहान खलपा, लपालि रविभा, विभावि न तपा. ।
करी नत विभी[2] बिभीषण; नसे न सेतु, वनधी[3] न धीट हि वसे; ॥ १६
न सामवश तो शतोग्र सदरी; दरीसख[4] बळें[5] बळें[6] द्रुत करी. ।
शयालु[7] खपला पलाश[8]; तनयानयाश्रित न ने, न नेय, विलया. ॥ १७
उभारि कपटा पटा, न बरवा, रवा भलतया, तया घनरवा[9]।
नये जय, खपे खपेरि तपला पलाश, मरणा रणासि जपला. ॥ १८
करी पवनभू नभूत रस; हा सहायवर[10] सारसाधक महा. ।
महा[11] स्तवि शचीश चित्त, वर या रया गणिपिता पिता, यश जया. ॥ १९
विलोकि अवधी, वधी अरिस या सयातु[12] परमा रमाप्रियसया, ।
उमादि हसती सती, प्रभु विता विताप करि, भारि भाहि सविता. ॥ २०
सुपुष्पकग या गया करि, नता न तापवि घनाघनाश भरता. ।
निवारि विपदा, पदा वरि सदा, सदा स्तववि, लावि लाज रसदा. ॥ २१

'विचित्ररामायण' हें मयूरें रामनंदनें, ।
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें[13] कृतवंदनें. ॥ १

---

# ५३. एकश्लोकी रामायण.

(जलोद्धतगति[14] वृत्त)

रमापति दयानिधि प्रभु हरी, पिता दशरथ क्षमापति करी, ।
दशाननवधा नराकृति[15] वरी, यशास्तव धरी, जगद्भय[16] हरी[17]. ॥ १

---

१. हिमाचलासारखा मोठा. २. भयरहित. ३. समुद्र. ४. गुहेचा सखा. ५. सामर्थ्यानें. ६. सैन्यें. ७. निजणारा. ८. राक्षस. (कुंभकर्ण.) ९. मेघनादाला, इंद्रजिताला. १०. मोठा सहायकर्ता. ११. उत्सवा किंवा आनंदा. १२. राक्षससहित. १३. 'वाहिलें' असाही पाठ आहे. १४. या वृत्ताचें लक्षणः—ज, स, ज, स—असे गण अनुक्रमें असतात. यति ६ व्या व १२ व्या अक्षरावर असतो. १५. मनुष्याची बरी (श्रेष्ठ) आकृति धरी. १६. जगताचें भय. १७. हरण करी.

# ५४. पुष्पिताग्रारामायण.

(पुष्पिताग्रा वृत्त.)

[1]रघुनृपकुळसद्मदीप राजा दशरथ, जो बहुमान्य जेंवि [2]आजा; ।
दशमुखहननार्थ [3]तत्सुतत्वा वरि; बहु ज्या [4]श्रुति गाति [5]सत्सुतत्वा. ॥ १
प्रथम तनय राम, दार ज्या [6]मा; भरत दुजा [7]वरशीलभव्यधामा; ।
पुरवि [8]सुगुण लक्ष्मण स्वकामा तनुज तिजा; चवथा रिपुघ्ननामा. ॥ २
अनुजसहित राम, आधि [9]ज्याचा [10]गुरु, मख रक्षि [11]सलील गाधिजाचा. ।
निववि [12]पदरजोनिळेंचि, [13]तप्ता भञ्जुनि [14]शिलापण, जी [15]मुनींद्रशप्ता. ॥ ३
[16]गिरिशधनु [17]जगन्मनोभिरामें [18]तृणसम ओढुनि मोडितांचि रामें; ।
विनवुनि, चवघांसि चार धन्या जनकनृपें [19]विधिनें दिल्या स्वकन्या. ॥ ४
उडवि, पवन पर्ण तेंवि, सर्व [20]प्रकुपितभार्गवरामवीर्यगर्व. ।
[21]स्वपितृवचनपालनार्थ सोडी पद [22]सुसमृद्धहि, कीं [23]यशींच गोडी. ॥ ५
निववि बहु [24]तपस्विवृंदचेत प्रभुवर लक्ष्मणजानकीसमेत. ।
[25]रचितजट [26]सवल्कचाप [27]सासि [28]स्तुति वरि, होउनि चित्रकूटवासी. ॥ ६

---

१. रघुराजाचें कुळ जें तेंच गृह तत्संबंधी दीप. २. रघुराजा. ३. तत्+सुतत्व=त्या दशरथ-राजाच्या पुत्रपणाला. ४. वेद. ५. सत्कृति हेंच ज्याचें उत्तम तत्व, त्याला. ६. लक्ष्मी ज्याची पत्नी आहे. ७. उत्तम स्वभावाच्या योगानें मंगलप्रद आहे तेज (कीर्ति) ज्याची. ८. सद्गुणी व तिसरा मुलगा लक्ष्मण स्वतःच्या इच्छेला (ईश्वराच्या हेतूला) पुरवी. ९. ज्याच्या पाठीमागें मोठा आधि (उपद्रव) लागला होता, त्या गाधिजाचा (गाधिपुत्र विश्वामित्रऋषीचा). १०. मोठा. ११. लीलेनें. १२. पद+रजस्+अनिल=चरणधूलीच्या वायूनें निवविली. १३. तापलेली अ-हल्या. १४. पाषाणत्व. १५. जी मुनींद्राच्या (गौतमाच्या) शापानें शिलापण पावून तप्त (त्रास पावली) होती. १६. शिवधनुष्य. १७. जगत्+मनस्+अभिराम=जगाच्या मनाला रम-विणारा अशा (रामें). १८. येथील **उपमा** रामाचें सामर्थ्य प्रकट करितें. रावणाला सुद्धां उ-चललें नाहीं अशी आख्यायिका आहे. १९. शास्त्रोक्त पद्धतीनें. जनकनृपानें विनवुनि=विनंति करून. २०. क्रुद्ध झालेल्या भार्गवरामाचा (परशुरामाचा) आपल्या सामर्थ्याविषयींचा सर्व गर्व, वारा पानें उडवितो त्याप्रमाणें उडवी. **उपमा** रामाचें सौकर्य दाखवितें. २१. आपल्या बापाचें वचन. कैकेयीस त्यानें वचन दिलें होतें त्याचें पालन करण्यासाठीं; तें न मोडावें एतदर्थ. २२. उत्तम आहे समृद्धि (उपभोग्य वस्तूंची विपुलता ज्यामध्यें) असें पद (राज्यपद). २३. कीर्तीमध्यें, सदाचरणामध्यें. २४. तपस्वी ऋषिमंडलाचें अंतःकरण. २५. धारण केल्या जटा ज्यानें असा. २६. वल्कलें आणि धनुष्य यांसहित. २७. खड्गासह. २८. लोक स्तुति करूं लागले.

भरत परतवावयासि गेला; दशरथ, होउनि शोकतप्त, मेला; ।
तरि[1] न परतला; तया[2], धराया क्षितिभर[3], दे निजपादुका तराया. ॥ ७
मुदित[4] करुनि अत्रि, दे विराधा[5] गति; वंदला[6] 'न भयें मनीं त्रिरां[7], धा[8]. ।
पिउनि निजतपः[9]सुधानदास द्विजवर हो! कथि हा मुधा[10] न दीस[11]'. ॥ ८
घटजमुनि[12], जटायु, यांसि पाहे; तदुपरि पंचवटींत राम राहे; ।
दशमुखभगिनी[13] कुबुद्धि, चंडी, रतरुचि जी विधवाहि; तीस दंडी. ॥ ९
खळ खरें हननार्थ[14] सैन्य आणी, निवटि[15] तया प्रभु चापबाणपाणी. ।
दशमुख खवळे अदभ्र[16], मायामृग[17] करि, पुण्ययशःपद[18] भ्रमाया. ॥ १०
कनकमय कुरंग दुष्ट धाडी. मरुनिहि अंतर[19] तो तिघांत पाडी. ।
गिवसुनि[20] उटजांत एकलीला हरि. उरगी[21] अनुमोदि भेकलीला[22]. ॥ ११
विरथ करि जटायु, तीस सोडी[23] क्षण; मग शत्रु तदीय[24] पक्ष तोडी. ।
स्वनग[25] पळवितां[26] कपींत टांकी हळहळले बहु हर्षलेहि नाकीं[27]. ॥ १२
नमुनि अनुज साश्रु[28] वृत्त[29] सांगे, प्रभुहि म्हणे, 'कटु बोललीस कां? गे!' ।
विषयिविरहि[30] जंतुसींच तोले, उटज विलोकुनि शून्य 'हाय!' बोले. ॥ १३

---

१. हीं दोन कारणें होतीं तरी. २. भरताला. ३. पृथ्वीचा राज्यभार धारण करण्यासाठीं व त्याला तारण्यासाठीं भगवच्चरणांचें स्मरण केलें असतां येथील कर्तव्य साध्य होऊन मोक्ष मिळतो असें पंतांनीं सुचविलें आहे. ४. आनंदित. ५. राक्षसविशेष त्याला. ६. ऋषींस म्हणाला. ७. गांगरूं नका, धैर्य सोडूं नका. ८. तृप्त व्हा. ९. आपल्या तपश्चर्यारूप अमृताच्या महानदीला. १०. व्यर्थ. ११. काय रामाचें सौजन्य हें? ऋषींचा दास म्हणवून घेऊन त्याप्रमाणें आचरण करणें ह्याला 'दैवी नम्रत्व' म्हणावें काय? Divine Humility ह्यालाच म्हणतात. १२. अगस्ति ऋषी. १३. रावणाची बहीण शूर्पणखा. रताविषयीं (कामोपभोगाविषयीं) रुचि आहे जिला. पंत म्हणतात ही विधवा असूनही कामवश होती! १४. रामाला मारण्यासाठीं. १५. 'निवर्तन'पासून झाला. मारिता झाला. १६. पुष्कळ. १७. मायेचा हरीण. १८. आपलें पुण्य आणि कीर्ति घालविण्यासाठीं. १९. नवराबायकोची व भावाभावांची ताडातोड त्यानें केली! हें करणें महापाप आहे. २०. पाहून, गांठून. 'गवेषण'पासून झाला. २१. सर्पीण. २२. बेडकाची क्रीडा; तिला सर्पिणीनें अनुमोदन दिलें! पोरांस खेळविलें! **अप्रस्तुत प्रशंसा** आहे. **असंभव**ही आहे. २३. सोडवी. २४. त्याचे. २५. आपले अलंकार. २६. रावण सीतेस पळवून नेत असतां तिनें अलंकार टाकिले. २७. स्वर्गीं रहाणारे (देव) ह्यांना खेद झाला व आनंदही झाला. २८. रडत. २९. घडलेली गोष्ट. ३०. विषयी आणि विरही जे प्राणी त्यांच्यासारखाच वागला.

प्रभु हुडकि वनीं, करी विलाप; [1]त्रिदश वधूविरही जसा [2]ईलाप, ।
विकळ [3]पितृसखा [4]खगासि पाहे, पुसुनि निमित्त, न शोकभार साहे. ॥ १४
'हरिलि दशमुखें सती' वदे हें, त्यजि [5]असुता, गमला दुजा न देहें. ।
प्रभु पिववि, करूनि दाह, तोया, [6]वरचरिता मनिं साधु वाहतो या. ॥१५
धरि असुर कबंध; त्यासि मारी प्रभुवर; तद्गतशापताप वारी. ।
शुचिमति शबरीहि धन्य केली. प्रभुसि रुचे न कधींहि [7]अन्यकेली. ॥१६
करुनि वरयशासि पात्र [8]पंपा पवनसुतींहि करी महानुकंपा. ।
त्वरित [9]सुगळताप सांग [10]वारी प्रभु वरसेय (?) जसेंचि [11]गांग [12]वारी. ॥ १७
कपि, जलधि उडोनि जाय, शोधी प्रभुदयितेप्रति, होय हा [13]यशोधी. ।
पवनतनय दे सतीस [14]मुद्रा, परपुर जाळुनिहि प्रमोद रुद्रा. ॥ १८
निरखुनि दयिताशिरोमणीतें, अति विरहासुख जें न [15]तो गणी तें. ।
पवनतनुज वाटला प्रभूतें, [16]असुदचि, गौरविला स्तवें [17]प्रभूतें. ॥ १९
जलनिधिस अपार [18]कीशसैन्य, प्रभुवर ने [19]बहुनाददत्तदैन्य; ।
करि, विटुनि अघा, त्यजूनि शंका, [20]प्रणति बिभीषण; दे तयासि लंका. २०
प्रभु करवि पयोनिधींत सेतु, [21]प्रबळनिशाचरराज्यधूमकेतु. ।
निववि, उतरतांचि, शोक, लंका, तुडवि तिच्या कपिराज [22]तो कलंका. २१
[23]कपिपतिसुत दूत राम धाडी; अतिपटु तो [24]परगर्व सर्व झाडी. ।
नच परि करि साम [25]हा कदापि [26]द्विपें, जरि दे प्रभुसिंह हाक, दापी. ॥२२
प्रथमचि वधिला प्रहस्त सेनापति, सुरसैन्य जयापुढें बसेना. ।
[27]घननरव करि [28]नागपाश, बांधी [29]प्रभुयुग, '[30]हां!' [31]हरिची म्हणे न कां धी? २३

---

१. ईश्वरी अवतार असून केवळ पृथ्वीपतीप्रमाणें (मनुष्याप्रमाणें) वधूविरही झाला. २. पृथ्वीपति. ३. 'पितृसख' याची द्वितीया. हें खगाचें विशेषण. ४. पक्ष्यास. (जटायूस.) ५. जीव. ६. या उत्तम आचरणाला. ७. उद्धारावांचून अन्य वर्तन. ८. सरोवरविशेष. ९. सुग्रीव. १०. निवारी. ११. गंगेसंबंधी. १२. उदक. १३. यशस्वी. १४. मुद्रिका, आंगठी. १५. राम. १६. प्राण पुनः देणाराचि. १७. पुष्कळानें. 'स्तवें' याचें विशेषण. १८. वानरांचें सैन्य. १९. मोठ्या नादानें त्रास दिला आहे ज्यांनीं असे. २०. नमस्कार. २१. अति बळकट जें राक्षसराज्य त्याच्या नाशाविषयीं उत्पात (ग्रहविशेष). २२. तो कपिराज लंका उतरतांच [सीतेचा] शोक निववी आणि तिच्या कलंकास तुडवी. २३. वानरांचा स्वामी जो सुग्रीव त्याचा पुत्र (अंगद) तो. २४. शत्रूचा गर्व. २५. हा द्विप. २६. हत्ती. २७. मेघनाद (इंद्रजित्), रावणाचा पुत्र. २८. सर्पांनीं बांधणें. २९. रामलक्ष्मणांस. ३०. हाय. ३१. हरि (मारुति) त्याची धी 'हा!' असें कां न म्हणे? अर्थात् 'हा!' म्हणे.

कथि जनकसुतेसि, 'यांस धोका तिळहि नसे,' त्रिजटा[1], निवारि शोका. ।
पळवि पतगपाळ[2] सर्व सर्प, प्रथम विनाशुनि तद्विषोग्रदर्प[3]. ॥ २४
पुनरपि कटकक्षयासि पाहे, दशवदन स्वपराभवा न साहे. ।
उठवुनि घटकर्णकाळ[4] धाडी, अजित तयाहि रणांगणांत पाडी. ॥ २५
घनरव हरिलाहि दे, ससैन्य प्रभुवर सानुजही खिळूनि, दैन्य. ।
उठवि बळसमेत[5] राघवातें पवनज[6] औषधिशैलशृंगवातें. ॥ २६
जनकनृपसुताविनाश दावी[7], प्रभुसहि 'हाय!' म्हणावयासि लावी; ।
कळवि कपट तत्पितृव्य[8], वारी भ्रम; मग लक्ष्मण त्या खळासि[9] मारी.॥ २७
स्वतनय, घटकर्ण, पुत्र, मेले, सचिव, सखे, सकळ क्षयासि गेले. ।
दशमुख असि[10] घे वधार्थ, सीता निरखुनि त्या अदयासि होय भीता.॥२८
सचिवपवन या दवास[11] वारी, अनयपयोनिधियाद[12] वासवारी[13]. ।
प्रभुवधचि मनीं धरूनि, रागें त्यजुनि अशोकवनासि, जाय मागें. ॥ २९
प्रभु बळ वधि, शत्रु पाठवी तें, सुरमन याचि रणासि आठवीतें. ।
जलधिसि वदले न कोण? 'वर्णा रुधिरनदीशतसंगशोणवर्णा[14]. ॥ ३०
मग परें[15] बळ घे; 'प्रभावि[16] रामा वधिन.' म्हणे, 'स्वबळप्रभाविरामा.' ।
पिउनि कपिबळीं सुरा[17] रिघाला, प्रभुवरि घालि मदें सुरारि घाला. ॥ ३१
स्वतनयभिदुरीं[18] अरीश हाणी, क्षत करि, शक्ति न, भा, हरी शहाणी, ।
पुनरपि कपि आणि औषधीतें रघुपतिच्या बहु अर्पि तोष धीतें. ॥ ३२
अमरपतिरथीं बसोनि काम श्रितमतिचा[19] पुरवावयासि राम, ।
अनळस दिनरात्रि सप्त, युद्धक्रतु करितां करि शत्रुसैन्य शुद्ध. ॥ ३३
अजित शत शिरें रणांत तोडी, तरि असु न क्षणदाचरेंद्र[20] सोडी. ।
'रविहृदय' कथी अगस्त्य, जोडी रविवर, त्या स्वबळें रिपूरें[21] फोडी. ॥ ३४

---

१. एक राक्षसी. रावणाची दासी सीतेच्या रक्षणार्थ ठेविलेली. ती ममताळू असून सीतेला अनुकूळ होती. २. गरुड. ३. तत्+विष+उग्र+दर्प=त्याच्या विषाचा उग्र दर्प. ४. कुंभकर्णरूप काळ. ५. सैन्यासहवर्तमान. ६. वायुपुत्र (मारुति). ७. कपटानें दाखवी. ८. तत्+पितृव्य=त्या इंद्रजिताचा चुलता (बिभीषण) तो. ९. इंद्रजितास. १०. खड्ग, तलवार. ११. वणव्यास. १२. अन्यायसमुद्रांतील जलचराला. १३. वासव+अरि=इंद्राचा शत्रु (इंद्रजित्). १४. शेंकडों रक्तनदींच्या संगतीनें लाल वर्ण ज्याचा अशा. १५. शत्रु. १६. प्रतापी. १७. मद्य. १८. आपल्या तनयांच्या वज्रानें. १९. आश्रितमति, भक्तजन. २०. रात्रिंचरराजा (रावण). २१. रिपु+उर=शत्रूचें वक्षस्थळ.

वधि कमळभवास्त्र[1] उद्धतातें, सुनिधन दे, मलिनाहि शुद्धता[2] तें. ।
दशमुखपतनींच पुष्पवृष्टी प्रभुवरि होय; निवे समस्त सृष्टी. ॥ ३५
स्तव जयजयकार फार झाले, प्रभुयश गाउनि सर्व साधु धाले. ।
प्रभुसि निरखितां न पक्ष्म[3] हाले, विधि शिव त्या परमोत्सवांत आले. ॥ ३६
प्रकटि सकळ उद्रवास[4] वाद्य, स्तुति परिसे विधिरुद्रवासवाद्य. ।
प्रभुवर करि उर्वशील[5] वेनापरि गुरु[6] या कसि उर्वशी लवेना? ॥ ३७
प्रकटलि रतिची[7] सुगी, तनाना करितिहि गाति कृती[8] सुगीत नाना. ।
अहिनरसुरकन्यका यशातें जपति, परें जन धन्य काय शातें[9]? ॥ ३८
अरिसहि तिळतोय देववीतो[11] रघुपति, जो द्रुहिणादि[10] देव वीतो; ।
बसवि सुविधिनें पदीं नतातें; करि अवलोकि लया न; दीनता ते. ॥ ३९
क्षणभरि करि दूर जानकीला, जिरवुं शके प्रभु तोहि ज्या न कीलो[12] ।
उडवि करुनि दिव्य ती तया, तें यश निववी अजिता महादयातें. ॥ ४०
उठवि रणमृत प्लवंग[13], ऋक्ष[14], प्रभु करि लज्जित सर्व देववृक्ष[15]. ।
प्रियसखयुत पुष्पकीं सुचेता बसुनि, पुराप्रति राम होय येता. ॥ ४१
परमकुतुकहेतु सेतु पाहे जनकसुता, परमोत्सवासि लाहे. ।
मग विनवुनि ती दयावतारा स्वपतिस, बैसवि पुष्पकांत तारा[16]. ॥ ४२
परिसुनि शबरीकबंधपंपाचरित, वरी[17] सुख रामघनशंपा[18], ।
तदनु[19] वदलि, 'ते नमोऽस्तु गोदाभववर्धित! हे न संश्रितप्रमोदा!' ॥ ४३
प्रभु कळवि जटायुच्या क्रियेतें, गहिंवरवी बहु आपणा प्रियेतें[20]. ।
मग घटजकथाहि राम लावी स्मरवुनि अत्रिस, चित्रकूट दावी. ॥ ४४
नमि रविजनिला[21], सुरापगेला[22], भजुनि जिला त्रिदिवा[23] सुराप[24] गेला. ।
कळवुनि गुण, लाख विप्र 'या गा' म्हणति असें कथि, दाखवि प्रयागा. ४५
स्वरत भरत भक्त आठवीला, अनिलज[25], तेथुनि शीघ्र पाठवीला; ।

---

१. ब्रह्मास्त्र. २. तृप्त झाले. ३. पापणी. ४. उत्+रव=मोठ्या शब्दास. ५. वेनराजाप्रमाणें उरु+अशील=अतिकठोरस्व करी. ६. मोठा. ७. प्रीतीची उत्तम वाणी. ८. कुशल जन. ९. सुखानें. १०. ब्रह्मदेवादि. ११. प्रसवतो. १२. संशयरूप कांट्याला, अथवा अग्नीला. १३. वानर. १४. आस्वल. १५. कल्पवृक्ष. १६. सुग्रीवाची स्त्री. १७. स्वीकारी, अनुभवी. १८. रामरूप मेघाची वीज (सीता) ती. १९. त्यानंतर. २०. आपणाला आणि प्रियेला. २१. यमुनेला. २२. सुर+आप+गा=भागीरथीला. २३. स्वर्गा. २४. मद्यपी. २५. मारुति.

पि[1]तृसख मुनि फार हर्षवीला, नमुनि शिरीं [2]तुहिनाश्रु वर्षवीला. ॥ ४६
न म्हणुनि [3]रघुवंशनायकोन प्रभु भरतेतर वृत्त नायकोन, ।
म्हणुनि बहु फलार्थ दे वरा या बहु शुचि दे यश जेंवि देवराया. ॥ ४७
क्रमुनि [4]रजनि आश्रमीं रिघाला. भरतमनीं मग तातसा निघाला. ।
कवळुनि निववी सख्या गुहास प्रभु, [5]धनदा विभुचा जसा [6]सुहास. ॥ ४८
मग भरतचकोर, [7]वीततंद्रें हरुनि वियोगज ताप [8]रामचंद्रें, ।
बहुत निववीला. न चातकाचा घन करि घात, वरी [9]नै [10]शांत [11]कांचा. ॥ ४९
सफळ करुनि यत्न सानुजातें द्रवुनि म्हणे, [12]गुरु [13]रत्नसानु ज्यातें, ।
प्रभुवर सुख दे, न माय लेंकीं तसि, सुयश त्रिजगीं न मायलें कीं. ॥ ५०
सुखवि [14]गुरुजनन्यमात्यपौर प्रभु, करि सद्यश [15]शंभुहासगौर. ।
तदुपरि अभिषेक होय रामीं, 'करिन' म्हणे गति 'हाचि सोयरा मीं.' ॥ ५१
निरखिति अशुभा दशा न नारी, प्रियविरहा निरसी दशाननारी. ।
न करि यमवश स्वनाम यांतें, रुचवि दयालु यश [16]स्वनाम यां तें. ॥ ५२
स्तविति सुकवि फार रामराज्या; लवहि नसे बहुमान [17]पामरा ज्या, ।
प्रभु वरद तयाहि, [18]तातसाच [19]प्रकटि, करूनि दया, ह्तिा तसाच. ॥ ५३
सुखवि सतत रामराज, गाया निज यश लावुनि [20]सामरा जगा या. ।
कलियुगिंहि मयूर, [21]होत नानापरि, करि, जोडुनि नित्य हा, तनाना. ॥ ५४

---

# ५५. मत्तमयूररामायण.

(मत्तमयूर वृत्त.)

श्रीचा भर्ता दि[22]ग्रथभूपात्मज झाला, कौसल्येच्या तो उदराला प्रभु आला. ।
त्याला ज्ञाता तात, जगत्तारक नाम स्थापी प्रेमें 'राम' असें सत्सुखधाम. ॥ १

---

१. वसिष्ठ. २. थेंड नेत्रोदक. ३. रघु+वंश+नायक+ऊन=रघुवंशाचे जे स्वामी त्यांहून उणा. ४. रात्र. ५. कुबेराला. ६. उत्तम हास्य. ७. गेली तंद्रा (आलस्य) ज्याची त्यानें. ८. वीततंद्रें रामचंद्रें वियोगज ताप हरुनि भरतचकोर निववीला-असा अन्वय. ९. कच्चें यश स्वीकारीत नाहीं. १०. सुख. ११. कच्चा. १२. मोठा. १३. मेरु. १४. वसिष्ठ, आई, प्रधान व पुरवासी लोक यांना. १५. शंकराच्या हास्यासारखे शुभ्र. १६. जें स्वनाम यांतें यमवश न करी, तें स्वनाम यां रुचवी. 'दयालु यश' हा कर्ता. १७. ज्या पामरांना. १८. पित्यासारखाच. १९. हित्म करूनि दया प्रकटी. २०. अमरासहित जें त्याला. २१. हात जोडुनि, तनाना करी. २२. दिक्+रथ+भूप+आत्मज=दशरथराजाचा पुत्र.

कैकेयीचा नंदन झाला प्रभु अंशें, केला भूषा[१] तो भरत श्रीरविवंशें. ।
दोघे भव्या[२] पात्र सुमित्रासुत ते, ज्यां नाहीं सीमा लक्ष्मण शत्रुघ्नहि तेजा[३]. ।। २
वेदीं शास्त्रीं सर्व वसिष्ठें पढवीले, तेजें माथां साधुसभेच्या चढवीले. ।
विश्वामित्रें सानुज राम प्रभु नेला, सर्वास्त्रज्ञ[४] स्वाध्वररक्षाक्षम[५] केला. ।। ३
यज्ञध्वंसीं[६] जे रत ते राक्षस मारी, पादस्पर्शें राम अहल्येप्रति तारी. ।
लीलेनेंचि त्र्यंबकचाप प्रभु मोडी, सीता कन्या जी जनकाची तिस जोडी. ।। ४
चौघांचेही भव्य विवाहोत्सव झाले, आले तेथें जे जन ते सर्वेहि धाले. ।
भ्याले तेजें राक्षस जे घालिति घाले, व्यालेशादि[७] प्राज्य[८] यशःसद्रस प्याले. ।। ५
क्षत्राराति[९] त्र्यंबकशिष्य[१०] स्मय[११] सोडी, श्रीरामातें जाणुनि तत्वें कर जोडी. ।
दावी लोकीं शुद्धयशीं फारचि गोडी, कैकेयीचें चित्त न, भू घेउनि, मोडी. ६
जें ताताचें सत्य तयातें प्रभु रक्षी, राज्य त्यागी, वल्कल घे; वन्यहि[१२] भक्षी. ।
सीता, भ्राता घेउनि गेला वनवासा, राहे शैलीं पर्णगृहीं तो न नवासा. ।। ७
शोकें मेला तात, कळे हें, पर [१३]तो न, भ्रात्याच्याहि[१४] प्रेमगुणें, ये परतोन. ।
कैकेयीचा पुत्रहि देहादि न पाहे, नंदिग्रामीं वल्कजटा वाहुनि राहे. ।। ८
अत्र्यादि श्रीकुंभजपर्यंत महर्षी [१५]वंदी झाले ते मुनि ज्या तात महर्षी[१६]. ।
ताताचा जो गृध्र सखा, त्या सुख दे हा. सेवी प्रेमें पंचवटीतच्छदगेहा[१७]. ।। ९
आर्याज्ञेनें[१८] लक्ष्मण नासा[१९] श्रुति खंडी, दुःशीलत्वें शूर्पणखेतें प्रभु दंडी. ।
रक्षःसेना मारवि ती दुर्मति [२०]चंडी, वार्ता झाली वैरिजनीं केवळ [२१]थंडी. ।। १०
[२२]रक्षोराज स्वर्णकुरंग[२३] द्रुत[२४] धाडी, त्या नाथासीं[२५] भूजनिसीं[२६] अंतर पाडी. ।
ने सीतेतें तो खळ, गृध्रासहि मारी, दे शोकघ्ना[२७] शोक, [२८]सुरेंद्राहित भारी. ।। ११
शून्या पाहे स्वच्छदशाला[२९], बहु शोधी; 'हा! हा!' बोले, लक्ष्मण नानापरि बोधी. ।
शोकीं शोक प्राप्त दुजा दारुण होय; प्रेमें, धैर्यें, दे परि गृध्रा प्रभु तोय. ।। १२

---

१. अलंकार. २. कल्याणाला पात्र. ३. ज्या तेजाला सीमा नाहीं. ४. सर्वास्त्रें जाणणारा. ५. आपल्या यज्ञाचें रक्षण करण्याला समर्थ. ६. यज्ञांच्या नाशाविषयीं. ७. व्याल+ईशादि=शेषादि. ८. पुष्कळ. ९. क्षत्रियांचा शत्रु. १०. महादेवाचा शिष्य. (परशुराम.) ११. गर्व. १२. अरण्योत्पन्नफलादिकहि. १३. राम. १४. भरताच्याहि. १५. स्तुतिपाठक. १६. महापूज्य पुरुष. १७. तत्+छद+गेह=पंचवटींतील पर्णकुटिकेला. १८. रामाच्या आज्ञेनें. १९. नाक आणि कान. २०. उग्र स्त्री. २१. भीतिकारक. २२. रावण. २३. सुवर्णमृग. २४. त्वरित. २५. रामाची आणि सीतेची तुटातूट केली. २६. सीतेसीं. २७. शोक हरणकर्त्या रामचंद्राला. २८. राक्षस. २९. आपली पर्णशाला.

अत्यंतोग्रा राम कबंधा मग मारी, वारी शापा जेंवि विराधा प्रभु तारी. ।
भेटे श्रीचा नाथ तपःश्रीकबरीतें[1] पूजा घे, दे सद्गति, भक्ताशबरीतें. ॥ १३
पावे पूर्वी सानुज लोकेश्वर[2] पंपा, तीच्या तीरीं आठवुनि श्री[3] मग कंपा[4]. ।
भेटे आधीं मारुति सुज्ञ प्रियवक्ता, तो सुग्रीवा भेटवि रामा हितभक्ता. ॥ १४
एकें उग्रें भेदुनि बाणें उर वाळी मारी, राम श्रीश सुकंठा[5] कुरवाळी. ।
दे कीशांचें[6] राज्य तया, तो कपि योध प्रेषी श्रीचा शीघ्र करायास्तव शोध. ॥१५
संपाती दे सांगुनि; लंघी जलधीतें, शोधी लंका, मारुति मोही खळधीतें. ।
श्री धिक्कारी दिग्वदनातें[7] कपि पाहे, रोमांचातें तो निजदेहीं कवि वाहे. ॥ १६
श्रीतें भेटे, देउनि मुद्रा हरि शोका, ती वाताच्या[8] दे निजे चूडामणि[9] तोका[10]. ।
वृक्ष ध्वंसी, रावणपुत्रा वधि अक्षा, मेघध्वाना[11] सांपडला संगरदक्षा[12]. ॥ १७
राजापासीं बांधुनि नेला, कपि हांसे, सर्वांगींचे केवळ मानी तृण फांसे. ।
संकोचातें सोडुनियां, जें फळ[13] भावी दुष्कर्माचें, बोलुनि तो स्पष्टचि दावी. ॥१८
कोपें बोले रावण तो, 'या अतितुच्छा दंडा; याच्या दीप्त करा सत्वर पुच्छा.' ।
लांगूलातें[14] पेटवितां क्षिप्र उडाला, भंगी[15] रक्षोवीरबळा[15], जेंवि कुडाला[16]. ॥ १९
लंकेची तो कीश मुहूर्तें करि होळी, 'हा ! हा !' बोले रावण, कोपें कर चोळी. ।
श्रीरामातें भेटुनि चूडामणि दे हा, भेटे राम, श्रेयचि याच्या गणि देहा. ॥ २०
शत्रूच्छेदा राम निघाला अतितेजा, उत्साहातें देति कपींचे पति ते ज्या. ।
पाथोधीच्या[17] उत्तरतीरा अज[18] पावे, ज्याचे पाय, त्यागुनि सर्वस्व, जपावे. ॥ २१
ज्याची धर्मी धी, अनुजन्मा[19], हितवक्ता जो, त्या त्यागी रावण धिक्कारुनि भक्ता. ।
दावग्रस्ता सोडुनियां जेंवि अरण्या यावें, तैसा ये, नमि तो विश्वशरण्या[21]. ॥ २२
त्या दे लंकाराज्य नमस्कारपरा हा लावी दात्या राम म्हणायास परा 'हो[22] !' ।
भेटे सिंधु, प्रार्थुनि तो बांधवि सेतु; प्राज्या घाला मोह तराया पर हेतु. ॥२३
पावे सेनासिंधु तयां सिंधुतटाला, लेखी वाजी तो न परा सैन्यतटाला[23]. ।

---

१. तपश्रीनें युक्त कबरी (केशभार) जिचा. २. राम. ३. सीता. ४. कंपा पावे इत्यर्थः. ५. सुग्रीवास. ६. वानरांचें. ७. रावणाला. ८. वाताच्या तोका. (मारुतीला.) ९. आपल्या मस्तकांतील मणी; अलंकार. १०. बालका (मारुतीला). ११. मेघनादाला. (इंद्रजिताला.) १२. युद्धकुशलाला. १३. दुष्कर्माचें जें भावी फळ तें. १४. पुच्छातें. १५. राक्षसवीरांच्या सैन्याला भंगी, मोडी. १६. कांबट्यांच्या भिंतीला. १७. समुद्राच्या. १८. अजन्मा, राम. १९. धाकटा भाऊ, बिभीषण. २०. दावग्रस्ता अरण्या सोडुनि यावें तैसा ये. २१. विश्वरक्षकाला, रामाला. २२. हाय !. २३. सैन्यरूप जें लहान तट्टू त्याला.

प्रारंभींच प्रेक्षुनि दुष्टाप्रति ताडी, राजा खालीं तन्मुकुटा त्यासहि पाडी. ॥ २४
श्रीरामाचें मस्तकचाप भ्रमवाया दावी श्रीतें घालुनि शोकीं श्रमवाया. ।
तीतें सांगे भेटुनि भक्ता [1]सरमा, 'या मद्वाक्यातें जाण खरें, हे [2]परमाया.' ॥ २५
राम प्रेषी वालिज जो अंगद दूत, क्षोभे मंत्रें त्या मळधी रावणभूत. ।
प्रासादातें भंगुनि मारी धरित्यांतें हा घोकाया लावि जयें, जे अरि त्यांतें. ॥ २६
झालीं भारी राक्षसकीशांसह युद्धें, क्रुद्धें सैन्यें राम करी मारुनि शुद्धें. ।
[3]मेघध्वान [4]व्यालमयोग्राद्भुतपाश क्रोधें घाली, वांछुनि सीतापतिनाश. ॥ २७
सीता पाहे 'हाय!' वदे तों, 'सखि धोका नाहीं,' सांगे हें त्रिजटा, त्या हरि शोका. ।
[5]तार्क्ष्यें केले पाशविमुक्त प्रभु दोघे, पूर्ण प्रेमें श्रीपतिच्या सद्यश तो घे. ॥ २८
सीताभर्ता स्वाश्रितसर्वा सुखहर्ता, 'न्यायें वर्ता' जो [6]म्हणता [7]पद्मजकर्ता ।
मारी मत्ता त्या घटकर्णा [8]कपिकाळा. व्याळा जैसा तार्क्ष्य, जया दे यम [9]टाळा. २९
ब्रह्मास्त्रातें योजुनि सर्वांसहि ताडी मेघध्वान, व्याकुळ रामासहि पाडी. ।
तेन्हां आणी मारुति [10]ओषध्यगशृंगा, त्या [11]स्वामी दे [12]श्री [13]निजपादांबुजभृंगा. ३०
[14]मायाश्रीतें मारि खल क्षिप्र भुलाया, तत्वें मेघध्वान न लक्षि प्रभुला या. ।
सांगे भेद, स्वस्थ करी सर्वहि खेदी छेदी त्याचा लक्ष्मण [15]मूर्धा, स्तवि भेदी. ३१
सीताघाता [16]जाय धरूनि [17]प्रखरासी, क्रुद्धा वारी त्याहि [18]सुपार्श्व प्रखरासी. ।
धाडी सेना पुष्कळ रामास वधाया, धी कैंची या? कीं वरि [19]कामासव धाया! ३२
मारी सारी राम मुहूर्तें अरिसेना, मोटा [20]खोटा [21]सामकथाही परिसेना. ।
युद्ध [22]क्रुद्धस्वांत करी आपण, ज्याला नाहीं कांहीं भी, न वळे हा [23]पणज्याला. ३३
[24]सौमित्रीच्या शक्ति उरीं रावण हाणी; तेन्हांही तें मारुति शृंग द्रुत आणी ।
[25]शक्र प्रेषी स्यंदन, [26]हा त्यावर वेघे, आशीर्वाद श्रीश मुनीचे बरवे घे. ॥ ३४

---

१. बिभीषणस्त्री. २. शत्रूचें कपट. ३. इंद्रजित्. ४. व्याल+मय+उग्र+अद्भुत+पाश= सर्पमय भयंकर अद्भुत पाश. ५. गरुडें. ६. म्हणणारा. ७. ब्रह्म्याचा पिता. ८. कपींच्या काळाला. ९. त्याच्या मरणाचा दोष आपणावर न घेतां परभारें काम उरकलें. १०. औषधिपर्वताचें शिखर. ११. राम. १२. शोभा, संपत्ति. १३. आपल्या पदकमलांच्या भुंग्याला. १४. मायेची सीता. १५. मस्तक. १६. 'जाय' याचा अध्याहृत कर्ता 'रावण.' १७. तीक्ष्ण खड्ग. १८. रावणाचा एक सचिव. १९. काम+आसव=कामरूप मद्य. २०. मोठा द्वाड, रावण. २१. सलोख्याचें भाषण. २२. क्रोधयुक्त अंतःकरण ज्याचें असा. २३. ब्रह्मदेवाला. हा ब्रह्मदेवाचा पणतू होता. २४. लक्ष्मणाच्या. २५. इंद्र. २६. राम.

तो सप्ताहोरात्रमितें संतत काळें केला प्रेत क्रव्यभुगीश क्षितिपाळें. ।
तेव्हां देव ब्राह्मण आनंदित झाले, आले होते जे, यश ते सेवुनि धाले. ॥ ३५
वाद्यें नृत्यें सुस्तवनें सुस्वरगानें श्रीरामानें सूचविलीं स्वस्वरगानें. ।
जो लीलेनें सर्वजगा देव वितो या, तो दिक्कंठा बंधुकरें देववि तोया. ॥ ३६
लंका त्याच्या बंधुसि दे, आणवि सीता, ती शुद्धाही दिव्य करी लौकिकभीता. ।
भेटे राजा दिग्रथ, त्यातें प्रभु वंदी, ज्याचे देव ब्रह्मशिवेंद्रादिक वंदी. ॥ ३७
युद्धीं मेलें जें, उठवी तें कपिचक्र, श्रीशें केला भव्ययशोभाजन शक्र. ।
स्थापी राजे सानुज आधीं, मग राम श्रीमान् बैसे पुष्पकयानीं सुखधाम. ॥ ३८
श्रीतें दावी युद्धमही सेतुपथा या, वर्णी लागे सर्व वियोगार्ति कथाया. ।
किष्किंधेतें पाहुनि मागे वर राणी, रामाज्ञेनें कीशप तारेप्रति आणी. ॥ ३९
पंपा दावी त्यावरि लोकेश बरीची वर्णी रीति, प्रेमळता, त्या शबरीची. ।
दावी गोदा पंचवटी गृध्रवटातें, पावे हर्षें देवनदीभव्यतटातें. ॥ ४०
राम प्रेषी वायुसुतातें कळवाया, त्याच्या शोका स्वागमतोषें पळवाया. ।
मोही विश्वंप्राणसुताला भरताची रीति श्रेष्ठा रामकथालाभरताची. ॥ ४१
वंदी प्रेमें राम भरद्वाजमुनीतें यत्कीर्तीसीं सख्य रुचे देवधुनीतें. ।
कौसल्येचा वासर तेथें सुत राहे, संधा केली त्याचि म्हणे बा! सुतरा हे. ॥ ४२
भेटे विश्लेषातिविपद्भीतगुहातें, वाटे स्पर्शे तो स्वखगा शीतगु हातें. ।
कैकेयीचा पुत्र खरा चातकसा हो! राम श्रीमान् मेघ म्हणों? घात कसा हो? ॥
स्वामी जाणे पावककुंडीं भरता तें; भेटे उक्तस्वावधि काळीं भरतातें. ।
त्याच्या माथां देवविला जो भर तातें तो घे, दे जें इष्ट, यशोलाभरतातें. ॥ ४४
जो साकेतीं जीव, खरा तो सुखवासी. याच्या भाग्या ब्रह्मसभेचा मुख वासी. ।
भक्तिज्ञानें राज्यचि सद्या पिकवी, तें गातां देतें सद्यश अद्यापि कवीतें. ॥ ४५
श्रीरामाच्या सत्कीर्तीतें जो गातो, होतो मुक्तिप्राज्यप्रेमाजोगा तो. ।
भक्तिज्ञानें वातापत्या दे, वाहे अंकीं, ठावी रीति, श्रेष्ठा देवा हे. ॥ ४६

---

१. सात दिवस रात्री प्रमाण ज्याला अशा. ('काळ'शब्दाचें विशेषण.) २. वधिला. ३. क्रव्य+भुक्+ईश=मांसभक्षक जे राक्षस त्यांचा स्वामी रावण तो. ४. रामचंद्रानें. ५. स्व+स्वर्+अग=स्वकीयांचा कल्पवृक्ष असा. ६. दशकंठ, रावण त्याला. ७. ब्रह्मचारी, लक्ष्मण. ८. वियोगरूप पीडा. ९. भरताच्या. १०. मारुतीला. ११. गंगेतें. १२. एक दिवस. १३. प्रतिज्ञा. १४. वियोगरूप अतिविपत्तीला भ्यालेल्या गुहातें. १५. चंद्र. १६. हा. १७. सांगितली आहे आपली मर्यादा ज्याणें असा. १८. अयोध्येमध्यें. १९. ब्रह्मसभेचा सभासद. २०. पसरी.

श्रीरामाच्या पादसरोजावरि भावें केलें दासें अर्पित रामायणनावें. ।
हें सचिरा मत्तमयूर द्रुत द्यावें, बाटावें कां न? प्रभुतें लक्षुनि गावें. ॥ ४७

---

## ५६. सद्भक्तसर्वस्वरामायण[१].

(वसंततिलकाछंद.)

श्रीकांत तो दशरथात्मज होय दासत्रासक्षयार्थ, करुणामृततोयदाम ।
यास त्रितापहर राम असें सुनाम स्थापी मतें स्वगुरुच्या नृप पूर्णकाम. ॥ १
भाग्यें तदंश दुसरा सकुमार झाला, ठेवी पिता भरत हें शुभ नाम त्याला. ।
तैसाचि लक्ष्मण तिजा, चवथाहि नावें शत्रुघ्न, तद्यश सदैव सुखार्थ गावें. ॥ २
श्रीराम लक्ष्मण असी बहु रम्य जोडी, यांसीं निरंतर परस्पर फार गोडी. ।
शत्रुघ्नही भरतचित्त कधीं न मोडी. सद्रीति हे शिशुपणींहि दिसे न थोडी. ॥ ३
विद्या कळा श्रितसुखा[२] गुरु दे वसिष्ठ, ज्ञानें गुणें स्तविति जे गुरु देव शिष्ट. ।
वादीं तयां वचकती चवघां, सभारी[३] देती, न दे अमृत ती चव, घांस[४] भारी. ॥ ४
पाहे नृपाळ उचिता तनया विवाहा, चिंती मनांत अजनंदन[५] जों विवाहा[६]; ।
तों ये महामुनि, तया नमि गाधिजाला[७], क्रव्यादविघ्नितमखें[८] बहु आधि ज्याला. ५
पूजूनि सादर पुसे रघुराज[९], 'आर्या! आलासि योजुनि जया हृदयांत कार्या, ।
तें सांग. जाणसिच शक्ति असे नसे वा, बा! ध्यात मी जरि मनांत असेन सेवा.' ६
सांगे नृपासि मुनि, 'पावुनि ताप वेना तैसें खळा दशमुखा मज शापवेना. ।
दे रक्षणार्थ सहलक्ष्मण रामराया, यज्ञघ्नदिङ्मुखबळा[१०] प्रखरा मराया.' ॥ ७
स्नेहें न दे नृप, वसिष्ठचि देववी. तो पायींच जाय मग, जो जग देव वीतो. ।
विद्या बळा अतिबळा मुनिराज दे हा, क्षुत्तृट्श्रमा[११] हरुनि ज्या सुख देति देहा. ८
अस्त्रें शत प्रभुवरा शिकवी नयज्ञा, रक्षावया सुकृतराशि कवीनें[१२] यज्ञा. ।
रामें गुरूक्ति बहु मानुनि ताटकेला मारूनि तो परम निर्भय वाट[१३] केला. ॥ ९

---

१. नामविशेष. (रामायणाचें नांव). हें एक वृत्त आहे. म-त-य-स-ग या रचनेनें हें वृत्त होतें. २. आश्रितांच्या सुखा. ३. सभेचे शत्रु. ४. सदन्नाचे कवळ. ५. दशरथ राजा. ६. गरुडवाहन ज्याचें अशा, विष्णूला. ७. विश्वामित्राला. ८. मांसभक्षकांनीं (राक्षसांनीं) विघ्नयुक्त केलेल्या यज्ञेंकरून. ९. दशरथ. १०. यज्ञाला विघ्न करणाऱ्या दशमुखाच्या प्रखर सैन्याला. ११. क्षुत्+तृट्+श्रम=क्षुधेच्या, तृषेच्या श्रमा. १२. कवि+इन=कविश्रेष्ठ (विश्वामित्र) तो. १३. यज्ञस्थान.

सिद्धाश्रमीं जय दिला बरवा सवातें, घ्याया स्वभागहि पुढें वैरवासवातें।
काळा सुबाहु दिधला. मग अर्णवातें मारीच, जेंवि लघु नीरस पर्ण वातें.॥१०
होय प्रसन्न मुनि कौशिक, दे वैराशीराशी, म्हणे, 'उपट शैत्रुफणाधराशी.'।
बोहे मखा जनक, ने मुनि सानुजा या, ज्या यांचि पादरज गौतमधर्मजाया.॥
जो दोष 'तापिव' म्हणे 'स्वजना; शिला हो,' तो लावुनि स्वपदनीरज नाशिला हो!॥
'बा! द्यावया त्रिभुवनासि सदा मह, त्या सत्कीर्ति,' हें वदलि पूजुनि ती अहल्या.॥
कां लंघितील भुज, नेणति चापला जे? वाटे मनीं कठिनतेस्तव चाप लाजे.।
जी त्या सुदुर्घटपणें धरि ताप सीता, तत्काळ होय हिमशैलसुतापशीता.॥१३
तें भंगितांचि धनु, ती मिथिलेशबाळा घाली गळां स्वपतिच्या समर्यांच माळा.।
रामाचिया, मुनि, तिघां अनुजांसि कन्या, तो देववी, कथुनि त्या जनकासि धन्या.॥
तो आणवी सतनया अजनंदनातें, कन्यार्पणें मिळवि सत्सुखकंद नातें.।
गेला पुसोनि, मुनि, जे.ुनि सद्यशाला, या सत्कथेहुनि परा, जसि मद्यशाला॥
क्षत्रापति, त्यजुनि मार्गवरा, 'मरो,' धी ज्याची म्हणे, स्वपथ भार्गवराम रोधी.।
अत्युग्र, तो, फुगवि गल्ल, वदे; वदावी जी शक्ति शांति रुचि, तल्लव देव दावी.॥
पूर्वापरीस विजयी नवराम हा, तें साकेत सत्पुर धरी प्रवेरा महातें.।
धन्य क्षितीश महिषीसह; सासु नाहीं धन्या असी निववली सहसा सुनांहीं.॥
ने मातुळ स्वविभवा भरता, पहाया. वृद्धास दे स्वमहिचा भर तूप. हा या।
ज्येष्ठा सुतास युवराज करावयाला योजी. म्हणे गुरु, 'विचार बरा वयाला'.॥१८
शक्रप्रियार्थ कथि दुर्मति मंथरा, या दावावयासि परलोकग पंथ राया.।
मन्वब्द राम वन सेवुच, एक यांची ऐसी; दुजा वर, सुता क्षिति, केकयाची॥१९
येनें तिच्या, विनवितांहि तसा मनातें, वाटे जसा हठ; न तें हित साम नातें.।
व्हाया यश स्वैतिलकालकहानि, घाया स्नेहीं करी, प्रणतपालक हा निघाया.॥२०

---

१. श्रेष्ठ इंद्राला. २. रसरहित. ३. श्रेष्ठ आशीर्वादराशी. ४. शत्रुरूप सर्पाच्या दाढा उपट. ५. बोलावी. ६. मागे. ७. अहो. ८. उत्सव. ९. धारण करा. १०. हिम+शैल+सुता+आप+शीत=हिमाचलपर्वतोत्पन्न भागीरथीच्या उदकप्रवाहासारिखी थंड. ११. वसिष्ठ. १२. अजपुत्र दशरथ, त्याला. १३. तत्+लव=त्या शांतीचा लव. १४. अयोध्या. १५. महाश्रेष्ठातें. १६. राजा दशरथ. १७. वसिष्ठ. १८. इंद्राच्या आवडीचा अर्थ. रामानें राक्षसवधार्थ अरण्यांत जावें हा. १९. दशरथाला. २०. चौदा वर्षे. २१. मागे. २२. एक असा वर याची. २३. पुत्रा तासभर क्षिती सेवू. २४. पृथ्वी. २५. केकयाची (कन्या) कैकेयी. २६. येईना. याचा 'दशरथ' हा कर्ता. २७. आपल्या यशाची, तिलकाची, आणि केशांची हानी होण्याकरितां. २८. स्नेहाच्या ठायीं घाय करी, स्नेह तोडी.

चित्तीं म्हणे प्रभु, 'न या [१]गुरुस त्यजावें; धर्में यशें न विलया [२]गुरु सत्य जावें.' ।
[३]सीतानुजांसह निघे, जरि तात दे हा आज्ञा न; कष्टहि वनीं [४]वरितात देहा. ॥ २१
घे वल्क; भूषण, सुवस्त्र, न सेवि; [५]पत्ती. ठावी असी पुरजनासि नसे विपत्ती. ।
रायें रडोनि बहु, दुर्नय [६]आटवीला; स्नेहें सुमंत्र रथ सत्वर पाठवीला. ॥ २२
पौरांसि कारुणिक तो [७]फँटवी, [८]सजाया केला विलंब न जिहीं [९]अटवीस जाया. ।
भेटे सख्या त्वरित राम निषादराजा तो त्या; गमे, करि महेश विषादरा ज्या. ॥
तेथें [१०]अखिन्न रचिती प्रभु ते जटा, कीं [११]माता वदे, 'नृपतिवेषज बोज टाकीं'. ।
दे त्यांसि पुष्कळचि तापसवेष शोभा, तो भाव जागवि विरक्त, मनींहि लोभा. ॥
तेथें सुमंत्र, रथ, सोडुनि दे. [१२]वनौका मागे नमूनि गुहनामक, देव नौका[१३]. ।
पारासि जाय, उतरोनि [१४]सुरापगेला, प्राशूनि यत्पय गतीस [१५]सुराप गेला. ॥ २५
जाऊनि कीर्ति विभु दे बरवि प्रयागा. शिष्या सख्यासि वदला वरविप्र या गा. ।
श्रीचित्रकूट वरि हा नग, मेरु [१६]साहो; हें नीटसें जरि मना न गमे, रुसा [१७]हो. ॥
[१८]वृत्रारिचाहि वरि हा निर्ध[१९]ना सहाय; होतां म्हणे कृपण हानि धनास 'हाय!'. ।
वृत्तांत होय सुजना भरता पवी तो; थोडा मुला ज्वर महाभर तापवीतो. ॥ २७
तैशा जडेसि [२०]भगवज्जन कां न गांजी? त्यागी अभीष्ट फल सज्जनकां नगां [२१]जी. ।
तातक्रिया करि, पुरी त्यजि, तो अरण्या जाऊनियां, विनवि सत्करुणा शरण्या. ॥
सांगे तया भरत मृत्युकथा पित्याची, [२२]मोहे मुहूर्त शुचि बुद्धि तथापि त्याची. ।
ज्याचें सुरर्षि यश वर्णित हिंडतो या विश्वांत, तो गुरुसि दे प्रभु पिंडतोया. ॥
ज्यांच्या, नुरेचि किमपि [२३]प्रखराघ, वातें, तीं श्रीपदें भरत वंदुनि, राघवातें ।
प्रार्थी. म्हणे, 'निजपुरा परतून, ये, बा!' बोले प्रभु, 'त्यजुनि हें परतूं नये, बा! ॥
मी सेवितों वन चतुर्दशमात्र वर्षें, तों तूं करीं [२४]गुरुवरास्तव राज्य हर्षें. ।
कीं, तातवाक्यपरिपालनपुत्रधर्म त्यागी न जो, वरि तया शुचिं कीर्ति, शर्म'. ॥

---

१. पित्याला. २. मोठें. ३. सीता आणि अनुज लक्ष्मण यांसह. ४. स्वीकारितात. ५. पादचारी. ६. शुष्क केला. ७. न कळवितां निघून गेला. ८. स्त्रीसह. ९. अरण्यास. १०. खिन्न न होतां. ११. कैकेयी. १२. अरण्यामध्यें रहाणाऱ्याला. १३. गुहनामक वनौकाला नमून, देव नौका मागे–असा अन्वय. १४. सुर+अपगा=देवनदी (गंगा) तिला. १५. मद्यपी. १६. सहन करो. १७. अहो. १८. वृत्र+अरि=वृत्रासुराचा शत्रु इंद्र त्याचाहि सहाकारी राम. १९. त्रासाला, दुःखाला. २०. भगवत्+जन=भगवंताचा भक्त भरत तो. २१. कैकयी. २२. मोह पावे. २३. प्रखर पातक. २४. पित्याच्या इच्छेस्तव.

तेथील जे [1]अहितमारणकाम हर्षी, [2]त्याचें न ते करिति वारण कां, महर्षी? ।
घे पादुका अभयही; परतोन [3]वासा बाहेर आदरि, वसे; पर तो नवासा. ॥३२
भेटोनि अत्रिस करी प्रभु वंदनातें. तो हर्षवी, जनक ज्यापरि नंदनातें. ।
लावी सती प्रभुसतीस सुचंदनातें; प्रेमें, तपें, [4]अवनिचें करि मंद नातें. ॥ ३३
तारी, वधूनि विभु उग्रतरा विराधा, विप्रांसि; हें कथि यशें, न भयें त्रिरा, [5]धा. ।
देऊनि भेटि [6]शरभंग, [6]सुतीक्ष्ण, वर्णी. दे यासि खेद [7]विषयी मुनि मांडकर्णी.॥
भ्राता [8]अगस्त्य मुनिचा करि आदरातें; नाशी महर्षिहृदयांतिल [9]हा [10]दरांतें. ।
दे [11]वैष्णवें [12]घटज सन्मुनि यासि शस्त्रें, [13]श्रीगाधिनंदन जसीं विजयार्थ अस्त्रें.॥
भेटे जटायु, [14]निर्जतातसखा, तयातें दे सौख्य, जें हित, करूनि महादया, तें. ।
गोदावरी वरुनि पंचवटींत राहे. श्रोत्यां [15]कथा कथि, भवीं [16]अवटीं तरा हे.॥३६
तेथें [17]दशास्यभगिनी, [18]विधवा, रमाया प्रार्थी, जया भजतसे विनयें रमा, या. ।
सौमित्रि दंड करि, खंडुनि नाक कान. प्रेमें तदीय यश वर्णिल [19]नाक कां न? ॥३७
तीचा खराख्य खळ माउसबंधु कोपे, मानी मदांध जड तो प्रभुबाण [20]सोपे. ।
मारी [21]चतुर्दशसहस्रपलाशयुक्ता त्या, लाजवि प्रभु यशें हिम, दुग्ध, मुक्ता.॥३८
दावी निजा, कुमति शूर्पणखा, दशा; तें [22]स्त्रीरत्न वर्णुनि [23]पलाशवरा शशातें, ।
तत्कोपकाम खवळूनि, बळेंचि धाडी श्रीरामकेसरिवरि, व्यसनांत [24]पाडी.॥ ३९
‘श्रीसीं,’ म्हणे खळ, ‘सुखें न सदा रमो हा;’ मारीचहेममृग शीघ्र [25]सदारमोहा ।
योजी. तया निरखितां जनकात्मजा या वांछी, वदे, ‘द्रुत धरा,’ नुमजोनि माया.॥
लागे धनुर्धर रघूत्तम [26]रंकुमागें, भागे सुदूरगमनें, वधि त्यासि रागें, ।
[27]गांगे [28]शरार्तहि, नरेश्वरसाचि, [29]खोटा. वागे मनीं भय, [30]सती गणि घात मोठा. ॥

---

१. शत्रूंच्या मरण्याची इच्छा ज्यांला असे. २. भरताचें. ३. वसतीला. ४. पृथ्वीचें नातें; मातेहून अधिक प्रेम करी. ५. तृप्त व्हा. ६. ऋषिविशेष. ७. स्त्रीलंपट असा मांडकर्णी ऋषी पाहून रामास खेद वाटला. ८. वसिष्ठमुनीचा भ्राता अगस्त्य. ९. राम. १०. भयातें. ११. वैष्णवें शस्त्रें. १२. अगस्त्य. १३. विश्वामित्र. १४. आपल्या पित्याचा (दशरथाचा) मित्र. १५. हे कथा ‘भवीं अवटीं तरा.’ १६. संसाररूप खळग्यांत (अर्थात् सागरांत) तारणारी. १७. रावणाची बहीण शूर्पणखा. १८. विद्युज्जिव्ह नामक राक्षसाची स्त्री. विद्युज्जिव्हाला रावणाच्या हातून चुकून मृत्यु आल्यामुळें ही विधवा झाली होती. १९. स्वर्ग. २०. सुलभ. २१. चवदाहजारराक्षसयुक्ता. २२. सीता. २३. राक्षसश्रेष्ठ रावणरूपी शशाला. २४. स्त्री आणि पति यांना मोह पाडण्याकरितां. २५. कपट न जाणून. २६. हरिणामागें. २७. ओरडे. २८. शरपीडित. २९. कपटी मारीच. शरार्तहि खोटा, नरेश्वरसाचि गागे—असा अन्वय. ३०. सीता.

'लोभें,' म्हणे कविहि, 'कां पतिघात लागे पाठीस हा ? व्यसनिं कां पति घातला गे!?'।
श्री [1]देवरा विनवि, 'बा लघु [2]पाव. नातें चिंतूनि, वांचिवचि जा रघुपा [3]वनातें.'॥
तीतें म्हणे [4]कवि, 'न हें [5]शुचि राक्षसाचें; आहे वनीं कुशळ तो [6]रुचिराक्ष साचें.'।
सीता वदे, '[7]मदभिलाष तुझ्या मनांत. आलासि यास्तवचि तूं [8]कुजना! वनांत.॥
जा, नीच, नीच, उटजीं [9]कितवा! न राहें. ऐसें कुकर्म न नरा हित, वानरा हें.।
भार्या कसी उचित, जी तुज [10]मायसी, ते.' ती आपणासहि वदे, 'त्यज [11]काय, सीते!'॥
रामाकडे रडत तो [12]धृतताप गेला. सोडी तिला, खग जसा [13]कलुषापगेला. ।
तों ये दशानन, बळें हरि एकलीला. इच्छी गतायु [14]उरगीसह [15]भेक लीला. ॥४९
मारी सती निजपतीस, दिरास, हाका, 'हा काळसा हरितसे पशु, यासि [16]हांका.।
हा! काय हो त्यजिलि ती, सहजा दया जी? या, [17]जी! [18]श्रितार्तिहर तो [19]हयमेधयाजी.'॥
बाहे. रथीं गगनमार्ग धरी पळाया; तों [20]गृध्रराज अडवी सहसा खळा या; ।
भंगूनि वाटवि सुरांसि [21]परासु, नेला स्वत्रास दे [22]श्वशुर हर्षे बरा [23]सुनेला. ॥
धर्में न होय जय; तोडुनि [24]पक्षतीतें खड्गें, पळे हरुनि, [25]कैतवदक्ष, तीतें. ।
[26]श्री ऋष्यमूकगतवानरपंचकातें पाहे, त्यजी [27]स्वनग, वंचुनि [28]वंचकातें. ॥ ४८
पावे, [29]विलंघुनि पयोनिधि, [30]निष्कलंकालंकारमूर्तिस हरूनि, दशास्य, [31]लंका.।
ठेवी अशोकवनिकेंत, तिला [32]विरोधी [33]रोधी, म्हणे, 'स्वभजनींच इची [34]शिरो धी.'॥
सौमित्रि साश्रु निजखेद वनांत सांगे. स्वामी म्हणे, 'कटु असें वदलीस कां गे!'॥
धांवोनि ये, उटज केवळ शून्य पाहे, वाहे मनीं परम शोक, न ताप साहे. ॥
तीतें वनांत बहु, [35]सानुज हा [36]यशोधी, '[37]सुस्त्रैणता' म्हणत 'हा! [38]बत! हाय!', शोधी.।

---

१. दीर लक्ष्मण याला. २. लौकर जाऊन पोंच. ३. रघुपा वांचिवचि; जा वनातें—असा अन्वय. ४. चतुर. (लक्ष्मण.) ५. राक्षसाचें हें शुद्ध कर्म नव्हे. अर्थात् कपट आहे. ६. सुनेत्र, राम. ७. मत्+अभिलाष=माझी इच्छा. ८. दुष्टा! ९. कपट्या. १०. आईसी. ११. देह. १२. संतप्त होऊन. १३. कलुष+आपगा=गढूळ नदीला. १४. सर्पिणीसह. गतायु भेक उरगीसह लीला इच्छी—असा अन्वय. १५. बेडुक. १६. पिटाळा. १७. अजि. १८. आश्रिताच्या पीडेचें हरण करणारा. १९. अश्वमेध करणार. (पराक्रमी राजा.) २०. जटायु. २१. मृत. २२. दशरथसख, जटायु. २३. सीतेला. २४. पिसांच्या मुळातें. २५. कपटचतुर, रावण. २६. सीता. २७. आपले अलंकार. २८. त्या वंचकाला(रावणाला)न कळत. २९. समुद्र ओलांडून. ३०. शुद्ध अलंकारमूर्तिरूप सीतेस. ३१. दशास्य लंका पावे—असा अन्वय. ३२. रिपु. ३३. अडकवून ठेवी. ३४. इची मति माझ्या भजनीं शिरो. ३५. लक्ष्मणासहित. ३६. यशोनिधि राम. ३७. स्त्रीच्या ठायीं परमासक्तता. ३८. खेदार्थी अव्यय.

तों गृध्र[1], तातसख, मूर्छित देखिला हो! रामें खरा जनकघातचि लेखिला हो! ॥
'नेली सती दशमुखें, मजला अधर्में पाडूनि,' हें कथुनि, याचि असह्यकर्में ।
श्रीशासि[2] तातसम देउनि शोक, सोडी तो प्राण, दाखवि यशीं प्रभु फार गोडी.
दे पिंड, तोय, करुणार्णव तो तयातें; देणार हा द्रवुनि सत्पद तोतैयातें[3]. ।
साचें करी हरुनियां गुणपाश नातें. द्यायासि मुक्ति, हुडकी कुणपाशनातें.॥९३
प्रासार्थ ने धरुनि यास, न ने कबंध, स्तोत्रार्चना हरि तदीय अनेक बंध. ।
भिल्लीस दे स्वपद, वाँढ[4] विमान. काँय[5] स्तुत्यर्ह हा. इतर वाढवि मान काँय[6]? ॥
पाहे प्रसिद्ध सैरसी[7] अतिरम्य पंपा. पावे, स्मरोनि दयितेप्रति, राम कंपा. ।
'गेली' म्हणे, 'त्यजुनि, जेंवि घनासि संपा[8]. माझ्या असूंसि म्हणतो कुसुमेषु[9], 'संपा.'
सौमित्रिच्या बहुत दे प्रभु मान बोधा, जातां कबंधवचनें प्रियदारशोधा. ।
भेटे मरुत्तनय[10] भूसुरवेष[11], कार्या, वृत्ता पुसे, सुगळ भेटवि सौधु[12] आर्या[13]. ॥ ९६
झाला सुकंठसख[14] राघव; हृष्ट पूषा[15]; दावी प्रभूसि सुगळ प्रभुदारभूषा[16]. ।
जो त्यांसि[17], तत्प्रियतमेसि हरूनि, वाँळी[18], तो मारिला प्रभुवरें हरिपुत्र[19] वाँळी[20].॥९७
दे रामभद्र कपिराज्य तैया[21] नतातें; केली तसी प्रियसुतींहि दया न तातें. ।
कीं, हा समस्तहि सुरासुर खेळवीतो, याच्या प्रिया अमित वानर मेळवी तो[22]. ॥९८
गेले सुकंठवचनें, श्रमलेहि, योध. श्रीचा कळे निपुण वायुसुतासि शोध. ।
तो धन्य सागर उडे, वधि सिंहिकेला[23]. जिंकूनि त्याहि सुरसेप्रति[24], पार गेला. ॥ ९९
लंकेसि जिंकुनि, पुरी हुडकूनि, रात्री[25] पाहे अशोकवनिकेंत विशुद्धगात्री[26]. ।
तों ये दशानन, वदे, 'वश हो मला गे! 'हूं' मात्र बोल, न सुलग्न न होम लागे.'
सीता वदे, 'निशिचरा! निरयीं[27] चपापें[28]. रे! ताप, शाप, कुदशा, चिरें[29] याच पापें. ।
होसील भस्म सकुळ प्रभुसायकांहीं[30]. व्याघ्रा दिली गिळिल ओतु[31] न साय कांहीं.' ॥
पाण्यापरीस करि पातळ पामरा या, चिंती मनीं जनकजा मग रामराया. ।
कोपे म्हणे खळ, 'बरें न वदोन माँस[32] देसील, जीवितजडे! तव,' दोन मास.॥

---

१. जटायु. २. रामचंद्रास. ३. भलत्याला. ४. सुंदर. ५. देह. ६. प्रश्नार्थक अव्यय. ७. सरोवर. ८. वीज. ९. मदन. १०. मारुती. ११. ब्राह्मणवेषधारी. १२. मारुती. १३. रामास. १४. सुगल, सुकंठ, सुग्रीव, हीं तीन्ही नांवें एकार्थक आणि एकाचींच आहेत. १५. सूर्य. १६. रामस्त्रीचे अलंकार. १७. सुग्रीवाला. १८. गाळी. १९. इंद्रपुत्र. २०. वानरविशेष. २१. सुग्रीवाला. २२. सुग्रीव. २३. मारुतीच्या गतीचा अवरोध करणारी लंकेंतील राक्षसी. २४. सुरसा नांवाची दुसरी एक राक्षसी. २५. रात्रिसमयीं. २६. सीता. २७. नरका. २२. भयभीत हो. २९. निरंतर. ३०. रामबाणांनीं. ३१. मार्जार. ३२. मांस.

जातां दशास्य, गुण[1] घे, उकलूनि वेणी, उद्बंधनार्थ[2] महिजा. 'खचरी[3] न, सेणी।
या पेटल्या; अदय हा वृक[4]; मीहि ऐणी[5]; व्हावी' म्हणे 'तनु न सासु[6] तयास फेणी[7].'
वर्णी मरुत्तनय शक्तिदयासमुद्रा, तो दे नमूनि तिस धृत्युदयास[8] मुद्रा[9]. ।
आनंदवी, कुशळ, उद्यमवृत्त[10], सांगे. 'नेतों' म्हणे, 'सति! वृथा श्रमतीस कां गे! ?'॥
सीता म्हणे, 'मज अयोग्य पळोनि जाणें; जावें वधूनि खळ, हें उचित स्व जाणें.'।
प्रार्थी तिच्या स्तवुनि मारुतभू सुतेजा, '[11]दे वस्तु, पाहुनि निवे प्रभु भूसुते! ज्या.'॥
चूडामणि[12] क्षितिसुता[13] प्लवंगासि[14] अर्पी, आशीःसुधासुरस वर्षुनि फार तर्पी. ।
मोडी [15]वरोपवनवृक्ष, अरीस क्षोडी; थोडी करी परचमू, जय भव्य जोडी.॥६६
क्रोधें करूनि रण दारुण, अक्ष[16] मेला; याच्या सुरर्षि बहु वर्णिति अक्षमेला[17]. ।
जो प्रेषिला[18] जलदनादहि[19] अक्षतातें, ब्राह्में[20] निबद्ध करि तो अरि अक्षतातें[21].॥६७
बांधोनि घे कपि बळें कुतुकेंचि. अस्त्रें बाधों नयेतचि, वरें जरि सर्व शस्त्रें.।
नेला सभेप्रति. वरूनि पराभवाला गेला; गमे अजितदास[22] बरा भवाला[23]. ॥ ६८
ब्रह्मादिकां, धरुनि आळस, मान दे हा. या जाचिती सुजड[24] काळसमानदेहा.।
'तूं कोण? कां उपवनद्रुमभंग? राया कां, मर्कटा! न भिसि, मांडुनि संगरा या?' ॥
बोले मरुत्तनय, 'मी रघुवीरदास. जैसा मयूर, खग, चातक, नीरदास; ।
तैसा सदा भजतसें. मज वातजा तें[25] तत्कार्य कार्य, कवि जोडिति हात ज्यातें.॥
ज्याचा[26] कृती अनुज शूर्पणखेसि दंडी; जो आपण प्रभु रणीं खरशीर्ष खंडी;।
एकेंचि जो स्वविशिखें[27] निर्वेटूनि[28] वाळी, देऊनि राज्य, सुगळा स्वसख्यासि पाळी॥
नेली तदीय दयिता[29], मरणार्थ, चोरें; न्यावें भुलोनि उरगीप्रति जेंवि पोरें.।
शोधास पाठवि सुकंठ मलाहि दूता, ती देखिली तंव अशोकवनांत पूता.॥७२

---

१. दोरी. २. गळफांसार्थ. ३. राक्षसी. ४. लांडगा. ५. हरिणी. ६. जिवंत. ७. भक्ष्य-पदार्थ. ८. धृति+उदय=धैर्याच्या उदयास. ९. आंगठी. १०. आपल्या उद्योगाचें वर्तमान. ११. हे भूसुते! ज्या (वस्तु) पाहून प्रभु निवे, अशा वस्तु दे. १२. मस्तकांतील अलंकार. १३. सीता. १४. वानराला, मारुतीला. १५. सुंदर उपवनवृक्ष. १६. रावणाचा एक पुत्र. १७. असहनतेला, क्रोधाला. १८. पाठविला. १९. मेघनाद, हाच इंद्रजित्, हा रावणाचा दुसरा एक पुत्र. २०. ब्रह्मास्त्र सोडून. २१. क्षतरहितातें, मारुतीला. २२. रामचंद्राचा दास. २३. महादेवाला. २४. महामूर्ख लोक. २५. त्याचें जें कार्य, तें माझें कार्य. २६. ज्याचा पराक्रमी भाऊ लक्ष्मण हा शूर्पणखेला विरूप करी. २७. बाणानें. २८. मर्दून, मारून. २९. त्याची स्त्री.

त्वां आणिली कसि सती दशकंधरा ! हे ? [1]श्रीचा, अशा न अनयें, तिळ गंध राहे.'।
जो भाग्यमत्त, जड, तो जन अंधसा, हें त्यातें म्हणे व्यसन, 'दुःसह बंध साहें.' ॥
रामप्रताप न कसा तुज ठावका गा ! हंसापुढें न विजयप्रद ठाव [2]कागा. ।
साध्वीस, वंदुनि, समर्पुनि रामराया, वांच. स्वयें सजसि [3]सान्वय कां मराया ? ॥
भेटावया तुज समर्थ उपाय नाहीं, [4]वृक्षाक्षसैन्यलय याचि [5]उपायनाहीं ।
आलों; पुढेंहि रडसील असा वधानें, त्वां नाशिजेल कुळ, राज्य, असावधानें.' ॥
इत्यादि मारुति वदे हित सत्य यातें. वारात्रया अपयशासह [6]अत्ययातें. ।
सोसी न भाषण तसें [7]अरवाळ हा तें. घे तद्वधार्थ, कुमती, [8]करवाळ हातें. ॥ ७६
ज्ञाता बिभीषण सुधी न अनर्थ साहे; बंधूसि तो विनवि, 'दूत अवध्य आहे. ।
होतेंहि आयु अवशिष्ट म्हणोनि राहे.' तत्पुच्छदाहचि बरा मग दंड पाहे. ॥ ७७
[10]तैलार्द्रनैकपटवेष्टित अग्रपुच्छ, क्रोधें प्रदीप्त करि, मानुनि त्यास तुच्छ. ।
सांगे, 'पुरींत फिरवा चिर वानरा, जा,' हें राक्षसांप्रति, धरी परवा न राजा. ॥
तो कौतुकी कपि सुटे, न धरूनि शंका. जाळी, न लंघुनि [11]बिभीषणहर्म्य, लंका. ।
मानी न त्या दशमुखा, नृप जेंवि रंका. सिंधूंत पुच्छ विझवी, उडवूनि [12]अंका. ॥
सीतेसि वंदुनि, पुसोनि, पुन्हा उडाला, भेटे प्रभुप्रति, पिपीलिकसा गुडाला, ।
चूडामणी, धरुनियां चिर पाय, दे हा. आलिंगनें निववि तो [13]निरपाय देहा. ॥
त्यातें म्हणे, '[14]हरिति मानसखेद वार्ता. झालासि [15]या अमृतमेघ सखे ! दवार्ता. ।
द्याया नसे [16]उचित अर्थ तुला, अगा ! धा, बा ! [17]सन्मुखें पिउनियां स्वयशा [18]अगाधा.'
वर्णी असें बहुत राघव सेवकास, ज्याची भयांत धरिती मुनि, देव, कास. ।
मार्ग [19]स्वशत्रुमत सर्व पुसोनि घेतें; [20]द्विट्तेज घे बळ; [21]कुयातु [22]पुसों निघे तें. ॥ ८२
पावे [23]बळार्णव [24]नदीपतिच्या [25]तटातें. तो त्यासि कांपवि सदश्व जसा [26]तटातें. ।
धिक्कारिला दशमुखें कथि जो हितातें. त्या, वाटला रिपु बिभीषण, [27]मोहितातें. ॥ ८३

---

१. वैभवाचा. २. कावळ्याला. ३. स+अन्वय=वंशासहित. ४. वृक्ष अक्ष सैन्य यांचा नाश. ५. नजराण्यांसहित. ६. नाशातें. ७. हलका. ८. तरवार. ९. त्याला वाटे. १०. तेलानें भिजविलेल्या अनेक पटांनीं वेष्टित. ११. बिभीषणाचें घर धोक्यांत न आणून. १२. चिन्हा, लांछना. १३. अपायापासून मुक्त. १४. हरण करिते. १५. मला (रामाला). १६. योग्य अर्थ, बक्षीस. १७. साधूच्या मुखानें. १८. गंभीरा. १९. शत्रु, राम, त्यानें योजिलेला मार्ग. २०. शत्रुतेज (रामाचें तेज) बळकट होय. २१. दुष्ट राक्षस. (रावण.) 'यातु'-शब्द नपुंसक आहे. २२. निर्मूळ करण्यासाठीं. २३. रामाचा सैन्यसमुद्र. २४. समुद्राच्या. २५. तीरातें. २६. सामान्य अश्वातें. २७. त्या मोहिताला.

आला बिभीषण सुधी शरण प्रभूतें, वंदी धरूनि विनयें चरण [1]प्रभूतें. ।
होय प्रसन्न बहु, तो [2]शिवनिष्क लंका, संपत्ति दे, सुचिर कीर्तिहि निष्कलंका.॥८४
काळासि कंप निजनामगवर्णवातें दे, तो न देइल कसा प्रभु अर्णवातें ? ।
सिंधूंत सेतु बरवा करवी, रसाचें श्रीच्या मनोज्ञ पद, तें करवीर [3]सांचें. ॥८५
श्रीसेतु लांब शत तो, दश रुंद गावें, हें दे सुखें गजमुखा, यश, तुंद [4]गावें, ।
पारासि पावुनि, [5]धृताहितदूत सोडी. मोडी न नीति, जय यास्तव हात जोडी.॥८६
श्रीराममस्तकधनुष्य सतीस दावी, सोडावया विपुळ अश्रु, दशास्य लावी. ।
शोका बिभीषणवधू सरमा शमाया, 'माया' असें कळवि, मानस न भ्रमाया. ॥ ८७
वेधे सुवेळशिखरीं कपिराजयुक्त श्रीराम, ज्या स्मरुनि वारण होय मुक्त. ।
लंका सुवर्णमय, अद्भुत दुर्ग, पाहे. दूरूनि शत्रुसहि न [6]प्लवगेंद्र साहे. ॥ ८८
तत्काळ तो गरुडसाचि उडोनि, शंका सोडूनि, गांठुनि पळांतचि मूर्तपंका
त्या रावणा, करुनि धिक्कृति, फार ताडी. पाडी तळीं मुकुट. त्यासहि गर्व झाडी. ८९
आला फिरोनि कपिनायक, त्यासि राम, प्रार्थी, 'न साहस, करीं सदुपाय, [7]साम.
सामर्थ्य पूर्ण असतांहि, कधीं नयाचा, न त्यागिती पथ, सुकीर्ति अधीन याच्या.॥९०
श्रीराम दूतपण दे परभंगदातें; [8]सामार्थ पाठवि अरिप्रति अंगदातें. ।
त्या ऐकवी प्रभुवरोक्तमहानिरोपा, ज्याच्या, सदैव सुकरा रिपुहानि, रोपा. ॥ ९१
[10]धांवी यशःसमवनें जनका, क्षमेला, त्वां प्रीति. साग्रज मदें [11]कनकाक्ष, मेला. ।
दे [12]मत्प्रिया, [13]परिस साम, रहा, [14]निकाम त्यागूत [15]भूमिसुर [16]समरहानिकाम.॥९२
[17]मांझी स्त्रवेल शर चापलता, पवीतें द्यायासि लाज, खर चापल तापवीतें. ।
मेले चतुर्दशसहस्र खळादि वाळी, तोही घडेलचि शिवांसि खरा दिवाळी.॥९३
दे जानकी, शरण ये मज, जोड [18]पाणी, [19]कीं राज्यजीवितकुळांप्रति सोड पाणी. ।
लोकेश्वरांसि भज तूं, अभयार्थ जा गा. [20]जागा मिळेल न जगीं तुज, होचि [21]जागा !' ॥
इत्यादि ऐकुनि वदे दशकंठ रागें, 'मी [22]रत्नभुक् कपिनरांसि भिऊनि मागें ।
देतों कसा ? भिवविला हरि काय नागें ? टाकूनि बोलसि, जडा ! मरसील [23]आगें.॥

---

१. पुष्कळें. ('विनयें' या शब्दाचें विशेषण.) २. महादेवाच्या गळ्यांतील पदक असा राम तो. ३. श्रीच्या आवडीचें सुंदर स्थळ. तें खरें 'करवीर' क्षेत्र. ४. गायन करावें म्हणून. ५. धरिलेला शत्रु रावणाचा दूत. ६. वानरराज, मारुती. ७. सख्य. ८. सख्य करण्यास्तव. ९. बाणा. १०. यशाचें संरक्षण करून पिता जनक, आणि माता पृथ्वी यांना संतोष द्यावा. ११. हिरण्याक्ष. १२. माझी स्त्री. १३. ऐक. १४. सर्वथा. १५. ब्राह्मण. १६. समरसंबंधी हानीची इच्छा. १७. हा श्लोक नीटसा लागत नाहीं. १८. हात. १९. किंवा. २०. स्थान. २१. जागृत. २२. रत्नभोक्ता. २३. अपराधें.

आला पदच्युत वना, त्यजिलाहि तातें, त्या आत्मताततरिपुच्या अपसी हितातें. ।
मातेसि भोगित असे [3]चुलता; चपापें मूढा! सभेंत, बुध या [4]उलताच पापें.'॥९६
कोपोनि अंगद वदे, 'खळदंडकर्ता, राजेंद्र राम शरणागतदुःखहर्ता. ।
तो निंदितोसि जरि नेणुनि तत्व, भर्ता, तूं पावसीलचि जडा [5]व्यसनोग्रगर्ता.'॥
क्षोभोनि रावण वदे, 'नरवानरांनीं कीजे [6]सुकातर भया न, रवा न, रानीं. ।
खद्योत तूं कृपण, मी प्रभु अर्क, टाकीं दुर्वाक्य हें, हरिल जीवित मर्कटा! कीं.॥
चोरा! तुला वधिन मी, प्रभु राम राहो. कां माजलासि बहु? सावध पामरा हो.' ।
तत्तेज वाळिसुत नेत्रयुगें तदा पी, दापी, म्हणे, 'न जगसील जडा! कदापी.'॥
सांगे दशास्य, 'वचका न धराचि. राहो न, क्रूर हा न, [7]रदनीं [8]अधरा चिरा हो.' ।
तों झोंबले [9]खेचर दुर्मति चार यातें. दावी उडोनि [10]खगभूपतिच्या [11]रयांतें.॥१००
नेऊनि दूर गगनीं, कपि बाहु झाडी. ते भूतळीं [12]अहित चारहि तूर्ण पाडी. ।
पक्कें फळें गुरुशिळेवरि तेंवि ताडी. काळाकडे प्रथम अक्ष तसेचि धाडी.॥१०१
'प्रासाद भंगुनि, निशाचर चार भारी मारी;' कथि प्रभुसि तो पटु कारभारी. ।
स्वामी, स्वयें न वरि जो अरिसाम, यातें दे दंड; वैद्य रस ज्यापरि [13]सामयातें.॥
आरंभिला समर त्या खळ [14]यातुपानें; रामप्रताप[15]दहना बळ या तुपानें. ।
दे पाठ [16]वज्रधर, सोडुनि संगरा, ज्या, त्या, प्राप्त होय विभुपासुनि भंग, [17]राजा.॥
वीर [18]प्रहस्त समरीं भय दे, वसेना ज्याच्यापुढें, नच वरी जय, देवसेना. ।
तो [19]यातुसैन्यपति, [20]आहवदक्ष, मेला; गेलाचि सोडुनी [21]असह्यगद [22]क्ष्मेला. ॥१०४
[23]रक्तापगा स्वकटकाहि न [24]वाहवाया संकोचल्या. स्तवि सुरर्षि [25]नवाहवा या. ।
[26]वारी भय स्व विभु सायकबंधनाचें, हा हर्ष सूचविति काय कबंध [27]नाचें? ॥
[28]लीलामनुष्य, [29]परिपूरितनागपाश, [30]श्रीनाथ सानुज; तयाप्रति नागपाश ।

---

१. रामाचें हें वर्णन आहे. २. आपला बाप वाळी त्याला मारणारा जो राम त्याच्या हिताला तूं अंगद जपतोस. ३. सुग्रीव. ४. फुटताच. ५. व्यसन+उग्र+गर्त=संकटरूप भयंकर.खळग्याला. ६. फार अधीर. हें 'नरवानर' यांचें विशेषण. ७. दांतीं. ८. ओष्ठाला. ९. राक्षस. १०. गरुडाच्या. ११. वेगातें. १२. शत्रु. १३. स+आमय=रोगयुक्तातें. १४. राक्षसेंद्रानें. १५. अग्नीला. १६. इंद्र. १७. त्या रावण राजाला. १८. रावणाचा मातुल, मुख्य प्रधान, आणि एक सेनापति. १९. राक्षस. २०. युद्धदक्ष. २१. दुःसह रोग. २२. पृथ्वीला. २३. रक्ताच्या नद्या. २४. वाहवाया न संकोचल्या–असा अन्वय. २५. नव+आहव =नूतन युद्धा. २६. सायकबंधनाचें स्व (आमचें) भय विभु वारी, हा हर्ष. २७. नृत्यानें. २८. लीलेसाठीं मनुष्यरूप धारण करणारा. २९. परिपूरित+नागप+आश=परिपूर्ण केली गजेंद्राची इच्छा ज्याणें असा. ३०. राम.

योजूनि बद्ध करि [1]रावणि काळ. [2]जाला वाटेचि, [3]भूमिजनिच्या व्रण काळजाला. ॥
[4]श्री [5]पुष्पकांत बसवी दशकंठ, धाडी; दृष्टीस मूर्छित सलक्ष्मण [6]राम पाडी. ।
ती 'हा !' वदे, निरखितांचि तसी अवस्था; वाळे पळांत बहु, जेंवि लता [7]दवस्था. ॥
दे धैर्य, [8]तत्व कथुनि, [9]त्रिजटा. कवीतें वाटे [10]श्रुतीच, [11]तम जें निज, टाकवी तें. ।
ये [12]तार्क्ष्य, नाग पळवी, जिववि [13]प्रभूतें, प्रेमें, पित्यापरि गमे निववि, [14]प्रभूतें. ॥
कोपोनि [15]दाशरथि मारिति वीर कोटी. पाहे दशानन रणीं बळहानि मोटी. ।
काळाननीं प्रभु [16]घटश्रुतिलाहि लोटी. वार्ता गमे [17]क्षण तया [18]जडधीस खोटी. ॥
जे कुंभकर्णसुत कुंभ निकुंभ भारी, तत्पुत्रही, सुरनरांतक, शस्त्रधारी; ।
तैसाचि उग्र परम [19]त्रिशिराहि; [20]सारी तज्जीवित प्रभु, रणीं [21]अतिकाय मारी. ॥ ११०
ब्रह्मास्त्र योजुनि पुन्हा [22]घननाद ताडी; [23]शस्त्रव्रजें प्रभुसमेत समस्त पाडी. ।
जे मारुती उठवि. [24]ओषधिशृंग आणी, पावूनि ये, नुतिस लावि कवींद्रवाणी. ॥
[25]मायामयी जनकजा निवटूनि मोही जो, हीनशक्ति पविपाणि जयासि, [26]तोही ।
सौमित्रिनें खपविला; स्मर जेंवि [27]भर्गें. स्वर्गें तसेंचि वरिलें सुख, साधुवर्गें. ॥
शोकार्त रावण [28]महीतनयावधाला, गेला, पिऊनि [29]मुनिशोणित जो न धाला. ।
[30]झाली, पुढें [31]असिधरा [32]सहसा पहाती, सीता सती, वदलि पावुनि ताप 'हा !' ती. ॥
त्यातें सुपार्श्व सचिवोत्तम साधु वारी. [33]रामात्ययासि बळ पाठवि फार भारी. ।
तें राम, सिंधुजळ [34]कुंभज तेंवि, [35]सारी. कीं [36]त्र्यंबकप्रभु जसें जग सर्व मारी. ११४
घोर स्वयें कटक घेउनियां निघाला, घालावया प्रभुवरावरि, शत्रु, घाला. ।

---

१. रावणपुत्र मेघनाद इंद्रजित. २. झाला. ३. सीतेच्या काळजाला. ४. सीता. ५. कुबेराकडून रावणानें हिसकून घेतलेलें विमान, त्यांत. पुढें रावणाला मारून रामानें हें घेतलें. ६. रामलक्ष्मणांचीं मूर्छित रूपें सीतेच्या दृष्टीस पाडी. ७. वणव्यांत सांपडलेली ८. ही सर्व माया आहे. खरोखरीं रामलक्ष्मण विजयी होणार, असी खरी गोष्ट. ९. सीतेच्या रक्षणार्थ रावणानें नेमिलेली राक्षसी. ही फार ममताळू होती. १०. वेदान्त. ११. अज्ञान. १२. गरुड. १३. रामातें. १४. पुष्कळें. ('प्रेमें' या शब्दाचें विशेषण.) १५. रामलक्ष्मण. १६. कुंभकर्णालाही. १७. क्षणभर. १८. मंदबुद्धि रावणास. १९. रावणपुत्रांतील एक. २०. त्यांचें जीवित संपवी; त्यांना मारी. २१. आणखी एक रावणपुत्र. २२. मेघनाद. २३. शस्त्रसमूहानें. २४. ओषधिपर्वताचें शृंग. २५. जो मायामयी (लटकी) सीता करून तिला मारून, रामास मोहांत पाडी; आणि ज्याशीं वज्रपाणि इंद्रही हीनशक्ति, तो इंद्रजित देखील लक्ष्मणानें मारिला. २६. इंद्रजितही. २७. महादेवें. २८. सीतेच्या वधाला. २९. ऋषींचें रक्त. ३०. पाहती झाली. ३१. तरवार हातीं आहे ज्याच्या, अशा रावणाला. ३२. एकाएकीं. ३३. राम+अत्यय=रामाच्या नाशासि. ३४. अगस्ति. ३५. संपवी, मारी. ३६. संहारकर्ता रुद्र.

तों शक्ति लक्ष्मणवधार्थ उरीं[1] शहाणी हाणी. करी कविसभा[2] महिता कहाणी. ॥
भंगी रघूत्तम अरिप्रति. शक्ति काढी. मूर्छा त्यजी न विभुच्या[3] अनुजासि[4] गाढी. ।
आणी पुन्हा त्वरित ओषधिशैलशृंग, [5]श्रीरामचंद्रचरणांबुजमत्तभृंग. ॥ ११६
सौमित्रि निर्व्रण उठे, घडतांचि [6]नस्य, श्रीयुक्त, जेंवि मिळतां [7]शुभवर्ष [8]सस्य. ।
झाले मरोनि गतिभाजन कोटि, काया न प्रेक्षिती; म्हणति, 'आयु नको टिकाया.'॥
मेलीं असंख्य कपिराक्षसवीरसैन्यें; न स्पर्शिलें पळहि तन्मन लेश दैन्यें. ।
'श्रीरामरावणकृता अतुळा [9]महाजी, [10]हां!' [11]जीव [12]काव्य वदले, 'असि दुःसहा जी!'
निर्जीव देह पडले बहु राक्षसांचे, [13]सांचे सखे. [14]रुधिरकर्दम फार सांचे. ।
केलें [15]महेंद्ररिपुच्या अतियुद्ध तातें, दे त्या जनापरिस, त्यासहि, शुद्धता तें. ॥ ११९
ज्याच्या [16]महाशरघनें [17]हरि लक्ष मेला, भासे सुरां [18]भसित हा करिल [19]क्ष्मेला ।
तो कां सुरांसि दशकंधर कांपवीना? ते घेति देखुनि, जसे अहि, कांप, [20]वीना. ॥ १२०
[21]शक्रप्रियास्तव [22]तदीयरथीं चढून, क्रोधें दशास्यमहिमार्थ मनीं कढून. ।
गाया सुरांप्रति मृदंग नवे मढून, श्रीराम दावि बळ मेळविलें [23]पढून. ॥ १२१
तें युद्ध सप्तदिनरात्रि, जया न जोडा; देवर्षि तों म्हणति, 'या प्रभुजी! न सोडा. ।
होईल मस्तक नवें किति? तूर्ण तोडा; ब्रह्मास्त्र योजुनि शरें [24]अहितोर फोडा.'॥ १२२
लंका म्हणे, 'पति नको [25]विद्रेरा मला जो, त्या मारितां [26]प्रभु न कोविद [27]राम लाजो.'।
ऐसें सुरर्षि वदले परिसोनि, याचें पाडी शरीर. [28]दिनें तें करि सोनियाचें. ॥ १२३
फार प्रभूत्तमशरें समरीं गळाले; तच्छेष जे स्वपतिच्या पतनीं पळाले, ।
ते [29]क्रव्यभुक् खपविले [30]कपिसत्तमांनीं, 'हा!' नीतिला म्हणविते वरमत्त मानी. ॥ १२४
झाली प्रभूत्तमशिरीं सुरपुष्पवृष्टी. कोंदे सुखें, प्रभुयशें, बहु सर्व सृष्टी. ।
गंधर्ववृंद करि सुस्वरगायनातें. कोणी पुसेचि न तई [31]स्वरगायनातें. ॥ १२५

---

१. मोठी. २. मान्य. ३. लक्ष्मणाला. ४. गाढ मूर्च्छा. ५. मारुति. ६. नाकामध्यें जें औषध घालितात तें. ७. उत्तमवृष्टि. ८. धान्य. ९. महा+आजि=मोठें युद्ध. १०. हाय. ११ बृहस्पति. १२. शुक्र. १३. काष्ठादिकांचे. १४. रक्ताचा चिखल. १५. महेंद्ररिपुच्या तातें, इंद्रजिताच्या पित्यानें, रावणानें. १६. मोठ्या बाणवृष्टीनें. १७. वानर. १८. भस्म. १९. पृथ्वीला. २०. गरुडा. २१. इंद्राच्या संतोषास्तव. २२. त्या इंद्राच्या रथावर. २३. वसिष्ठगाधिजांपाशीं शिकून. २४. अहित+उर=शत्रूचें वक्षःस्थळ. २५. विरूप, विद्रा. २६. कोविद प्रभु राम न लाजो—असा अन्वय. २७. ज्ञाता. २८. 'दिन' शब्द नपुंसक आहे. २९. मांसभक्षक, राक्षस. ३०. वानरश्रेष्ठांनीं. ३१. स्वर्:+अग+अयन=स्वर्गसंबंधी वृक्षाच्या स्थानातें.

भेरीशतध्वनि, जयस्तवनाद, दाटे. [1]भेरी सुरर्षिकपिसंहति सत्य वाटे. ।
[2]हेरी सुखार्थ शिवसद्गुणमंदिरातें. हे रीति दावि भजतां [3]खग [4]चंदिरातें. ॥ १२६
नाचोनि गाति यश [5]भक्तिपराप्सरा तें. त्या पावल्या सुतृषिताचि [6]वराप्सरातें. ।
स्वच्छें, जसी सतत भा वदना, [7]रदानें; तैसी यशा [8]सरसभावद नारदानें.॥ १२७
प्रेरूनि सज्जन बिभीषण रामराजा, संस्कारवी, सुकृत लेश न [9]पामरा ज्या. ।
‘माझाहि रावण, जसाचि तुझा’ वदे, हें सार्थक्य केंवि वरिजेल तया न देहें?॥ १२८
दे राज्य लक्ष्मणकरें विधिनें [10]नतातें, केला कृतार्थ न असा विधिनें, न तातें; ।
सीतेकडे अजित पाठवि मारुतीतें, तो ऐकवी जयकथामृत [11]चारु तीतें.॥ १२९
सीता म्हणे, ‘जयकथाचि सुधानद्या या. आशीविना [12]उचित वस्तु बुधा! न द्याया.’।
प्रार्थी, कृती, मुदित, पाहुनि [13]पावलातें, मी फार; हें हृदयिं राहुनि, पावलां तें. ॥
देतीस देवि! तरि तूं वर एक दे, हा होईल या [14]अमृतसद्रससेक देहा. ।
मी राक्षसी वधिन, या वद, ‘मार जाच’ केला असे सति! इहीं तुज फार [15]जाच.’ ॥
सीता म्हणे, ‘पवनजा! न वधींच दीना. या किंकरी परवशा मतिशक्तिहीना. ।
जो यांसि जाच सिकवी, परमापराधी, [16]तो मारिला. तव असोचि दयापरा धी.’ ॥
श्रीरीतिनें पवनपुत्र सुधी निवाला. हे [17]सूक्ति यासि, जसि [18]विष्णुपदी शिवाला. ।
‘शीळें तुझ्या, प्रकृति देवि! विरो [19]पयाची,’ ऐसें स्तवूनि तिस साधु निरोप [20]यांची. ॥
देवी वदे, ‘प्रभुसि सांग, मला [21]उशीर, हो [22]पादरेणु; हित कां गमला [23]उशीर? ।
सोडू, अदर्शनज सत्वर ताप हा, या दृष्टीस; [24]हे तृषित सत्व रता पहाया.॥ १३४
ऐके, मरुत्सुतमुखें [25]हरि हा, निरोपा; ज्याच्या, सदैव सुकरा अरिहानि, [26]रोपा. ।
[27]लंकेश्वरा कथि, म्हणे, ‘द्रुत आणवा हे.’ ती [28]प्रत्ययार्थ करि दिव्य, न आण वाहे. ॥

---

१. नादानें भिरभिरली. २. टेहळी. तिकडे जाई. ‘गंधर्ववृंद’ हा ‘हेरी’ याचा कर्ता. ३. आकाशामध्यें राहणारे. ४. चंद्रातें. ५. भक्तिपरा+अप्सरा. ६. वर+अप्+सर=श्रेष्ठ उदक ज्याचें अशा सरोवरातें. ७. स्वच्छ दांतानें. ८. सप्रेमभक्तिप्रवर्तक अशा उदकदानानें. ९. रावणाला. १०. नत जो बिभीषण त्याला. ११. सुंदर. १२. बक्षीस देण्याला, मजपाशीं आशीर्वादाशिवाय अन्य वस्तु नाहीं. पराक्रमी मारुती. १३. तुझ्या पावलातें. १४. अमृतरूप उत्तम रसाचें सिंचन. १५. पीडा. १६. तो रावण. १७. सु+उक्ति. १८. भागीरथी. १९. अमृताची प्रकृति लाजो. २०. मागतो. २१. वाळा. २२. तुमच्या पायाची धूळ मला परिमळाप्रमाणें होवो, अर्थात् मला तुमच्या पायाचें वंदन घडो. २३. वेळ. २४. ही दृष्टि. २५. राम. २६. बाणा. २७. राम बिभीषणाला म्हणाला. २८. प्रचीतींसाठीं अग्नींत प्रवेश करून स्वच्छ बाहेर आली.

भक्तांसि, घेउनि नतिस्तुति, देव राजी; राजीवनेत्र[1] दयिता तिस दे वरा, जी ।
वर्णी तयाहि पितृपुत्रसमागमातें;[2] मातें[3] म्हणे कविस[4] जो 'गति माग, मातें.' ॥१३६
देवांशज प्लवग, ऋक्ष, सुरारिजेते,[7] मेले, निशाचर वधूनि रणांत जे, ते ।
देवेश्वरें उठविले अमृतांबुवर्षे. या सद्यशा मुनि महा कवि गाति हर्षे. ॥ १३७
प्रार्थी बिभीषणहि भद्रसभाजनातें,[8] ध्याया. तया अजित सैद्रसभाजनातें[9] ।
सांगे, जया विरहभूधर[10] तावि,[11] नातें,—'ही[12] दे, नको, म्हणसि जें भरताविना, तें.'॥
पूर्जी सुकंठसह वानर, ऋक्ष; बा! हें मद्योग्य, मी परमपूजित यांत आहें. ।
तो[13] भेटिव त्वरित, साधु सभाजनातें दे हर्ष; याचि करिं भव्य सभाजनातें.॥१३९
तैसेंचि तो[14] करुनि पुष्पक दे, वहाया. प्रेमें अधिष्ठुनि[15] रमायुत देव हा या, ।
त्या कीशराक्षसपतींसह सत्यसंध[16] स्वामी निघे, नुरवुनि स्वजनार्तिगंध. ॥ १४०
श्रीचें, लवों तिळहि देचि न सेतु, पातें.[17] कीं, जें गुरुत्व अमृतासि नसे, तुपा तें. ।
विद्वत्सभा, श्रुति तसी, परमारणाची,[18] सेवी कथा, प्रभुमुखें परमा रणाची.[19]॥१४१
सीता, जरी विरहदुःखकथा, तथापी, प्रेमें, प्रियें कळविल्या, त्यजुनि व्यथा, पी. ।
सुग्रीवसख्य कथि, वालिविनाशकर्म; श्रीराम दे प्रचुर[20] भूमिसुतेसि शर्म.[21]॥१४२
श्री आणवी, विनवुनि प्रवरावतारा,[22] तारावया कुसुमयानवरांत[23] तारा.[24] ।
दावी स्थळ प्रथम मारुतिसंगमाचें, जें भाग्य मूर्त सकळस्थिरजंगमाचें. ॥ १४३
पंपेसि दाखवि, म्हणे रघुवीर, 'कांते! म्या या स्थळीं, दशननिर्जितहीरकांते[25]! ।
केला विलाप. तव सन्मति दीर, देहा रक्षी, पुसूनि नयनें, बहु धीर दे, हा.'॥
दावी मतंगमुनिच्या परमाश्रमातें स्वामी, उरों तिळहि दे न रमाश्रमातें. ।
तारी सुधाहि न गदी;[26] शबरीकबंधत्राता हरीच[27] जगदीश वरीक[28] बंध. ॥ १४५
श्रीजानकीस जगदीश्वर राम गोदा, तो दाखवूनि, बहु दे तिसहि[29] प्रमोदा. ।

---

१. कमलनेत्र, रामचंद्र, आपली जी प्रिय स्त्री तीस वर देता झाला. २. दशरथ आणि राम यांच्या समागमाला. ३. सुखें मत्त हो. ४. मला कवीला. ५. जो दशरथरामसमागम. ६. मजप्रत. ७. राक्षसांना जिंकणारे. ८. मंगल भेट. मोठा दरबार. ९. प्रेमभक्तिपात्रास. (बिभीषणास.) १०. विरहपर्वत. ११. तापवी. १२. लज्जा. १३. तो भरत साधु. १४. बिभीषण. १५. त्यांत बसून. १६. सत्यप्रतिज्ञ. १७. नेत्रपातें. १८. शत्रुवधाची. १९. मोठ्या युद्धाची. २०. पुष्कळ. २१. सुख. २२. श्रेष्ठ अवतार ज्याचा, त्या रामाला. २३. पुष्पकविमानांत. २४. सुग्रीवस्त्री. २५. दांताच्या कांतीनें हिऱ्याची कांति जिंकिली आहे जिच्या. २६. रोगी. २७. निवारीच. २८. मात्र. २९. गोदेलाही.

दावी निजा[१] बरवि पंचवटींत शाळा[२]; बाळाहि जी म्हणति कीर्ति गतींस 'भाळा[३].'
दे, गृध्रतातगति सांगुनि, हर्ष तीतें, शोकाश्रु, तद्वट विलोकुनि, वर्षतीतें[४]. ।
कुंभोद्भवात्रिशरभंगसुतीक्ष्ण यांचे दावी सदाश्रम, जयांत न मोह वांचे. ॥१४७
श्रीचित्रकूटनगपा मग पाहवी[५] तो, जो कीर्तिनें दुरित सर्वहि वाहवी[६]तो. ।
भेटे प्र[७]यागगततातसखा मुनीतें, त्यातें निवोनि निववी स्वयशें पुनीतें. ॥ १४८
तेथूनि, जो पवनपुत्र, महाबळा या, प्रेषी[८] निजागम[९] गुहा, भरता, कळाया. ।
देतेचि, लोभ धरिता तरि, संपदा ते[१०]. कीं जीविताहि म्हणतातच्चि[११] 'संप' दाते.॥
'झालों प्रसन्न तुज मी. वर माग रामा !' ऐसें मु[१२]नीश्वर वदे परिपूर्णकामा. ।
त्याच्या पदासि विनयें वरदेश[१३] लागे, कीशप्रियार्थ फळपुष्पसमृद्धि मागे. ॥१५०
भेटोनियां गुहसखा मग धन्य केला; दे कीर्ति हे प्रियसखी पदकन्यकेला[१४]. ।
हें, आर्द्र, सयश, करी शुचि, वाचकोरा[१५]; मोरां[१६] घनीं अणु, भवीं[१७] रुचि वा चकोरा[१८].'॥
सीतावरा भरत, चातक तोयदास[१९], प्रेक्षूनि तो परम हर्षित होय दास. ।
शत्रुघ्न सर्वजन संसद यास मोर. येतां बळें उतवि वत्स देयां[२०] समोर. ॥ १५२
आलिंगिला भरत सानुज जेंवि तातें, ढुंगी शिरींहि विभु तो, करि जें वितो[२१] तें. ।
प्रेमें मनीं, गुरुसमप्रभ जे नमावे, आनंद सर्व हृदयांसि भजे, न मावे. ॥१५३
ब्रह्मादि सर्व करिती सुर पुष्पवृष्टी, कोंदे सुखें विविधवाद्यरवेंहि सृष्टी. ।
दे सानुजा ससचिवा भरतास वेशें[२२], स्वासासि गाति यश तें विधि वासवेश[२३].॥
केले सुपात्र कपि, राक्षस, गौरवा हे, पाहोनि मुन्नदशतीं[२४] बहु पौर वाहे. ।
सर्वांसि सानुज म्हणे प्रभु वेषधारी 'घा रीतिनें' करि सुधाकरकांतिधारी.॥१५५
साकेत जें पुर तया रघुवीर, देहा प्राण प्रवेशुनि तसें, महितत्व[२५] दे हा. ।
होय प्रजार्थ नृपसा, नसतां पदेहा[२६]. राज्यांत या न कुतरेंहि कधीं वदे 'हां[२७] !'॥

---

१. आपली. २. झोंपडी. ३. मोहित व्हा. ४. शोकाश्रूची वृष्टि करणारी जी तीतें. ५. दाखवी. ६. धुवून टाकितो. ७. प्रयागीं असणारा तातसख मुनि वसिष्ठ, त्यातें. ८. [राम] पाठवी. ९. आपलें येणें. १०. गुह, भरत. ११. संपूर्ण हो. १२. वसिष्ठ. १३. वरद+ईश=राम. १४. भागीरथीला. १५. वाचक+उर=वाचकाच्या वक्षस्थळाला. हें सयश वाचकोरा आर्द्र, शुचि, करी—असा अन्वय. १६. मोराला घनीं, अथवा चकोराला चांदण्यामध्यें रुची थोडी, पण वाचकाला रामयशीं रुचि अधिक. १७. सृष्टिसौंदर्यामध्यें. १८. चकोरपक्ष्याला. १९. मेघास. २०. वत्स समोर येतां मातेच्या दयेतें ऊत आणितो. २१. जन्म देणारी. २२. वस्त्रें. २३. इंद्राधिप. (वासव+ईश.) २४. मुत्+नद+शत=आनंदनदशतीं. २५. पूज्यत्व. २६. पद+ईहा=पदाची इच्छा. २७. हाय हाय.

जे दुर्लभ त्रिभुवनींहि, तसे वि[1]ल्यांचे न प्रेक्षिले कविजनें हितसेविल्यांचे, ।
ते सद्गुण प्रकटुनी, निववि प्रजांतें; गाती सदा, वरुनियां, शिव विप्र ज्यातें. ॥
शत्रुघ्न मारुनि रणीं लवणासुरातें, तो भू[2]मिच्या सुख न दे कवणा सुरातें? ।
ज्यांच्या भया कुशळही जन लोटिती न, गं[3]धर्व ते भरत संहरि कोटि तीन. ॥
केले बिभीषण मं[4]रुत्सुत भक्त धन्य; स्थापूनि जों स्वयश सं[5]द्गुणवृंदजन्य, ।
जे पौर, जानपद, जे पशु, जीव अन्य, श्रीशें पदीं बसविले, मुनि तेंवि व[6]न्य.॥

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

श्रीरामायण वाहिलें प्रभुपदीं 'सद्भक्तसर्वस्व' हें;
प्रेमें गातिल साधु तारितिल या दीना मयूरा महें; ।
त्याचा मी उपकार फेडुनि कसा उं[7]त्तीर्ण होऊं बरें?
श्रीरामें परि दीन हीन हि[8]र्त जे, ते धन्य केले वे[9]रें. ॥ १६०

---

# ५७. रामायणपीयूष.

(मालिनी वृत्त.)

विधिसह सुर विप्र प्रार्थिती विश्वपाळा,
अवतरुनि वधाया रावणा लोककाळा. ।
दशरथसुत झाला तो घनश्याम राम,
श्रुतिबहुमत ऐसें ठेविलें त्यासि नाम. ॥ १
सुत भरत दुजा हा मध्यमेचा तदंश,
त्रिभुवनं[10]नुत जेणें जाहला सूर्यवंश. ।
गुणनिधि तिसरा तो लक्ष्मण प्रां[11]ज्यधामा,
*कविमत चवथाही साधु शत्रुघ्ननामा. ॥ २
दशरथ सुत होतां वृद्ध भावांत हर्षे,
बहु धन, घन जैसा तोय तैसेंचि, वर्षे. ।

---

१. मातापित्यांचे. २. भूमीच्या सुरातें=विप्रातें. ३. राम राज्य करीत असतां गांधार देशांत गंधर्वांनीं उन्मत्त होऊन प्रजेस पीडा दिली. तेव्हां, भरतानें आज्ञा होतांच त्या देशांत आपल्या दोन पुत्रांसह गमन करून त्या गंधर्वांचा पराभव केला. (उत्तरकांड—सर्ग २०१). ४. मारुती. ५. सद्गुणसमूहापासून उत्पन्न होणारें. ६. वनवासी. ७. ऋणमुक्त, उतराई. ८. कल्याणकारी भक्त. ९. वर देऊन. १०. स्तुत. ११. विशालशक्ति.

करि उपनयनें तो योग्यकाळीं जगातें
सुखवि दुखवि दानें पारिजाता नगातें[१]. ॥ ३
स्वमखसमवनार्थी[२] गाधिजन्मा[३] महर्षी
नृपतिस सुत मागे; होय राजा न हर्षी. ।
कुळगुरुवचनें दे तत्करीं पुत्र दोघे,
परम मुदित आशीराशि[४] अर्पूनि, तो घे. ॥ ४
मुनिवर शत अस्त्रें रामभद्रासि दे हा,
प्रथम शिकवि विद्या, क्लेश व्हाया न देहा. ।
वधुनि गुरुनिदेशें राघवें ताटकेला,
परम सुगम विघ्नध्वंसनें वाट[५] केला. ॥ ५
अनुजसह मुनीच्या आश्रमीं राम पावे.
त्यजुनि भय महर्षि स्वस्थचित्तें तपावे, ।
कुशिकसुत म्हणे, 'ते दुष्ट यावे खपावे;
तव भुज रघुवीरा! आज यज्ञा जपावे.' ॥ ६
कटकसह[६] सुबाहु क्रव्यभुक्[७] प्रेत[८] केला,
उडवुनि शरवातें दूर मारीच नेला. ।
अतिविकळ पडे तो सागरीं ससु[९] राहे
स्वहित शमचि पाहे, त्रास चित्तांत वाहे. ॥ ७
रघुपतिवरि विश्वामित्र वर्षे वराशी,
मुदिरहि[१०] उदकाच्या तेंवि गोत्रीं[११] न राशी.
जनक निजसवातें[१२] तो पहायास बाहे,
विमळ यश, अहल्या रूपही भव्य, लाहे. ॥ ८
दृढहि धनु शिवाचें वोढितां राम मोडी,
पण पुरवुनि सीतारूप सद्रत्न जोडी. ।
भरतमुख तिघे जे त्यां तिघी आत्मकन्या
जनक नृप समर्पी, पावल्या तोष धन्या. ॥ ९

---

१. कल्पवृक्षातें. २. आपल्या यज्ञाच्या रक्षणासाठीं. ३. विश्वामित्र. ४. आशीर्वादांच्या राशी. ५. यज्ञस्थान. ६. सैन्यासुद्धां. ७. मांसभक्षक. ८. वधिला. ९. सप्राण. १०. मेघहि. ११. पर्वतीं. १२. आपल्या यज्ञाला.

'पळभरि भलता जो देवदेवा जपे या,
स्वसुकृतफळ वर्णीं[1] दे,' वदे वाजपेया[2]. ।
जनक-अजित हा-हें व्यक्त जाणे सुतत्व[3],
प्रकट दशरथाच्या धीस बाणे सुतत्व[4]. ॥ १०
मग दशरथ राजा मैथिला[5] अत्युदारा
पुसुनि तनय घे, ज्या जोडिल्या तत्सुदारा. ।
फिरुनि निजपुरा ये, तों पथीं राम[6] भेटे,
यमसम बहु कोपे, मोडितां चाप, पेटे[7]. ॥ ११
दशरथ गुरु तोहि त्रासला क्षत्रकाळा[8],
प्रभुसि परि जयश्री दे तया शांतिमाळा. ।
प्रमुदित नगरीतें पावला, लोक सारे
म्हणति निजमनीं, 'बा! भंगिला तो कसा रे!!' ॥ १२
अनुजसह पुराला मातुळें साधु नेला
भरतहि, गुरुवाक्यें तत्प्रियार्थेंचि गेला. ।
धरि मति युवराज ज्येष्ठपुत्रा कराया.
परि हित [10]दंयिताही तें करूं दे न राया. ॥ १३
'ऋषिसम मनुवर्षे[11] राम रानीं वसावा,
भरत निजपुरीं या राजभावें असावा.' ।
स्मर वर, कर साचे, हेचि तूं देव! दोन.
श्रम पतिहृदया ती स्त्री असें दे वदोन. ॥ १४
सुरहृतमति[12] सोडी आग्रहा बायको न.
प्रभुवर जननीचें इष्ट तें आयकोन, ।
अनुजजनककन्या घे, निघे, [13]अंह राया
तिळभरि न सिवाया, रावणा संहराया. ॥ १५
[14]अनुजसहित नेसे वल्कलें मातृदत्तें,
नमुनि गुरुसि, सोडी राज्य, जें स्वर्गवत्, तें. ।

---

१. स्वनाममंत्राच्या प्रतिवर्णीं स्वसुकृत फळ दे. २. यज्ञविशेष. ३. उत्तम तत्व. ४. पुत्रत्व. ५. जनकाला. ६. परशुराम. ७. चवताळला. ८. क्षत्रियांच्या काळाला, परशुरामाला. ९. ज्येष्ठ पुत्राला युवराज कराया मति धरी. १०. स्त्री, कैकेयी. आवडती असतां ही. ११. चौदा वर्षें. १२. देवांनीं जिची मति हरिली आहे अशी. १३. पातक. १४. मातेनें (कैकेयीनें) दिलेलीं.

दशरथ कथि सूता, 'शीघ्र ने स्यंदनातें[1],
बसिव अनुजयुक्ता स्त्रीयुता नंदनातें. ॥ १६
निरुपमतम शोकीं होय साकेत[2] मग्न.
क्षितिपति[3] बहु लाजे त्या जना, जेंवि नग्न. ।
करुनि सुरहितार्थ स्वाश्रितेच्छेसि भग्न,
त्वरित विभु निघे तो, जेंवि साधूनि लग्न[4]. ॥ १७
न विपुळहृदयींही दुःख मावे, उते तें.
त्यजुनि नृपति गेला कैकयाच्या सुतेतें[5]. ।
सुविकळ महिषीच्या[6] शेवटीं जाय गेहा,
रडत तिस म्हणे, 'न प्राणहा काय गे! हा?' ॥ १८
प्रभु गुहकनिषादा भेटला शृंगवेरीं[7].
कथि गुरु सचिवातें, 'जा स्वनाथासि हेरीं[8].' ।
तरुनि सुरधुनीतें[9] शीघ्र पावे प्रयागा,
नतिस[10], नुतिस[11], झाला श्रीभरद्वाज जागा. ॥ १९
प्रभुवर करि हर्षे चित्रकूटीं निवास;
प्रमुदित भजती त्या साधु, जैसे शिवास. ।
गुहचर[12] कळवी तें, सूत सांगे पुरांत
क्षितिपतिस[13], तयाच्या वज्र झालें उरांत. ॥ २०
प्रभुवरजननीतें शाप सांगोनि, भूप
त्यजि वपु सुतशोकें, होय देवार्च्यरूप[14]. ।
पतिनिधन जनौघीं तें, जसें वज्र शैलीं.
सचिव, भरत ये तों[15], स्थापिती प्रेत तैलीं. ॥ २१
न कथुनि भरतातें दूत घेऊनि आले
पुरिंत, समजतां ते बंधु शोकार्त झाले. ।
सुतरचितनिजांबाधिकृतें[16] साधु धाले.
किमपि नच तिचें तें त्यापुढें कृत्य चाले. ॥ २२

---

१. रथाला. २. अयोध्या. ३. दशरथ. ४. मुहूर्ते. ५. कैकेयीला. ६. पट्टमहिषीच्या, कौसल्येच्या. ७. नगरविशेष, त्यांत. ८. पद्दा. ९. भागीरथीला. १०. नमस्काराला. ११. स्तुतीला. १२. दूत. १३. दशरथास. १४. देव+अर्च्य+रूप=देवांनीं पूजा करण्यास योग्य असें रूप ज्याचें. १५. येईपर्यंत. १६. पुत्रानें केलेला जो आपल्या आईचा धिक्कार त्यानें.

करि सकळ पित्याचा अंत्य संस्कार, साहे
अपयश न, म्हणे, 'या काय दासा रसा[1] हे!' ।
निघुनि शरण गेला सात तो[2] साधु, आर्या
नमुनि, परतवाया ने चमू, तातभार्या. ॥ २३
गुह बळ करि सिद्ध, क्रुद्ध होऊनि, घाट
त्रिदशनुत नदीचा तो धरी, दे न वाट. ।
विषम समजला, कीं जातसे अत्ययातें[3];
उतरि भजक ऐसें जाणतां सत्य यातें. ॥ २४
करुनि बरि परीक्षा श्रीभरद्वाज आधीं,
मग सुखवुनि आज्ञा दे म्हणे, 'कीर्ति साधीं.' ।
प्रभुचरण नमी, जे लोकपांहीं नमावे,
यदमलयश[4] अंडामाजि[5] कांहीं न[6] मावे. ॥ २५
स्वजनक मरणातें पावला आत्मशोकें,
श्रवण करुनि रामें, प्राकृतें जेंवि तोकें[7]. ।
भरुनि नयनपद्में, पिंड[8], बोलोनि 'हंत[9]!'
स्मरुनि गुण, दिले; हें वर्णिती सर्व संत. ॥ २६
भरत, परतवाया स्वाग्रजा, हात जोडी.
बहु बहु समजावी, न प्रभु प्रेम मोडी. ।
चरणकमळपूता पादुका दे, वदे हा,
'अवधि टळलिया, मी या न वाहेन देहा.' ॥ २७
फिरुनि, वसवि नंदिग्राम तो साधु, वन्या
प्रभु परि वरि वृत्ति; श्रीशचिंता न अन्या. ।
बसवि वरपदीं ज्या पादुका त्या विधन्या[10].
कविततिच[11] न वर्णी तद्यशा, जन्हुकन्या[12]. ॥ २८
अतुल सुखयशाच्या, अत्रिला[13] देव, राशी
स्तवुनि नमुनि, अर्पी. तोहि या दे वराशी. ।

---

१. पृथ्वी. २. तो साधु, आर्या परतवाया तातभार्या नमुनि चमू ने—असा अन्वय. ३. नाशातें. ४. यत्+अमल+यश=ज्याचें स्वच्छ यश. ५. ब्रह्मांडामध्यें. ६. न सामावे. ७. बाळकें. ८. 'पिंड' हें 'दिले' याचें कर्म. ९. हाय. १०. विशेषेंकरून धन्या. ११. कविपरंपराच. १२. जन्हुकन्या ही वर्णी—इत्यर्थः. १३. देव, अत्रिला स्तवुनि नमुनि, अतुल सुखयशाच्या राशी अर्पी—असा अन्वय.

शुचिमति अनसूया शोभवी जानकीला;
रचि वर तनुरागा[1], क्षोभवी ज्या न कीला[2]. ॥ २९
हरि[3] महितनया[4] जो, त्या विराधासि मारी;
हरुनि सकळतापा, उग्र शापाघ[5] वारी. ।
निववि विभु तपस्वी दंडकारण्यवासी,
गति सतत उपासी ज्यांसि होऊनि दासी. ॥ ३०
वरगति शरभंगा दे, अरूपाहि, पेटी
मणि भरुनि तसी, घे मूर्ति नेऊनि भेटी. ।
स्वपितृसखजटायु, ख्यात गृध्रेंद्र जो, त्या
सुखवि भुवनहर्म्या[6] या, तया तोहि जोत्या[7]. ॥ ३१
निववि मुनिहिता जी सिंधु[8] गोदावरी ती;
करुनि वसति तीरीं प्राज्य मोदा वरीती, ।
दशरथसुत, लीलामानुष, स्वर्ग[9] ज्यांचें
स्तवि यश, गुरु चंद्र क्षीरधि, स्वर्गजांचें[10]. ॥ ३२
दशमुखभगिनी ये, हारवी नाक कान.
स्तविल निवुनि तेजें ईश्वरा नाक[11] कां न? ।
सखर[12]मनुसहस्रप्राण घे, देव धाया,
यश करि विभु, आज्ञा स्वाशुगां[13] दे वधाया. ॥ ३३
दशमुख भगिनीची दुर्दशा ती न सोसी.
गमलि विधिस त्याची त्यावरि श्री नसोसी[14]. ।
अवनिजनि[15] हराया हा करी ज्या सहाय,
प्रबळबळ वदे तो त्रस्त मारीच 'हाय!' ॥ ३४
कनकहरिण झाला, पंचवट्याश्रमाला
चकितहृदय आला, श्री[16] विलोकी तयाला. ।
विनवि मृग धराया तत्प्रिया, तें कराया
प्रभुहि खळ मराया जाय, विश्वा तराया. ॥ ३५

---

१. अंगराग, उटणें. २. ज्वाला. ३. हरण करी. ४. सीता. ५. शापाचें पातक. ६. भुवन हेंच ज्याचें घर, त्याला. ७. जोतें, घराचा आधार. ८. नदी. ९. स्वर्ग, गुरु, चंद्र, क्षीरधि (समुद्र) हे प्रत्येक ज्यांचे गुण गातात. १०. देवांचें. हें 'ज्यांचें' याचें विशेषण. ११. स्वर्ग. १२. खरासहवर्तमान जे चौदा हजार राक्षस त्यांचे प्राण. १३. स्व+आशुग=आपल्या बाणांस. १४. न असो असी. १५. भूमिसुता, सीता. १६. सीता.

कपटहरिण तो ने त्या [1]नृसिंहासि दूर
क्षणभरि; मग ताडी त्यासि लोकैकशूर. ।
[2]प्रभुपरि महिजेला, लक्ष्मणा, हाक फोडी,
मग निज वपु सोडी, [3]तन्मनीं आधि जोडी. ॥ ३६
परिसुनि बहु देवी व्याकुळत्वासि दावी;
उचित, शुचि, तरी त्या [4]देवरा दुष्ट भावी. ।
वदुनि कटु, पिटूनि [5]स्वोटजांतूनि लावी,
तंव दशमुख ये, ने तीस, जी माय [6]गावी. ॥ ३७
श्रवण करि सुनेच्या तो महासत्व हाका
दशरथतनुजांचा गृध्रभूपाळ काका; ।
विरथ करि अरीतें, दे महाहर्ष नाका,
मिरवि वि[7]शदता तत्कीर्ति, तैसी न [8]राका. ॥ ३८
[9]असिकरुनि अधर्मे [10]दुष्ट तत्पक्ष तोडी,
पळवि, जिस मुहूर्त त्रस्त होऊनि [11]सोडी. ।
गिरिवरि कपि पाहे पांच, ती त्यांत पाडी
नग पटसह; जाणो त्यांकडे दूत धाडी. ॥ ३९
खळ जलधिस लंघी, ने स्वलंकेंत देवी,
भय न गणि, अशोकीं काननीं गुप्त ठेवी. ।
प्रतिदिन [12]शतयज्ञप्रेषितात्पान्न सेवी,
सतत पतिपदाब्जध्यानपीयूष सेवी. ॥ ४०
नमुनि [13]अनुज सांगे साश्रु तें वृत्त रामा,
त्वरित म्हणत 'हा!', ये आपुल्या [14]पर्णधामा. ।
उटजचि न तदा तो, विश्व, निःश्रीक पाहे,
[15]कपटमनुजरूप [16]स्त्रैणसा शोक वाहे. ॥ ४१
विरहविकळसा तो श्रीस सर्वत्र शोधी,
प्रभुसि बहु सुमित्रापुत्र दे धैर्य, बोधी. ।

---

१. रामास. २. रामाप्रमाणें. ३. त्यांच्या मनामध्यें. ४. दिरा (लक्ष्मणाला). ५. स्व+उटजांतूनि=आपल्या पर्णशाळेंतून. ६. वर्णावी. ७. प्रकाशितपणा. ८. पूर्णचंद्रयुक्त रात्र. ९. तरवारेनें. १०. रावण. ११. 'गृध्र' हा याचा अध्याहृत कर्ता. १२. इंद्रानें पाठविलेल्या अल्प अन्नाचें सेवन करी. १३. बंधु (लक्ष्मण). १४. पर्णकुटीला. १५. लीलेनें मनुष्यरूप धारण केलें आहे ज्यानें, तो राम. १६. स्त्रीलंपटसा.

खिन्नवुनि बहुयत्नें शोकवेगासि रोधी,
नयन पुसुनि सांगे, 'बा! न मोहीं शिरो धी.'[1] ॥ ४२
विपिन[2] हुडकितां, तो देखिला गृध्र[3] तात,
त्यजुनि धृति म्हणे 'हा!', दे स्वयें वारि वात. ।
विकळहि कथि, 'केला रावणें हा स्वघात;'
व्यसु[4] मग खग होय श्रीमुखातें पहात. ॥ ४३
सकरुणवर लावी त्याचिया हात दाहा[5],
स्मरुनि न[6] वदला स्वप्रेयसी[7] हा तदा 'हा!' ।
सुतसमचि यथोक्त[10] श्रीश दे पिंडतोया.
विसरुनि जन पुत्रीही[11] भवीं हिंडतो या. ॥ ४४
तदुपरि धरि जाया[12] सानुजा; तो कबंध,
क्षपवुनि[13] जगदीशें तत्क्षणीं शोकबंध, ।
सुरवरसम केला. सिंधुतें यादें[14] ये तें.
कविमन विभुतेजें ऐकतें या दयेतें. ॥ ४५
प्रभुसि हित कथी तो[15], पाय वंदूनि भावें,
'निववुनि शबरीतें ऋष्यमूकासि जावें. ।
तरणितनुज[16] आहे कीश[17] सुग्रीवनामा,
करिल, सुखवितां, हें त्वन्महाकार्य रामा!' ॥ ४६
वरगति शबरीतें दे मतंगाश्रमांत,
प्रकटि निजकुळा जो त्या पतंगा[18] श्रमांत. ।
सुखवुनि सुगळातें[19] हर्षवी राम, हातें
धरि, करि अमृताचें वर्ष[20] वीरा महा तें. ॥ ४७
पवनतनुज[21] सीताजानिचा[22] होय दास
प्रथम; मग यशस्वी, राघवा तोयदास[23] ।

---

१. मोहीं बुद्धि न शिरो. २. अरण्य. ३. जटायु. ४. मृत. ५. दहनाला. ६. न बोलिला. ७. आपली स्त्री (सीता) ती. ८. राम. ९. हाय. १०. शास्त्रोक्त रीतीनें. ११. पुत्रवान् देखील. १२. स्त्री आणि बंधु यांकडे लक्ष देई. १३. क्षीण करून, १४. मासा. 'याद' हा नपुंसक आहे. १५. कबंध. १६. सूर्यपुत्र सुग्रीव. १७. वानर. १८. सूर्य हा आपला कुळ पुरुष असें प्रकट करी. १९. सुग्रीवाला. २०. वृष्टि. २१. वायुपुत्र मारुती. २२. सीतापतीचा, रामाचा. २३. जलदाला, राघवरूप मेघाला.

विकळ[1] सुगळ बर्ही[2] भेटवी हा सखा या;
 सुहित पवन दावा[3] जेंवि कक्षास[4] खाया[5]. ॥ ४८
रविसुत[6] नग[7] दावी, पाहतां अश्रु गाळी
 प्रभु, सुगळ सदुक्तें शोक मोहासि टाळी. ।
परिसुनि अपराध, क्रूरता, मत्त वाळी
 व्यसु[8] करुनि, पदीं त्या[9] स्थापुनि श्रीश पाळी. ॥ ४९
कपि[10] बहु शतकोटि क्रूर देवांश गोळा
 करि सुगळ, म्हणाया राक्षसां 'हात चोळा.' ।
पटु कपि हुडकाया पाठवी त्यांत आर्या[11];
 निरखि पवनजन्मा. ये कृती[12] तोचि कार्या. ॥ ५०
जळधि उडुनि लंघी, नावरे अंतराया[13].
 शतमखमुख[14] गाती देव या संतराया[15]. ।
उसळवि निजवेगें सिंधुचें तोय, शोधी
 परपुर[16], विभुमुद्रा[17] श्रीस दे तो यशोधी[18]. ॥ ५१
पुसुनि कुशळ[19] सांगे, तो धनुर्बाण[20] तूण
 स्तवुनि, नमुनियां घे सुज्ञ मागोनि खूण. ।
उपवनतरु मोडी, शत्रुपुत्राक्ष[21] मर्दी.
 निशिचर पशुसे, हा त्यांत भासे कपर्दी[22]. ॥ ५२
मग घनरव[23] योजी ब्राह्म[24], दे त्यास मान
 श्वसनसुत[25] सुतेजें भानुसा भासमान. ।
अजित[26] अजितसा[27] जो सांपडे, तो खपावे
 पर म्हणुनि. न जाणे हें कुधी, तोखें[28] पावे. ॥ ५३

१. उद्विग्न. २. मोर. मग यशस्वी [पण] उद्विग्न सुगळ, या राघवरूप मेघाला आपला सखा (मारुती) हा मोर भेटवी. ३. वणव्या. ४. गवतास. ५. जसा गवताला भक्षण्याला अग्नीला वायु हा मित्र होतो, त्याप्रमाणें. ६. सुग्रीव. ७. अलंकार (सीतेचे). ८. प्राणरहित करून, वधून. ९. सुग्रीवाला. १०. चतुर वानर. (सुग्रीव.) ११. सीतेला. १२. शहाणा. १३. विघ्नाला. १४. इंद्रप्रभृति देव. १५. साधुश्रेष्ठाला. १६. शत्रुनगर, लंका. १७. रामाची अंगठी. १८. यशोनिधि. १९. सीतेचें कुशळ पुसून, रामाचें कुशळ सांगे. २०. रामाचें धनुष्य, बाण, तूण (भाता), यांचें वर्णन (खुणेसाठीं) करून. २१. शत्रु रावण, त्याचा पुत्र अक्षनामा. २२. जटाधारी (महादेव). २३. मेघनाद (इंद्रजित). २४. ब्रह्मास्त्र. २५. वायुपुत्र. २६. न जिंकिलेला. २७. विष्णुसा. २८. तोष, संतोष.

दशवदनसभेला, हानिच्या कामनेला
धरुनि, न समजोनि प्राज्य तें [1]धाम, नेला, ।
कथि [2]केवि वदवीतां, भावि जें सत्य यातें,
[3]खचरपति तयाच्या खड्ग घे [4]अत्ययातें. ॥ ५४
[5]तैदनुजनि, **बि भी** हे ज्याचिया वर्ण [6]नामीं,
मग **ष ण**, न कराया सुज्ञ तद्वर्णना मी, ।
विनवुनि वदला तो वाक्य अत्यंत पूत,
'[7]प्रभुस तुज नव्हे बा सर्वथा वध्य दूत.' ॥ ५५
त्यजुनि नय, पटांनीं वेष्टिलें पुच्छ, तैलें
भिजवुनि, उजळीलें **राव**णें पापशैलें, ।
[8]खचरततिस केला 'न्या पुरीं,' हा नि[9]देश,
उसळुनि पुर जाळी काळसा [10]हानिदेश. ॥ ५६
[11]द्विषदनुजगृहातें मात्र तो सुज्ञ पाळी.
वरकड दशकंठाद्यालयें सर्व जाळी. ।
सिकवुनि ससुता त्या, 'हा!' वदाया, खळाला,
उडुनि जलधिनीरीं, ये महेंद्राचळाला. ॥ ५७
निववुनि विजयानें [12]सांगदा कीशचक्रा,
[13]मधुवन लुटवी, भी वानरांच्या न [14]शक्रा. ।
मुदित करि तया, जो दे गजा मुक्ति, नक्रा
वधुनि, नुरवि काळीं तेज, यद्दृष्टि वक्रा. ॥ ५८
निरखुनि [15]दयितेच्या [16]भव्यचूडामणीतें,
प्रमुदितमति भेटे त्या [17]कपिग्रामणीतें. ।
स्तवि बहु, उपकारा आठवी जानकीश,
प्रियकर शिव साक्षात् तो गमे ज्या, न [18]कीशां. ॥ ५९

---

१. तेज. २. चतुर, मारुति. ३. राक्षसपति, रावण. ४. नाशातें. ५. त्याचा धाकटा भाऊ. ६. ज्याच्या नामामध्यें **बि भी** आणि मग **ष ण** हे वर्ण आहेत. ७. तूं राजा असल्यामुळें दूतवध तुला योग्य नाहीं. ८. राक्षससमूहास. ९. आज्ञा. १०. हानिद+ईश=हानि देणाऱ्यांचा स्वामी. ११. शत्रूचा धाकटा भाऊ–बिभीषण त्याच्या घराला. १२. अंगदसहित वानरसमुदायाला. १३. वालीचें वन. १४. वानरांच्या जुन्या राजाला (वालीला) न भी. १५. स्त्रीच्या. १६. मस्तकांतील तेजस्वी अलंकार. १७. वानरश्रेष्ठातें. १८. वानर.

'निर्वंटुनि[1] खळ, रक्षा मानवित्ता सेजाच[2];
 त्यजिन तनुसि, सोसे या न चित्तास जाच. ।
पटुहि न करिती कां शत्रुची हानि रोपें[3]?'
 श्रवण करि सतीचा सन्मुखें[4] हा निरोप. ॥ ६०
रघुपति घटिकेच्या ही विलंबा न साहे;
 अनुजसह निघे, त्या वायुचा पुत्र वाहे. ।
रथपण[5] युवराजें[6] लक्ष्मणाचेंहि केलें,
 कपिबळ सुगळें तें सिंधुतीरासि नेलें. ॥ ६१
कथिति वरमदांधा रावणा मेघनाद-
 प्रमुख खळ, 'न द्यावी जानकी'. ते कुवाद[7] ।
परिसुनि, नयधर्मी जो सदा एकनिष्ठ,
 स्वमत कथुनि बंधु क्रोध दे, त्या कनिष्ठ[8]. ॥ ६२
'प्रबळयुवति साध्वी द्या जयाची तया हो!
 स्वकुळ न बुडवा. त्या ईश्वराची दया हो. ।
अपटु सकळ[9] एका वानरा आवराया,
 बुडवितिल कुधी हे संगरीं नाव, राया! ॥ ६३
नमन करुनि, आर्या[10] आर्यवर्यासि[11] अर्पा.
 हरधनु चुरि[12] जो, त्या दावितां काय दर्पा? ।
गरुड न कवणाही जिंकिला जाय सर्पा.
 न कुळपललरक्तें[13] गृध्र[14]काकांशि तर्पा.' ॥ ६४
करुनि दुरभिमानी बंधुधिक्कार, यातें,
 त्यजि; कवि[15] विटला त्या, जेंवि हिक्कारयातें[16]. ।
विहंग[17] अमरवृक्षा, प्राप्तदावा अरण्या
 त्यजुनि, शरण आला तेंवि रामा शरण्या[18]. ॥ ६५
अनुज दशमुखाचा मानिती सर्व[19] खोटा.
 पवनसुत म्हणे, 'हा या जगीं साधु मोटा. ।

१. निर्दाळून. २. त्वरित. ३. वाण. ४. साधुच्या (मारुतीच्या) मुखद्वारें. ५. रथत्व. ६ अंगदें. ७. दुष्ट उपदेश. ८. कनिष्ठ बंधु बिभीषण. ९. हे सकल कुधी युद्धामध्यें नांव बुडवितील. १०. सीता. ११. रामचंद्रास. १२. मोडी. १३. स्वकुळाच्या मांसरक्तें. १४. गिधाडांना आणि कावळ्यांना संतोषवूं नका. १५. ज्ञाता, बिभीषण. १६. उचकीच्या वेगाला. १७. पक्षी. १८. आश्रय करण्यास योग्य, त्याला. १९. सर्व राक्षस खोटा मानिती.

प्रभुमतरघुवंशा ज्या महावज्रकोटा,
  भजति समय, यावा तद्यशाला न तोटा'. ॥ ६
द्विषदनुज नमी त्या, विश्व जो देव वीतो;
  कथुनि अवरजातें, राज्य तें देववी तो. ।
रघुतिलकनिदेशें सेतु केला नळानें,
  दळसम धरिला तो सागराच्या जळानें. ॥ ६
धनु शिरहि विभूचें दाखवीलें छळानें,
  घडिभरि महिकन्या साश्रु केली खळानें. ।
प्रभुसह कपिसेना सेतुनें जाय पारा,
  द्विगुणित उतराया लागले याम बारा. ॥ ६
सुगळसह सुवेळीं राम वेघोनि राहे,
  कनकरचित लंकादुर्ग दूरूनि पाहे. ।
अरिस निरखि, धांवे क्रुद्ध सुग्रीव पाडी,
  मुकुट, गरुड जैसा पन्नगा तेंवि, ताडी. ॥ ६९
फिरुनि सुगळ येतां त्या म्हणे राम, 'राहें,
  स्थिर, असुसह रक्ष. स्वर्गपा सांमरा हे ।
श्रितें बुडविति, मोहीं सेविती साहसा जे.
  दहन पवन संगीं घे, करीं दाह, सोंजे. ॥ ७०
कपिकटकसमुद्रें राम लंकेसि रोधी.
  मग 'दशवदनाची क्षिप्र सांमीं शिरो धी,' ।
म्हणुनि सजुनि धाडी वाळिजा अंगदातें,
  हित कथि, परि माने त्या न सद्रंगदा तें. ॥ ७१
धरवि वध कराया अंगदातें विरोधी,
  रघुपतिविशिखांहीं खंडवाया शिरोधी. ।

१. परमेश्वराला मान्य आणि वज्राचा मोठा कोट, ज्याला सर्व समय होऊन भजतात, त्या रघुवंशाच्या यशाला उणेपणा न येवो. २. बिभीषण. ३. धाकट्या भावाला, लक्ष्मणाला. ४. पानासम. ५. कपटानें. ६. परतीराला. ७. द्विगुणित बारा याम, चोवीस प्रहर. ८. चाकव. ९. सजीव. १०. देवांसह इंद्राला. ११. आश्रित, सेवक. १२. हें योग्य आहे. १३. मिथत्वीं. १४. साधूंचा छळ करणाऱ्याला. १५. बाणांनीं. १६. शिरांचा समुदाय.

[1]वंधि निशिचर, वेगें बाहु झाडूनि, चार.
प्रभुसिं रण करावा हाचि माने विचार. ॥ ७२
समर सेनरयांहीं मांडिला फार भारी,
तपति खपति पापें शत्रुचे कारभारी. ।
परम पर मदानें अंध कांहीं वळेना,
[3]सुचिर रुचि रणाची, घात होतां, कळेना. ॥ ७३
[4]क्षितिवरि रुधिराची वाहिली जी नदी, न
द्विपहि तरति, चिंतासीच ते जीन दीन. ।
नटति बहु कबंध, [5]स्वर्ग आला पहाया,
मुनिहरिण म्हणे त्यां. 'काय [6]आलाप हा या!' ॥ ७४

[7]नरतनु करि दोघे बद्ध ते, कीं भ्रमावे,
[8]खरविषधरपाशीं बंधु फार श्रमावे, ।
[9]सकृदपि भवमोहा जावया जे न [10]भांवे,
खळ [11]घनरव कर्मे या त्रिलोकीं [12]नमावे. ॥ ७५
[13]सुधृति जनकजेला दे [14]त्रिपूर्वा जटा, 'हो
स्थिर, [15]विभु [16]विप ये जों, तों म्हणे, 'संकटा हो!' ।
करि [17]अहिगुणबद्धा मुक्तिदात्यासि मुक्त.
प्रभुसि सुयश द्यावें, सेवकां हेंचि युक्त. ॥ ७६
प्रभु पुनरपि मारी संगरीं सैन्य कोटी,
उठवि [18]अनुज. होतां आपली हानि मोटी, ।
कपिबळ पळवी तो काळसा कुंभकर्ण,
प्रबळ पवन वेगें वाळलें जेंवि पर्ण. ॥ ७७
विकळ करि, धरी, ने, तो सुकंठासि; मागें,
[19]हरि [20]हरिवर, नासाकर्ण तत्काळ रागें ।

---

१. याचा कर्ता 'अंगद.' २. समान वेगांहीं. ३. दीर्घकाळपर्यंत. ४. वृद्ध. ते (ती नदी) द्विप (हत्ती) ही न तरती, अर्थात् तिजमध्यें हत्तीही बुडती. यास उदाहरण–जसे, दीन वृद्धजन चिता तरत नाहींत, तिजमध्यें बुडतात, त्याप्रमाणें. ५. स्वर्गीचे देव. ६. सुस्वर गायन. ७. नरतनु रामलक्ष्मण. ८. प्रखर सर्पांच्या पाशांनीं. ९. एकदा तरी. १०. नमस्कारावे. ११. मेघनाद, इंद्रजित. १२. न सामावे. १३. चांगलें धैर्य. १४. त्रिजटा. १५. पराक्रमी. १६. गरुड. १७. सर्परूप दोरीनें बद्ध अशा मुक्तिदात्याला, रामाला (तो गरुड) मुक्त करी. १८. लक्ष्मण. १९. हरण करी. २०. वानरश्रेष्ठ (सुग्रीव).

गिळि कपि सगळेचि; क्रुद्ध होऊनि आगें,
प्रभुशर म्हणती, 'घे नीज, वीरा! न मागें.' ॥ ७८
विखरि गगनवर्ती शस्त्रजालादि सेना,
घनरव खिळि सारी. विश्वपाळा दिसेना. ।
द्विषदनुज[1], हनूमान् मोहिले हे न दोघे;
म्हणुनि[2] दशमुखास्यें 'धन्य' तत्पुत्र[3] तो[4] घे. ॥ ७९
कविवर[5], बळशाली, सर्वसन्मौलिरत्न[6],
श्वसनसुत, हनूमान् जांबवत्प्रोक्त यत्न ।
करि; झडकरि ओषध्यद्रिचें शृंग आणी,
उडवि सकळ शल्यें, मोह; तद्गंध खाणी[7]. ॥ ८०
व्रणकणहि पहाया एक देवा न राहे,
विपुलतर सुधेचा सेक[8] दे वानरा, हे ।
जगदसुतलीला[9] जिष्णु[10]ची गाय; कांहीं,
न उणि वरिलि, जैसी विष्णुची, गायकांहीं. ॥ ८१
स्मरहरगिरिपार्श्वीं शृंग पावूनि[11] आला,
स्वधनु धरुनि युद्धा सिद्ध जों नाथ झाला; ।
प्रभुवरविशिखांच्या त्या न साहे[12] समूहा.
त्यजुनि धृति, म्हणे ती राक्षसांची चमू 'हा!' ॥ ८२
वध जनकसुतेचा दाखवी दुष्ट मोही[13],
सुर मुनि वदले, 'हा देव!' निर्माय[14] तोही ।
कथि पति सरमेचा[15], 'सिद्धि पाहो[16] मयाचा[17]
न कपटपटु नातू. राहवा होम याचा'. ॥ ८३

---

१. बिभीषण. २. तो इंद्रजित् रावणाच्या तोंडून आपणास धन्य म्हणवून घेता झाला. ३. त्या रावणाचा पुत्र. ४. इंद्रजित्. ५. चतुर. ६. सर्व साधूंचा शिरोमणी. ७. खणून काढी. ८. सिंचन. ९. जगत्+असु+सुत+लीला=जगत्प्राण जो वायु त्याच्या पुत्राची (मारुतीची) लीला. १०. इंद्र गाऊं लागला. ११. पोंचवून. १२. याचा कर्ता 'चमू' (अध्याहृत). १३. मायावी. १४. मायेपासून मुक्त. १५. सरमेचा पति. (बिभीषण.) १६. सिद्धि न पाहो. १७. मयासुराची कन्या मंदोदरी, ही रावणाची स्त्री. हिचा पुत्र इंद्रजित्. म्हणून तो मयाचा नातू.

निवटवि [1]चुलता त्या लक्ष्मणाच्या करानें.
स्तवुनि निववि‌ला तो [2]बंधु सीतावरानें. ।
प्रियसुतवध लावी [3]त्या वदायास 'हाय!'
स्वजन न उरला हो! एकही या सहाय. ॥ ८४

दशमुख सुतशोकें क्षोभला; [4]कार्य मानी,
वध जनकसुतेचा, जीस्तव [5]स्वासुहानी. ।
सचिव विनवि, 'कैसा मारिसी बा! असीतें?
पतिवरिच इच्या या योज उग्रा [6]असीतें.' ॥ ८५

बहु बळ [7]चतुरंग प्रेषिलें [8]पंक्तितुंडें,
कथुनि, 'अरि वधा, खा, जा,' असें स्पष्ट [9]पुंडें ।
विखरुनि शर भारी [10]निर्जरध्वंसकारी.
प्रभु [11]पुरहरसा [12]तें दों मुहूर्तांत मारी. ॥ ८६

परिसुनि बहुकोटि स्त्रीजनाचे विलाप,
त्यजुनि पुर निघे तो राक्षसांचा [13]ईलाप; ।
प्रभुवरि निजसेनासिंधु नेऊनि लोटी,
प्रलयपवनसा तो दाखवी शक्ति मोटी. ॥ ८७

[14]भगवदनुजवक्षीं [15]शक्तिनें [16]शत्रु ताडी;
विकळ करुनि [17]ती त्या सर्पिणीसीच पाडी. ।
प्रभुहि दशमुखातें, सैन्य मारूनि, मोडी.
श्रम उडवुनि [18]शृंगें मारुती हात जोडी. ॥ ८८

[19]शतमखवचनें ये [20]मातलि क्षिप्र, देवा,
विनवि बहु असें, 'या स्यंदनीं पाय ठेवा. ।

---

१. चुलता बिभीषण लक्ष्मणाच्या हातून [पुतण्या—इंद्रजिताला] मारवी. २. लक्ष्मण. ावणाला. ४. करावयास योग्य. ५. आपल्या प्राणांची हानी [घडते]. ६. खड्गातें. ्त्ती, घोडे, रथ आणि पदाति मिळून चतुरंग बळ. ८. दशमुखानें, रावणानें. ९. दांड- ी. १०. देवांचा वध करणारे. ११. शिवसा. १२. तें चतुरंग बळ. १३. पृथ्वीपति ण). १४. भगवत्+अनुज+वक्ष=रामाचा कनिष्ठ बंधु जो लक्ष्मण त्याच्या वक्षस्थलीं. . शस्त्रविशेष, भाला, त्यानें. १६. रावण. १७. ती शक्ति. १८. ओषधिपर्वतशृंगाच्या ानें. १९. इंद्र. २०. इंद्राचा सारथी.

प्रभुजि! मज घडावी दुर्लभा आजि सेवा.
इजसम हितकर्ती ती न गंगा न रेवा. ॥ ८९

प्रभुसह खळ भांडे तो अहोरात्र सप्त;
[1]त्रिदश मुनिहि झाले, युद्ध पाहोनि, तप्त. ।
उडवि शत शिरें जों, तोंचि आलीं नवीनें;
बहु नवल कथावें काय हो तें कवीनें? ॥ ९०

प्रभु करि बहु चिंता, जो [2]श्रितस्वांत शोधी.
[3]‘रविहृदय’ जपाया तो अगस्त्यर्षि बोधी. ।
[4]दिनकर वर दे, या ईश्वरातें घडाया
विजय, अरि पडाया, कीर्ति विश्वीं जडाया. ॥ ९१

[5]कुळकर[6]मिहिरां[7]शी घे [8]असी मारणातें.
करुनि, सुख सुरातें दे, [9]असीमा रणातें. ।
रघुपति [10]वर [11]ब्राह्म योजूनि, सोडी,
कठिनतर अरीचें वक्ष तत्काळ फोडी. ॥ ९२

समर करुनि होतां प्रेत [12]देवर्षभारी,
सुरतरुकुसुमाचें तोष दे [13]वर्षे [14]भारी. ।
नभ भरिति सुरार्षे [15]स्फोरसर्वस्वनाहीं.
म्हणति बहु तुला बा, ‘भक्तसर्वस्व.’ [16]नाहीं? ॥ ९३

तव चरणचि रामा! सर्वदा ते जपावे;
[17]प्रणत [18]अखिल याहीं सर्वदा तेज पावे. ।
म्हण, ‘[19]अहित सुरांचे संहरा मानवांचे.
दृढहि तव पदांहीं [20]अंह रामा! न वांचे. ॥ ९४

[21]मुखर करिति वाद्यें देव, संगीत नाना
करिति बहु असंगी, जेंवि संगी तनाना. ।

---

१. देव. २. आश्रितांचें अंतःकरण शुद्ध करी. ३. ‘आदित्यहृदय’ मंत्र. ४. सूर्य. ५. वंशाचा मूळ पुरुष. ६. मिहिर=सूर्य. ७. कुलश्रेष्ठ जो सूर्य त्याचे आशीर्वाद. ८. खड्ग ९. अमर्याद. असीमा रणातें करून—असा अन्वय. ‘असीम’ याचें सामान्यरूप ‘असीमा. १०. श्रेष्ठ. ११. ब्रह्मास्त्र. १२. देव+ऋषभ+अरि=देवश्रेष्ठाचा शत्रु. (रावण.) १३. वृष्टि १४. सुरतरुकुसुमांचें वर्ष भारी तोष दे—असा अन्वय. १५. स्फुरण पावणाऱ्या उच्च शब्दांहीं १६. तुला बहु [जन] भक्तसर्वस्व म्हणती. होयना? १७. नम्र, भक्त. १८. सर्व, प्रत्येक १९. देवांचे आणि मानवांचे शत्रु संहरा, असें [पदांना] म्हण. २०. पाप. २१. शब्दयुक्त

'श्रितहित विभु,' ऐसें गाय नाकर्षि नातें.
प्रभुयश कवणाचें चित्त आकर्षिना तें? ॥ ९५

प्रभु न दशमुखातें दोष लावी, क्रियेतें,[1]
करवि, न धरि शौर्यें तोषला विक्रियेतें.[2] ।
मग अनुजकरानें[3] लेववी निष्क.[4] लंका,
धरि रुचि,[5] जसि तारा पावतां निष्कलंका. ॥ ९६

वरि, करुनि महीजा[6] दिव्य,[7] देवस्तुतीतें.[8]
श्रुतिबहुमत जें तें, संग दे, वस्तु तीतें[9] ।
दशरथनृप भाग्यें भेटला नंदनातें,[10]
प्रमुदितमति वंद्याच्याहि घे वंदनातें.[11] ॥ ९७

असुरवर[12] म्हणे, 'त्वां मोडिली मद्यशाला,
रचिलि अमृतशाला, श्री[13] दिली मद्यशाला,[14] ।
प्रिय वर, वरदांच्या नायका! माग, साजो,
गुरुगुण न म्हणों दे 'भव्यकामागसा'[15] जो.[16]' ॥ ९८

रघुरमण म्हणे, 'बा वत्सला देवराया![17]
मृत सुभट[18] उठावे सर्वही, दे वरा या.' ।
उठवि अमित कोटि प्राज्यपीयूषवर्षे,[19]
प्रभुसि नमिति, गाती कीर्ति, ते कीश, हर्षे. ॥ ९९

नमुनि विनवि लंकानाथ,[20] 'भूजावरा![21] या,
स्वपदनत कराया धन्य, पूजा वरोया.[22]' ।
प्रभु कथि, 'कपि पूजीं.[23] यांत मत्तोष पूर्ण.
त्यजुनि भरत आलों, त्यासि भेटीव तूर्ण.' ॥ १००

---

१. उत्तरक्रियेतें. २. मनांत विकार न आणी. ३. बिभीषणाच्या हातून. ४. सुवर्णाचे अलंकार. ५. शोभा. ६. सीता. ७. अग्निप्रवेश. ८. महीजा दिव्य करुनि देवस्तुतीतें वरी. इंद्रादिदेवांनीं केलेल्या स्तुतीचा स्वीकार करी. ९. श्रुति बहुमत जें वस्तु (राम) तें तीतें संग दे. १०. पुत्राला (रामाला). ११. 'इंद्र' हा कर्ता. १२. इंद्र. (एथें 'असुर'शब्दाचा अर्थ चमत्कारिक आहे.) १३. शोभा. १४. मत्+यश=माझ्या कीर्तीला. १५. कामरूप दोष-सा. १६. जो वर केवळ स्वार्थपर आहे असें गुरुगण न म्हणो, आणि जो शोभो. १७. इंद्रा! १८. उत्तम वीर (वानरादिक). १९. पुष्कळ अमृताच्या वृष्टीनें. २०. बिभीषण. २१. सीतापते! २२. स्वीकारण्यांला. २३. कपीचें पूजन कर.

सबळ सुगळ पूजी भक्त, आज्ञेंत राहे.
नमुनि सकटकातें पुष्पकामाजि वाहे. ।
परममुदितचित्ता जानकी सेतु पाहे,
सुख बहुतचि तारा भेटतां श्रीस लाहे. ॥ १०१

स्तवुनि नमिलि गोदा, जीस गाय त्रिलोकी[1].
परिचित पहिले, त्या आश्रमांतें विलोकी. ।
अघ न, नमुनि भास्वज्जन्हुकन्यांस[2], वांचे.
कथि गुण, धरिती या[3] सर्व धन्या, सवांचे[4]. ॥ १०२

नमुनि मुदितचित्त श्रीभरद्वाज केला.
पवनसुत विभूक्तें तूर्ण तेथूनि गेला. ।
गुहभरतमनींचा ताप अंतासि नेला.
सुयश हिमकराच्या हें मिळालें न भेला[5]. ॥ १०३

प्रभु सुखवि गुहा त्या; अर्क[6] तो वारिजातें[7];
अधन निवविला कीं वत्सलें[8] पारिजातें[9]. ।
प्रिय घन भरता या चातका भेट दे, हां,
'निरवधि' म्हणणारा 'पावकीं पेट देहा!' ॥ १०४

स्वगुरु सचिव माता, आप्त शत्रुघ्न पौर,
प्रमुदित करि; गाती तद्यश क्षीरगौर. ।
स्तवन, नटन, वाद्यध्वान, सत्पुष्पवृष्टी,
त्रिदश करिति, कोंदे[11] उत्सवें सर्व सृष्टी. ॥ १०५

करवुनि अभिषेक श्रीश घे, होय राजा,
प्रिय करुनि म्हणे त्या स्वप्रजांतें, 'विराजा.' ।
प्रभु निजविभवानें वालिदिक्कंठबंधु[12],
स्वसम करि करावे, सागरें जेंवि अंधु[13]. ॥ १०६

प्रभुनिजयश जों, तों 'वांच' या दे वरा ज्या,
पवनतनय झाला पूज्य तो देवराजा[14]. ।

१. त्रैलोक्य. २. भास्वत+जन्हु+कन्या=सूर्य आणि जन्हुराजा यांच्या कन्या (यमुना, भागीरथी) त्यांस. ३. यमुना इत्यादि. ४. उदकांचे. ५. प्रभेला. हें सुयश हिमकराच्या भेला (प्रभेला) न मिळालें. ६. सूर्य. ७. कमलाला. ८. दयाळू जो त्यानें. ९. कल्पवृक्षानें. १०. भरत. ११. भरी. १२. वाळी आणि रावण यांचे भ्राते सुग्रीव आणि बिभीषण. १३. कूप, विहिर. १४. इंद्राला.

त्रिभुवनजननीही **श्री**, करी हा, [1]रैया, तें.
स्मरुनि भजन, अर्पी आपुला हार यातें. ॥ १०७
[2]**घ**टजमुनिमुखानें आयके जन्मकर्म
**प्र**भु **द**शवदनाचें, अश्वमेधादि कर्म ।
श्रुतिमत करि, होय स्वप्रजावज्रवर्म;
स्तुतिनतिनिरतां दे [3]निस्तुळ [4]प्राज्य [5]शर्म. ॥ १०८
हें **'रामायणपीयूष'** **म**यूरें **राम**नंदनें ।
**श्रीराम**चरणीं भावें वाहिलें कृतवंदनें. ॥ १०९

---

## ५८. पंचचामररामायण.

(पंचचामर छंद.)

[6]**स**रोजजार्थित **प्र**भु, [7]क्षपाचरेंद्रमारणा,
असंख्य भक्तदृष्टिची घडावयास पारणा, ।
[8]**अ**जात्मजात्मज द्रवोनि होय विश्वतारणा,
अशेष[9]जाड्यजन्यपापशापतापवारणा. ॥ १
[10]गुणाब्धि [11]**को**सलेंद्रजातनूज होय **राम**; हा
**शि**वादिसत्सभा तिचा उदार सोयरा महा. ।
[12]**भ**रादि **ता**न्त नाम साधु [13]**के**कयात्मजाजनी,
प्रसिद्ध बोलले कवींद्र, आर्य भक्त ज्या जनीं. ॥ २
[14]**सु**मित्रवर्णनाम जीस, तीस दोन नंदन,
[15]श्रितोखिलातितापनाशहेतु दिव्य चंदन. ।
वडील **ल**क्ष्मण, द्वितीय तो [16]अरिघ्न सन्मती.
असे कुमार चार [17]सारसारसाक्ष जन्मती. ॥ ३

---

१. त्वरेला. २. अगस्तिमुखानें. ३. अतुल. ४. पुष्कळ. ५. कल्याण. ६. कमलजा लक्ष्मी, तिनें प्रार्थिलेला. ७. निशाचर राक्षस, त्यांचा इंद्र, रावण, त्याच्या वधास्तव. ८. अजराजाच्या पुत्राचा पुत्र, दशरथाचा पुत्र. प्रभु अजात्मजात्मज होय—असा अन्वय. ९. मांद्य. १०. गुणसागर. ११. कोसलेंद्रजा कौसल्या तिचा तनूज पुत्र. १२. 'भर'शब्द आदीं आणि 'त'कार अंतीं ज्याला (भरत) असें. १३. कैकेयीचा पुत्र. १४. 'सुमित्र' या वर्णांनीं रचिलेलें नांव. १५. आश्रित जनांच्या सकल अतितापाच्या नाशाचा हेतु. १६. शत्रुघ्न. १७. कमलपत्राक्ष.

जन्मला पुरीं, [१]त्रिविष्टपीं, असीम जो [२]मह,
[३]प्रभूतदीप्ति वाढले कुमार ते तयासह. ।
[४]द्विजत्व पावले, श्रुतिस्मृतिज्ञ जाहले, शतें
[५]गुणाचिया दिसों न देति जें शिशुत्व, लेश तें. ॥ ४
मुनींद्र [६]कौशिक स्वयें स्तवूनियां नृपा, वदे,
'मखावनार्थ सानुज स्वपुत्र **राम**, पाव, [७]दे.' ।
**वसिष्ठ** देववी बळेंचि, ने न वाहतां रथीं.
[८]सदस्त्र दे महर्षि, **ताटकेसि** मारवी पथीं, ॥ ५
सविघ्नयज्ञसिद्धिचा असे [९]सदैव [१०]आधि ज्या,
करी, वधूनि राक्षस, प्रसन्न, **राम** [११]गाधिजा. ।
जिला शिलात्व ये, **प्रभु** क्षणांत उद्धरी [१२]तितें.
कवींद्र गाति रामपादपद्मशुद्धरीतितें. ॥ ६
**महेशचाप** मोडितांचि, **जानकी अजा** [१३]वरी,
पडेचि **रामसिंहतेज रावणा** गजावरी. ।
दिल्या [१४]तिघी तिघांजणांसि [१५]मैथिलें सुता; तया,
प्रजाहि बोलिल्या न सद्वरार्पणें [१६]सुतात [१७]यां. ॥ ७
करी, महोग्र [१८]जो, धरूनि मार्ग, [१९]वासरा [२०]मह,
हरूनि दे तया सुशांति **भार्गवास, राम** हा. ।
पुरी सुखास पावली, यशें जगीं न [२१]मावली;
[२२]सुरद्रुची न सावली [२३]सुतर्धि [२४]गाय मावली. ॥ ८
कुमार **राम** यौवराज्ययोग्य वाटला नृपा;
परंतु [२५]तत्प्रिया करी जगत्रयीं बरी कृपा, ।

---

१. स्वर्गामध्यें. २. उत्सव. ३. पुष्कळ तेजस्वी. ४. मौंजीबंधन. ५. शेंकडों गुणांनीं. ६. विश्वामित्र. ७. पाव, यज्ञरक्षणार्थ तुझा पुत्र, राम, बंधूंसहित दे. ८. सत्+अस्त्र. ९. सर्वदा. १०. उपद्रव. ११. गाधिपुत्र विश्वामित्र त्याला. १२. अहिल्येला. १३. जन्मरहित विष्णूचा अवतार राम, त्याला वरी, स्वीकारी. १४. आणखी तिघी. १५. मिथिलेचा राजा जनक, त्यानें. १६. चांगला बाप. १७. कन्या. चांगल्या वरांना अर्पण केल्यामुळें त्याला या कन्याच 'चांगला बाप' म्हणाल्या असें नव्हे, तर त्याच्या प्रजाही त्याला तसेंच म्हणाल्या. १८. भार्गव. १९. वत्सा, रामाला. २०. आनंद देई, मोठेपणा देई. २१. न सामावली. २२. कल्पवृक्षाची. २३. सुत+ऋद्धि=पुत्रांचें वैभव. २४. वर्णन करी. २५. तत्+प्रिया=त्या दशरथाची प्रिय स्त्री (कैकेयी) ती.

स्वपुत्रभक्ति, **राम**कीर्ति, पाववि प्रसिद्धितें.
   ति[1]चाचि होय, हेतु, तो प्रभाव, विप्रसिद्धितें. ॥ ९
सदार सानुज, **प्रभु** स्वतातसत्यरक्षण
   स्वयें करावया निघे, व[2]रूनि व[3]न्यभक्षण. ।
वळावया जटा, व[4]टागदुग्ध दे निषाद या,
   यशोऽर्थ सेववी वना, जसी शि[5]वा विषा, दया. ॥ १०
नमी **प्रयाग**वासि तातमित्रस[6]न्महर्षितें.
   गणी मनें जगांत तो कृतार्थजन्म ह[7]र्षितें.' ।
करूनि आश्रय [8]स्व **चित्र**कूटपर्वता, प[9]सा
   करी मु[10]कुंद तेथिल स्वभक्त सर्व तापसा. ॥ ११
वियोगशोकपावकीं सुदुःसहीं पिता गळे,
   जळे, असें कळे; परंतु बं[11]धुला न तो वळे. ।
तयासि दे स्वपादुका, पु[12]रा फिरोनि पाठवी,
   'अ[13]वध्यतिक्रमें जळेन,' हें तदुक्त आठवी. ॥ १२
म्हणे यदंघ्रिरेणु, 'दीनजन्मपत्रिके! तुतें
   मृषा करीन सर्वथा,' तयाहि, [14]पत्रिकेतुतें, ।
नमूनि हस्त जोडितां, महर्षि **अत्रि** गौरवी.
   यश क्ष्[15]मासुतार्चनें स[16]तीहि [17]चंद्रगौर [18]वी. ॥ १३
. **विराध** [19]भूमिजा धरी, तिला प्र[20]भूंसिही हरी,
   असा महोग्र जो अरी, तयासि **राम** उ[21]द्धरी. ।

---

१. विप्रसिद्धीतें जो हेतु होय, तो तिचाच प्रभाव. तिच्याच प्रभावानें ऋषींची इष्टसिद्धि झाली. प्रभाव=पराक्रम. २. स्वीकारून. ३. अरण्यामध्यें उत्पन्न झालेल्या फलादिकांचें भक्षण. ४. वटवृक्षाचा चीक. ५. महादेवास. दया ही यशास्तव त्याकडून वना सेववी, जशी ती (दया) शिवाकडून विषा सेववी. ६. भरद्वाज ऋषीला. ७. हर्षितें मनें. ८. आपला. ९. प्रसाद, १०. विष्णु, रामचंद्र. ११. भरताला. १२. अयोध्येला. १३. अवधि+अतिक्रम=मर्यादेच्या उल्लंघनानें; 'जर चौदा वर्षांच्या दुसऱ्या दिवशीं न आलास तर, मी अग्निकाष्ठें भक्षून मरेन,' असें जें भरताचें भाषण तें स्मरणांत ठेवी. १४. गरुडध्वजातें. (विष्णूतें, रामचंद्राला.) जन्मपत्रिकेमध्यें जें (दुष्ट भविष्य) लिहिलें असेल, तेंही खोटें करण्याचें सामर्थ्य ज्याच्या पायाच्या धुळीला आहे, त्या पत्रकेतूनें (रामानें) नमून हात जोडिला. तेव्हां महर्षि अत्रिनें त्याला फार गौरविलें. १५. पृथ्वीकन्या, सीता, इनें केलेल्या पूजनानें. १६. अत्रिस्त्री अनसूया. १७. चंद्रासारखें शुभ्र (यश). १८. प्रसवे. १९. सीतेला. २०. रामलक्ष्मणांसहि. २१. वधून उद्धार करी.

महर्षि दंडकीं वनीं भयार्त जे सदा मनीं,
अभीति दे तयां धनी तपीं स्वलोकसाधनीं. ॥ १४
सुतीक्ष्ण बाण[1]भंग कुंभ[2]संभवादि सन्मुनी,
सुखी करी, सदैव जे स्वभक्तिनिष्ठ जन्मुनी. ।
जटायु तातमित्र, त्यासि दे प्रमोद तोखदें[3],
समागमें; महागदार्दितासि[4] जेंवि ओखदें[5]. ॥ १५
स्वबंधुनिर्मितोटजीं[6] रमेश गौतमीतटीं,
वसे, प्रकाश आवरी प्रदीप तो जसा घटीं. ।
खळस्वसा[7] म्हणे, 'असीस[8] लुब्ध कां? मला भजें;
कळत्र[9] तेंचि सेव्य, दे यथेष्टकामलाभ जें.' ॥ १६
समर्पि लक्ष्मणाचिया असीस[10] नाक, कान, ती.
न त्या करील, दंडितां असीस[11], नाक[12] कां नती[13]? ।
तिणें[14] स्वबंधु धाडिला खराख्य, तोहि ताडिला,
ससैन्य गर्व झाडिला, व्यसु[15] क्षणांत पाडिला. ॥ १७
स्वदुर्दशा दशाननासि दाखवूनि कोपवी,
सुवर्णएण[16] पाठवूनि तो विचार[17] लोपवी. ।
करूनि दूर शूर रामलक्ष्मण प्रभु छळें[18],
बळें हरी सतीस. ती म्हणे, 'खळा! अघें जळें.' ॥ १८
जटायु सोडवी; परंतु युद्धधर्म मोडुनी,
छळेंचि गृध्र पाडिला रणांत, पक्ष तोडुनी. ।
म्हणोनि हाय हाय रामलक्ष्मणासि बाहुनी[19],
क्ष्मासुता[20] रडे, मनांत शोकभार वाहुनी. ॥ १९

---

१. शरभंग. २. अगस्त्य. ३. संतोषकारकें. 'समागमें' याचें विशेषण. ४. महा गदानें, रोगानें पीडित जो, त्यातें. ५. औषधानें. ६. स्व+बंधु+निर्मित+उटजीं=आपल्या बंधु-लक्ष्मणानें निर्मिलेल्या पर्णशालेंत. ७. दुष्टरावणाची भगिनी शूर्पणखा, ती. ८. यासारखीस (सीतेस). ९. कुटुंब, स्त्री. १०. तरवारेस. ११. अशा प्रकारचीस (शूर्पणखेस). १२. स्वर्ग. १३. नमन. १४. शूर्पणखेनें. १५. गतप्राण. १६. सुवर्णहरिण. १७. विचाराचा नाश करी, मोह पाडी. १८. कपटानें. १९. हाका मारून. २०. सीता.

सती [1]कपींत ऋष्यमूकपर्वतीं [2]नग त्यजी,
[3]क्षयार्थ गांजिली, नमावि [4]वृद्धिदा अगत्य जी. ।
पुरींत [5]रोधिली अशोककाननीं महासती.
श्रमे, परंतु वाढवी सुखव्रजीं [6]महास ती. ॥ २०
वदे [7]निजानुजोक्त वृत्त आयकोन राम 'हा!'
[9]तयाहि शोक दे, जसीच [10]बायको नरा महा. ।
'प्रिये! प्रिये!' असाच शब्द विश्वनायकाननीं,
करीत [11]दारशोध, [12]योधराय जाय काननीं. ॥ २१
जटायु मूर्छित, क्षतार्त, देखतां, गळां पडे,
रडे, पुसे; कथी; परंतु मृत्यु सांगतां [13]घडे. ।
दडे मुहूर्त [14]पूर्वशोक [15]यापुढें, मनीं जडे.
अडेचि धैर्य; तोय दे, निघे [16]शुगब्धिच्या कडे. ॥ २२
पुन्हाहि शोधितां, कबंध उद्धरी; तयावरी,
[17]शबर्युपासनाप्त हृष्ट मुक्तिदायका करी. ।
यदीयनाम युग्मवर्ण '[18]पं' अणीक 'पा' असें,
तिच्या तटीं [19]स्मरे प्रियेसि. वर्णवेल तें कसें?' ॥ २३
[20]समीरपुत्र भेटतां, सखा [21]सुकंठ होय, ज्या
करी प्रहृष्ट दर्शनेंचि, जेंवि अर्क [22]तोयजा. ।
[23]सतीनिजोत्तरीयबद्ध मुक्त दाखवी [24]नग.
धरी [25]तदीक्षणींच तोष, ताप, लाख [26]वीनग. ॥ २४

---

१. वानरसमुदायांत. २. अलंकार. ३. पुढें आपला क्षय व्हावयाचा, म्हणून त्याला त्यासारखी तिला गांजण्याची बुद्धि झाली. ४. भरभराट, वैभव वाढविणारी. ५. कोंडून ठेविली. ६. उत्सुवास किंवा तेजास. ७. आपल्या बंधूनें सांगितलेलें. ८. हाय. ९. लक्ष्मणाला. १०. जसा सीतेनें रामचंद्रास शोक दिला त्याप्रमाणें. ११. स्त्रीचा शोध. १२. श्रेष्ठयोद्धा, राम. १३. वृत्त सांगून तो (जटायु) लागलाच मृत्यु पावला. १४. सीतेचा शोक. १५. या जटायूच्या शोकापुढें. १६. शुक्+अब्धि=शोकसमुद्राच्या कडे निघे; त्याला अत्यंत शोक झाला. १७. शबरी+उपासना+आप्त=शबरीची उपासना जी तीच मित्र तो. १८. पंपा. १९. प्रियेचें स्मरण करी. २०. वायुपुत्र=मारुती. २१. सुग्रीव. २२. कमला. २३. सीतेनें आपल्या वस्त्रामध्यें बांधून टाकलेले नग (दागिने) सोडून दाखवी. २४. अलंकार. २५. ते पाहतांच. २६. वि+इन+ग=पक्षिश्रेष्ठ गरुडेंकरून गमन करणारा विष्णु (राम).

स्वदुःखवृत्त तें विष प्रभूसि [1]कीश चाखवी,
प्रभु [2]प्लवंगनायकासि कार्यसिद्धि दाखवी. ।
हरूनि [3]वाल्यसु, क्षणांत राज्य दे [4]नता पदा,
[5]पिटीच रामदृष्टिवृष्टि दे उरों [6]नतापदा. ॥ २५
[7]कपिप्रवीर धाडिले करावयासि शोध जे,
तयांत [8]सिंधुलंघनास [9]वातपोत तो [10]धंजे. ।
वधूनि [11]सिंहिकेसि, योजनें शत क्षणें उडे,
श्रमे [12]सतीस धुंडितां, विलोकितां सुखीं बुडे. ॥ २६
अशांत ये दशास्य, ज्या न लाज, मत्त पाप हा,
वदे, 'सुभोग भोग चाल, आज मत्तपा पहा.' ।
पतंग तो, हितावहा तया न दीपिका सती;
चिरी नगासि, [13]पोषिती नता, नदी, पिकास [14]ती. ॥ २७
सती करूनि धिक्कृति, [15]क्षपाचरासि कोपवी.
गमे रविप्रभाचि ती, तया दिव्यास लोपवी. ।
कथी [16]निशाचरींस, 'सिंधुतें वदो [17]नई 'सखा.'
न हे [18]वळेल, लोटतांचि मास दोन, ईस खा.' ॥ २८
[19]पलाशराय जाय. 'हाय!' जानकी वदे. तिला
प्रमोद [20]मुद्रिकार्पणें [21]समीरनंदनें दिला. ।
सतीहि दे [22]शिरोमणी; पुसोनि वृत्त, '[23]या, [24]लया
खळासि न्यावया,' म्हणे 'तुम्हीं यशोर्थ याल [25]यां.' ॥ २९
[26]समीरजें अशोककाननस्थ वृक्ष मोडिले,
[27]दशास्यपुत्र अक्ष लक्ष दक्ष वीर झोडिले; ।

१. वानर (सुग्रीव) आपली स्त्री वालीनें नेल्याचें स्वदुःख कळवी. २. वानरराजाला, सुग्रीवाला. ३. वालि+असु=वालीचे प्राण. ४. पदीं नम्र असणारास (सुग्रीवाला.) ५. पळवून लावी. ६. नत+आपदा=नम्राची विपत्ति. ७. वानरांतील मोठे वीर. ८. समुद्रोल्लंघनास. ९. वायुपुत्र मारुती. १०. पुढें सरे. ११. लंकेची रक्षकदेवता. १२. सीतेला. १३. पालन करणारी. १४. नदी; नम्र अशा पिकाला (शेताला) पोसते जी नदी, तीच पर्वताला फोडून टाकिते. १५. निशाचर रावण त्याला. १६. रावण राक्षसींस सांगे. १७. नदी. नदी (सीता) सिंधुला (समुद्राला) मला रावणाला सखा म्हणो. १८. जर ही वश होणार नाहीं तर. १९. मांसभक्षक जे राक्षस त्यांचा राजा रावण तो. २०. रामाची अंगठी देऊन. २१. वायुपुत्र मारुतीनें. २२. मस्तकांतील अलंकार. २३. या खळाला. २४. नाशा. २५. याल पण, या याच. २६. वायुपुत्रानें. २७. रावणपुत्र.

घनध्वनीस[1] सांपडोनी शब्दबाण सोडिले,
सभेंत रावणादिपापबुद्धिकर्ण[2] फोडिले. ॥ ३०
खळेंद्र[3] पुच्छ पेटवी; म्हणोनि पावका[4] सती[5]
स्तवी; गमे पुरी कसी, म्हणोनि 'पाव,' कांस[6] ती; ।
सुटे, उडे कपींद्र; त्या पुरीस आग[7] दे; वदे,
'तुम्हांसि[8] मी न, हें फळ, स्मरोनि आग[9], देव दे.' ॥ ३१
पुसोनि ईश्वरीस[10], ये उडोनि. जे सखेद, या
विलोकितांचि, दाविती, प्रहृष्ट ते सखे, दया. ।
शिरोमणीस[11] देखतांचि, त्रिष्टपासु[12] खवें[13] दे, ।
तया 'तुझा ऋणी असें'हि शिष्टपा[14] सुखें वदे. ॥ ३२
प्रभु प्लवंगसैन्ययुक्त[15] सिंधुच्या तटास ये,
म्हणे, 'तुला द्विषत्पुरी[16] महाहिची[17] फटा[18], सये[19]! ।
अहा! पहा वियोगदुःख शत्रुनें कसें दिलें!
भवांतरीं[20] अडांत[21] सत्व[22] लोटिलें, न सेंदिलें[23].' ॥ ३३
नमी बिभीषण, त्यजूनि त्या दुराशया. दया-
निधि प्रभु स्वयें करी प्रसाद; सिंधु[24]याद यां[25]. ।
तयास राज्य दे. म्हणे समुद्रही, 'नसे तुतें
अशक्य लेश, जा तरून, बा! करून सेतुतें.' ॥ ३४
विशाळ सेतु पंचवासरांत[26] निर्मिला नळें.
अहर्निशत्रयें[27] परातटासि पावलीं बळें[28]. ।
असत्य रामशीर्षचाप[29] सत्यसेंचि दाखवी,
मुहूर्त[30] जानकीस शोककाळकूट[31] चाखवी. ॥ ३५

---

१. मेघनादास, इंद्रजितास. २. रावणादि दुष्टबुद्धींचे कान फोडिले. (त्यांना कडू भाषणें ऐकविलीं.) ३. दुष्टराजा. (रावण.) ४. अग्नीला. ५. सीता. ६. 'पाव' असें म्हणून तो ती कांस पुरी कसी. ७. अग्नि. ८. मी तुम्हांला हें फळ देतों असें नव्हे, तर तुमचा अपराध स्मरून देव तुम्हाला फळ देत आहे. ९. अपराध. १०. सीतेला. ११. सीतेच्या मस्तकांतील अलंकार. १२. जगत्प्राण राम तो. १३. आलिंगन. १४. शिष्टांचा रक्षक जो मारुती त्याला. १५. वानरसैन्ययुक्त. १६. शत्रुनगरी. १७. मोठ्या सर्पाची. १८. फडा. १९. हे सखे! (सीतेचें विशेषण.) २०. अन्यजन्मीं. २१. विहिरींत. २२. प्राणी. २३. वर काढिलें नाहीं. २४. समुद्रांतील जळचर. २५. या दयासमुद्राला. तो केवळ समुद्रांतील माशाप्रमाणें. २६. पांच दिवसांत. २७. तीन अहोरात्रांत. २८. सैन्यें. २९. खोटेंच रामाचें शिर आणि धनुष्य. या वाक्यांत 'रावण' हा अध्याहृत कर्ता. ३०. दोन घटिकांपर्यंत. ३१. शोकरूप विष.

सुकंठ, [1]तार्क्ष्य [2]पन्नगीं तसा, दशाननीं पडे;
तयासह प्रसिद्ध बाहुयुद्ध देखतां घडे. ।
करावया यशोर्थ [3]साम, राम, शत्रुभंगद,
स्मरोनि नीति, पाठवी [4]सुपूत दूत अंगद. ॥ ३६

म्हणे, 'धराचि,' तो नसामकाम पाप तापला.
वधी खळांसि अंगद, प्रताप दावि आपला. ।
त्यजूनि नीति धर्मशर्मकीर्तिहेतु, उद्धतें,
हठें क्षयार्थ मांडिलें, न वर्णवेचि युद्ध तें. ॥ ३७

[6]प्रहस्तनाम सैन्यपाळ, देव[7]काळ, तो मरे;
म्हणे महेंद्र, 'हो असाच शेष[8]शत्रुहोम, रे!' ।
करि [9]प्रभूंसि नागपाशबद्ध मेघनाद; या
खळाचिया नसे कधींहि ठावुकी मना दया. ॥ ३८

सतीस पाठवी रणांत पुष्पकांत वाहुनी;
करी विलाप ती तशा दशेंत त्यांसि पाहुनी. ।
भली [10]'त्रि'युक् 'जटा'भिधा [11]निशाचरी परोपरी,
करूनि बोध, ते [12]धरात्मजातिशोक तो हरी. ॥ ३९

[13]खगेंद्र ये पळांत, तों अशेष नाग लोपले,
[14]सुधारसापुढें जसे प्रचंड रोग कोपले. ।
म्हणे [15]यदीय [16]अंतकाहि 'जोड हात' [17]दापिता,
गमे तया प्रभूसि मुक्तिहेतु हा तदा, [18]पिता. ॥ ४०

[19]प्रयत्नकोटिभग्ननिद्र कुंभकर्ण काळसा,
गमे, कपींस भक्षितां, न सोडितांहि आळसा. ।
[20]हरी [21]हरीश्वर, क्षणें सुटोनि, नाक कान, ती
सुशक्ति दावितां, करील त्या न [22]नाक कां नती? ॥ ४१

---

१. गरुड. २. सर्पी. ३. संधि, सल्ला. ४. फार पवित्र. अथवा सुपुत्र. ५. 'युद्ध' याचें विशेषण. ६. रावणाचा सेनापति. ७. देवशत्रु. ८. अवशिष्ट शत्रूंचा संहार. ९. रामलक्ष्मणांस. १०. 'त्रि'शब्दानें युक्त जी 'जटा' नामक राक्षसी (त्रिजटा) ती. ११. राक्षसी. १२. सीतेचा मोठा शोक. १३. गरुड. १४. अमृतापुढें. १५. ज्या रामाचा भक्त. १६. काळाकाही. १७. दटाविता. १८. रक्षणकर्ता. १९. ज्याच्या निद्रेचा भंग करण्याला कोटि प्रयत्न लागत तो. २०. हरण करी. २१. वानरांचा स्वामी (सुग्रीव). २२. स्वर्ग.

जयापुढें फिकें पडे महेंद्रवज्रवर्णन,
प्रभूत्तमाशुगें[1] उरे तसाहि कुंभकर्ण ने[2]. ।
म्हणे दशास्य, 'सोडिला कसा सहाय हा यशें ?'
तसेचि बोलिले स्मरोनि त्यास 'हाय! हाय!' शें[3]. ॥ ४२
घनस्वन[4] प्रभूत्तमादि सर्व संगरीं खिळी.
न मोह ऋक्षपा[5], मरुत्सुता[6], बिभीषणा, गिळी. ।
महौषधिक्षमाध्रशृंग[7] आंजनेय[8] आणि तें;
विशल्य[9] जाहले ससैन्य वैरिवृक्षखाणि ते. ॥ ४३
मृषासतीवधें[10] पुन्हाहि होय सर्वमोहिता[11].
करी कथूनि तत्व तत्पितृव्य[12] साधु तो, हिता. ।
झटोनि मारिलाचि लक्ष्मणें अपूर्णहोम हा[13],
म्हणे तयासि[14] शक्र, 'बा! तुझ्या समृद्धि हो महा[15]. ॥ ४४
तनूजशोकतप्त[16], 'दुष्ट' जाय, ज्या न कीव[17]; 'धा',
म्हणे असीस[18] 'शोणितें, करूनि जानकीवधा.' ।
सुपार्श्व[19] साधु होय त्या तशासही निवारिता.
वदे, 'सुकर्म तैल बा! पडें न तूं दिवा रिता.' ॥ ४५
रणांत मृत्यु पावतां प्रधानबंधुसोदर[20],
स्वपाप शाप आठवी; तथापि घे न तो दर[21]. ।
स्वसैन्य रामलक्ष्मणक्षयार्थ पाठवी; 'रहा,'
म्हणे मरोनि तें. तरी नदेचि पाठ वीर[22] हा. ॥ ४६
निशाचरीविलापखिन्नचित्त[23] हा निघे; 'रणें
जया[24] क्षयाहि कीं,' म्हणे तयासि हानि 'घेरणें.' ।

---

१. प्रभु+उत्तम+आशुग=प्रभुश्रेष्ठ जो राम त्याच्या बाणानें. २. न उरे=मृत्यु पावे. ३. शत, शेंकडो राक्षस. ४. मेघनाद, इंद्रजित्. ५. जांबुवानाला. ६. मारुतीला. ७. क्षमा+ध्र=पर्वत. महौषधिपर्वताचें शृंग. ८. मारुति. ९. शल्यमुक्त. १०. खोटाच सीतावध दाखवून. ११. सर्वांना मोह पाडणारा. एथें 'मेघनाद' हा कर्ता अध्याहृत. १२. त्याचा चुलता, बिभीषण. १३. हा अपूर्णहोम इंद्रजित्. १४. त्या इंद्रजिताला. १५. तेजा. १६. पुत्रशोकानें पीडित, रावण. १७. करुणा. १८. खड्गास. १९. रावणाचा एक सचिव. २०. प्रधान, आप्त, आणि भ्राता. २१. भय. २२. राम. २३. राक्षसींच्या विलापानें खिन्न आहे चित्त ज्याचें असा रावण. २४. हानि त्याला म्हणे, 'घेरणें (करून) जयासाठीं किंवा क्षयासाठीं घेरणें (वेढा घाल.)'

सुरांसि होय दैन्य सैन्य तैं न्यहाळितां; [1]तड
[2]प्रवीर पावले भवाब्धिची, करूनि तांडव. ॥ ४७
म्हणे स्वसारथीस [3]शक्र, 'मंत्र ऐक, **मा**तले!
**द**शाननादि राक्षस त्रिलोकशत्रु [4]मातले. ।
[5]शतांग ने, [6]बसीव **राम**, काम वा! पुरीव हा.
स्वचातुरी, **प्र**भूसि कीर्ति व्हावया, पुरी वहा. ॥ ४८
अशेष शस्त्रअस्त्र [7]अर्जुनीच मूढ, कायशा
कथा? न लावितील गर्जुनी चमू ढका यशा. ।
तरी रथीं [8]अराति, [9]नाथ [10]पंक्ति, हें न सोसवे;
असाधुची बढाइ सोसणें, असी नसो सवे.' ॥ ४९
[11]रात्रिसप्तवासर प्रसिद्ध संगर, क्षण
श्रमें न राहिला, न पाहिलेंहि अंगरक्षण. ।
तशांत आठवूनि दे [12]निशाचराघ **वा**सव,
'द्विजघ्न, गोघ्न, भंगि हा **पि**शाच, **रा**घवा! [13]सव.' ॥ ५०
नटे नभांत जो [14]उमेशपादपद्मबंभर,
[15]व्यसुत्व घे न, खंडिलीं शिरें जरीहि शंभर; ।
**अ**गस्त्यमंत्र, तज्जपें प्रसन्न **सू**र्य दे वर.
स्वयें [16]शची म्हणे, 'करू सनाद [17]तूर्य देवर.' ॥ ५१
[18]महेंद्रसूतसूचितस्वयंभवास्त्रमंत्रितें
शरें [19]रिपूरें भेदिलें [20]अजें [21]परानियंत्रितें. ।
पडोनि राहिल्या म्हणे, 'मला पहा, रिघा तमीं
न, पावलों अघें मदें,' प्रजा! 'महारिघात मी.' ॥ ५२
जयें **म**हेंद्रदुंदुभिप्रचंड नाद वाजला,
जयाचिया महाध्वनीस मेघसंघ लाजला. ।

---

१. परतीर. २. शूर योद्धे. ३. इंद्र. ४. माजले. ५. युद्धोपयोगी रथविशेष. ६. रथांत बसीव. ७. प्राप्त करून घेऊन. ८. शत्रु. ९. राम. १०. पादचारी. ११. रात्रंदिवस सात वासर. १२. राक्षसांचें पाप. १३. यज्ञ. १४. उमा+ईश+पाद+पद्म+बंभर=उमापति जो शिव त्याच्या चरणकमलावरचा भ्रमर, रावण. १५. न मृत्यु पावे. १६. इंद्रपत्नी. १७. वाजंत्र. १८. इंद्रसारथि जो मातली त्याणें सुचविलेल्या ब्रह्मास्त्रानें अभिमंत्रित जो बाण तेणेंकरून. १९. रिपु+उर=रिपूचें वक्षस्थळ. २०. रामचंद्रानें. २१. शत्रूपासून जो बद्ध नाहीं त्यानें.

प्रभूत वाद्य, नृत्य, गीत, पुष्पवृष्टि; माजला
  स्तव, प्रमोद; सद्यशें समस्त लोक साजला. ॥ ९३

[१]प्रभूदितें बिभीषणें स्वयें दशाननक्रिया[२]
  करूनि, सांत्विल्या, पुसूनि अश्रु, अग्रजप्रिया. ।
पदीं बसोनि, [३]सर्वदीनबंधुच्या अनुग्रहें
  म्हणोनि घेतलें [४]प्रजावतीमुखें 'अनुग्र' हें. ॥ ९४

बिभीषणासि सांगुनि प्रभु [५]प्रियेसि आणवी,
  प्रदीप्त वन्हिकुंड जें, तयांत तीस न्हाणवी. ।
तिची विशुद्धि, दिव्य तें, सुरादिकांसि जाणवी,
  'महाविभूति ती,' असेंचि सन्मनांत बाणवी. ॥ ९५

[६]रणव्यसुप्लवंगसैन्य तें उठे [७]सुधाघनें,
  असें करी. भरे [८]सरोजजांड [९]तज्जयस्वनें. ।
बसोनि पुष्पकीं सखे, महाविभूति[१०]जोंनि वे;
  प्रहर्ष द्यावया पुरा समुत्सुका निजा, निघे. ॥ ९६

करूनि [११]अंकवर्तिनी, प्रभू महाविभूतितें
  कथा कथूनि [१२]आजिची, म्हणे, 'पहावि भू,' तितें. ।
भवाब्धि अब्धितें सुत प्रबुद्ध मान सेतुतें;
  मला, तसाचि तारि हाचि, शुद्ध मानसे! तुतें. ॥ ९७

[१३]स्वानुभूत ऐकवीत, दाखवीत, रंजवी
  श्रीस तो, चतुर्मुखा यदीय नाभिकंज [१४]वी. ।
तत्प्रियार्थ पुष्पकीं [१५]सुकंठदार आणवी,
  त्यांसि ती सती [१६]कपीश्वरोपकार जाणवी. ॥ ९८

[१७]हर्षवी, [१८]शबर्युदारभाव वर्णुनि, प्रिया,
  राम, ते बिभीपणादि, त्याहि वानरस्त्रिया. ।

---

१. रामाच्या सांगण्यावरून. २. रावणस्त्रिया. ३. सर्व दीनांचा आप्त राम, त्याच्या कृपेनें. ४. बंधुस्त्रियांच्या मुखानें. ५. सीतेला. ६. रणांत मेलेलें वानरसैन्य. ७. अमृतवृष्टीनें. ८. सरोज+ज+अंड=ब्रह्मांड. ९. त्याच्या जयघोषानें. १०. सीतापति. ११. मांडीवर बसलेली असी. १२. युद्धाची. १३. आपण अनुभविलेलें. १४. ज्याचें नाभिकमळ ब्रह्मदेवाला प्रसवे. १५. सुग्रीवस्त्री, तारा. १६. सुग्रीवाचे उपकार. १७. 'राम' कर्ता; 'हर्षवी' क्रियापद; 'प्रिया,' 'बिभीषणादि,' 'वानरस्त्रिया' हीं कर्मे. १८. शबरी+उदार+भाव=शबरीचा मोठा अभिप्राय.

गौतमी, तसाच दाखवी जटायुचा वट,
  प्रीतिस त्यजी न, जेंवि चावटीस चावट. ॥ ५९
[1]कुंभयोनिच्या, तसाचि दावि अत्रिच्या, पदा,
  आपदा कधीं शिवे पदाश्रिता न, तापदा. ।
[2]पापदावमेघ चित्रकूट शैल दाखवी,
  [3]लाख [4]वीतबाध ज्यांत, जो सुधेसि चाखवी. ॥ ६०
दाविल्या, [5]दिनेशविष्णुपादपद्मजा नद्या
  सांगती, 'यशा, [6]स्वराद्यनित्य सद्म,' ज्या 'न, द्या.' ।
त्या प्रयागसत्पदीं [7]मुनीस हर्ष दे, वसे;
  विप्र तच्छिरीं करीति पुष्पवर्ष, देवसे. ॥ ६१
भक्तवत्सल [8]स्वबंधुनिश्चयासि आठवी.
  सूचवावया स्ववृत्त मारुतीस पाठवी. ।
हर्षवी गुहास, त्याहि [9]केकयात्मजासुता,
  ज्या [10]वियोगसंज्वरांत फार भार [11]सासुता. ॥ ६२
[12]बंधु मोर, राम मेघ, नाद होय [13]दास; [14]हा
  [15]त्या म्हणे 'श्रमासि, देखसील [16]तोयदा, सहा.' ।
वृत्त घे पुन्हा, न ठेवितां उधार, साधु तो;
  प्राशितोहि, [17]अंग पावला, [18]सुधारसा, धुतो. ॥ ६३
पूजुनीहि पूजनास, वंदुनीहि वंदना
  तो करीं; धरी, न सोडि, नाग जेंवि चंदना. ।
'घे' म्हणे 'सुरत्नराशि, राज्य, [19]कन्यका मना
  सांग कां गभीरभाव? काय अन्य कामना?' ॥ ६४
[20]तो वदे, 'तुला विलोकितांचि सर्व [21]पावलें.
  नाशितील बा! तुझीं, [22]सुरेंद्रुगर्व, पावलें. ।

---

१. अगस्तीच्या. २. पापरूप दावाग्नीला मेघासारखा. (राम.) ३. लक्षावधिः ४. निर्बाधजन. ५. दिनेश (सूर्य) आणि विष्णु यांच्या पदकमलांपासून निघालेल्या नद्या, यमुना आणि गंगा. ६. स्वः+आदि+अनित्य=स्वर्ग इत्यादि अनित्य. ज्या सांगती, 'यशा स्वर्गादि अनित्य स्थान न द्या.' ७. भारद्वाज मुनीस. ८. भरतनिश्चयाला. ९. कैकेयीचा पुत्र भरत, त्याला. १०. वियोगरूप मोठ्या संतापांत. ११. जिवंतपणा हा मोठा भार झाला होता ज्याला. १२. भरत. १३. मारुति हा मेघाचा नाद. १४. मारुति. १५. त्या भरतरूप मोराला. १६. मेघाला (रामाला). १७. 'धुतो' याचीं कर्में. १८. 'प्राशितो' याचें कर्म. १९. कन्या. २०. तो मारुति. २१. पोंचलें. २२. कल्पवृक्षाचाही गर्व.

[1]रामहंसमानसा! [2]रघूत्तमालिसारसा!
सार साधिलें यश; [3]ज्ञ या करी पसा रसा. ॥ ६५
तृप्त मी, तुझ्या, भजोनि, भक्तिच्या [4]महानसा.
सज्जनाचिया, स्मरादि साहती, [5]महा, न [6]सा. ।
कीर्ति सांगती, ‘त्यजूनियां सुशील हा [7]नसा.’
त्वां न दास मानिला लहानही [8]लहानसा. ॥ ६६
[9]पातलाचि; शीघ्र [10]रामतोयदासमोर हो,’
या [11]कपिस्वनें प्रहृष्ट होय [12]दास मोर, हो! ।
तो निघे, न आवरी महातपा [13]दुकान तें.
वल्कली, जटी, शिरें, वहात पादुका, [14]नतें. ॥ ६७
श्रीवसिष्ठ, वामदेव, मातृवर्ग, [15]नागर,
स्वप्रधानसैन्ययुक्त शुद्धसत्वसागर ।
[16]सानुज प्रभूत्तमासि जाय [17]चिंतित क्षण;
प्रेक्षितां दिसे विमान भव्य पुण्यलक्षण. ॥ ६८
पावला न लंघितां [18]स्ववाक्य, कीं न [19]घातक,
श्रीश मेघ, [20]लक्ष्मणाग्रजादि मोर, चातक. ।
प्रेम तें वदों शके न तो सुरर्षितात [21]क,
स्वल्पबुद्धिचेंहि, वर्णितां, सरेचि पातक. ॥ ६९
होय, पुष्पक त्यजूनि, दास तेंवि, [22]पत्ति; तें
जन्म मृत्युच्या, स्वकाळ भासतें, विपत्तितें. ।
वाटला विलोकित्यांस गाय [23]वत्सल [24]क्षण
[25]श्रीनिवास; तोहि [26]साधुराय वत्सलक्षण. ॥ ७०

---

१. रामरूप हंसाच्या मानससरोवरा! २. रामरूप भ्रमराच्या कमळा! ३. बृहस्पति; ब्रह्मा. ४. पाकशाळेला, अन्नाला. ५. प्रभेला, शोभेला. ६. स्मरादि सहा शत्रु. ७. राहूं नका. ८. लहानही दास लहान न मानिला. ९. राम आलाच. १०. रामरूप मेघासमोर ये. ११. वानराच्या शब्दानें. १२. दास(भरत)रूप मोर. १३. राज्यसंबंधी विस्तार, पसारा. १४. नतें शिरें. १५. नगरवासी लोक. १६. शत्रुघ्नासहित. १७. नेमलेल्या वेळेचें चिंतन करीत. १८. ‘चौदा वर्षांच्या अंतीं मी खरोखरी येईन’ असें रामानें दिलेलें वचन. १९. जर राम न येता, तर भरत आत्मघात करिता, पण राम नेमलेल्या वेळेस आल्यानें तसें झालें नाहीं. म्हणून रामाला ‘न घातक’ असें विशेषण दिलें आहे. २०. भरतशत्रुघ्नादि. २१. ब्रह्मदेव. २२. पादचारी झाला. २३. मायाळू. २४. क्षणभर. २५. राम गाय वाटला. २६. भरत वत्सलक्षण (वांसरासारखा) वाटला.

लेववूनि पादुका, पदाब्जयुग्म[1] पाहिलें
साधुनें, तयावरि स्वशीर्षराज्य[2] वाहिलें. ।
हुंगितां शिरीं, दयासमुद्र[3] अश्रु वर्षला,
भेटला सुतासि तात तेंवि, राम हर्षला. ॥ ७१
वाटला अरिघ्न[4] तो धरूनि हांव, लेंकरूं
त्या चिरागता[5] पित्या, प्रणाम धांवलें करूं. ।
वंदिला वसिष्ट, शिष्ट वामदेव, सादरें
मातृवर्ग, जो वदे सदा सशोक 'हा!' दरें[6]. ॥ ७२
वृद्ध जे गुरु, प्रधान, ते सुखांत घातले;
पातले समस्त पौर, दर्शनेंचि मातले. ।
भेटले बिभीषण, प्लवंगराज, सज्जना
सानुजास[7]; पावले सुधासमुद्रमज्जना[8]. ॥ ७३
वासवादि[9] नंदनोत्थ[10] पुष्पवर्ष[11] वर्षले.
देवगायक[12] प्रभूसि गाति, फार हर्षले. ।
नाचल्या वराप्सरा, मृदंग वेणु वाजले,
दिव्यदुंदुभिध्वनीस मेघनाद[13] लाजले. ॥ ७४
सप्रधान बंधु जे, तयांचिया स्वयें जटा
मोडवी, निजाहि[14]; पावतां पणाब्धिच्या तटा[15]. ।
वल्कलें करूनि धन्य[16], राजभूषणा पटा
मान दे रमेश, झांकिल्या तनुच्छविच्छटा[17]. ॥ ७५
भूषवी सुकंठ, सर्व यासमान वानर.
स्पष्ट पौर मानिती न त्या समा[18] नवा नर. ।
पाहतां गमे सभाहि रुंदि, लांबि, भीखणा[19]
त्या जनां गणेशहर्षतुंदिलां[20], विभीखणा[21]. ॥ ७६

---

१. पदकमलांची जोडी. २. आपलें डोकें आणि राज्य. ३. राम. ४. शत्रुघ्न. ५. बहुता काळेंकरून आलेल्या. ६. भयें. ७. शत्रुघ्नसह भरतास. ८. अमृतसागराचें स्नान. ९. इंद्रादि देव. १०. नंदनवनापासून उत्पन्न असें. ११. पुष्पवृष्टि. १२. गंधर्व. १३. मेघगर्जना. १४. आपल्याही जटा मोडवी (सोडवी). १५. पणरूप समुद्राच्या परतीराला; चौदा वर्षे वनवासाची मर्यादा पुरी होतांच. १६. विसर्जन करून. १७. शरीरकांतींचे समुदाय. १८. त्यासारखा. १९. भीषणा, विशाळ. २०. गणेशाप्रमाणें हर्षानें तुंदिल झाले आहेत ते, त्या जनांला. २१. बिभीषणाला.

काळभीतितेंहि भेट जी न दे, वदे, खणी[1];
मानिती तसी निजा पुरी न देव[2] देखणी. ।
निस्तुळें[3] महोत्सवें महायशेंहि दाटली,
आटली जिची न दीप्ति, मूर्त मुक्ति वाटली. ॥ ७७

रामसा बिभीषण प्रवेशला. नवा[4] सवा
सेवितां, गमे न लेशही निजोन[5] वासवा[6]. ।
रम्यरूप, मंत्रियुक्त, भव्यभूष, शोभला;
लोभला तयास पौर, कीं तसाच तो भला. ॥ ७८

हर्षले करूनि राममातृपादवंदन,
क्रव्यभुक्[7], प्लवंगराज[8], साधु जेंवि नंदन[9]. ।
ते सुकंठदार[10], त्याहि कीशयूथपस्त्रिया[11]
पावती, जसीच जानकी तसीच, सत्क्रिया[12]. ॥ ७९

तीर्थजीवनें[13] महाभिषेक तो यथाविधि
श्रीवसिष्ठहस्तकें करूनि घे दयानिधि. ।
राज्य विश्वरंजना करी; तयांत आदरी
नादरीति[14], बोलिल्या पडोनि[15], शून्य हा दरी[16]. ॥ ८०

होय रामराज्य रामराज्यसेंचि[17] तोषद[18],
व्याधि जो भवाख्य उग्र, हें तयासि ओखद. ।
कीं करी, प्रकाशुनि स्वसन्महा[19] निरंजन[20],
श्रीश, बुद्धिचें[21], हरूनि जन्म हानि, रंजन. ॥ ८१

कुंभजादि[22] विप्र, जे सभाग्य वित्तपाहुनी[23],
श्रीवरासि[24], जाहले प्रसन्नचित्त, पाहुनी. ।

---

१. खणून काढी. २. देव, निजा पुरी तशी देखणी न मानिती. ३. अद्वितीय, अतुल. ४. नव्या यशाला. ५. निज+ऊन=आपल्याहून उणा. ६. इंद्राला. ७. मांसाहारी (राक्षस). ८. वानरश्रेष्ठ. ९. पुत्र, आनंदकारक. १०. सुग्रीवाची स्त्री. 'दार'शब्दाचा प्रयोग बहुवचनीं असतो; तथापि अर्थ एकवचनीं. ११. वानरनायकांच्या स्त्रिया. १२. सत्कार. १३. तीर्थोदकानें. १४. प्रतिध्वनीची रीति. १५. पढोनि (?). १६. हा शून्य दरीप्रमाणें. १७. याला दुसरें उदाहरणच नाहीं. रामराज्य हें रामराज्यासारखेंच झालें–असा अर्थ. 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव' अशा प्रकारें हा **अनन्वय** अलंकार होय. १८. संतोषकारक. १९. आपल्या श्रेष्ठ तेजाला. २०. निर्दोष. २१. जन्ममरण हरून बुद्धीचें रंजन करी. २२. अगस्त्यादि. २३. कुबेराहूनि. २४. सीतापतीस.

वर्णिती प्रताप [1]गद्यपद्यशस्तवाद या,
मागती सदा, करूनि सद्यशस्तवा, दया. ॥ ८२
[2]कुंभजाननें [3]दशाननप्रताप जे अरी,
[4]तत्सुतानुजादि, [5]वानरेंद्र, [6]वातभू, [7]हरी, ।
तत्कथा [8]प्रधानबंधुयुक्त आयिके; धरी
तोष; [9]शोषला गमे, [10]सुधातिपान तो करी. ॥ ८३
[11]धर्मनीतिसंश्रितावनें सुकीर्ति जोडिली,
निंदितां [12]जडें जनें, [13]शुचि प्रियाहि सोडिली. ।
[14]स्वर्णजानकी करूनि, अश्वमेध साधिला.
[15]श्वांहि मानिला; नुपेक्षिलें तशाहि [16]साधिला. ॥ ८४
'व्याल', 'दाव', 'बाण' या पदत्रयांत अक्षरें,
तीन सेवटील, तेंचि [17]नाम सेविलें [18]खरें, ।
ज्या [19]द्विजादिशत्रुनें, तया [20]अरिघ्नहस्तकें,
मारवूनि, डोलवि प्रभु [21]त्रिनेत्रमस्तकें. ॥ ८५
[22]केकयात्मजासुतासि मातुळाचिया मतें,
पाठवी, तयासह प्रसिद्ध जें [23]स्वधाम तें. ।
[24]देवगायक त्रिकोटि शूर मत्त मारवी,
राम; त्यां करी तम, स्वबंधुसत्तमा रवी. ॥ ८६
आठ पुत्र जे, तयांसि आठ दे पुरें पदें;
स्पर्शिले कुमारही न भूप ते [25]मनोगदें. ।
आयके चरित्र आपलेंचि [26]आत्मजाननें,
ज्यां न नेणताहि '[27]नो' म्हणे कधीं मुखें, मनें. ॥ ८७

१. गद्यपद्यमय प्रशस्त भाषणें. २. अगस्तीच्या मुखानें. ३. रावणासारखे पराक्रमी. ४. तत्सुत+अनुज+आदि=त्या रावणाचे पुत्र बंधु इत्यादि. ५. सुग्रीव. ६. मारुती. ७. इतर वानर. ८. प्रधान आणि आप्त यांहीं युक्त होत्साता. ९. तृषाक्रांत झालेला. १०. अमृताचें अतिपान. ११. धर्म आणि नीति यांहीं आश्रितांचें रक्षण केलें आहे ज्यानें त्या रामानें. १२. अज्ञ जनानें. १३. पवित्र स्त्री देखील. १४. जानकीची सुवर्णप्रतिमा. १५. कुत्र्यालाही योग्य मान दिला. १६. आधियुक्ताला. १७. 'लवण' हें नांव. १८. क्रूर राक्षसानें. १९. ब्राह्मण क्षत्रियादि वर्णत्रयाच्या शत्रूनें (राक्षसानें). २०. शत्रुघ्नाच्या हातून. २१. शंकराचीं मस्तकें. २२. भरताला. २३. अयोध्या (अयोध्येंतील जन) ते पाठवी. २४. तीनकोटी शूर गंधर्व. २५. खेदानें. २६. लवकुश या पुत्रांच्या मुखांनीं. २७. 'ना' न म्हणे. तिरस्कार न करी.

दिव्य जानकी पुन्हा[1] करी, धरोदरीं[2] शिरे,
शोक कोप उद्भवोनि राममानसीं जिरे. ।
लक्ष्मणासहि त्यजी, म्हणे, 'दयालु हा, पण
हा पणक्षयें[3] नव्हे असत्यसंध[4] आपण?' ॥ ८८
प्रेत विप्रबाळ[5] तो पुन्हा उठे, असें करी,
सद्यशें सुधी[6], जसेचि इक्षुच्या रसें करी[7]. ।
हर्षवी, करूनि यज्ञ नाक, विप्रसिद्धिला,
कामनेंचि[8] दे महामना कवि[9] प्रसिद्धिला. ॥ ८९
भाविती चकोर[10] आपणांस चांद विप्र ज्या,
प्रीतिनें भरूनि, तातसाचि[11] नांदवि प्रजा. ।
जो मृकंडुनंदनासि[12] भेट दे, वसे वटीं,
ने पुरी महागतीसि तोचि देव सेवटीं. ॥ ९०
ज्या प्रभूत्तमें यशें अशेष विश्व तर्पिलें[13],
त्यासि 'पंचचामरा'ख्य[14] तच्चरित्र अर्पिलें. ।
रामचिंतनार्थ वर्णिलें मयूरसेवकें;
मुक्ति सुंदरी वधू वरावि याचि देवकें[15]. ॥ ९१

---

१. पुनः दिव्य करी. २. पृथ्वीच्या उदरांत. ३. प्रतिज्ञा मोडिली आहे ज्यानें असा. एके दिवशीं काळ हा तापरूपानें रामाला भेटायाला आला. आंत येतांच रामचंद्रानें त्याचा सत्कार केला. काळ म्हणाला, 'आम्ही दोघांहींच एथें असलें पाहिजे. आमचें भाषण चालत असतां जो कोणी आम्हांस पाहील, किंवा आमचें भाषण ऐकेल, त्याचा वध करीन असें वचन दे.' रामानें त्याप्रमाणें वचन दिलें, आणि लक्ष्मणास द्वाराबाहेर उभा करून, 'कोणासही आंत येऊं देऊं नको, आणि तूं ही येऊं नको,' असें सांगितलें. त्याप्रमाणें झाल्यावर 'तुझा अवतार समाप्त होण्याचा समय आला आहे; यास्तव येथें राहणें, किंवा विष्णुरूपीं मिळणें, यांतून जें आवडेल तें कर' असें त्यानें सांगितलें. त्यांचें भाषण चालत असतां दुर्वास ऋषी भोजन मागण्यास आला; आणि 'मला आंत सोड, नाहीं तर शाप देऊन तुला आणि तुझ्या सर्व नगरीला दग्ध करीन' असें लक्ष्मणाला म्हणाला. तेव्हां स्वतःचा एकट्याचाच नाश होईल तर होवो, सर्वांचा नाश होऊं नये, म्हणून तो आंत गेला. त्याला पाहून काळ बाहेर निघून गेला. दुर्वासाला भोजन मिळालें. पण लक्ष्मणानें प्रतिज्ञाभंग केल्यामुळें, त्यावर मृत्यूची पाळी आली. तथापि गुर्वादिकांनीं सांगितलें कीं 'देशांतून घालविणें हें वधाप्रमाणेंच आहे, यास्तव त्याला घालवून द्यावें, प्रत्यक्ष वध करूं नये.' तेव्हां त्याप्रमाणें त्यानें केलें. ४. असत्य झाली ज्याची प्रतिज्ञा, असा. ५. ब्राह्मणाचा मृतपुत्र. ६. संतुष्ट होतात—असा अर्थ. ७. हत्ती. ८. हौसेनें, इच्छेनें. ९. वाल्मीकि. १०. ज्या आपणास विप्रचकोर चांद भाविती, तो राम. ११. पित्याप्रमाणें. १२. मार्कंडेयाला. १३. तृप्त केलें. १४. 'पंचचामर' नामक. १५. कौतुकानें, खेळानें.

# ५९. पृथ्वीरामायण.

(पृथ्वी छंद.)

रमापतिस[1] निर्जर[2] स्तविति, पीडितां रावणें;
'नसे उचित पन्नगें गरुडसंश्रितां[3] चावणें; ।
विपज्जलधिच्या[4] तटीं प्रभुवरें नता लावणें,
तुलाचि अतिवत्सला[5]! सुकर[6]; धांवणें[7] पावणें[8].' ॥

विधिप्रमुख[9] आर्त[10] जे, अभय दे तयांतें. मग
स्वयें दशरथात्मज प्रभुहि होय[11]; हर्षे जग. ।
सुनाम धरि 'राम' तो प्रथम[12] दाविल्या विग्रहें[13];
दुजा भरत, लक्ष्मण त्रितें[14], चतुर्थ शत्रुघ्न हें. ॥
दिला, कुशिकनंदना[15] दशरथें नृपें राम हा.
महास्त्रशत घे, मुनिप्रवरदत्त[16], पोषी महा[17]. ।
महा[18] गुरुसि दे पथीं, वधुनि ताटका; वासवा[19],
सवा[20] जपुनि, हर्षवी; मथुनि[21] सेविते आसवा[22]. ॥
तयावरि, समुद्धरी पदरजें अहल्या शिळा;
यशें कथि असें, 'जळो अघ[23], मदंघ्रिसी[24] या, मिळा.'
प्रताप[25] करि शत्रुचा, हरधनुष्यभंगें, शिळा[26].
वरी जनकजा[27]; बळें निववि तो भृगूचा[28] टिळा[29]. ॥
पुरासि चवघी सुना जनकजा नृपें[30] आणिल्या.
महोत्सवसुधाऱ्हदीं[31] सकळही प्रजा न्हाणिल्या. ।

---

१. लक्ष्मीपती विष्णूस. २. देव. ३. गरुडाच्या आश्रितांना सर्पानें चावणें प्रशस्त नाहीं. ४. विपत्+जलधि=विपत्तिरूप समुद्राच्या परतीरीं पोंचविणें तुलाच सुकर होय. ५. अतिममताळू. ६. करावयास सोपें. ७. धांवून येणें. ८. प्रसन्न होणें, रक्षण करणें. धाव, रक्षण कर—असा अर्थ. ९. ब्रह्मदेवप्रमुख. १०. पीडित. ११. प्रभुहि दशरथात्मज होय. १२. दाखविलेल्या विग्रहानें प्रथम; शरीरधारणामध्यें जो प्रथम तो. १३. शरीरें. १४. तिसरा. १५. विश्वामित्रास. १६. मुनिश्रेष्ठानें (विश्वामित्रानें) दिलेलें. १७. तेजास. १८. आनंदास. १९. इंद्राला. २०. यज्ञास. २१. मद्य सेविते जे राक्षस, त्यांना मारून. २२. मद्यास. २३. पातक. २४. मत्+अंघ्रिसी=माझ्या पायाशीं. २५. परशुरामरूप शत्रुचा प्रताप शिळा करी. २६. गतरस, थंड. २७. सीतेला. २८. भृगुकुलोत्पन्नाचा. २९. तिलक, श्रेष्ठ (परशुराम) त्याला. ३०. दशरथानें. ३१. महोत्सवरूप अमृताच्या डोहामध्यें.

**वसिष्ठमुनिला**, किती **दशरथा**, किती **गाधिजा**[1],
  किति स्तविति त्या पुरा, **रघुकुळा**, त्यजी आधि ज्या. ॥ ५

स्वमातुळकुळा सुधी **भरत** जाय, पृथ्वीहिता[2]
  **प्रभू**सि युवराजता गुणगणज्ञ योजी पिता. ।
न **केकयसुते**[3]स तें सुखद होय, राज्या मितां[4]
  भुले; सुतमणीस[5] दे वन; वरा[6] वराया चिता. ॥ ६

**प्रभूत्तम** मनीं म्हणे, 'परम वत्सला भावली[7];
  पितृव्रतसुरक्षणें यश मिळावया, पावली[9]. ।
चतुर्दश समा[10] वसों विपिनिं[10], सर्वपापारि[11] घे
  प्रियानुज[12], हरावया सकळविप्रतापा, निघे. ॥ ७

पिता स्वरथ पाठवी, वरि **सुमंत** वाहे, रितें
  निकाय[13] पडले, तदा वदति पौर 'हां[14]!' हेरिते[15]. ।
रथा फिरवि, पावुनि **प्रभु** सुरापगेच्या[16] तटा.
  वटाहि करि धन्य तो, रचि पयें[17] जयाच्या जटा. ॥ ८

**गुहें** उतरिला **प्रभु** त्रिदशसिंधुपारा[18], तया
  **दयार्णव** पुसे, निघे; करि सुखी **भरद्वाज** या. ।
तरूनि **यमुना** नदी, वरुनि **चित्रकूटाचला**
  पलाश[19] भिववी, महामुनिजनांत आणी केला[20]. ॥ ९

**सुमंत** कळवी, 'जटा रचुनि **चित्रकूटीं** नगीं
  कुमार वसले', असें; नृप न लाभ पाहे जगीं. ।
म्हणे, 'वससि काननीं प्रियकरा शिशो! केंवि रे!'
  मुखें म्हणत '**राम** हा!' मुक्तराशि शोकें विरे. ॥ १०

नृपें असु[21] विसर्जितां, **भरत** आणिला सत्वर.
  प्रसू[22] कथि तया कृत[23], द्रुत[24], न लंघितां चत्वर[25]. ।

---

१. विश्वामित्राला. २. जगाच्या हितासाठीं. ३. कैकेयीस. ४. परिमित राज्याला. ५. पुत्ररत्न राम यास. ६. पती दशरथास. ७. माता कैकेयी. ८. पिता दशरथ याचें वचन सत्य करण्यानें. ९. प्रसन्न झाली. १०. वर्षे 'समा' हा स्त्रीलिंगी शब्द आहे. १०. अरण्यांत. ११. सर्व पापांचा शत्रु राम. १२. प्रिया, सीता आणि अनुज लक्ष्मण. १३. गृहें. १४. हाय! १५. पाहणारे. १६. सुर+आपगेच्या=भागीरथीच्या तटाला पोंचल्यावर. १७. चिकानें. १८. देवनदी भागीरथी, तिच्या पलीकडच्या तिराला. १९. राक्षसांना. २०. कांती. २१. प्राण. २२. माता (कैकयी). २३. आपण केलेलें कर्म. २४. सत्वर. २५. आंगणें ओलंडण्याच्या पूर्वी.

तिची, तनय तो, करी, जरिहि साधु, कुत्सा[1]; हेया[2]
कशा[3] तसि; विलंघना[4] कुमति[5] दे[6] न उत्साह या. ॥ ११
तिला त्यजुनि जाय तो सुमति राममातेकडे,
रडे, नमुनि तत्पदें; विकळ होय, मोहें पडे. ।
'दडे न निजकर्म[7], बा! दुखविताति कांटे खडे;
घडे विधिबळें[8]; म्हणे; न सुविवेक तीचा[9] दडे. ॥ १२
यथाविधि सुधी[10] करी गुरुमतें स्वतातक्रिया.
निघे, शरण जाय तो, म्हणत, 'वत्सला! स्वप्रिया!' ।
पथीं प्रभुसखें गुहें अडवितां, म्हणे, 'हाय!' तें
शुचित्व कथि; जान्हवी उतरि नौपथें[11] आयतें[12]. ॥ १३
परीक्षुनि निरोप दे पदनता भरद्वाजही.
'न' लक्ष्मण 'भला' म्हणे, धरि धनुष्य, कांपे मही. ।
तया प्रभु म्हणे, 'उगा. भरत हा नसे वावगा.
मला फिरविणार, या सुमतिचा, असा भाव[13] गा. ॥ १४
वसिष्ठ[14] जननी पुढें करुनि, अग्रजा वंदन
प्रसन्न मति व्हावया, करि तसा; जसा नंदन. ।
स्वतातगति जी कथी भरत, आयके साश्रु[15] ती,
'अशोक' म्हणती जया, कवि जगन्निवासा श्रुती[16]. ॥ १५
पित्यांसि[17] जळ अर्पिल्यावरि, पदद्वयातें [18]धरी;
करी विनवणी दयामृतनिधीस[19] नानापरी. ।
तयासि समजावुनी प्रभु म्हणे, 'वनीं सारितों
चतुर्दशसमाचि[20]. [21]यो न तव लोचनीं वारि[22] तों. ॥ १६
असेंचि ऋषि बोलती त्रिदशविप्रकालक्षया[23].
मनीं धरुनि जाहल्या स्वगुरुपादुका लक्ष[24] या[25]. ।

१. निर्भर्त्सना. २. घोड्यास. ३. चाबूक. ४. अपराधासाठीं. ५. दुष्टबुद्धि याला उत्साह देऊं न शके. ६. 'कुमति देचि' असाही पाठ आहे. ७. आपलें प्राक्तन कर्म चुकत नाहीं. ८. दैवबळानें. ९. राममातेचा. १०. बुद्धिमान्, भरत. ११. नौकामार्गें. १२. दीर्घें. १३. अभिप्राय. १४. वसिष्ठ आणि आया यांना पुढें करून. १५. अश्रुयुक्त होऊन. १६. वेद. १७. रामानें—इति शेषः. १८. 'भरत' हा कर्ता. १९. दयारूप अमृताच्या समुद्रास. (रामास.) २०. चवदा वर्षेंचि. २१. येवो. २२. उदक. २३. देव, ब्राह्मण, यांचे काळ जे राक्षस, त्यांच्या क्षयासाठीं. २४. लक्ष्य, अत्यंत इष्ट, प्राप्य वस्तु. २५. भरतास.

‘जळेन दहनांत मी, अवधि लंघितां’, हा पण[1]
प्रभुप्रति कथी, निघे नमुनि तो, म्हणे ‘हा[2]!’ पण[3]. ॥ १७
द्विजादिवदनें[4], पुरी[5] जरि जपोनि[6] बाहे[7] रहा-
वया, तरि बसे जटाधर[8] तपोनि[9] बाहेर हा[10]. ।
वरी[11], प्रभुनमस्कृत[12] प्रिय सदार[13] जें, अत्रि, तें
वशीकृत[14], न एकतें[15] सुयश, न द्वितें[16], जें त्रितें[17]. ॥ १८
नमी जनकजा प्रिया बहु, जसी सुता[18] धाकुटी;
महामुनिसतीहि[19] दे तिस अयातयामा[20] उटी; ।
तसीच कुसुमावली[21], तिलक, कांत[22] वेणी, रची.
निघे नमुनि ते[23], गमे अदितिवर्धितश्री[24] शची[25]. ॥ १९
धरी जनकजेसि जो खळ, मृगीस जैसा हरी[26],
करी सुपदपात्र[27] त्या, वधुनियां, विराधा, हरी[28]. ।
गतीच्छु[29] शरभंग भूसुर[30], तयासि दे राम ती[31];
नतीकरुनि[32] उद्धरी शुचितपीं[33] जयाची मती. ॥ २०
सुतीक्ष्णघटजानुजप्रमुखतापसांचीं[34] शतें
नतें, त्रिजगदीश्वरें निवविलीं, गुणौघें ततें[35]. ।

---

१. प्रतिज्ञा. २. हाय. ३. परंतु. ४. ब्राह्मणादिकांच्या मुखानें. ५. अयोध्यानगरी. ‘बाहे’ याचा कर्ता. ६. प्रार्थून. ७. बोलावी. ८. जटाधारी होऊन. ९. तपश्चरण करून. १०. भरत. ११. जें प्रिय प्रभुनमस्कृत सदार अत्रिऋषि वरी, तें नुसतें एकपट किंवा दुप्पट किंवा तिप्पट सुयश झालें असेंच नव्हे, तर तें मोठें वशीकरण झालें. १२. रामचंद्राचें नमस्कार करणें. १३. स्त्रीसहित. १४. वशीकरण. १५. एकानें. १६. दुसऱ्यानें. १७. तिसऱ्यानें. असाही अर्थ ‘सर्वसंग्रह’कारांनीं घेतला आहे. तथापि या चरणाचा अर्थ अमळ संदिग्ध दिसतो. १८. कन्या. १९. अत्रिस्त्री, अनसूया. २०. जीवरून प्रहर गेला नाहीं अशी. (ताजी—असा भाव.) २१. पुष्पाची वेणी, गजरा. २२. सुंदर. २३. सीता. २४. देवांची माता अदिति इनें वाढविली आहे शोभा जिची अशी. २५. इंद्राणी. २६. सिंह. २७. मोक्षपदाला योग्य. २८. राम. २९. गति+इच्छु=उत्तम गती इच्छिणारा. ३०. भूदेव. (ब्राह्मण.) ३१. गति. ३२. नमनाच्या योगानें, नमनामुळें. ३३. शुद्ध तपस्येमध्यें. ३४. अगस्तीचा भाऊ. (याचें नांव प्रसिद्ध नाहीं.) ३५. विस्तृत. तापस (तपस्येनें तापलेले ऋषि) यांचीं शतें (शेंकडों तापसी) यांना आपले गुण हेंच शीतलोदक, याच्या ओघानें शांत करी. हा **परिकर** अलंकार आहे.

व्रतें[1] सुख यशव्रती वरिति; हें कवींच्या मतें,
यतेंद्रियमनस्क[2] जे, म्हणति ते, 'मिळालीं[3] क्षतें[4]'. ॥ २१
जयार्थ धनुरादि जें शतमखें[5] दिलें आणुनी
सुशस्त्र, घटयोनि[6] दे, प्रभुसि तत्वता[7] जाणुनी ।
जटायु गुरुचा[8] सखा सुखवुनी, स्वयें गौतमी
तटीं वसुनियां, तिला[9] म्हणवि, 'जाहलें धौतें[10] मी.' ॥ २२
कुधी दशमुखस्वसा[11] कपटसुंदरी[12] ये; 'वरा',
वदे; तदपराध तो खवळि जानकीदेवरा[13]. ।
करी महिसुतेहुनि स्वगुणवर्णना साहसा.
सुरांप्रति म्हणे सुधी[14], हरुनि कर्ण नासा, 'हसा'. ॥ २३
खराहि[15] मथि, जो, वधी मुनिजना वनस्था, नया
त्यजी. 'जय असो', म्हणे 'प्रभुवरा' जनस्थान 'या'. ।
सुवर्णमृग दाखवी दशमुख, भ्रमाया[16] सती;
धरूं[17] पतिस पाठवी द्रुत, अदभ्रमायास[18] ती[19]. ॥ २४
वनीं न मृग, यातु[20], हें समजतांचि, मर्मी खरें[21]
शरें क्षत करी प्रभु; क्षितिसुता, तदार्तस्वरें[22] ।
खरें व्यसन मानुनी प्रभुसि, 'हा!' म्हणे; देवरें[23]
बरेंहि कथितां, वदे कटु[24], जया नमावें गरें[25]. ॥ २५
त्यजी उटज[26] लक्ष्मण, स्मरुनि रामभद्र क्षण,
स्वधैर्यसह, जी वदे बहु दुरुक्ति, तद्रक्षण[27]. ।

---

१. 'वृतें' असाही पाठ आहे. २. यत+इंद्रिय+मनस्क=जिंकिलीं इंद्रियें आणि मन ज्यांहीं ते. ३. बुजालीं, मिटलीं. ४. छिद्रें, उणीं. ५. इंद्रानें. ६. अगस्त्यऋषी. ७. प्रभूच्या हातून राक्षस मरायाचे आहेत हें लक्षांत आणून. ८. दशरथाचा. ९. तिजकडून. १०. शुद्ध. ११. रावणाची बहीण शूर्पणखा. १२. कपटानें सुंदर रूप धरिलें आहे जिनें. १३. सीतेच्या दिराला. (लक्ष्मणाला.) १४. सुबुद्धि लक्ष्मण. १५. खरनामा राक्षस. १६. सतीनें भ्रमांत पडावें म्हणून. १७. सुवर्ण मृगाला धरायाला. १८. अतिशय माया ज्याची त्याला. १९. सती, सीता. २०. राक्षस. २१. तीक्ष्णें शरें. २२. तत्+आर्त+स्वरें=त्या हरिणाच्या पीडायुक्त शब्दानें. २३. दीर लक्ष्मण यानें. २४. कडू भाषण. २५. विषें. अर्थात्, विषापेक्षां देखील कडू बोलली. २६. पर्णशाला. २७. तत्+रक्षण=त्या सीतेचें रक्षण, असें जें उटज, तें स्वधैर्यासह त्यजी.

[१]तशांत दशकंठ, जो परमदुष्टधी, तो [२]यति-
स्वरूप धरि, ये, [३]हरी, सुविकळा सती होय ती. ॥ २६
[५]तदार्तरव ऐकतां, धरि जटायु धी मारणीं;
[६]सुनेसि लघु सोडवी, करुनि भग्न [७]भीमा रणीं. ।
[८]कृपाण [९]वैरि, जावया, वरुनि [१०]उग्र पाप, क्षया;
करी विकळ, खंडुनि त्वरित, गृध्रपा, पक्ष, या. ॥ २७
जरी विरथ, [११]विक्षत; [१२]क्षतज, धैर्य तेंही गळे;
[१३]पळे खळ नभःपथें, हरुनि तीस, पापें मळे. ।
त्यजी, [१४]प्लवंगपंचकीं जनकजा, अलंकार; ती
अशोकवन पावली, खलहृता [१५]अलंकारती. ॥ २८
वधूनि [१६]कुणपाशना रघुपति त्वरेनें फिरे.
स्वदुःख कथि लक्ष्मण, प्रभुहि ऐकतां तें विरे. ।
विलोकुनि [१७]विशोकही [१८]उटज शून्य, शोकीं शिरे,
विलाप करि; ऐकतां हृदय देवतांचें चिरे. ॥ २९
वनीं हुडकितां, क्षताकुल जटायु तो देखिला,
मनीं परम घात त्या परमवत्सलें लेखिला. ।
'दशास्य हरि [१९]मत्स्नुषा, करुनि [२०]मद्गरुच्छेदना,'
असें कथि, मरे; [२१]वधूहृति तसी न [२२]त्या वेदना. ॥ ३०
तया करुनि दाह, दे प्रभुहि पुत्रसा पिंड तो.
अशा परमवत्सला न [२३]भजता भवीं हिंडतो. ।
[२४]कबंध धरि सानुजा भुवनरंजना भक्षणा;
तशाहि गति अर्पितां, [२५]नेलेवि [२६]कंजनाभ क्षणा. ॥ ३१

१. तितक्यांतच. २. संन्याशाचें स्वरूप. ३. हरण करी. ४. अतिव्याकुल. ५. तत्+आर्त+रव=त्या सीतेचे पीडायुक्त शब्द. ६. दशरथ हा जटायूनें बंधु मानिला होता म्हणून त्याची सून जी सीता ती याची सून म्हटली आहे. ७. भयंकर रावणाला. ८. तलवार. ९. 'दशकंठ' हा याचा कर्ता. १०. उग्र पाप वरुनि क्षया जावया कृपाण वरी; आणि त्वरित पक्ष खंडुनि या गृध्रपा विकळ करी–असा अन्वय. ११. घायाळ. १२. रक्त. १३. 'तरी' असा अध्याहार. १४. पांच वानरांमध्यें. १५. लंकेविषयीं जिला प्रीति नाहीं अशी, सीता. १६. मृगरूप धारण करणाऱ्या मारीच राक्षसाला. १७. जात्या शोकरहित असा असतांही. १८. पर्णशाला. १९. मत्+स्नुषा=माझी सून, सीता. २०. मत्+गरुत्+छेदन=माझ्या पक्षछेदनाला. २१. पत्नीचें हरण. २२. त्या रामाला. २३. न भजणारा. २४. राक्षसविशेष. २५. न जाऊं देई. २६. कमल ज्याच्या नाभींत उत्पन्न झालें तो, अथवा कमलासारखी नाभि ज्याची तो. (राम.)

[1]वरूनि सुविमान तो रवि, '[2]सुता सुकंठा सखा
करीं, करिल कार्य;' हें कथुनि जाय लंघून [3]खा. ।
तशीच शबरीसही गति भली दिली पावनें.
[4]हितें गमति [5]नंदनापरिस तीं [6]दिलीपा वनें. ॥ ३२
[7]असह्यविरही गमे प्रभुमनास पंपा [8]दिती,
नि[9]जप्रसववैभवें असुख होय [10]संपादिती. ।
[11]मरुत्तनय भेटतां सुहित [12]कंजनाभास, ती
यशेंकरुनि जाहली, [13]अदिति [14]अंजना, भासती. ॥ ३३
मरुत्तनय राघवा [15]तरणिसूनुला भेटवी.
करी सुगळसख्य तो, सविधि अग्नितें [16]पेटवी. ।
समस्त [17]नग दाखवी प्रभुसि, रक्षिले आयते.
कथी [18]अनुज 'नूपुरें'. म्हणविती तया 'हाय!' [19]ते. ॥ ३४
करी बहुत सांत्वन प्रियसखा, तया तो म्हणे,
'त्यजीं न निजधैर्य बा! सकलवीरचूडामणे! ।
[20]प्रियां हरुनियां जपे [21]वडिल बंधु, अंता, पहा,
तऱ्ही कपिहि साहतों, धरुनि धीर, संताप हा. ॥ ३५
तुझी प्रियतमा तुला, वधुनि रावणा [22]सानुगा,
असंशय रघूत्तमा! त्वरित भेटवीतों; उगा.' ।
पुसे प्रभु, सविस्तर [23]व्यसन ऐकवी आपलें
सुकंठ [24]करुणाब्धिचें हृदय ऐकतां तापलें. ॥ ३६
वधू हरुनि, ज्या खळें [25]अनुज [26]भक्तही [27]वाळिला,
करूनि [28]सुगळा पुढें, प्रभु वधी तया वाळिला. ।

---

१. सुविमान असा रवि वरून (आकाशांतून) कथुनि. अथवा चांगलें विमान स्वीकारून, इ० इ०. २. सुग्रीव हा सूर्यपुत्र होता. ३. आकाशाला. ४. नंदनवनापेक्षां हितकारकें गमति. ५. नंदनवनापरीस. ६. दिलीपवंशज रामचंद्राला. ७. हें 'प्रभुमनास' याचें विशेषण. ८. असुरमाता. ९. आपल्या फलपुष्पादिकांच्या ऐश्वर्यानें. १०. संपादन करणारी. ११. मरुत+तनय=वायुपुत्र. (मारुती.) १२. कमलनाभ जो राम त्याला. १३. देवमाता. १४. नामविशेष. (मारुतीची आई.) अंजना अदिति भासती जाहली. १५. सुग्रीवाला. 'तरणिसुतुशीं' असाही पाठ आहे. १६. साक्षित्वास्तव–इत्यर्थ. १७. अलंकार. १८. लक्ष्मण. १९. नूपुर. २०. स्त्रीचें हरण करून. २१. वाली. २२. सेवकांसहित. २३. संकट. २४. रामाचें. २५. धाकटा भाऊ. २६. सेवा करणारा ही. २७. टाकिला. २८. सुग्रीवाला पुढें करून.

सख्यासि कपिराज्य दे, सुमति तीहि [1]तारा; वया
विलोकुनि असें करी; कळवि तेज, तारावया. ॥ ३७
दयाळु, [2]युवराजही करि [3]तदात्मजा अंगदा.
सुकंठ मग मेळवी कपिचमू [4]द्विषद्भंगदा. ।
'सतीस हुडका', म्हणे करुनि एकमासावधी,
[5]निदेश चुकतांचि जो परम उग्र, दासा वधी. ॥ ३८
कपि भ्रमुनि [6]दिक्त्रयीं श्रमुनि खिन्नते पातले,
[7]कृतावधिविलंघनें; [8]ईतर संकटीं घातले. ।
[9]प्रवृत्ति कथि, जी म्हणे [10]निजं [11]असूंसि '[12]संपा.' तितें
'पहा उडुनि सागरा.' मरण वारि [13]संपाति तें. ॥ ३९
उडे [14]पवनभू; म्हणे मनिं तयास [15]मैनाक '[16]वी-
क्षितीश'. करितां स्तुती गमति कीर मैनाकवी. ।
शिरूनि सुरसामुखीं, वधुनि सिंहिकेतें, [17]हरी
समुद्र शतयोजनें करुनि गोष्पद, [18]श्री वरी. ॥ ४०
[19]पराभव करूनियां, प्रथम जोडि लंका [20]करा.
सतीस अवलोकि, त्या दशमुखाहि [21]पंकाकरा. ।
[22]तिरस्कृतकुधी निघे, स्तवि यशःसमुद्रा, [23]हरी
भ्रमश्रमहि, दे [24]कृती नमुनि तीस मुद्रा [25]हरी. ॥ ४१

---

१. वाळीनें नेलेली सुग्रीवस्त्री. २. राजपुत्रपदवीधर. ३. वाळिपुत्राला. ४. द्विपत्+भंग+द=शत्रूचा नाश करणारी. ५. आज्ञा. ६. पूर्व, पश्चिम आणि उत्तर दिशांकडे. ७. कृत+अवधि+विलंघन=केलेल्या मर्यादेच्या उलंघनानें. ८. अन्य. (दक्षिणेकडे गेलेले.) ९. वार्ता. प्रवृत्तीनें सांगितलें, अर्थात् तीन्ही दिशांना गेलेल्या वानरांच्या मृत्यूचें वर्तमान त्यांना लागलें तेव्हां ते आपल्या प्राणांला म्हणाले, 'तुम्ही संपा.' अर्थात् मरणाची वाट पाहात राहिले. किंवा—'अंगद' हा अध्याहार घ्यावा. अंगदानें संपातीला वृत्त सांगितलें, जें वृत्त प्राणांला 'संपा' म्हणे, तें तेव्हां 'समुद्रावरून उड्डाण करून पहा' असें, संपातीनें सांगून त्यांचें मरण वारिलें. १०. त्यांच्या. ११. प्राणांला. १२. तिजवरून. १३. जटायूचा वडील भाऊ. १४. मारुति. १५. पर्वतविशेष. १६. वी (पक्षी)+क्षितीश (राजा)=पक्षिराज, गरुड. १७. वानर. (मारुति.) १८. यश. १९. विघ्नें दूर करून. २०. हस्ता. २१. पंक+आकर=चिखलाची खाण असा. २२. तिरस्कृत आहे कुधी ज्यानें असा. २३. हरण करी. २४. चतुर. ज्यानें आपलें काम सिद्धिस नेलें आहे तो. २५. मुद्रिका, आंगठी.

करी हरि, तुरे वनीं तरु, रणीं चमू अक्ष[1], तें[2].
घन[3]ध्वनिस सांपडे मग कलेवरें[4] अक्षतें. ।
जरी अजित, मान दे कपि पितामहास्त्रा[5] रणीं,
वृथा विकळ होय, तो पटु न बंधनातें गणी. ॥ ४२
सभेंत वचनें वदे जनकसा अघातोचितें[6].
दटावुनि कथावया पटु, तया अघा[7], तोचि, तें. ।
बिभीषण वधूं[8] न दे, गणुनि तुच्छ. तो[9] खांपर[10]
स्ववक्त्र करुं, पेटवी धरुनि पुच्छ तोखां[11] परें[12]. ॥ ४३
पलाशधृति[13] ने, पुरीप्रति करूनि होळी, लया.
म्हणे द्रुहिण[14], 'धन्य तूं. इतर कोण घोळील[15] या?' ।
सुगीतिहुनि निर्जरश्रुतिस[16] हर्ष दे हा कपी,
सुरर्षि[17] यश तें करी अमृतवर्ष[18], दे हाक पी[19]. ॥ ४४
महेशारदीप्त[20] जें, विझवि पुच्छ तें अर्णवीं.
रमा पदनता[21], म्हणे, 'यश महन्मुखें[22] वर्णवीं.' ।
जयें निववि अंगदप्रमुख सर्वही तो हरी[23];
करी, प्रभुवराधि जो गुरुगिरी[24], तया मोहरी. ॥ ४५
कथी कुशल, देउनी प्रभुवरासि चूडामणी[25].
प्रसन्न बहु होय त्या वरदवत्सलग्रामणी[26]. ।
सुदुर्लभ मुनीस जो प्रभु, कपीस तो खेंव[27] दे;
तदीय[28] भुजविक्रम स्तवुनि, 'धन्य' तोखें[29] वदे. ॥ ४६
स्वयें प्रभु निघे अरीवरि; मदांध हो घाबरा.
सुकंठ भर देत या बळसरस्वदोघा[30] बरा. ।

---

१. रावणपुत्र अखया. २. तें (असें) हरि (मारुति) करी. ३. इंद्रजितास. ४. शरीराला घाय न होतां. ५. इंद्रजितानें योजलेल्या ब्रह्मास्त्राला. ६. अघात+उचित=घात न करण्यास योग्य अशीं वचनें. ७. पापरूपी रावणाला. ८. मारुतीला मारूं न दे. ९. रावण. १०. कृष्णवर्ण. ११. संतोषाला. १२. अत्यंत. १३. राक्षस रावणाचें धैर्य. १४. ब्रह्मदेव. १५. घोंटाळ्यांत घालील. १६. देवांच्या कानांस. १७. नारदमुनि. १८. अमृताची वृष्टि मानी. १९. प्राशन करी. २०. अग्नीनें प्रदीप्त. २१. पदनता मारुतीला. २२. महत्+मुख=साधूंच्या मुखानें. २३. मारुति. २४. पर्वतासारिखा मोठा. २५. सीतेच्या मस्तकांतील रत्नालंकार. २६. वर देणारे आणि दयालु जे त्यांमध्यें श्रेष्ठ. (राम.) २७. आलिंगन. २८. मारुतीचा. २९. संतोषें. ३०. बल+सरस्वत्+ओघ=सैन्यसागराच्या ओघास.

कपी करिति गर्जना, प्रळयमेघसे नाचती,
गमे गिळिल, त्या बळासह खळास, सेनाच ती. ॥ ४७
अतित्वरित पावला रघुकुलेंद्र [1]पृथ्वीपटा,
तया लवणसिंधुच्या, [2]कपिबळासिं, वेष्टी [3]तटा. ।
सभेंत [4]अपमानिला, विहित सांगतां, रावणें,
बिभीषण नमी म्हणे, 'शरण आलिया [5]पावणें.' ॥ ४८
तया करवि, लक्ष्मणा कथुनि राम, लंकापती.
न [6]मर्त्य, करितां यशश्रवण हें, [7]भवीं कांपती. ।
भयें [8]जलधि भेट दे, करवि सेतु, तो टाकवी
स्वभान, रचिता नल[9]प्लवग होय मोटा कवी. ॥ ४९
तशांत खळ दाखवी [10]प्रभुशिरोब्जचाप स्वयें.
[11]जयेंकरुनि, आपुल्या स्ववश व्हावया ती, भयें. ।
[12]महाधि [13]सरमा हरी, पुसि [14]विभूतिनेत्रें [15]शयें,
नयें शिव असें म्हणे, 'शिवें[16] तयास आहे अये!' ॥ ५०
ससैन्य उतरे मुखें, [17]अजित सेतुमार्गें, बळें.
खळें खचर धाडिले बहुत, [18]पक्षिकीशच्छळें. ।
बिभीषण तयां धरी, प्रभु महानुकंपा करी.
निरोप [19]बळ पाहिल्या उपरि दे, नया आदरी. ॥ ५१
[20]सुवेळशिखरीं चढे, कनकदुर्ग हा हेरि [21]तें;
म्हणे प्रभु मनांत, 'हें त्वरित होत आहे रितें.' ।
दिसे दुरुनि रावण; [22]प्लवगराज कोपें उडे;
तयासचि न कांपवी, सकळही पुरींचे [23]हुडे. ॥ ५२

---

१. पृथ्वीचें वस्त्र अशा समुद्राला. २. 'कपिबळाब्धि' असाही पाठ आहे. ३. तीराला. ४. हें बिभीषणाचें विशेषण. ५. पाव. ६. मनुष्य. ७. संसारीं. ८. समुद्र. ९. वानर. १०. प्रभु+शिर+अब्ज+चाप=रामाचें शिरकमळ आणि धनुष्य (मायामय). ११. ज्याच्या योगानें. १२. महा+आधि=मोठी अंतःकरणव्यथा. १३. बिभीषणाची स्त्री. १४. सीतेचीं नेत्रें. १५. हस्तें. १६. कल्याण. एथें 'प्रभु जयाई आहे' असा पाठ आहे. १७. राम. १८. पक्षी आणि वानर यांच्या सोंगानें. १९. आपलें सैन्य. २०. लंकेंतील एक पर्वत, त्याच्या शिखरीं [राम] चढला. २१. तें लंकेचें सुवर्णदुर्ग. २२. वानरांचा राजा. (सुग्रीव.) २३. बुरूज.

पराभवुनि शत्रुला, सुगल ये, तयातें[1] हंसे,
'अनर्थ घडतो,' म्हणे प्रभु, 'जनीं न हो बा हेसें[2].' ।
अरातिपुर[3] वेष्टवी; मग, 'करीं म्हणे साम[4]' हें
न वाळिसुतसूक्त[5] घे; करवि भूप हासा महें[6]. ॥ ५३
कुधी[7] धरवि बाहु; जे धरिति मत्त चौघेजण,
व्रण स्ववपुला न घे, वधि तयां, न लावि क्षण. ।
महाधनसभाळयाप्रतिहि[8] होय तो भंगद[9];
प्रभूसि कळवी, 'करी अरि न साम,' हें अंगद. ॥ ५४
बळें वरिति उत्सवें मनुजविग्रहाज्ञा[10], नतें[11].
सुधी म्हणति, 'काय जें रुचवि विग्रहा[12], ज्ञान[13] तें.' ।
सतीहरणकर्म हें परम नीच; मूढा लहा[14]
लया[15]. म्हणविल, क्षया वरुनि हे 'चमूढाल[16] हा[17]!' ॥ ५५
भटासि खळ तो म्हणे, 'नर न हा निघो, राहवा
प्रहार न, करीं हठें वरुनि हानि, घोराहवा[18].' ।
कबंध[19] बहु नाचले, पललपंकही[20] सांचले,
पलाश[21] खपले रणीं, बहुत थोडके वांचले. ॥ ५६
गभीर[22] रुधिरौघ[23] त्या बहु रणांगणीं वाहिले,
सुरर्षि वदले, 'अहा! नच कधीं असे पाहिले.' ।
सुदुःसह सुरांसि जे, कपिरणीं न ते राहिले
अतिक्रम करावया; चरित ईश्वरें साहिलें[24]. ॥ ५७
घडे स्मरण तोंचि, जो पुरवि नागपाशा[25], हरी
दयार्णव, तयाचिया गरुड नागपाशा हरी[26]. ।

---

१. शत्रूला. २. उपहास्यता. ३. शत्रुनगर, लंका. ४. संधि, सल्ला. ५. वाळिपुत्र अंगद, त्याचें हें उत्तम भाषण, तो रावण मान्य न करी. ६. तेजानें. ७. दुर्बुद्धि, रावण. ८. रावणाचा धनकोश. ९. भंग+द=नाश देणारा. १०. मानवदेहधारी राम याची आज्ञा. ११. 'बळें' याचें विशेषण. १२. शरीरा. १३. या नरदेहामध्यें ज्ञान आहे, म्हणून त्याची आवड. १४. पाव. १५. नाशा. १६. हीच ढाल क्षय पावून तुजकडून 'हाय' म्हणवील. १७. हाय. १८. घोर+आहवा=भयंकर युद्धा. १९. मस्तकरहित धडें. २०. मांसाचे चिखल. २१. मांस भक्षण करणारे राक्षस. २२. गंभीर. २३. रक्ताचे ओघ. २४. होऊं दिले. २५. नागप+आशा=गजेंद्राची इच्छा. २६. हरण करी.

कवी म्हणति, 'मृत्युसीं परम उग्र जोखा यशें[1]
   तशाहि वधि उद्धता प्लवगवीर, जो खाय शें[2].' ॥ ५८
मरुत्तनय ओषधि क्षितिधराचिया[3] घेउनी,
   क्षणांत शिखराशि, ये पुनरपि स्थळीं, ठेवुनी. ।
'असें सुयश वाढवी, वरुनि शल्यमोहादि जे
   अरी, जय,' म्हणे, 'तया,' अजित देव तो, 'हा दिजे.'॥ ५९
दशास्यसुत[4] दाखवी तसिच रूपशोभा, वधी.
   जरी समजली स्वयें, कपट सर्व तो भाव, धी. ।
म्हणे 'प्रभु अहा!' तया सफळ कर्म तें वाटवी.
   यशोनिधि बिभीषणा करि, यशें भवा आटवी. ॥ ६०
तयाउपरि लक्ष्मणें घनरवाचिया[5] मारणें
   सुराधिपतिदृष्टिचें[6] रुचिर फेडिलें पारणें. ।
न तत्वमित[7] याम तों धृति[8] उरों दिली या रणें
   सुरांत. न अनुष्ठिलें[9] श्रवण वीरणें[10] वा रणें. ॥ ६१
म्हणे दुरित दि[11]मुखा, 'वरुनि पुत्रशोका जळें.'
   मळे अपयशें, गमे सकळ लिप्त तो काजळें. ।
निघे जनकजावधा, असि[12] धरी करीं नागवा.
   स्वनाथचरणासि ती विनवि संकटीं 'वांगवा[13].' ॥ ६२
सुपार्श्वसचिवाननें[14] प्रभु दशानना वारवी
   पुन्हाहि बहुकोटि तो प्रभुकरें बळें मारवी. ।
तया परम जाहलें पुर विलापसंतापद,
   स्वजीवित नको, जसें जरि समृद्ध, संता पदें[15]. ॥ ६३
समस्त उरलें बळ स्वचतुरंग घे सच्छळ-
   प्रवीण शर तो, जळप्रद[16] तसाचि, वर्षे खळ. ।
न दे कळ[17] पडों, पळ प्लवगसैन्य काढी पळ.
   प्रभूत[18] भरि तो पलक्षतजपंक[19] पृथ्वीतळ. ॥ ६४

---

१. जो शेंकडों मनुष्यांला खाणारा, त्या उद्धताला ज्या कपिवीरानें वधिलें, त्याचें यश मृत्यूच्या यशाशीं तोलून पहा. २. शेंकडों. ३. पर्वताच्या. ४. रावणपुत्र इंद्रजित्. ५. मेघनाद इंद्रजित् याला मारिल्यानें. ६. इंद्राच्या दृष्टीचें. ७. पांच प्रहर. ८. धैर्य. ९. केलें. १०. युद्ध-निवारणानें अथवा युद्धानें. ११. दशमुखा, रावणाला. १२. खड्ग. १३. संभाळा. १४. रावणाचा सचिव. १५. राज्यपद. १६. मेघासारिखाचि. १७. विसांवा. १८. पुष्कळ. १९. मांस आणि रक्त यांचा चिखल.

बिभीषण वधावया प्रखर शक्ति जी सोडिली,
स्वभक्तहितलक्ष्मणें [1]तदवना रणीं तोडिली. ।
म्हणूनि [2]तदुरीं दुजी त्रिदशशत्रुनें अर्पिली
यशोऽर्थ निजशोणितें रघुविरेंहि ती तर्पिली. ॥ ६५
प्रभूत्तम दशाननावरि तदा बहु क्षोभला
विशस्त्र, विरथ, क्षणें करुनियां जयें शोभला. ।
पुन्हा शिखर, वायुचा सुत तसाचि आणीं [3]शया-
वरूनि कुसुमापरी, स्तवुं शके न [4]वाणीश या. ॥ ६६
[5]महौषधिरसें व्रण, क्षण न लागतांही, शमे;
उठे मुदित लक्ष्मण प्रभु, निजोनि तैसा, गमे. ।
[6]हरि स्वरथ पाठवी; प्रभु, दशास्य तोही शमे.
न सप्तदिन संगरीं; सुरमुनींद्रचित्त भ्रमे. ॥ ६७
शिरें दशहि संहरी प्रभु, रणीं दहादां; परी
तशींच दिसती; अरि [7]व्यसु पडेचिना भूवरी. ।
[8]नरत्व कुतुकें धरी तदनुरूप, चिंता करी.
'रविस्तुति' कथी बरी घटज; तेज [9]भास्वान् [10]भरी. ॥ ६८
रत स्वजनरक्षणीं, असुरवायुचा जो [11]फणी,
[12]पुराणवर [13]मार्गणीं [14]कमलजास्त्र योजी रणीं. ।
चिरूनि उर तत्क्षणीं, सकलराक्षसांचा धणी
वधूनि, असुखें खणी, सकळवीरचूडामणी. ॥ ६९
अशेष सुर हर्षले; कुसुमराशितें वर्षले;
जयध्वनिहि माजले; अमित दुंदुभी वाजले; ।
बहु [15]प्रभुयशोरतें, नटति अप्सरांचीं शतें.
[16]सुरर्षिसह [17]पर्वतें, [18]महित गाति गंधर्व ते. ॥' ७०

---

१. तत्+अवन=त्या बिभीषणाच्या रक्षणार्थ. २. तत्+उर=त्या बिभीषणाच्या वक्षःस्थळीं. ३. हातावरून. ४. ब्रह्मदेव किंवा बृहस्पति. ५. महा+ओषधी+रस=मोठ्या औषधींच्या रसानें. ६. इंद्र. ७. वि+असु=गतप्राण. ८. ज्या पक्षीं प्रभूनें मनुष्यरूप धारण केलें होतें, त्या पक्षीं मनुष्याप्रमाणें चिंता करणें स्वाभाविकच होय. ९. सूर्य. १०. याच्या अंगांत भरी. ११. असुररूप वायुचें भक्षण करणारा. सर्प. १२. प्राचीनांत श्रेष्ठ, ईश्वर, राम. १३. बाणीं. १४. कमलज+अस्त्र=ब्रह्मास्त्र. १५. प्रभु+यशस्+रत=प्रभु जो राम त्याच्या कीर्तीच्या प्रीतीनें. १६. नारदासह. १७. ऋषिविशेष, त्याच्याशीं. १८. पूज्य अशा रामाला गाती.

बिभीषण विभुप्रिया, करि बरी दशास्यक्रिया.
तयापरिस हा अया[1] प्रभु. न गाति कां या अया? ।
अरीसहि महोदया अजित, दे, न सोडी, दया.
म्हणे, 'करिन भव्य[2], या' गति सुखें वरा अव्यया. ॥ ७१
बिभीषण वरासनीं बसविला; मग क्ष्मासुता[3]
तया पुसुनि आणवी, स्वदयिता त्रिलोकस्तुता. ।
स्वदिव्यचरितें[4] हरी जडजनापवादास ती.
निवे प्रियतमांकगा[5], द्रुहिणपूज्यपादा[6], सती. ॥ ७२
पिता दशरथ स्वयें निजविमान ये सोडुनी,
प्रियानुजसह प्रभु द्रववि, हस्त, या, जोडुनी. ।
निवे, निवति पाहते सुर शिवादि, कीं तो[7] लवे,
न यच्चरणरेणुसीं[8] सविधि[9] अंडही[10] तोलवे. ॥ ७३
प्रियार्थ विभुच्या, हरी[11] उठवि सर्व मेले हरी[12].
समाधिरत आदरी नुति[13], म्हणे तदा, 'हा!' दरी[14]. ।
बिभीषण संभाजना[15] विनवि त्या रमाभाजना;
नये, भरतकामना न पुरतां, प्रभूच्या मना. ॥ ७४
'ससैन्यसुगलार्चनें मुदित मी,' वदे तोहि तें.
प्रभूक्त करि. या, श्रितीकृतचि[16], वत्सला, मोहितें. ।
नमी, बसवि पुष्पकीं; भरतदर्शना हीं[17] बरा
उपाय रचि, कीं महोदय[18] मनीं न हा घाबरा. ॥ ७५
बिभीषण सुकंठ हे, सबळ[19], तो रमाजानि[20] घे.
सबंधु निववावया स्वपुर सत्समाजा[21] निघे[22]. ।
म्हणे, 'सुदति! निर्मिता नळ कृती न हा सेतुला,
प्रिये जरि न पावतों, तरि सुधांशु[23] हासे तुला.' ॥ ७६

---

१. चांगल्या•दैवाचा. २. कल्याण. ३. पृथ्वीकन्या, सीता. ४. अग्नींत दिव्य करून. ५. पतीच्या मांडीवर बसलेली. ६. ब्रह्मदेवानें पूजा करण्यास योग्य पाय जीचे असी. ७. तो राम, पित्याला नमन करी. ८. यत्+चरण+रेणु=ज्याच्या चरणधूळीसीं. ९. ब्रह्मदवासह. १०. ब्रह्मांडही. ११. इंद्र. १२. मृत वानर. १३. स्तुति. १४. गुहा. १५. भेटीचा उत्सव करण्यास्तव. १६. या वत्सला श्रितीकृतचि मोहितें. आश्रित मनुष्यच लोभ लाविते. १७. पुष्पक विमानांत बसवून पाठविणें. १८. राम. १९. सैन्यसहित. २०. लक्ष्मी स्त्री ज्याची असा राम. २१. सत्+समाज=साधूंच्या समूहा. २२. सबंधु स्वपुर सत्समाजा निववावया निघ. २३. चंद्रमा. तुझी शोभा गेली असती—असा अर्थ.

स्मरे भरत, आइला करुनि जेंवि 'आ' लेंकरूं;
तया मुदित, पुष्पक प्रभुसमेत आलें, करूं. ।
विमान बहु मेळवी शुचियशा तदा वी[1]नता
धरी; प्रभु निजानुजा परम शां[2]त दावी नता. ॥ ७७
[3]मरुज्ज भरता कथी प्रथम, 'राम आला, पहा
सखा.' भुलवि त्या मृगा परम हृ[4]द्य आलाप हा. ।
तया तृषितचातका [5]जलदनाद तो टाकवी
सखेदपण. तत्सुखा कथि असा न मोठा कवी. ॥ ७८
[6]स्वहार्दनिधिच्या भरीं [7]भरतवत्सल क्षिप्र ज्या
नता उपगता, जसा भरत वत्स लक्षि [8]प्रजा. ।
[9]समर्चि, करुनि स्वयें [10]कुसुमवर्ष देवा; स[11]र्वा-
परीस बहु तो महोत्सवचि हर्ष दे [12]वासवा. ॥ ७९
'वसिष्ठजननीमहीसचिवबंधुपौरादि जे,
तया सुख,' म्हणे प्रभू, 'यश कुलाहि सौरी[13] दिजे.' ।
परेश अभिषेक घे करुनि, होय [14]राजाचि तो.
सदा सकळ रंजवी. इतर सोयरा जाचितो. ॥ ८०
कधी विधिप[15]दा न ते वरिति रामराजास्तव,
प्रमोद भजला चिर प्रचुर पामरा ज्यास्तव ।
बिभीषण सुकंठही न [16]हनुमद्यशा लाभला,
त्यजी [17]प्रभुकथेतरा, गणुनि मद्यशाला, भला. ॥ ८१
समस्त कपि गौरवी; यश सु[18]धांशुसें गौर वी;[19]
[20]दुरापपण हारवी, हरि [21]भजत्तमोहा रवी. ।

---

१. वि+इनता=गरुडत्व. २. कल्याण. ३. मरुत्+ज=वायुपुत्र. (मारुति.) ४. अत्यंत मनोहर गायन. भरत हा मृग आणि हा मारुति हें सुस्वरगायन. ५. मेघाचा ध्वनि. ६. आपल्या प्रेमनिधीच्या. ७. भरतावर माया करणारा राम. ८. ज्या प्रजा नता होऊन उपगता झाल्या म्हणजे पुढें आल्या, त्यांना तो भरतवत्सल (राम) स्वप्रेमराशीच्या भरीं, क्षिप्र (शीघ्र), जसा भरत वत्स लक्षी, तसा लक्षी. अथवा जसा भरत वत्साला तसा प्रजेला लक्षी. ९. पूजी. १०. पुष्पवृष्टि. ११. यज्ञापरीस. १२. इंद्रा. १३. सूर्याच्या. १४. नांवाचा राजा नव्हे. खरोखरीं राजा. १५. ब्रह्मपदालाही. १६. हनुमत्+यश=मारुतीच्या कीर्तीला. १७. प्रभु+कथा+इतरा=रामाच्या कथेहून दुसऱ्या कथा. १८. चंद्रासारखें शुभ्र. १९. प्रसवे. २०. दुर्लभता. २१. भजत्+तमस्+हा=आपल्या भक्तांचें अज्ञान घालविणारा.

प्रभू स्वरग[1] लाजवी, सदयता भली गाजवी;
नमी निपट[2] जो भवीं[3] जन, तया पदीं[4] शोभवी. ॥ ८२
'पृथ्वीरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामाच्या पादपद्मीं अर्पिलें कृतवंदनें. ॥

---

## ६०. भावरामायण.[5]

(मंदाक्रांतावृत्त.[6])

श्रीशा प्रार्थी विधि, 'अभय या सृष्टिला दे, वधाया
दिक्कंठा हो नर रविकुळीं, देवभूदेव[7] धाया.[8]' ।
तों पुत्रार्थी दशरथ करी वाजिमेधा,[9] तयाच्या
भार्या आर्या सुखवि वचनें सन्मतें धातयाच्या. ॥ १
अग्निप्राप्त द्विजमनुबळें[10] जें, तया पायसाचे[11]
घेती साध्वी सुकवळ[12] तिघी, जे शिपों पाय साचे. ।
कौसल्येला प्रथम सुत जो होय तो रामनामा,
कैकेयीचा भरत बहु दे जन्मतां धाम[13] धामा.[14] ॥ २
दोघे पुत्र स्मरशतनुत[15] श्रीसुमित्रेसि झाले,
राजा, त्याचा कुळगुरु, तयां पाहतां फार धाले; ।
ठेलें ज्येष्ठा मुनिवरमतें 'लक्ष्मण' प्राज्यधाम,[16]
प्रेक्षी भाग्यें तदवरज[17] जो त्यासि 'शत्रुघ्न' नाम. ॥ ३
हर्षे केलीं तदुपनयनें[18] त्यांसि भूदेवशिष्ट
प्रेमें विद्या जपुनि सकळा निर्मळा दे वसिष्ठ. ।
तों त्या वृद्धा दशरथनृपा तद्विवाहाधि[19] लागे,
विश्वामित्र क्रतुसमवना[20] रामचंद्रासि मागे. ॥ ४

---

१. स्वर्+अग=कल्पतरु. २. अत्यंत. ३. संसारीं. ४. आत्मपदीं. ५. भक्तिभावविशिष्ट असें जें रामायण तें 'भावरामायण' असा कदचित् कवीचा अभिप्रेतार्थ असावा. ६. या वृत्ताचें लक्षण—चतुःषट्सप्तविरतिर्वृत्तं सप्तदशाक्षरम् । मंदाक्रान्ता मभनतैस्तगगैश्चाभिधीयते ॥' [वृत्ततिलक—१-३५]. ७. देव आणि विप्र. ८. तृप्त कराया. ९. अश्वमेधा (पुत्रकामेष्टि) १०. ब्राह्मणाच्या मंत्रबळें. ११. पायसान्नाचे. (पयश्चरुचे.) १२. उत्तम घास. १३. तेज. १४. गृहा. १५. शंभर मदनांनीं स्तुत असे. १६. पुष्कळ तेज आहे ज्याला तें. याचें विशेष्य 'नाम' हें अध्याहृत. १७. तत्+अवरज=त्या लक्ष्मणाचा कनिष्ठ. १८. उपनयन हा एक संस्कार आहे. [अध्ययनासाठीं शिष्याला उपाध्यायासमीप पाठविणें.] १९ त्यांच्या लग्नाची चिंता. २०. यज्ञसंरक्षणार्थ.

गुर्वाज्ञेनें नृप मुनिकरीं दे सुत प्राण दोघे,
त्यांला अस्त्रें शत कथुनियां, सयश [2]प्राज्य तो घे; ।
सांगे विद्या प्रथमचि **बळा** जी निवारी क्षुधेतें,
[3]तृड्बाधाघ्नी मग **अतिबळा** लाजवाया सुधेतें. ॥ ५
जी मारूं ये, स्वगुरुवचनें त्या वधी **ताटके**ला;
जीणें स्वर्गी स्तुति करि **श**चीही असा थाट केला; ।
पावे सिद्धाश्रम [4]शमधनध्येय दे, [5]आधि ज्याला,
त्या हर्ष [6]द्विट्क्षयमखमहासिद्धिनें **गा**धिजाला. ॥ ६
**वि**श्वामित्रा **जनक** नृपति [7]स्वाध्वरा तोंचि [8]बाहे,
त्यातें प्रार्थी प्रभु, ‘**शि**वधनूरत्न पाहोत, बा! [9]हे.’ ।
जातां तारी स्वचरणरजें **गौ**तमस्त्री शिला, हो!
भंगे [10]भर्गप्रभुधनु, म्हणे, ‘**श्री**पति **श्री**सि लाहो.’ ॥ ७
अर्पी माळा, पण पुरवितां [11]चापभृत्कोटिगीता
**सीता रा**मा निववि बहु ती [12]कीर्तिसंसारभीता. ।
[13]विप्रेंद्रोक्तें [14]भरतमुख जे, त्यांसही [15]भूपें धन्या
[16]अन्या दे तो [17]सगुरु **मि**थिलेमाजि आणूनि कन्या. ॥ ८
[18]उल्कापात; त्यजि [19]रवि रुचि; [20]क्ष्मा चळे; मार्ग [21]वात्या
रोधी; क्रोधी [22]त्रिनयनधनुःखंडनें **भा**र्गवा त्या ।
जिंकी **राम प्रभु; द**शरथा हर्षवी; पुत्रलोभी
[23]क्षत्रघ्नातें निरखुनि, धरी देहभाना न, जो भी. ॥ ९

---

१. विश्वामित्र. २. पुष्कळ. ३. तृषेची बाधा दूर करणारी. ४. योग्यांनीं ध्यान करण्यास योग्य राम तो. ५. मानसिक व्यथा. ६. शत्रुनाश आणि थोर यज्ञांची संफलता यांनीं विश्वामित्राला हर्ष दे. ७. आपल्या यज्ञार्थ. [अध्वर=यज्ञ.] ८. बोलावी. ९. रामलक्ष्मण. १०. शिवप्रभूचें चाप म्हणे. ११. धनुर्धरांच्या कोटींनीं स्तविलेली सीता. १२. कीर्तिरूप संसारापासून भ्यालेली, जिला कीर्तीचा कंटाळा होती ती. १३. विश्वामित्राच्या सांगण्यानें. १४. भरतप्रमुख. भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न. १५. राजा जनक. १६. अन्या कन्या. १७. वसिष्ठ गुरुसहित. १८. नक्षत्रपात घडे. १९. सूर्यानें तेज टाकिलें. २०. पृथ्वी कंपित झाली. २१. वावटळीनें मार्ग अडविला. २२. त्रिनेत्र जो शिव, त्याचें धनुष्य मोडल्यामुळें रागावलेला जो भार्गव, परशुराम, त्याला जिंकी राम प्रभु. २३. पुत्रलोभी दशरथ क्षत्रघ्नातें (परशुरामाला) पाहून, देहभान सोडी.

हर्षे पीतां प्रभुविजय हा सार[1] साकेत कानें
 प्राचीनें या न विसर[2]विजे सारसा[3] केतकानें. ।
हंसें जैसा,[4] मह[5] तदितरें काय होतो खगानें?
 कीं जो सामें कविमतिस तो काय हो! तोख गानें? ॥ १०
नेला प्रेमें भरत सदना मातुलें भूरिभागें.
 भूपें द्यावें प्रभुसि युवराजत्व, हें कार्य मागे. ।
गुर्वाद्याप्त[6] प्रियें[7]हि करितां मंथरानाम दासी
 कैकेयीतें कुमति शिकवी, जाचवी कामदासी.[8] ॥ ११
मागे,[9] 'राम, त्यजुनि नगरा या, अरण्यास जावा;
 चौदावर्षें भरतचि धरापालनाला संजावा.[10] ।
स्त्रीच्या,[11] सत्यव्रत कुळज तो, आग्रहीं कोंडला. जे
 तैसे,[12] त्यांचें, वचन वदतां अन्यथा, तोंड लाजे. ॥ १२
कैकेयीचें प्रिय न करवे, होय तो आर्य[13] सांधी.[14]
 तत्सत्वाचें संवन[15] करी; मुख्य तें कार्य साधी. ।
विप्रांला दे धन; विनवितां, राम घे जानकीला,
 त्या भ्रात्याही, विरह[16]शिखिची, सोसवे ज्या न, कीला.[17] ॥ १३
साहों वाहों धृतिस न शके तो वदे राय[18] 'हा!' तें,
 पाहे जेव्हां दयिततनया[19] वल्क[20] दे माय[21] हातें. ।

---

१. एकंदरींत रामाचा विजय हें तात्पर्य, कानानें पिवून (ऐकून) साकेत नगर हर्षें. साकेत=अयोध्या. २. प्राचीन जो परशुराम, त्याच्यानें या रामाचा विसर पाडवला नाहीं. ३. केतक जरी उग्र असलें तरी त्याच्यानें कमलाचा विसर पाडवत नाहीं. ४. जसा हंसापासून मह (आनंद) होतो; तसा इतर पक्ष्यांपासून होत नाहीं. सामगायनानें कवीस जसा आनंद होतो, तसा सामान्य गाण्यानें होणार आहे काय? तोख=तोष, आनंद. ५. उत्सव. ६. गुरु आदि आप्त. ७. 'प्रिय' हें 'आप्त' याचें किंवा 'कार्य' याचेंही विशेषण घेता येईल. ८. इच्छित पदार्थ देणारा राम, त्याला. ९. कैकेयी मागे. १०. सिद्ध करावा. ११. स्त्रीच्या आग्रहीं कोंडला. १२. जे तैसे (सत्यव्रत आणि कुलज) त्यांचें तोंड, अन्यथा वदतां लाजे. १३. तो आर्य दशरथ अडचणींत पडला. १४. आधियुक्त. १५. त्याच्या सत्वाचें [राम] उत्तम रक्षण करी. १६. विरहाग्नीची. १७. ज्वाला. १८. दशरथ राजा. १९. प्रिय पुत्राला, रामाला. २०. वल्कल झाडाच्या सालीचें वस्त्र. २१. माता, कैकेयी.

भोगूं जातां अनघहि[1] तसा तो वनाला, विपत्ती.
स्वस्त्रैणत्वें बहु खरखरा तन्मना लावि, पेत्ती[2]. ॥ १४
सांगे सूता[3] नृप, निजरथीं त्या तिघांतें[4] वहाया;
कौसल्येच्या, विकळमति तो जाय गेहीं रहाया. ।
झाले पौर क्षम, न पळही, तद्वियोगा[5] सहाया,
त्यांतें सोडी प्रभुहि; न शके तन्मुखातें पहाया. ॥ १५
श्रीगंगेच्या श्रितहित[6] तटीं शृंगिवेरीं गुहातें[7].
भेटे, मुक्तिप्रदपद[8], जसा मेघ पृथ्वीरुहातें[9]. ।
तेथें माथां हरि करि जटा, दाखवी शंर्वरीती[10],
प्रव्हाविद्या[11] परिहरि; गमे सूर्य तो शर्वरी[12] ती. ॥ १६
जाया, भक्ता जनकसचिवा[13] त्या सुमंत्रासि, मागें,
सांगे, 'राहो नृपतिभजनीं सर्वदा चित्त जागें.' ।
गंगापारीं उतरि गुह; ये रामभद्र प्रयागा;
तो जिव्हेतें हित कथि भरद्वाज सद्विप्र, 'यां[14] गा.' ॥ १७
त्या आर्यातें[15] पुसुनि, करि तो चित्रकूटीं निवास,
ध्येय, प्राण्या परमकृपणा वित्तसा, जो शिवास. ।
मंत्री ऐके, गुहचरमुखें तें कथी त्या प्रभूतें.
'देह त्यागी,' म्हणत वदनें राम शोकें प्रभूतें[16]. ॥ १८
उग्रीं शोकीं, नृपति[17] मरतां, ती अयोध्या बुडाली.
सर्वांचीही मति. गति तसी प्राप्त होतां, उडाली. ।
स्थापी ज्ञाता गुह शव धराजानिचें[18] तैलपूर्ण,
द्रोणीमध्यें; पिटुनि चर[19] ते, आणवी पुत्र[20] तूर्ण. ॥ १९

---

१. निष्पाप. निष्पाप असतां, विपत्ति भोगण्यासाठीं तसा तो पादचारी होऊन वनाला निघाला असतां, त्यानें त्या दशरथाच्या मनाला, त्याच्या स्त्रैणत्वास्तव पुष्कळ खरखरा लाविल्या (खरखर लाविली.) 'खरखर' शब्दाचें बहुवचन. एथें बहुवचनप्रयोगाचें कारण नव्हतें, तथापि बहुत्व मुद्दाम दाखविलें आहे. २. पादचारी होऊन वनाला जातां ३. सारथ्याला. ४. राम, सीता, लक्ष्मण यांतें. ५. रामाचा वियोग साहण्याला. ६. आश्रिताला हितकर अशा तटीं. ७. किराताधिपतिविशेष. ८. मुक्ति देणारा पाय ज्याचा असा तो राम. ९. वृक्षाला. १०. शिवाचा मार्ग. ११. नम्र क्षुद्रा, अविद्या. १२. रात्र. १३. पित्याचा प्रधान सुमंत्र, त्याला. १४. रामाला. १५. भरद्वाजाला. १६. पुष्कळें. १७. दशरथ. १८. पृथ्वीपति दशरथाचें प्रेत. १९. दूत. २०. भरत.

येतां, वृत्त श्रवण करितां, फार मातेसि [1]निंदी.
  '[2]खर्जूरीसी गमलिस कसी तूं सुधीराहि सिंदी? ।
बा शत्रुघ्ना! नच निरखिजे तोंड या पापिणीचें,
  जीच्या नेत्रीं [3]खर गर वसे, [4]त्या बरें सापिणीचें.' ॥ २०
कौसल्येच्या, रडुनि पडला, तो, गळां, [5]साधुरीती;
  त्या मातेची, निववि भरता या, [6]सुधामाधुरी ती; ।
[7]आचार्योक्त, श्रुतिमत, करी [8]सांग [9]तातक्रियेतें,
  [10]राज्यश्रीतें त्यजुनि, विनवूं जाय [11]साधुप्रियेतें. ॥ २१
नौका दे तो गुह, [12]शुचि असें जाणतां सत्य यातें.
  [13]आज्ञा, येतां, मुनिवर भरद्वाजहि, प्रत्ययातें. ।
भेटे आर्या, पितृमृति कथी, राम दे पिंड [14]वन्यें.
  धन्यें [15]भूपें बरवि वरिली तृप्ति, तैसी न अन्यें. ॥ २२
घाली प्रेमें, भरत, परतायासि तो देव, [16]राडा.
  प्रेमार्द्रांचा तिळहि रुसवा [17]श्रीनतीदेवराडा. ।
[18]स्वादु [19]श्रीमद्वच, अमृत जें तेंहि न स्वादु कांहीं;
  सांत्वोक्तींहीं बहु निवविला भक्त तो [20]पादुकांहीं. ॥ २३
नंदिग्रामीं परतुनि वसे, कीं मनीं ताप सांचे.
  सेवी धर्म, स्थिरमति सदा, जे वनीं [21]तापसांचे. ।
त्या स्थानासि त्यजि विभु; तया स्वाश्रमामाजिं अत्री
  पाहे हर्षें बहुतचि, जसा [22]मानसा [23]हंसपत्री. ॥ २४

---

१. 'पुत्र' हा अध्याहृत कर्ता. २. तूं सिंदी (मादकरसवृक्ष) असतां, सुधीराहि (चांगला शहाणा, गंभीर, अशा दशरथाला देखील) खर्जूरीसी (खजूराच्या वृक्षासारखी सन्मान्य) कशी गमलीस (वाटलीस)?' ३. प्रखर विष. ४. त्यापेक्षां बरें. ५. सन्मार्गी. (भरत.) ६. अमृतासारखें माधुर्य. ७. पुरोहितानें सांगितलेली (सांगितल्याप्रमाणें). ८. यथाशास्त्र. ९. पित्याच्या उत्तरक्रियेला. १०. राज्यलक्ष्मीला. ११. गंगेतें. १२. अंतःकरणाचा पवित्र, असें जाणून. १३. प्रत्ययातें येतां (खात्री पटतांच) मुनिवर भरद्वाजही त्याला आज्ञा देई. १४. आरण्यक पदार्थांनीं. १५. दशरथानें. १६. संसारसंबंधीं निर्वाह्य जीं अनेक कामें त्यांचा जो पसारा तो. १७. श्री (लक्ष्मी, सीता) तिच्या नमनासारिखा थोर देवराड् (देवांचा राजा विष्णु, राम) त्याला. 'देवराज्'शब्दाचें प्रथमैकवचन 'देवराट्,' 'देवराड्,' असें होतें. त्यावरूनच पुनः मराठीप्रमाणें द्वितीया केली आहे. १८. गोड, मधुर. १९. रामाचें भाषण. २०. आपल्या पादुका देऊन. २१. तापसांचे धर्म. २२. मानससरोवराला. २३. हंसपक्षी.

[1]तद्भार्या [2]श्रीतनुसि निववी अद्भुतें [3]अंगरागें,
जेणें द्यावा श्रम नच घडों, जेंवि सत्संग रोगें. ।
सांगे '[5]श्लोकें, धरुनि न भया या विरा, धा;' [6]हिमारी
स्पर्शी, जैसा सहज पतगा, त्या विराधाहि मारी. ॥ २५
ब्रह्मानंदीं मुनि बुडविले दंडकारण्यवासी,
मुक्ति, '[7]प्रेक्षा,' विनवुनि असें, ज्यापुढें तोंड वासी. ।
वंदी सीता [8]दयितघटजा, [9]गृध्रपा, [10]बाणभंगा;
राहे तीरीं, सुखवि बहु या, मायसी वृद्ध [11]गंगा. ॥ २६
तेथें आली कुमति विधवा रावणाची [12]स्वसा, या
श्रीरामाच्या [13]शुचितम [14]महीजोचितांकीं बसाया. ।
[15]नासाकर्णद्वयविरहिता लक्ष्मणें ती [16]अशीला
केली. ज्ञाते म्हणति, 'उचिता दुर्दशा हे [17]अशीला'. ॥ २७
[18]घाता भ्राता खर [19]सपलभुक्सैन्य अत्युग्र [20]चंडी
[21]प्रेषी द्वेषी; करि समर तो, तच्छिर [22]श्रीश खंडी. ।
सांगे, 'कां गे! रडसि?' म्हणतां, रावणा वृत्त; सोडी
शंका; लंकापतिस नुरवी जें, असें वैर जोडी. ॥ २८

---

१. अत्रिस्त्री. (अनसूया.) २. सीतेच्या देहाला. ३. अंगाला लावण्याचें उटणें, त्यानें. ४. जेंवि सत्संग प्रीतीनें निववी. ५. यशें. यशानें तृप्त व्हा. भय धरूं नका, विरूं नका. ६. अग्नि. ७. पहा. ८. घटज (अगस्त्य) आहे पति जिचा ती लोपामुद्रा, तिला. ९. जटायूला. १०. शरभंगा. ११. गोदावरी. १२. शूर्पणखा. १३. अत्यंत पवित्र. १४. महीजा+उचित+अंकीं=सीतेला योग्य जी मांडी, तिजवर बसण्याकरितां. एथें 'महीं जो चितांकीं' असा पदच्छेद करून 'महीं (आनंदीं) आणि चितांकीं (चितारूप मांडीवर)' असा टीपेंत अर्थ देऊन छापी पुस्तकांत अनर्थ केलेला असल्यामुळें, खरा अर्थ शोधून काढण्यास फार श्रम पडले. माधव चंद्रोबाकृत 'सर्वसंग्रहा'पासून काव्यार्थाच्या ज्ञानाला फार मोठें साहाय्य होत आहे, यांत संशय नाहीं. तथापि निर्दोष वस्तु जगतांत दुर्लभ असल्यामुळें, असा प्रकार अनेक प्रसंगीं घडतो. यास्तव तुलनेसाठीं दुसऱ्या हस्तलिखित पोथ्या मिळतील तर फार चांगलें होईल. १५. नाक आणि दोन्ही कान यांहीं विहीन. १६. दुःशीला. १७. या प्रकारचीला. १८. घात करण्यासाठीं. १९. पलभुक्, मांसभक्षक राक्षस त्यांच्या सैन्यासहित. २०. ती उग्र राक्षसी. २१. पाठवी. २२. राम.

[1]श्रीतें वर्णी बहुबहु, म्हणे, 'रत्नभोक्तया! हरावी
ती; स्त्रीरत्न स्ववरमहिषी त्वां समर्थे करावी. ।
[2]स्वःपुष्पस्रक् तसिच, हृदयीं सर्वदा ही धरावी;
बा! सर्वस्व त्यजुनि चतुरें मुक्ति तैसी वरावी.' ॥ २९

त्या मारीच स्तवुनि कळवी [3]स्वानुभूतप्रतापा,
'श्रीरामाच्या [4]विशिखपवनीं तेज [5]निःसीम बापा! ।
तेणें गावें शत उडविलों मी, जसें पर्ण वातें;
मेलों होतों, जरि न मिळतों, रावणा! [6]अर्णवातें.' ॥ ३०

त्यातें दापी दशमुख, म्हणे, 'हो मृग स्वर्णवर्ण,
[7]स्त्री ती मोहीं; मग उसळ तूं शीघ्र जैसा [8]सुपर्ण. ।
व्हावी प्राप्त द्रुत मज वनीं एकली; हो सहाय.
बोलेना हा [9]मदसि, [10]अवशा पाडितां ओस, 'हाय!' ॥ ३१

चित्तीं [11]चिंती, '[12]प्रभुवरशरें मृत्युही लाभ मोटा.
[13]दिक्कंठाच्या जरि वध करें, स्पष्ट अत्यंत खोटा.' ।
झाला मान्य प्रबल कपटी, तो धरी [14]ऐणतेतें,
व्हाया विश्वीं यश, करिति ते कर्म, जें [15]नेणते, तें. ॥ ३२

'द्यावा स्वामी! कनकमृग हा,' प्रार्थिती हें [16]सुंदार;
प्रेमें बोले वच 'बहु बरें,' यापरी तो उदार. ।
गेला, श्रीच्या, [17]अनुज, [18]अवना ठेवुनि, [19]न्यंकुमागें;
जाणों रामाप्रति मन म्हणे, 'त्या उरीं [20]शंकु मागें.' ॥ ३३

---

१. सीतेला. ती शूर्पणखा सीतेचें फार फार वर्णन करून रावणाला म्हणते, 'तिचें हरण करावें; त्या स्त्रीरत्नाला आपली पट्टमहिषी करावी'. २. स्वर्गपुष्पांची माला. ३. आपण अनुभविलेला त्या रामाचा प्रताप. ४. बाणांचा वाऱ्यामध्यें. ५. अमर्याद. ६. समुद्रांत पडलों नसतों तर. ७. त्या स्त्रीला मोहांत पाड; लोभ उत्पन्न कर. ८. गरुड. ९. मत्+असि=माझी तरवार. १०. आज्ञा न मानणाराला. जर तूं माझी आज्ञा न ऐकशील, तर माझ्या तरवारीनें तुला कापून टाकीन–असा भाव. ११. 'मारीच' हा याचा अध्याहृतकर्ता. १२. रामचंद्राच्या बाणानें. १३. दशकंठ रावण याच्या करानें. १४. हरिणपणातें. हरिणाचें रूप घेई. १५. नेणते जें कर्म करिति, तें कर्म ते दोघे करिती. १६. हा शब्द पुंलिंग आणि बहुवचनी आहे. पण याचा अर्थ स्त्रीलिंगीं एकवचनीं घ्यावयाचा. सुदार हें प्रार्थिती, म्हणजे उत्तम स्त्री हें प्रार्थिते. १७. लक्ष्मण. १८. श्रीच्या (सीतेच्या) रक्षणाला. १९. हरिणाच्या मागें. २०. खिळा, टोचणी.

'हा सीते! हा अनुज!' असि, तो[1], ताडितां वक्ष बाणें[2],
फोडी हाक[3], क्षितिजनि[4] म्हणे, 'लक्ष्मणा! क्षिप्र जाणें[5].'।
'मिथ्या रक्षश्छळ[6],' कथि असें; ती न तें सत्य मानी.
बोले, 'मातें 'वरिन' म्हणसी[7]; वांछिसी आर्यहानी[8].' ॥ ३४
तो सीतेला त्यजुनि उटजीं[9], पांवला[10] ताप, गेला;
जैसा हंसद्विज खवळल्या श्रावणीं[11] आपगेला.।
ने आर्येतें, टपतचि दशग्रीव होता दडाला.
वाटे, केलें हितकर भलें कर्म तें, त्या जडाला[12]. ॥ ३५
रोधी[13] क्रोधी दशरथसखा तो जटायु प्रतापी.
भंगी युद्धीं रथ, महिसुता सोडवी, त्यासि दापी.।
जेव्हां पावे जय, झटुनिही, धर्मयुद्धीं नें[14] पापी,
तीक्ष्णें खड्गें, क्षतशतचित[15], क्रूर, तत्पक्ष[16] कापी. ॥ ३६
शोकें बोले[17] श्वशुर[18] पडतां, साश्रु होऊनि, 'हाय!'
क्ष्मापुत्रीतें[19] उचलुनि, नभोमार्ग[20] लंघूनि, जाय.।
पाहे पांच प्लवग[21], नगें[22] ती स्वोत्तरीय स्वहातें
सोडी त्यांत, श्रवण करिती जें तदास्योत्थ[23]'हा!'तें ॥ ३७

---

१. तो मारीच राक्षस. २. रामानें बाणानें वक्ष (हृदय) ताडितां. ३. रामाला मोठ्यानें हाक मारी. ४. सीता. (भूमिकन्या.) ५. लौकर जा. ६. हें राक्षसाचें कपट आहे, ही हाक खोटी आहे, असें तो सांगे. ७. 'मला (तुला सीतेला) वरीन, असें म्हणतोस. ही वाक्यरचना एथें एकाच गौण वाक्यामध्यें 'मला' आणि 'वरीन' हीं दोन्ही प्रथमपुरुषवाचक पदें असतां, एकाचें अधिकरण **सीता,** आणि दुसऱ्याचें अधिकरण **लक्ष्मण,** असा भेद झाला आहे. ही वाक्यरचना उपलब्ध व्याकरणामध्यें प्रायः अलक्षित आहे. तथापि अशी रचना बोलण्यामध्यें वारंवार आढळते. ८. रामचंद्राचा नाश व्हावा असें तूं इच्छितोस. ९. पर्णकुटीमध्यें. १०. ताप पावलेला, दुःख पावलेला असा, तो गेला. ११. खवळलेल्या नदीला. १२. मूर्खाला. १३. प्रतिबंध करी. १४. जेव्हां धर्मयुद्धीं झटुनिही (तो) पापी जय न पावे, तेव्हां. १५. क्षतांच्या शेंकड्यानें व्याप्त, आच्छादित. १६. जटायूचे पक्ष. १७. हाय म्हणे. १८. जटायु. १९. पृथ्वीकन्या सीता, तितें. २०. आकाशमार्ग ओलांडून. २१. तिनें पांच वानर पाहिले. २२. ती त्यांत नग (अलंकार) आणि स्वोत्तरीय (आपलें उपवस्त्र) स्वहातें सोडी (इकडे टाकी). एथें 'स्वहातें' हा संस्कृत-प्राकृत समास 'स्वहस्तें' याच्या स्थळीं केवळ यमकासाठीं घातला आहे. २३. तत्+आस्य+उत्थ+हातें=तिच्या मुखांतून निघालेल्या 'हा!' या दुःखोद्गाराला ऐकती.

[1]लंकेमध्यें दशमुख, वनीं ती अशोकाभिधानीं
ठेवी देवी; प्रभु मनिं जिच्या, यक्ष जैसा निधानीं[2]. ।
तो सौमित्रि प्रभुसि गहनीं[3] वृत्त भेटोनि सांगे;
बोले दुःखें प्रभु, 'नैव[4] असें त्वन्मुखीं कूक्त[5] कां गे!?' ॥ ३८
'हा! हा!' ऐसें म्हणत उटजीं ये, प्रियेतें न पाहे.
वाहे खेद प्रभु मृदु मनीं, तद्वियोगा[6] न साहे. ।
[7]लाहे कोठेंहिं न पद[8] तिचें, नाम घेऊनि बाहे[9].
'हा!' हे वाणी निमिषभरिही [10]श्रीमुखींची न राहे. ॥ ३९
देखे गृध्रा[11] वन हुडकितां मूर्छिता छिन्नपक्षा;
सामें कष्टें हळु वदवितां [12]शोकनिर्भिन्नवक्षा, ।
'नेली वत्सा खळदशमुखें; त्या वधीं दुष्टरक्षा[13],
प्रक्षाळाया मदपयश[14] बा शत्रुसंहारदक्षा[15]!' ॥ ४०
तातप्रेमें करुनि[16] उजवी दे तया श्रीश मांडी.
[17]श्रीमद्वक्त्राप्रति निरखितां [18]तीवरि प्राण सांडी. ।
[19]आंगें मोक्षप्रदहि, सुतसा तत्क्रिया सांग मांडी.
जो या सोडी, इतर करि, तो स्पष्ट कोंडाचि कांडी. ॥ ४१
[20]श्रीश [21]श्रीतें हुडकित फिरे स्त्रैणसा[22], बंधुयुक्त.
ग्रासाया जो धरि हरि, करि त्या कबंधासि मुक्त[23]. ।

---

१. लंकेमध्यें अशोकाभिधानीं वनीं, दशमुख ती देवी ठेवी. २. पुरून ठेविलेल्या धनावर [सर्वदा जागृत] जसा यक्ष असतो, तद्वत् जिच्या मनीं प्रभु असे. ३. अरण्यामध्यें. ४. नवें, कधींही न ऐकलेलें. ५. कु+उक्त=दुर्भाषण. सीतेनें लक्ष्मणाला जें कांहीं म्हटलें तें. ६. सीतावियोगाला. ७. लाभे; त्याला न मिळे. ८. तिचें पाऊल (पावलाची खूण) त्याला कोठेंही न लाहे (लाभे) न आढळे.' अथवा पद म्हणजे तिचें कोठेंही ठिकाण न लागे. ९. हाक मारी. १०. रामाच्या मुखांतील. ११. जटायूला. मूर्छिता छिन्नपक्षा गृध्रा देखे–असा अन्वय. १२. शोकानें फुटलें आहे हृदय ज्याचें, अशा त्या जटायु गृध्राला. १३. दुष्ट राक्षसाला. १४. मत्+अपयश=माझी अपकीर्ति प्रक्षाळाया, धुवून काढण्याला. १५. शत्रूंच्या नाशाविषयीं चतुर. १६. तो आपल्या पित्याचा सखा, अर्थात् आपणाला पित्याप्रमाणें पूज्य, म्हणून त्याला प्रेमानें उजवी मांडी दे. पित्याच्या अंतकालीं त्याच्या मस्तकाखालीं पुत्रानें आपल्या उजव्या मांडीचा टेंका द्यावा–असा शास्त्रनियम आहे. १७. रामाच्या मुखाकडे. १८. त्या मांडीवर. १९. राम स्वतः मोक्षदाता असतांही, सुतसा, पुत्राप्रमाणें, त्याची उत्तरक्रिया सांग मांडी (करी). २०. राम. २१. सीतेला. २२. स्त्रीलंपटसा. २३. मुक्त करी, मारी.

त्याच्या बोधें[1]करुनि, शबरी जी, तिला भेट थोरें[2]
तत्प्रेमें दे सुगतिहि, दयासिंधु, भक्षूनि बोरें. ॥ ४२
पंपातीरीं प्रकटि परमानंद तो, जे विलाप,
स्पष्ट स्वाहा[3]प्रथम, न तिहीं तेधवां ठेविला, पं[4]. ।
भ्रातृस्नेहें अनुज शुचिधी[5] धैर्य या दे; वदावी
रीति, प्रेमें बहु, कविशतें ती, जितें देव दावी[6]. ॥ ४३
आधीं भेटे पवनतनुज[7] ब्रह्मवेषें[8] रमेना[9];
तो अन्यत्र, त्यजुनि पळ तत्पादपद्में[10], रमेना. ।
हा सुग्रीवा दिनमणिसुता[11] भेटवी; साधि[12] तोया,
तैसा यत्नें तृषित कपिहि; श्रीशही[13] साधि तो या. ॥ ४४
दोघे तुल्यव्यसन[14] करिती सख्य; सुग्रीव दावी
ते सीतेचे नगें[15]; मग जगन्नाथ वक्षासि[16] लावी; ।
हाय! श्रीश, स्मरुनि दयिता[17], साश्रु; सांत्वी कपीन[18];
स्वक्लेशातें कथि. विभु म्हणे, 'शोक माझा न पीन[19].' ॥ ४५
स्वामी सांगे, 'व्यसन[20] हरितों' हें तुझें सर्व आधीं;
हो किष्किंधापति, मग सख्या! तूंहि मत्कार्य साधीं. ।

---

१. सांगण्यावरून. २. थोरें तत्प्रेमें. ३. त्या विलापांनीं तेधवां, स्वाहा ('परमानंद' या आपल्या नांवाचें) प्रथमाक्षर 'प', तो न ठेविला (राहूं दिला नाहीं). त्याचा स्पष्ट 'रमानंद' केला. सीता हाच त्याला आनंद, तो नसल्यामुळें त्याचा सर्व आनंद गेला—असा अर्थ. ४. 'प' हें अक्षर. ५. पवित्रांतःकरण लक्ष्मण. ६. बहु प्रेमें जी रीति देव दावी, ती कविशतें वदावी. ती संपूर्ण वर्णण्यास शेंकडों कवि लागतील—असा अर्थ. 'बहुप्रेमें' हें पद कवींकडेही लावितां येईल. ७. वायुपुत्र, मारुति. ८. ब्रह्मचारी वेषानें. ९. रमा+इन=लक्ष्मीपति जो राम, त्याला. १०. त्या रामाचीं चरणकमळें. ११. हा मारुती, सूर्यपुत्र सुग्रीवाला नेऊन रामाला भेटवी. 'दिनमणिसुत' (सूर्यवंशीय) अशा अर्थानें हा शब्द रामाकडे देखील लावितां येईल. १२. तृषित प्राणी मोठ्या यत्नानें तोया (जलातें) साधि (मिळवितो), तैसा, कपि (सुग्रीव)ही रामाला साधी—असा अर्थ. १३. श्रीश (राम)ही त्यासारखाच साधि (दुःखित), तो याला (सुग्रीवाला) साधी. १४. दोघेही राज्यभ्रष्ट झाले होते, आणि दोघांच्याही स्त्रिया दुसऱ्यांनीं नेल्या होत्या, म्हणून. १५. अलंकार. १६. राम ते अलंकार आपल्या हृदयाला लावी. १७. स्त्री, सीता. १८. कपि+इन=वानरश्रेष्ठ, सुग्रीव. १९. पुष्ट. तुझ्यां शोकाहून मोठा नव्हे. २०. दुःख.

कां तो चेंडू अचळ करिना[1]? कीश कां पाळिना शें?
सूर्या[2] देतों सुख, असुख मी वासवा, वाळिनाशें.' ॥ ४६
पादांगुष्ठें उडवुनि, दहायोजनें दैत्यदेहा[3];
भेदी सप्त द्रुम[4], गिरि, शरें त्या सख्या शैत्य[5] दे हा. ।
मित्रा सांगे, 'विभय[6], समरा त्या महाबाहु[7] बाहे.'
पाहे दोघे सम, विभु[8] उगा दूर वृक्षांत राहे. ॥ ४७
भंगे युद्धीं, पळुनि कपि[9] तो ऋष्यमूकासि गेला.
वल्ली[10] कंठीं खुण करुनियां सिद्ध युद्धासि केला. ।
एकें बाणें रघुकुळवरें मारिला वीर वाळी.
किष्किंधेतें सुगळ भगवद्दत्तसामर्थ्य[11] पाळी. ॥ ४८
वर्षाकाळीं प्रभु नगगुहेमाजि[12] राहे उगाची,
श्रीविश्लेषीं[13] त्रुटिहि[14] विभुला आलि[15] झाली युगाची. ।
वाटे चित्ता, पण विसरला तो कृतघ्न[16]; प्रभावा
दावायाला विभु कपिकडे पाठवी क्षिप्र भावा[17]. ॥ ४९

---

१. तो (वाळी) अचळ (पर्वताला) चेंडू करीना (चेंडूप्रमाणें पर्वताला उडवीना) कां? आणि शेंकडों वानर संरक्षणार्थ ठेवीना कां? म्हणजे, मी त्याला मोजीत नाहीं—असा अर्थ. २. वाळीला मारून मी सूर्याला (सुग्रीवाच्या पित्याला) सुख देतों, आणि वासव—इंद्र (वाळीचा पिता) याला असुख (दुःख) देतों. ३. दुंदुभिनामक दैत्याला वाळीनें मारिलें होतें. त्याचा विशाळ अस्थिपंजर रामाला दाखवून तो सुग्रीव रामाला म्हणाला कीं, 'तुझें सामर्थ्य दाखविण्यास्तव हा अस्थिपंजर पायानें उडवून दे; आणि मग शालवृक्षाला भेदून जाण्याजोगा बाण मार.' तेव्हां रामानें पादांगुष्ठानें तो पंजर दहा योजनें दूर उडवून दिला; आणि बाण सोडून सात तालवृक्षांतून पार नेऊन पर्वतालाही भेदिलें. ४. वृक्ष. ५. शीतता, थंडाई. ६. निर्भयपणें. ७. त्या महाबाहु वाळीला युद्धाला बोलाव. ८. रामाला ते दोघेही सारखेच दिसल्यामुळें, कोणता सुग्रीव आणि कोणता वाळी, याविषयीं भ्रांति उत्पन्न होऊन राम दूर वृक्षामागें उगाच उभा राहिला. वाळीला त्यानें मारिलें नाहीं. ९. सुग्रीव. १०. नंतर रामानें ओळखीसाठीं त्याच्या गळ्यांत वल्लीची खूण बांधून पुनः युद्धाला तो सुग्रीव सिद्ध केला. ११. रामानें दिलेल्या सामर्थ्यामुळें किष्किंधेचें रक्षण करी, किष्किंधेचा राजा झाला. १२. पर्वताच्या गुहेमध्यें. १३. सीतेच्या वियोगकालीं. १४. अल्पकाळहि. १५. सखी. क्षणही युगासारखा वाटूं लागला. १६. तो कृतघ्न सुग्रीव, सीता शोधून आणण्याचा आपला पण विसरला, असें त्याच्या मनांत वाटलें. १७. बंधू लक्ष्मणाला.

सौमित्रीला सुगळ बहु भी; साम[1] योजूनि, तारा[2]
ने प्रासादीं[3]; विनवुनि म्हणे हा सखा साधु, 'तारा.'[4] ।
प्रार्थायाला स्वगुरुसि[5], तया कीशपाळासि[6] तो[7] घे;
आले स्वामीजवळि[8] शिबिकेमाजि[9] बैसोनि दोघे. ॥ ९०
आल्या, देती रविसहि दिसों ज्या न, कीशादि सेना,
धूळिव्रातें[10] यदवधि तया जानकीशा दिसेना. ।
राजा[11] मासावधि[12] करुनियां तो, करायासि शोध
प्रेषी, आले परतुनि दिशा तीन धुंडूनि, योध. ॥ ९१
शोधीं केलें[13] अवधि टळला; दक्षिणाशेंत[14] वीर
प्राणत्यागा धरुनि बसले ते महेंद्राब्धितीर. ।
तों संपाती[15] क्षुधित सहसा पातला गृध्रहीर[16],
श्रीचें[17] हो ते वदत हरण, व्यग्र ते कीशधीर. ॥ ९२
खाऊं आला, अनुजसुकृता[18] ऐकतां, हृष्ट झाला.
सांगे शोध. प्लवगबळ जें तोय सेवी न, पाला, ।
दे ऋक्षेशा[19] स्तव, नव महोत्साह वातात्मजाला;
एकाकीच, स्वबळ कळतां, वायुसा तो निघाला. ॥ ९३
मैनाकाद्रि[20] त्रिदशवदनें[21] क्षिप्र बाहेर आला;
मानी विघ्न श्वसनज[22], उरें पाडिता होय त्याला. ।
देवाज्ञेनें अडवि[23] सुरसा नागमाताहि यासी,
ग्रासायाला द्विर्गुणशतही[24] योजनें तोंड वासी. ॥ ९४
ती, 'ब्रह्याचा वर मज असे,' यापरि स्पष्ट बोले.
तद्वक्त्रीं तो लघुतनु[25] शिरे, जाय; देवेंद्र डोले. ।

---

१. सख्य करून. २. नामविशेष. वाळीनें नेलेली सुग्रीवस्त्री. ३. आपल्या घरीं. ४. रक्षण करा. ५. रामाला. ६. वानरराज सुग्रीवाला. ७. लक्ष्मण. ८. रामापाशीं. ९. पालखीमध्यें. १०. धुळीच्या समुदायानें. ११. सुग्रीव. १२. एक महिन्याचा अवधि. १३. ठरविलेला अवधि. १४. दक्षिण प्रदेशीं. १५. जटायूचा बंधू. १६. गृध्रश्रेष्ठ. १७. सीतेचें. १८. जटायूनें केलेलें सत्कृत्य ऐकून. १९. संपातीला. २०. मैनाकपर्वत. २१. देवांच्या सांगण्यावरून मारुतीला स्थान देण्यासाठीं म्हणून. २२. वायुपुत्र, मारुती. २३. सामर्थ्य पाहण्यास्तव अडवी. २४. दोनशें योजनें. २५. सूक्ष्म शरीर होऊन.

जी [1]आकर्षी जलनिधिगता सिंहिका सावलीला,
तीतें पोटीं शिरुनि नि[2]वटी, कीर्ति दे मावलीला. ॥ ५५
लंघी, लीलेकरुनि शत तो योजनें सिंधुपारा;
पावे वेगें; चकित हृदयीं होय पाहोनि [3]वारा. ।
[4]लंकादेवीपरिभव करी; देव[5]दारोग्रकारा
शोधी; पाहे उपवनगता, शेवटीं स्वामिदारा. ॥ ५६
तों ये रात्रि, स्मरविकळ [6]तो केवळ क्रूरकर्मा
प्रार्थी, 'माझी [7]सुमुखि! महिषी हो, सदा पात्र [8]शर्मा.' ।
[9]काडी मध्यें करुनि, वदली श्री, 'विलंघूनि धर्मा,
होसी वध्य [10]प्रभुधनुसि कां, त्यागुनि [11]न्यायवर्मा? ॥ ५७
पापी बोले, 'उडतिस बळें त्याचि अद्यापि कां? गे!
वेड्ये! झाले बहु मजपुढें देवतायत्त पांगे. ।
इच्छी, पावे नच विधुसि, जो आंगणीं बाळ रांगे.
पावे व्यर्थ व्यय वय तुझें. हें बरें, कां न, सांगे.' ॥ ५८
क्रोधें आज्ञा करि खळ असी राक्षसीतें, 'अगे! या
स्त्रीतें सांगा हि[12]तपथ, हठा [13]हे न पोषू [14]अगेया. ।
बोधा, शोधा, अवधि दिधला दोन जाणून [15]मासे;
ग्रासायाला मग मज इचें द्याचि आणूनि मास.' ॥ ५९
गेला ऐसें वदुनि. करिती राक्षसी ग[16]र्जना ज्या,
देतें झालें बहुतचि तया ताप तें, [17]अंजनाजा. ।
काढी वे[18]ण्युद्ग्रथन मग ती [19]स्वीकृतोद्बंधनाशा
जी, चिंतावी विमळमतिनीं, मुक्तिदा, बंधनाशा. ॥ ६०
वृक्षीं वर्णी हळुचि कपि तो सद्गुणांच्या समुद्रा
रामा; त्याची, करुनि नमन, स्तोत्र, दे तीस, मु[20]द्रा. ।

१. समुद्रांत पडलेली सावली आकर्षी. २. मारी. ३. वायु, पिता. ४. लंकादेवीचा पराभव करी. ५. देव+दार+उग्र+कारा=रामस्त्री सीता, इचें कारागृह शोधी. ६. रावण. ७. हे सुमुखि! ८. सुखाला पात्र हो. ९. मर्यादेस्तव उभयतांच्या मध्यें एक काडी धरून. १०. रामाच्या धनुष्याला, धनुष्याकडून, वध्य. ११. न्यायरूप चिलखत टाकून. १२. हिताचा मार्ग. १३. ही सीता. १४. गाण्यास अयोग्य अशा. ('हटा' या शब्दाचें विशेषण.) १५. दोन महिने. १६. धिक्कारातें. १७. अंजनापुत्र मारुती, त्याला. १८. वेणी बांधण्याचा दोर. १९. स्वीकृत्+उत्बंधन+आशा=स्वीकारिली गळफांसाची इच्छा जिणें अशी. २०. खुणेची अंगठी.

सीता हर्षे; कुशळ पतिचें, देवराचें[१], विचारी.
रुग्णा[२] जैसें अमृत, हित तें वृत्त तो तेंवि चारी[३]. ॥ ६१
'बैस स्कंधीं, घडिहि न भरे, सद्गुणांच्या खने[४]! तों
पक्षींद्राचे[५], करुनि चकित, स्वांत[६] ते पाख, नेतों.' ।
देवी बोले, 'सकुळ असतां पाप[७] हा सासु, नेसी
कैसा? वत्सा! यश न करितां, दिग्रथाच्या सुनेसी[८]?' ॥ ६२
या श्रीवाक्यें कपि कवि निवे, शास्त्र तैसें गणी तें.
घे संदेश[९]; स्तवुनि, महिजा[१०] दे स्वचूडामणीतें. ।
मोडी शाखी[११], निशिचर[१२] बळें तो महाबाहु झोडी.
फोडी मस्तें[१३] बहुत परिघें[१४] दक्ष; अक्षायु[१५] खोडी. ॥ ६३
ब्रह्मास्त्रातें घननरव[१६] रणीं तद्विनाशार्थ योजी.
होय छद्में[१७] वश कवि, मनीं तो तयातें न मोजी. ।
त्या मूढानें[१८] कपिवर महारज्जुंनीं बद्ध केला,
नेला राजाजवळ मदनारातिचा[१९] योग्य चेला. ॥ ६४
'तूं कोणाचा? उपवन वरें[२०] ध्वंसिलें कां? अरे! तें?
कां! रे! केलीं निशिचरबळें[२१] मर्कटा! त्वां परेतें[२२]?' ।
ऐसें कोपें दशमुख पुसे; कीं रणीं अक्ष मेला.
त्याच्या शोकेंकरुनि वशधी होय तो अक्षमेला[२३]. ॥ ६५
त्या वाताचा[२४] सुत कथि, 'असें दूत मी; रामभार्या
आर्या येथें दिसलि सुकृतें; पातलों याचि कार्या. ।
आलों द्वारें तुजजवळि या, बा! करायासि बोधा.
क्रोधा कामा त्यज; वश नया, नित्य धर्माहि हो, धा. ॥ ६६

---

१. दीराचें. २. रोग्यास. ३. भरवी. ४. 'खनि (खाण)' शब्दाचें संबोधन. ५. गरुडाचे. ६. शब्द करणारे. 'स्वन्' धातूपासून भूतकृदंत. ७. हा दुष्ट, रावण. कुळसहित जिवंत असतां. ८. दशरथाच्या सुनेला (मला). ९. निरोप. १०. सीता आपलें शिरोभूषण देई. ११. वृक्ष. १२. राक्षस. १३. मस्तकें. १४. परिघ नांवाच्या आयुधानें. १५. रावणपुत्र अक्ष, याचें आयुष्य. १६. रावणपुत्र मेघनाद (इंद्रजित्). १७. कपटानें, ढोंगानें. १८. मूढ इंद्रजितानें. १९. मदन+अराति (शत्रु)=शिव, त्याचा भक्त, अर्थात् ब्रह्मचारी, मारुती. २०. श्रेष्ठ. २१. राक्षससैन्यें. २२. प्रेतें केलीं. वधिलीं. २३. असहनतेला वशधी होय, क्षमा न करावी अशा बुद्धीच्या अधीन झाला. २४. वायूचा पुत्र, मारुती.

[1]सत्ता दत्तावरि करि असा, कोण योगींद्र आहे?
मत्ता! लत्ताप्रद [2]अहिवरा कोण कल्याण लाहे? ।
[3]लोभा शोभासुमति हरि, त्या सुज्ञ चित्तीं न वाहे.
हो [4]भा क्षोभास्तव नच उणी; भाग्य पापें न राहे'. ॥ ६७
इत्यादि स्वप्रभुभुजबळें मारुती जों दटावी,
तों घे हस्तीं खळ [5]असिलता, जी सुरौघीं नटावी. ।
'सोडी मारूं कुमति, इतरा जेंवि,' [6]तद्वत्सलातें
वारी [7]भ्राता स्तवुनि; न रुचे कर्म [8]सद्वत्सला तें. ॥ ६८
[9]विश्वप्राणप्रियतनय जो, त्यासि मानूनि तुच्छ,
[10]स्नेहीं वस्त्रें भिजवुनि, तिहीं वेष्टवी दीर्घ पुच्छ. ।
क्रोधें, बोधें रहित, [11]करवी दीप्त तें. होय भीता,
प्रार्थी अग्निप्रति [12]तद्देवना ती दयासिंधु सीता. ॥ ६९
सांगे, 'यातें धरुनि फिरवा सर्वलंकेंत, सोडा.
व्हावा दंड [13]प्रणतसरमाकांतमानार्थ थोडा.' ।
नेतां बद्ध [14]स्वभुजयुग तो वायुचा [15]प्राण झाडी.
पाडी द्वेषी, कपि [16]दवें गमे, स्पष्ट लंकाहि [17]झाडी. ॥ ७०
होळी लंका गमलि, धडके वाळली जेंवि मोळी.
घोळी रक्षोगण बहु; दशग्रीव तो हात [18]चोळी. ।
पोळी व्योमीं दहन, नटिके देवतांचीहि टोळी.
चोळी साडीहि न धड; शिव्या स्त्री दशास्यासि तोळी. ॥७१
लंकेशाचा [19]अनुज दुसरा साधु, तद्गेह पाळी;
आळी, लक्षाधिक सुसदनें ज्यांत, त्या सर्व [20]जाळी. ।
जाळी, मुक्तामणिगणमिषें, पेटतां अश्रु गाळी.
चाळी नेत्रें, न रिपुघुबड! स्पष्ट हा [21]अंशुमाळी. ॥ ७२

---

१. दत्तात्रेयाहून श्रेष्ठ योगी कोण आहे? कोणी नाहीं. २. सर्पश्रेष्ठाला लात मारणारा. ३. जो लोभास्तव, शोभा आणि सुमति हरी. ४. कांति. ५. तरवार. ६. आपल्याठायीं प्रीति ठेवणारा जो रावण त्यातें. ७. बंधु बिभीषण. ८. साधूच्याठायीं ममता करणारा बिभीषण, त्याला. ९. विश्वाचा प्राण जो वायु त्याचा प्रियपुत्र. (मारुती.) १०. तेलामध्यें. ११. पेटवी. १२. त्याच्या रक्षणासाठीं. १३. सरमेचा पति बिभीषण यानें विनविल्यावरून त्याच्या मानासाठीं दंड थोडा करा. १४. आपले दोन्ही भुज. १५. मारुती. १६ वणवा. १७. बारीक मोठ्या झाडांनीं निबिड जें अरण्य ती. १८. घांसी. १९. बिभीषण. २०. दग्ध करी. २१. सूर्य.

[1]पारावारीं विझवि मग तें पुच्छ; देवीस वंदी;
[2]नंदी भासे; करि, तरुनियां सिंधुतें, कीश [3]बंदी. ।
त्यांला लावी [4]मधुवन लुटायास; बोभाट साच.
क्रोधें सांगे [5]दधिमुख; गमे साधु तो भाटसा च. ॥ ७३
[6]श्रीचा चूडामणि पतिपदीं अर्पुनि, [7]स्वंग दे, हा
श्रीभर्ताही [8]पवनजनिच्या त्या [9]परिष्वंग देहा. ।
[10]वर्णीना त्या बहुबहु कृतज्ञेश कां जीवदाना?
स्वामिप्रेमा 'अमृत,' अमृता 'कांजि,' कां जी! वदाना? ॥ ७४
श्रीसंदेशा, [11]सदरिकुमता, ऐकतां, राम वीरा
भ्रात्या, त्याही पुसुनि सुगळा, जाय [12]पाथोधितीरा. ।
[13]मत्तत्यक्ता [14]द्विषदवरजा [15]सत्सभामूर्धहीरा.
लंकाराज्य, स्वपद नमितां, दे, दयासिंधु, धीरा. ॥ ७५
सिंधु प्रार्थी, नळ [16]कवि रची सेतु. लंकेंत [17]पापी
श्रीला दावी प्रभुशिर, म्हणे, '[18]मद्बळाधीश कापी.' ।
'माया' ऐसें हळुचि सरमा सांगुनि श्रीस रक्षी,
तीस प्रेमें जनकतनया माय तैसेंच लक्षी. ॥ ७६
[19]धाडी, श्रीमान् करुण धरिले साधुनें, हेरणारे.
[20]बोले, 'शत्रो! मम भुज पहा, पातले हे रणा रे!' ।
वारा जैसा, त्वरित बळवान् पावला तेंवि [21]पारा.
[22]स्वप्राकारीं चढुनि निरखी सैन्य [23]तो तें [24]विपारा. ॥ ७७
दुर्ग प्रेक्षी चढुनि शिखरीं तो [25]सुवेळाचळाच्या.
क्षोभे चित्तीं सुगळ बळवान् दर्शनें त्या खळाच्या. ।

---

१. समुद्रामध्यें. २. आनंदित, संतुष्ट. ३. स्तुतिपाठक. ४. जुनें वाळीचें वन. ५. मधुवनाचा रक्षक. ६. सीतेच्या मस्तकांतील अलंकार. ७. सु+अंग=चांगलें शरीर ज्याचें असा मारुती तो. ८. वायुपुत्र मारुती त्याच्या देहाला आलिंगन देई. ९. आलिंगन. १०. अर्थात् अतिशय वर्णी. ११. साधुशत्रु रावण त्याच्या मतातें. १२. समुद्रतीराला. १३. मत्तानें टाकिलेल्या. १४. द्विषत्+अवरज=शत्रूचा कनिष्ठ बंधु बिभीषण त्या. १५. साधुसभेंतील शिरोमणी बिभीषण त्याला. १६. चतुर. १७. रावण. १८. माझा सेनापति. १९. रावणाचे हेर, जे श्रीमान् करुण साधुनें (रामानें) धरिले ते तो धाडी (परत जाऊं देई). २०. राम म्हणे. २१. समुद्रतीराला. २२. आपल्या तटावर. २३. रावण. २४. अफाट. २५. लंकेंतील एक पर्वत, त्याच्या शिखरावर.

स्वामीतेंही न पुसुनि उडे तार्क्ष्यसा[1] त्यासि ताडी,
पाडी खालीं; मुकुट मदही, बाहुयुद्धांत झाडी. ॥ ७८
मित्रा प्रार्थी प्रभु, 'न[2] भजती साहसा सुज्ञ नेष्टा.
यूथाधीशांप्रति[3] निजमुखें सांग, 'लंकेसि वेष्टा.' ।
तो कीशौघ,[4] प्रबळ दुसरा कोट दुर्गासि, झाला.
तेणें रक्षःप्रसर, जळदें दाव[5] तैसा, विझाला. ॥ ७९
धाडी आधीं प्रभु रिपुकडे वाळिपुत्रासि[6] सामा;[7]
कामासक्ता[8] कपि दशमुखा भेटला गर्वधामा.[9] ।
आमा[10] बोध प्रिय न, मरत्या बाळका जेंवि आमा.[11]
'या मारा,' हें कथि; धरिति तें मूढ नेणोनि धामा.[12] ॥ ८०
कीशेंद्राचा सुत[13] गरुडसा आक्रमी पुष्करातें.[14]
तत्कर्मातें स्तवि कविशत प्रीतिनें, दुष्करातें. ।
प्रासादातें,[15] सजव[16] उडतां तो महासत्व फाडी,
पाडी, नाडी करुनि शिथिला, शत्रु, जों बाहु झाडी. ॥ ८१
मोटे खोटे अहित[17] चवघे मारिले अंगदानें,
तेजें केले चकित अवघे दुष्टधी, भंगदानें. ।
युद्धारंभ प्रभु करि तदा, तो न शंके; शवांचे
राशी[18] पाहे तरि, बहु बुडायासि लंकेश वांचे. ॥ ८२
सेनानाथ प्रथमचि मरे, पावुनी भंग; रामीं
नृत्व[19] प्रेक्षी; 'वधिनचि' म्हणे, 'सोडिन संगरा[20] मी.' ।
मेघध्वान[21] प्रखर फणभृत्पाश[22] घालूनि, बांधी
दोघे बंधु;[23] त्रुटित[24] जय जो कौतुकें त्यासि सांधी. ॥ ८३
देवी[25] मोहे; तिस बहु भली राक्षसी[26] सत्य सांगे.
तेजस्वी हे व्यसु[27] न; म्हणसी साध्वि! तूं 'हाय!' कां? गे! ।

---

१. गरुडासारखा. २. अनिष्ट अशा साहसकृत्याला सुज्ञ न भजती—असा अभिप्राय. ३. कळपाच्या अधिपतींला. ४. वानरांचा ओघ. ५. वणवा. ६. अंगदाला. ७. साम (सख्य) करण्यासाठीं. ८. हें 'दशमुखा' याचें विशेषण. ९. गर्वाच्या घराला. हेंही 'दशमुखा' याचें विशेषण. १०. अपक्व. ११. स्तन. १२. तेजाला. १३. वानरराज सुग्रीव त्याचा पुत्र (पुतण्या) अंगद. १४. आकाशातें आक्रमी; आकाशांत उडाला. १५. राजवाड्यातें. १६. सवेग. १७. शत्रु. १८. 'राशि' शब्द पुल्लिंग आहे. १९. मनुष्यत्व. २०. युद्धाला. २१. इंद्रजित्. २२. सर्पांचे पाश. २३. रामलक्ष्मण. २४. तुटलेला. २५. सीता. २६. सरमा. २७. वि+असु=गतप्राण.

तों ये तार्क्ष्य[1]; त्यजिति अजिता[2] सानुजा नाग धाकें.
केला स्तोत्रास्पद हरि करीशावनीं[3] जेंवि नाकें[4]. ॥ ८४
[5]बंधक्षुब्ध प्रभुवर वधी संगरीं यातु[6] कोटी.
चिंता लागे, निजपरिभवें, राक्षसेंद्रासि मोठी; ।
मोठ्या कष्टें उठवि अनुजा, न त्यजी बुद्धि खोटी.
त्या दाटूनि प्रलयदहनीं कुंभकर्णासि लोटी. ॥ ८५
त्याच्या, होता भर पसरला, विग्रहीं[7], आळसाचा;
सुग्रीवाच्या, तरिहि, कटका भासला काळ साचा. ।
पाडी मोहीं; धरुनि, परते वाळिचा भाउ[8], जीव,
स्वामी तेव्हां निजमनिं म्हणे त्यासि, 'बा! भा उजीव[9].' ॥८६
लंकेमध्यें [10]अहित शिरतां, मोह सोडी [11]हरीना,
नासा तोडी, सुटुनि मग तत्कर्ण कां तो हरीना? ।
कोपे मागें फिरुनि कटका[12] लागला घोळसाया.
झाला, दावा[13] कपिनिकर तो टोळसा, मोळसा[14], या[15]. ॥ ८७
[16]कुंभश्रोत्र प्लवंग[17] सगळे तो गिळी, जेंवि पेढे,
हा दावाग्नि प्रबळ भंवते स्पष्ट कीशौघ मेढे. ।
त्याचे बाहू चरण मग तन्मस्तक श्रीश तोडी,
जोडी शोकीं मन न. कर ती दुष्ट खोडी न सोडी? ॥ ८८
पुत्र, भ्राते, सचिव, खपले[18], पीडिते विष्टपा[19] हे;
हानि स्पष्टा निरखि, फिरलें आपलें दिष्ट[20] पाहे. ।
झालें शापस्मरण[21] तरिही दुष्टधी तो लवेना,
कोणासींही हठमठ शठश्रेष्ठ हा तोलवेना. ॥ ८९
दिक्कंठातें घनरव म्हणे, 'निर्मितों [22]संगरा ज्या
'कल्प[23]' ज्ञाते म्हणतील; करीं इच्छिला संग राजा! ।

---

१. गरुड. २. लक्ष्मणासह रामाला. ३. करि+ईश+अवन=गजेंद्राच्या रक्षणीं. ४. स्वर्गी. ५. बंधनानें क्षुब्ध झालेला. ६. राक्षस. ७. देहीं. ८. सुग्रीव. ९. आपलें तेज पाजळ. १०. कुंभकर्ण. ११. हरि+इन=वानरेंद्रा. १२. सैन्याला. १३. वणव्याला. १४. तृणवत्. १५. कुंभकर्णा. १६. कुंभकर्ण. १७. उडी मारून चालणारे, वानर. १८. आटोपले, मेले. १९. भुवनाला. २०. दैव. २१. मानवाच्या हातून मरशील, असा ब्रह्मयाचा शाप. २२. युद्धा. २३. प्रलय.

बा! चिंतेतें करुनि म्हणसी, 'तेज नाशो,' कसा हो?
  स्वस्थ प्राज्ञा! तव मन, सुखी व्हावया, शोक साहो. ॥ ९०
बाणव्रातें कपिबळ खिळी, तो नभीं गुप्त राहे.
  त्याचें व्हाया यश, वश तसा सानुज, श्रीश साहे. ।
ते [1]शल्यार्त प्रभुसह जसे सर्व मोहीं बुडाले,
  वाटे प्राण क्षणभरि भयें [2]जिष्णुचेही उडाले. ॥ ९१
रात्रीं [3]उल्काधर [4]ससरमाजानि तो [5]वातभूतें
  पाहे, जोडी [6]बळसमवनाकारणें हात भूतें. ।
[7]ऋक्षाधीश स्तवि, कथि तया, 'ओषधी आण, जा, गा!
  बा! नाहीं भी लव; अससि तूं आमुचा प्राण जागा.' ॥ ९२
तो कैलासाजवळ निमिषें जाय; दे हर्ष [8]बाला.
  भ्याल्या, देती झडकरि न त्या ओषधी भेटि याला. ।
ज्ञाता [9]ओषध्यगशिखरचि क्षिप्र घेऊनि आला;
  झाला स्वस्थ प्रभु सबळ, या सद्यशें फार धाला. ॥ ९३
होतें तेथें, पवनतनुभू, नीट ठेवूनि शृंग
  स्थापी; ये तो परतुनि पुन्हा रामपादाब्जभृंग. ।
झाले स्वस्थ प्लवग सुभट; क्षोभले [10]सेशं माया.
  युद्धें सारे; वधित सुटले राहिले ते शमाया. ॥ ९४
मायासीता घनरव करी, ने रणामाजि पापी;
  दावी आधीं, मग शिर तिचें, खड्ग हाणोनि, कापी. ।
'नाहीं स्त्रीचें अवन घडलें काय? तूं [11]क्ष्वेड जा पी,'
  श्रीरामातें [12]खळमणि असें, प्राकृता तेंवि, दापी. ॥ ९५
तेव्हां बोले पवनसुत हा, राम हा, बंधु तो हा,
  राजाही हा, [13]शतमखहि हा, पावले सर्व मोहा. ।
सांगे [14]साधुप्रवर सरमाजानि, 'कां खेद? माया
  हे कीं रामा! अनुज समरीं त्या खळा दे दमाया. ॥ ९६

---

१. बाणानें विद्ध. २. इंद्राचे देखील. ३. वानरविशेष. ४. बिभीषणासहित. ५. मारुतीला. ६. सैन्याच्या रक्षणास्तव हात जोडी. ७. जांबवान्. ८. बापाला, वाऱ्याला. ९. ओषधिपर्वताचें शिखरच. १०. ईशासह. ११. विष. १२. दुष्टश्रेष्ठ. १३. इंद्र. १४. साधुश्रेष्ठ, सरमेचा पति, बिभीषण.

[1]अभ्युत्पन्न प्रवर अमरत्वप्रद, प्राप्त होमीं
मे[2]घध्वाना रथ विधिवरें, चिंतितों, या न हो, मी. ।
गेला दुष्ट भ्रमवुनि तुम्हां, कार्य साधावयाला,
सेना त्याला करु, करि [3]जैरा जेंवि, बाधा, वयाला. ॥ ९७
आर्याज्ञेनें [4]सैकटक निघे वीर [5]सौमित्रि; पूर्ण
[6]प्रत्यूहातें करि झटुनि; दे होम होऊं न पूर्ण; ।
मारी त्यातें; [7]अनवरत तें युद्ध [8]चोवीसयाम.
प्रेमें बोले, [9]व्रणचित वपु प्रेक्षितां, 'हाय!' राम. ॥ ९८
वार्ता येतां, दशमुख मनीं भाजला पुत्रशोकें,
क्रोधें भारी तळमळ करी, देखतां ओस [10]ओकें. ।
सीताघाता, धरुनि [11]असितें, काळसा जाय हो! तो.
भी ती; बोले, 'वध रघुपते! हा असा काय होतो?' ॥ ९९
त्यातें प्रार्थी, सचिव, 'हरितो शर्म [12]हेकीं; यश स्त्री-
घातें जातें. प्रभुजि! करिती कर्म हें काय शस्त्री? ।
सर्वस्वें कीं वरिलि, वधितां ईस कां? जीव [13]धांवा
जीणें, आधीं वर नर इचा, तो न कां जी वधावा?' ॥ १००
आयु:शेषेंचि परतविला हो, न तो मंत्रिबोधें;
हेंचि स्पष्ट स्वमत विमळें स्थापिलें साधुशोधें. ।
माराया त्या सुगळसहिता सर्वथा रामराया,
धाडी सैन्यें बहु, कुमतिचा सर्व थारा, मराया. ॥ १०१
सद्बाणांचें, विखरुनि महासंगरीं, जाळ, तो 'खा'
ऐसें सांगे. प्रभुगुणरवें तों धरी काळ तोखा. ।
[14]क्रव्यादांचे अगणित रणीं नाचले हो! [15]कबंध;
क्रूरांचेहि प्रभुवर हरी तत्क्षणीं शोकबंध. ॥ १०२
[16]तो कर्णांहीं सकळ [17]पृतनाहानिची ती कथा पी;
आंगें भांडे जरिहि, [18]असकृत् भंग पावे तथापी. ।

१. या मेघध्वाना विधिवरें अभ्युत्पन्न अमरत्वप्रद प्रवर रथ होमीं प्राप्त न हो [असें] मी चिंतितों—असा अन्वय. २. या मेघध्वाना (इंद्रजिताला) विधिवरें अमरत्वपद अभ्युत्पन्न प्रवर रथ होमीं प्राप्त न होवो असें मी चिंतितों. ३. वृद्धत्व. ४. सैन्यसहित. ५. लक्ष्मण. ६. विघ्नातें. ७. अखंड, एकसारखें. ८. चोवीस प्रहर. ९. व्रणांनीं व्याप्त असें. लक्ष्मणाचें शरीर पाहून. १०. घरें. ११. खड्गातें. १२. आग्रह. १३. तृप्त व्हावा? १४. राक्षसांचे. १५. शिरोविरहित धड. १६. रावण. १७. सेनेच्या हानीची. १८. वारंवार.

मोडी [1]कीशप्रखरकटकें, दारुणा शक्ति सोडी,
फोडी [2]वक्ष, स्मृतिहि उरवी लक्ष्मणींही न थोडी. ॥ १०३
तेव्हांही तें पवनतनुजें आणिलें शृंग; [3]नस्यें
तेणें शोभा वरिलि अधिका, [4]वारिदें जेंवि [5]सस्यें. ।
युद्धीं [6]पत्ति प्रभु, [7]पर रथीं, तें न शक्रा पहावें;
धाडी [8]जैत्र स्वरथ; न खळोत्कर्ष थोरा सहावे. ॥ १०४
बैसे [9]श्रीमान् [10]सुरपतिरथीं, तापवी [11]यातुपातें;
पेटे वाटे [12]दहन, गिळि तत्सैन्य जें, या तुपातें. ।
[13]नाकी जे त्या गमति म्हणते भक्त ते 'ओ' घनाचे,
कीं तो त्याचा शर, विखरितां, रावणीं ओघ नाचे. ॥ १०५
शस्त्रें जीं जीं दशमुख, रणीं क्रुद्ध होऊनि, सोडी,
तीं तीं राम प्रभुवर, शर क्रूर योजूनि, तोडी. ।
अस्त्रांतेंही [14]पविभृदरिच्या हा यशोराशि, खंडी;
दापी व्यापी अनित, भुजगा जेंवि घोरा [15]शिखंडी. ॥ १०६
खंडी रामप्रभु शत शिरें तो, तरी हा न आटे;
वाटे गेलें स्वबळ, विभुच्या [16]आधि चित्तांत दाटे; ।
फाटे धाकें हृदय अरिच्या तों अगस्त्यर्षि आला;
झाला देता '[17]रविहृदय' तो; भक्तिनें भानु धाला. ॥ १०७
[18]भास्वान् बोले, 'अवघड तुला काय? [19]कामारिशील!
श्रीशा! तूं या, शिखुनि उरीं [20]सायका, मारिशील. ।
लागो विश्व स्तवरचनिं, [21]घोरांघ वारो, पहा हो!
कीर्ति ध्यानांतुनि नच निघो. राघवा! रोप राहो. ॥ १०८

---

१. वानरांचीं प्रखर सैन्यें. २. हृदय. ३. नाकामध्यें घालावयाचें किंवा ओढावयाचें औषध त्याणें. ४. मेघें. ५. धान्यें. ६. पादचारी. ७. शत्रु. ८. जयशील. ९. राम. १०. इंद्ररथामध्यें. ११. राक्षसेंद्र जो रावण त्यातें. १२. अग्नि. १३. जे नाकी (स्वर्गवासी देव), ते त्या घनाचे (मेघाचे), ओ म्हणते (आज्ञांकित) भक्त गमती. अर्थात् मेघाला पाहून मोर आनंदित होतात, त्याप्रमाणें आनंदित झाले. १४. पविभृत्+अरि=वज्र धरणाऱ्या इंद्राचा शत्रु (इंद्रजित्) त्याच्या अस्त्रातें. १५. मोर. १६. व्यथा. १७. सूर्यस्तवन जप. १८. सूर्य. १९. महादेवासारिखा स्वभाव ज्याचा असा. २०. बाणातें. २१. भयंकर पाप.

साधी, न्हाया मुदित [1]ससुरा ही रसा, राम [2]होरों;
भेदी, [3]ब्राह्मप्रखरविशिखें, हीरसारा [4]महोरा. ।
अंता, संतापद म्हणुनियां, पाठवी राजराजा,
द्याया श्री, दे विधिवरबळें पाठ वीरा जरा ज्या. ॥ १०९
सत्पुष्पांची, प्रभुवरि तदा, वृष्टि केली सुरांहीं;
[5]प्रेमाश्रूंची समनुभविली सन्मुनींच्या उरांहीं. ।
झालीं वाद्यें परम [6]मुखरें, दिव्य नृत्यें सगीतें;
आनंदाचें, किमपि शकली, पर्व वर्णूं, न [7]गी, तें. ॥ ११०
झाला भारी [8]स्वसम रण जो, तो अहोरात्र सप्त,
[9]स्वर्गेशादि [10]त्रिदश, मुनिही पाहती त्रासतप्त. ।
सर्वांचाही, प्रभुवरजयप्राप्तिनें, ताप गेला,
जैसा जातो सकळ भजतां [11]यांचिया [12]आपगेला. ॥ १११
[13]तद्भ्रात्यातें कथुनि, करवी तत्क्रिया सांग तो; या,
श्रेष्ठप्रेमें, विसरवि, यशें पावनें, [14]गांगतोया. ।
स्थापी भक्ता, स्थिर [15]चिरें, पदीं. होय [16]हा [17]निष्कें लंका-
वक्षीं. स्वांकीं मिरवि मग ती स्वप्रिया निष्कलंका. ॥ ११२
'या, देणारा यश, कविशता, तूं महाबाहु, त्याया.
मन्नेत्रांच्या, अतुळचरितें, तोषल्या बाहुल्या, या. ।
वज्र व्रीडा त्यजु, न मृति, जें दे, शरीरा वणातें.
अंता नेता, न पटु दुसरा तों [18]शरी, रावणातें.' ॥ ११३
ऐसें शंभु, [19]द्रुहिण वदले, शक्र, अत्यंत हर्षें.
युद्धीं मेले प्लवग उठवी, [20]प्राज्यपीयूषवर्षें. ।
भेटे राजा दशरथ, तया बंधुसीतासमेतें
श्रीशें केलें नमन; अमृताहूनि भारी गमे तें. ॥ ११४

---

१. देवसहिता पृथ्वी. २. सुमुहूर्त. ३. ब्रह्मदेवानें दिलेल्या प्रखर बाणानें. ४. वज्रासारखें कठीण जें मोठें उर, त्याला भेदी. ५. प्रेमाश्रूंची वृष्टि. ६. शब्दयुक्त अशीं. ७. गीः, वाणी, सरस्वती. ८. स्वतःसारखा; ज्याला उपमा दुसरी नाहीं असा. 'रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव,' अशी कवीची सदुक्ति आहे. अनन्वयालंकाराचीं हीं उदाहरणें होत. ९. इंद्रादि. १०. देव. ११. याच्या पायांपासून निघालेल्या. १२. नदीला, गंगेला. १३. बिभीषणाला. १४. गंगोदकाला. १५. दीर्घकालपर्यंत. १६. बिभीषण. १७. अलंकार. १८. बाणधारी. १९. ब्रह्मा. २०. पुष्कळ अमृतवृष्टीनें.

[1]लंकाकीशाधिपसह बसे [2]पुष्पकीं, दे करा ज्या.
श्रीश भ्रात्या सुखवि भरता, त्या जसा [3]देवराजा. ।
राजा होय; त्वरित पुरवी सर्वही आस; राया,
रंका, प्रेमें निववि; करितो तापला आ [4]सरा, या. ॥ ११५

पूजी अंगें कपिनिशिचर[5]क्ष्माप हो! ते [6]ससेन;
स्नेहें बोले, 'प्रबळ हरिसे शत्रु होते, ससे न; ।
गात, प्रेमेंकरुनि तुमचें सार साहित्य, जावें.
भृंगें, [7]स्वर्द्रुस्तबक मिळतां, [8]सारसाहि त्यजावें.' ॥ ११६

प्रेमें पूजी पवनतनया; जाणता [9]वत्समान
स्वामी दे त्या; कथि, 'अचळता जाण तावत् समान, ।
यावत् साधो! मम यश; जळीं मीनसा, मज्ज नामीं;
बाधों देता अरि, विटुनि सामीं, न सा [10]मंजना मी?' ॥ ११७

दीन त्राणोचित सतत ज्या; धर्मसे विप्र ज्यातें
होती पात्र, श्रमुनि सकळा, शर्म सेवि प्रजा तें. ।
त्या श्रीरामा, नमुनि, यश हें सेशें[11] वाहे मयूर,
प्रेमाश्रूंहीं भिजवि [12]शशिभृद्वक्षसें [13]जें [14]मयूर. ॥ ११८

(उपसंहार.)

**'भावरामायण'** प्रेमें **मयूरें रामनंदनें** ।
अर्पिलें **रामचरणीं** असकृत्कृतवंदनें. ॥ १

---

१. लंकाधिप आणि कीशाधिप यांसह. २. कुबेराचें विमान, रावणानें हिसकून घेतलेलें. तेंच पुढें रामानें जिंकून घेतलें. ३. इंद्र. ४. सरोवरा. ५. वानर, राक्षस, आणि राजे. ६. सेनेसहित. ७. स्वर्गवृक्षाचा (कल्पवृक्षाचा) गुच्छ प्राप्त होतां. ८. कमळाला देखील. ९. पुत्राचा मान. १०. माझ्या जनाला. ११. पूजा मंगलाक्षता. १२. चंद्रशेखर शिव, त्याचें हृदयसें. १३. जें यश. १४. मयु+उर=घोड्याच्या मुखाचा जो मयुनामा किन्नर, स्वर्गींचा गायक, त्याचें हृदय.

# ६१. सच्छ्राव्यरामायण[1].

(हरिणीवृत्त[2].)

दशरथ महीभर्ता कर्ता सुरप्रिय तो यजी[3],
दशमुखवधा त्याचा साचा सुत प्रभु[4] होय जी!।
अनुजहि तिघे अंशें; वंशेंदु[5] तो, भरतादि जे,
विधि विनवि कीं, ‘भव्या त्वव्या गति स्वरता[6] दिजे’. ॥ १
प्रथम सुत जो कौसल्येचा घनप्रभ[7], नाम या
करि दशरथ प्रेमें श्रीराम हेंचि अनामया[8]; ।
भरत तनया कैकेयीच्या, तिजा सुत लक्ष्मण,
प्रियगुण सुमित्रेचा, शत्रुघ्नही शुभलक्ष्मण[9]. ॥ २
सकल शिकले हृद्या[10] विद्या कला गुरुच्या मुखें,
समधिक सखा शक्रा भासे चतुर्गुण या सुखें ।
तदुपयम[11] जे, त्यांची चिंता नरेंद्र मनीं धरी,
कुशिकसुत[12] तों भेटे, वाटे महेश[13] दया करी. ॥ ३
निजमखपरित्राणा[14], मागे सलक्ष्मण राम हा,
विरह गमला त्यांचा वृद्धा मनुष्यवरा[15] महा; ।

---

१. हें काव्य साधूंनीं श्रवण करण्यास योग्य, म्हणून याला ‘सच्छ्राव्यरामायण’ असें नांव दिलें आहे. २ या काव्याचें वृत्त ‘हरिणी’ आहे. त्याचें लक्षण श्रीक्षेमेंद्रकृत ‘सुवृत्ततिलकां’तून येथें देतों:—‘नसमै रसलैर्गैन युक्ता सप्तदशाक्षरा। विच्छिन्ना हरिणी षड्भिश्चतुर्भिः सप्तभिस्तथा॥२३॥’ (सुवृत्ततिलक–प्रथम विन्यास), ‘त्वरातरलविच्छेदैर्विभाति हरिणी पदैः । मन्थरैर्ग्रन्थिबद्धेव याति निःस्पन्दसंगताम् ॥ २९ ॥ त्रिषु पादेषु विश्रान्तविलासैर्ललिता पदैः । अन्ते तरंगितगतिर्हरिणी हारिणीतराम् ॥ ३०॥’ (सुवृत्ततिलक–द्वितीय विन्यास), ‘औदार्यरुचिरौचित्यविचारे हरिणी वरा ॥ २०॥’ (सुवृत्ततिलक–तृतीय विन्यास). यांचा भावार्थ:—या वृत्तांत न, स, म, र, स, हे यथानुक्रम गण, एक लघुअक्षर, आणि एक गुरुअक्षर–अशीं सतरा अक्षरें प्रत्येक पादांत असतात. सहाव्या, नंतर चवथ्या आणि त्यानंतर सातव्या अक्षरांवर यति असतो. ही हरिणी तरलपदा असतां विशेष शोभा पावते. हिच्या तीन पादांतील पदें विश्रांतिप्रद असून अंतीं चपलगति असलीं तर ती अत्यंत मनोहारिणी होय. ३. यज्ञ करी. ४. विष्णु. ५. कुलचंद्र. ६. तुझ्याठायीं जे रत त्यांना. ७. मेघकान्ति. ८. रोगरहिताला. ९. शुभलक्षण. १०. आवडत्या, प्रिय, हृदयंगम. ११. त्यांचे उपयम=विवाह. १२. विश्वामित्र. १३. महादेव. १४. आपल्या यज्ञाच्या संरक्षणार्थ. १५. राजाला.

स्वगुरुवचनें दे ते दोघे, मुनींद्रकरीं, [1]असु,
प्रिय, सुकृपणें जैसें द्यावें [2]सदर्थिजना, [3]वसु. ॥ ४
[4]अनुजसहिता [5]क्षुत्तृट्बाधाशमार्थ, पथीं दया
करुनि, शिकवी विद्या नामें 'बळातिबळा' तया, ।
अचित [6]निवटी [7]मुन्याज्ञेनें [8]सुदुर्मति ताटका,
वरुनि अतुळें अस्त्रें, दावी [9]द्विषद्वधनाटका. ॥ ५
धनु धरि, उभा राहे सिद्धाश्रमीं [10]बळशेवधी,
प्रभुवर, [11]सुबाह्वादि क्रूर [12]क्षपाचर, ते वधी. ।
[13]विशिखपवनें मारीचातें क्षणें शतयोजनें
उडवि; [14]सुपदस्तोत्रा केला पराक्रम तो जनें. ॥ ६
जनकयजना जातां ने त्या, [15]महामुनि, सानुजा;
हरि तम [16]मुनिस्त्रीचें पादें, करेंहि न भानु [17]ज्यां. ।
[18]पुरहरधनु ध्वंसी तें, ज्यापुढें तृणता पवी
धरि, नृपशता जें, निर्द्रव्या जसें ऋण, तापवी. ॥ ७
प्रभुसि [19]वसुधाबाळा, माळा समर्पुनियां, वरी.
कुशिकतनयें आज्ञा केली तया जनका बरी; ।
सविधि दिधल्या धन्या कन्या तिघांस तिघीजणी.
कवि दशरथा [20]पुत्रिश्रीमद्गणीं पहिला [21]गणी. ॥ ८
कळवि पहिल्या [22]रामा राम स्वतेज, न ज्या तुला.
सुयश भृगुच्या जें, तें घे, दे स्वयें रघुच्या, [23]कुला. ।
समचि विभु तो देता झाला [24]महा जनका [25]पुरा.
भजुनि चरिता या, चिंतीना महाजन [26]कापुरा. ॥ ९

१. प्राण. २. उत्तम याचकांना. ३. धन. ४. अनुजसहिता तया विद्या शिकवी. ५. भूक आणि तहान यांची पीडा शमविण्यासाठीं. ६. मारी. ७. मुनीच्या आज्ञेनें. ८. अत्यंत दुर्मति. ९. शत्रुवधरूप नाटकाला दावी. १०. बळनिधि. (शेवधि=निधि, कुबेराचें द्रव्य.) ११. सुबाहु+आदि. १२. रात्रिंचर, राक्षस. १३. बाणांच्या वाऱ्यानें. १४. त्या पराक्रमाचीं उत्तम पदें आणि स्तोत्रें केलीं. १५. विश्वामित्र. १६. अहल्येचें. १७. ज्या तमाला भानु करेंही न हरी. १८. शिवधनुष्य. १९. पृथ्वीकन्या, सीता. २०. पुत्रवंत जे श्रीमान् लोक त्यांच्या समुदायीं. २१. गणना करी. २२. भार्गवरामाला. २३. हा शब्द दोहोंकडे घ्यावयाचा. २४. आनंदातें. २५. पूर्ण. २६. कर्पूराला, आनंददायक वस्तूला.

[1]अवनिपतिच्या सख्या अत्यादरेंचि मनावरि
[2]स्वसुरतरु घे; प्राज्या राज्या त्यजूनि, वना वरी. ।
प्रभु [3]सदुटजद्वारा, [4]दारानुजांसह, तो भजे;
सुतसम तपःसक्तां भक्तां नमी, गतलोभ जे. ॥ १०
'[5]महित [6]महि तत्पादस्पर्शें,' असें बुध वानिती.
[7]अहित अहि [8]तद्दृक्पातेंही [9]विमुक्तचि मानिती. ।
स्वपितृसख, जो [10]पक्षी, झाला तयाप्रति [11]मानद.
प्रभु गण महान् पीयूषाचा, न तत्प्रतिमा नद. ॥ ११
प्रभुपरिचयें [12]मोदें गोदावरी सहसा वरी.
[13]श्रितहितकरी; जे वंशींचे, तयांसह सांवरी. ।
[14]कुमति विषयासक्ता [15]भक्ताहिता बरि शोभली.
[16]शुचिरुचि रमा [17]जाया ज्या, या म्हणे, '[18]भुंज.' लोभली. ॥ १२
[19]श्रुतिसह तिची नासा, नासावया अघ, खंडिली.
मग [20]पललभुक्सेना [21]सेनां रणीं बहु दंडिली. ।
कनकहरिण प्रेषी द्वेषी दशास्य; तयास ती,
समजुनि मनीं, मागे, [22]देवद्विजायुदया, सती ॥ १३
प्रभुहि हरिणामागें लागे वनांत, खळा बरें
[23]मरणदशरें ताडी; केला तरी [24]छळ त्या [25]खरें. ।
सदय सदयस्वामी, त्या स्वर्ग दे हरिणा; महा
विजय निजयज्ञापूर्वांचा भला परिणाम हा. ॥ १४
प्रभुसमचि, 'हा सौमित्रे! हा प्रिय महिजे!' असी
[26]कपटिमणि तो मारी हाक, [27]श्रुतींत गमे [28]असी. ।
भय धरि सती; धीरा [29]दीरा वदे कटु, घालवी;
[30]अभयपथ दे घोरा चोरा, प्रदीपचि मालवी. ॥ १५

१. पृथ्वीपतीच्या. २. स्वतःच जो कल्पवृक्ष, तो (राम.) ३. साधूच्या झोंपडीच्या द्वाराला भजे. ४. स्त्री आणि बंधु यांसह. ५. पूज्य. ६. पृथ्वी. ७. दुष्ट दुर्जन. ८. त्याच्या दृष्टिपातानें देखील. ९. पराभूत अथवा पापयुक्त. १०. जटायु. ११. त्याला मान देता झाला. १२. हर्षानें. १३. आश्रितांचे हितकर्ते. १४. दुष्टमति (ताटका). १५. भक्ताच्या वैराला. १६. पवित्र रुचि. १७. पत्नी. १८. उपभोग घे. १९. कानांसहित तिचें नाक. २०. मांसभक्षक निशाचरांची सेना. २१. स+इना=धन्यासहित असी. २२. देव आणि द्विज यांच्या कल्याणार्थ. २३. मरणदायक बाणानें ताडी. २४. कपट. २५. त्या हरिणरूप दुष्टानें, मारीचानें. २६. मारीच. २७. कानामध्यें. २८. खड्ग. २९. दीर लक्ष्मण, याला. ३०. मुक्ति.

तंव दशमुखें, नेली[1], व्याघ्रें मृगी तसि, आगतें;
 समजुनि, करूं दे त्या दुष्टा, तदंतक[2], आग[3] तें. ।
विरथ करुनि क्रूरा, शूराधिराज[4], करी रिणी
 खगतिलक[5] तो देहत्यागें, सुमुक्ति शरीरिणी. ॥ १६
नग[6] नगवरीं[7] टाकी, नेतां, कपींत नभःपथें.
 अरि हरि; मुनिस्वांतें[8] झालीं अतीव धृतव्यथें[9]. ।
वसवि मळधी लंकेमध्यें अशोकवनीं पुरी.
 त्वरित बुडवी या, किंवा, ती भरी जठरीं सुरी. ॥ १७
अनुज[10] मनुजच्छद्मा[11] प्राग्दुरुक्त[12] कथी, रडे.
 प्रभुहि गणुनि स्वांत[13], स्वांतव्यथेंत[14] बळें पडे. ।
पळत उटजा आला, झाला, न[15] पाहुनि, घाबरा;
 सहजधृतिला[16] सोडी; जोडी नृभावचि हा बरा. ॥ १८
जसिच विरहीं स्त्रैणीं[17], शून्या गमे महि, मानवा;
 तसिच विभुला; दावी[18], गाया, असा महिमा नवा. ।
तरुंसहि पुसे, गोदेलाही, करूनि विलाप, हा
 विनवि अनुजा, 'सांगे, बापा! मला, न[19] तिला पहा?' ॥ १९
कळवि विरही, ऐसे शोकें उरीं उलतात, मी[20];
 सदय न बुडों दे ताताचा सखा, चुलता[21], तमीं. ।
सुतपण वरी, पक्षी लक्षी, पित्यापरि तत्क्रिया
 करि बरि, म्हणे, 'बा! हा!' दाहादि[22] साधुनि, सत्प्रिया[23]. ॥ २०
अनुजसहिता भक्षाया जो कबंध वनीं धरी,
 सदय तदघा[24] सारी, मारी, सुरार्ह[25] तया करी. ।

---

१. सीता नेली. २. त्याचा हंता, राम. ३. तें पातक. ४. वीरश्रेष्ठ जटायु. ५. पक्षिराज. ६. अलंकार. ७. उत्तम पर्वतावर. ८. मुनिहृदयें. ९. व्यथित. १०. लक्ष्मण. ११. मानवाचें सोंग घेतलेल्या रामास. १२. सीतेचें कठोर भाषण. १३. स्व+अंत=आपला नाश. १४. हृदयाच्या व्यथेंत. १५. सीता न दिसल्यामुळें. १६. स्वाभाविक धैर्यातें. १७. स्त्रीलंपट पुरुषाला. १८. मही (पृथ्वी). १९. 'तिला पहा, तूं पाहिलें नाहीं काय, हें मला सांग.' २०. मी ऐसे, मजप्रमाणें. २१. जटायु. २२. प्रेत जाळणें इत्यादि. २३. सज्जनाला प्रिया अशी तत्क्रिया. २४. तत्+अघा=त्याच्या पातकाला. २५. देवांना पूज्य.

प्रथम शबरी तारी. वारी दिवाकरनंदन[1]
प्लवग[2] सुगळ त्रासा; हा तो महोरग चंदन[3]. ॥ २१
प्लवगपति जो वाळी, वाळी[4] मदें अनुजा[5]; तया
निर्वटुनि[6], सख्या पाळी; टाळी क्षणांत महाभया. ।
कथि रविसुता, 'बा! जा राजा असें[7] स्वपदीं, नया'
न विसर; करी मोटी, कोटि स्तुतांघ्रि[8] असी, दया. ॥ २२
उपकृतिस तो राजा चित्तीं निरंतर आठवी;
कपि सुभट[9], ती श्री शोधाया, दिशांप्रति पाठवी. ।
श्रमुनि इतरां, लागे, ठावा जरीं नय, शोध न;
श्वसनतनया[10] दैवें, जें हें, परा न, यशोधन. ॥ २३
दशमुख जया[11] युद्धीं, पृथ्वीसुताहरणीं, मथी,
खग वडिल तद्भ्राता संपाति शोध भला कथी. ।
पवनतनुभू[12] अत्युत्साहें उडे शतयोजनें
जलधि; गणिला दिव्यें रामप्रतापचि तो जनें. ॥ २४
हुडकुनि पुरी[13], मुद्रा रुद्रावतार[14] सतीस दे;
कुशळ कळवी; तीही संदेश[15] जो हित, तो वदे. ।
मग रण करी मेघध्वाना[16]; बळें कपि सांपडे.
खळ न वळतां जाळी लंका; दशास्य[17] मनीं रडे. ॥ २५
पुनरपि उडे, ये श्रीरामासमीप महामती.
प्रभुसि मणि[18] दे; सांगे ते जे निरोप कथी सती. ।
प्रलय कळवी, जें तत्पापद्रुम प्रसवे फळ;
'छळपटु[19] नसे सामा मान्य प्रमत्त कधीं खळ.' ॥ २६
वचननिरत, ब्रह्म्यालाही सुदुर्लभ जो पिता,
प्रभुवर, तया[20] झाला आलिंगन प्रिय ओपिता. ।
पडुनिच गळां जैसा, तैसा गमे उपकार हा
स्तवुनि, भगवान् फेडी बोले, 'सुखी चिर बा! रहा.' ॥ २७

---

१. सूर्यपुत्र, सुग्रीव. २. वानर. ३. एक मोठा सर्प, आणि एक चंदनवृक्ष. दोहोंची परस्परप्रीति मोठी असते. ४. वर्जी. ५. सुग्रीवाला. ६. मारून. ७. हो. ८. कोट्यवधि जनांनीं पायांची स्तुति करावी अशी दया. ९. मोठे वीर. १०. मारुतीला. ११. ज्याला. १२. मारुति. १३. लंका. १४. हनुमान्. १५. निरोप. १६. मेघनाद, इंद्रजित, त्याशीं. १७. रावणा. १८. सीतेचा अलंकार. १९. कपटपटु. २०. मारुतीला.

जलनिधितटा[1] गेला, नेला मरुत्तनयें, रथें;
किति कपिबळें अत्युत्साहें उडोनि, नभःपथें. ।
सदलि[2] कमलीं तैसा, रामीं बिभीषण ये, रते.
न वळति असे जे श्रीरामा बळी पण येर ते. ॥ २८
चरण नमितां, लंकाराज्य प्रभूत्तम देववी,
श्रुतिनुतबळें ज्याच्या, विश्व प्रजापति देव वी. ।
विनवि कुपिता श्रीशा, भेटोनि, सिंधु, 'नसे तुला
जड; करिव, या बाणें दुष्टांसि विंधुन, सेतुला. ॥ २९
नळ कपि रची सेतु, क्षारोदकीं[3] शतयोजनें.
रडविलि सती तेव्हां मायाशिरें[4] पळभोजनें. ।
अजित[5] उतरे पारीं, वेंघे सुवेळनगावरी.
तंव निरखिला त्या दुर्गीं तो, कपिप्रवरें, अरी[6]. ॥ ३०
सुगळ उडुनि क्रोधें; त्याच्या गळांचि बळें पडे,
मुकुट उडवी, मोडी छत्रें, नियुद्ध[7] भलें घडे. ।
परिभव तया भावी[8] दावी बळीं, परते जया
मिळवुनि. शके दावायाला न तो पर तेज या. ॥ ३१
रघुपति म्हणे, 'बापा! तापावहा, बुध, साहसा
न वरि; न तुला, साधो! बाधो पराभव दाहसा. ।
रचिं अहितिं....दैन्या, सैन्या खळावरि पाठिव.
स्वहितवच हें, राजा! माझ्या सख्या! मनिं आठिव.' ॥ ३२
परपुर बळें रोधी, शोधी मनीं, पटु. अंगदा
कथुनि हृदय प्रेषी द्वेषिक्षपाचरभंगदा[9]. ।
अहित[10] नवळे सामा, रामा 'मनुष्य' म्हणे तमें[11].
गरळरससा[12], काढा गाढा गतायु जना, गमे. ॥ ३३
करिति समरारंभा[13], रंभादिमानस जो हरी.
प्रभुसि, 'हरितों बाधा; बा! धा जयें,' म्हणती हरी[14]. ।

१. समुद्रतीराला. २. चांगला भ्रमर कमळिणीमध्यें. ३. समुद्रामध्यें. ४. मांसभक्षक (राक्षसांनीं) रामाचें मायिक शिर दाखवून सतीसीता रडविली. ५. राम. ६. शत्रु, रावण. ७. बाहुयुद्ध. ८. पुढें होणारा पराभव. ९. दुष्ट राक्षसांचा भंग करणाऱ्याला. १०. शत्रु. ११. आत्मश्लाघेनें. १२. विषाच्या रसासारखा. १३. युद्धारंभातें. १४. वानर.

दशमुख महामानीं मानी स्वसिद्धि, म्हणे, 'असी
किति कपिचमू? मारा, मारारिदत्त[1] असे असी[2].' ॥ ३४

प्रथमचि रणीं मेला भारी प्रहस्त चमूपती.
दशवदनही भंगे, कांहीं दिसे न बरी गती. ।
घनरव करी उग्रा माया, वृथा जरि होय ती.
तरि मन म्हणेना, 'श्री दे, कीं जगन्नुत[3] होय ती.' ॥ ३५

उठवि अनुजा[4] कुंभश्रोत्रा; तया खपवि प्रभु,
प्रखर करिती, ज्या उग्राच्या क्षया, तप विप्रप्रभु[5]. ।
सकळ सुभट[6], भ्राते, पुत्र, प्रधानहि मारवी.
'अतुळ विभुचा, दिक्कंठाचा' म्हणे 'महिमा,' रवी. ॥ ३६

घनरव महामाय[7] व्योमीं दडे, निकरें अरी
बळसह ससुग्रीवा रामा शरार्त रणीं करी. ।
पवनसुत तों आणी दिव्यौषधीशिखर क्षणें,
वर यश वरी, भ्रात्यासैन्यासह, प्रभुरक्षणें. ॥ ३७

मग खळ वधी मायासीता; सुरांसि गमे खरें[8].
मुनिहि वदले, 'हा! हा! केलें सुदुष्कर या खरें[9].' ।
सुगळसह त्या सर्वांचेंही भ्रमे मन घाबरें,
क्षण न गमलें, लीलामर्त्या, जिणें, अनघा[10], बरें. ॥ ३८

करि करिवरत्रात्या[11] धात्या बिभीषण सावध;
'भ्रमकर तुम्हां झाला मिथ्याचि, सत्य न हा वध.' ।
करवि सहसा होमीं विघ्न स्वयें, पर मारवी.
रघुवरकरें, त्या दे आशी तदा, परमा, रवी. ॥ ३९

स्व तनुजनिच्या[12] शोकाग्नीनें दशानन भाजला,
असि धरुनियां, जातां सीतावधासि, न लाजला. ।
सचिव फिरवी यत्नें, धाडी चमू परमारणा[13].
प्रभुवर करी, तेव्हां तीच्या[14] वधा, परमा रणा. ॥ ४०

---

१. मार+अरि+दत्त=महादेवानें दिलेला. २. खड्ग. ३. जगत्+नुत=जगानें स्तविलेली असी. ४. बंधु कुंभकर्ण, त्याला. ५. ऋत्विजश्रेष्ठ. ६. वीरश्रेष्ठ. ७. माया मोठी ज्याची. ८. वास्तविक. ९. दुष्टें. १०. पापरहिताला, रामाला. ११. गजेंद्राचें रक्षणकर्त्या विष्णूला, रामाला. १२. पुत्र इंद्रजिताच्या. १३. शत्रुवधाला. १४. त्या चमूच्या (सैन्याच्या) वधासाठीं.

हतपललभुग्दारांचे त्या विलाप न सोसती.
म्हणति, 'पळही' रुद्धा क्रुद्धा 'पुरींत नसो सती. ।
प्रिय परम जे भ्राते, पुत्र, प्रधान, तयांविणें
मरणचि बरें. मानध्वंसीं अयोग्य जगीं जिणें.' ॥ ४१
सकटक निघे, आंगें न्हाया रणीं शव, शेवटीं.
खवळुनि गमे, शाखाछेदें, न यक्ष वसे वटीं. ।
कपिबळ वधी, भेदी सौमित्रिचें उर शक्तिनें.
परवश तसा तो मूर्छेनें, जसा शुचि भक्तिनें. ॥ ४२
रघुपति महादुष्टा रुष्टा करी विरथ क्षणें,
विकळहि शरत्रातें त्यातें, कळेवरतक्षणें. ।
पवनज जपे दास्या, लास्यावहा, बहु विष्णुच्या;
नुति रुचिहि दे आस्या, हास्यामृतासह जिष्णुच्या. ॥ ४३
पुनरपि कपिश्रेष्ठें शृंग क्षणांतचि आणिलें,
भगवदनुजस्वास्थानंदामृतीं बळ न्हाणिलें. ।
सुरपवचनें बैसाया दे, महारथ मातली.
प्रभु परचमू मर्दी, लंघूनि जी पथें मातली. ॥ ४४
मग सदरिसीं सत्रात्यासीं महारण मातला.
सुरपति जयाच्या संदेहीं क्षणक्षण घातला. ।
प्रभु शत शिरें खंडी, योगें वरें, तरि जोडिलीं
दिसति दशही; वाटे गेली स्वशक्ति, न तोडिलीं. ॥ ४५
घटज मुनि ये, जो या विश्वीं प्रसिद्ध महातपा,
'रविहृदय' दे, त्याच्या लावी जगद्गुरुला जपा. ।
रविहि वर, देव क्षोभे, दे; वधी दशकंधरा,
गिरिशनयनें, प्रेमाश्रूनीं भरी प्रभु, पंधरा. ॥ ४६

---

१. मारलेल्या राक्षसांच्या स्त्रियांचे. २. मानखंडना झाल्यावर. ३. पराधीन; परमात्म्याच्या ठायीं लीन. ४. बाणसमुदायानें. ५. शरीरच्छेदनेंकरून. ६. सेवेला. ७. नृत्यविशेष उत्पन्न करणाऱ्या. ८. मुखाला. ९. पर्वतशृंग. १०. लक्ष्मणाच्या स्वास्थ्यरूप अमृतामध्यें. ११. इंद्राज्ञेनें. १२. उन्मार्गगामी होऊन. १३. माजली. १४. साधूंच्या शत्रूशीं (रावणाशीं आणि साधूंच्या त्रात्याशीं (रामाशीं). १५. विजयाच्या. १६. अगस्ति. १७. मंत्रविशेष १८. पंधरा नेत्रें. एकेक मुखाला तीन तीन याप्रमाणें पांच मुखांचीं पंधरा.

दशमुख पडे, वार्ता लंघी महागिरिचे कडे,
बहु भय जडे [१]शत्रुस्वांतीं; यशांत शशी दडे. ।
कळिबळ झडे; माया [२]मुख्याश्रयापगमें रडे.
अघटित घडे; पृथ्वी हर्षे, करी मणि, जे खडे. ॥ ४७

प्रभुवर दिसे सत्पुष्पांच्या, मुहूर्त न, [३]वृष्टिनीं.
मग कवळिला देवर्षींच्या अवारित दृष्टिनीं. ।
सकळ भरिलें तों ब्रह्मांडोदर स्तवसृष्टिनीं,
अजितकृतिनीं धाले, जैसे [४]स्वतर्णक [५]गृष्टिनीं. ॥ ४८

मधुर [६]विविधध्वानें वाद्यें नभीं बहु वाजलीं,
[७]पटुमतिकृतें गानें नृत्येंहि, फारचि साजलीं. ।
स्तवनहि करी, नाचे, गाय, [८]प्रियंवद नारद,
प्रभुगुण जना शोभा देती, जसे वदना [९]रद. ॥ ४९

रघुपवचनें त्या संस्कारीं, बिभीषण उद्धता
वरुचि अरिता; तैशालाही मिळे अतिशुद्धता. ।
प्रभु मळ, जसा कांहीं राहे मनीं न तसा, धुतो.
मग बसविला, प्रेमें सिंहासनीं नत, साधु तो. ॥ ५०

अनिलजमुखें ऐके ती स्वामिच्या विजया सती.
अभिमत पदें देखावीं, हें कथी [१०]निज यास ती. ।
[११]अजितवदनें ने देवीतें, बिभीषण, पूजुनी;
म्हणति, 'विभुची लंका सासू नवी;' कवि, 'भू जुनी.' ॥ ५१

प्रभु तिस म्हणे, 'तूं होतीस द्विषत्सदनीं चिर,
व्रत मग तुझें कांते! कैसें असेल शुचि स्थिर? ।
निजकुळयशासाठीं, नेलें लया अरिचें शिर.
त्यजिलिस, म्हणेना मी लोभें तुला, 'निलयीं शिर.' ॥ ५२

[१२]क्षितिजनि म्हणे, 'स्वामी! हा मी स्वदेह हुताशनीं
[१३]भसित करित्यें, आलें ऐसें कसें तुमच्या मनीं? ।

---

१. शत्रुहृदयीं. २. मुख्य आश्रय नाहींसा होतां. ३. सत्पुष्पांच्या वृष्टीनें झांकला गेला. ४. आपले वत्स. ५. एकवार प्रसूता गायींनीं. ६. वेगवेगळ्या नादांचीं वाद्यें. ७. चतुर-बुद्धिजन. ८. गोड भाषण करणारा. ९. दांत. १०. आपली इच्छा. ११. रामाच्या सांगण्यावरून. १२. जानकी. १३. भस्म.

झडकरि रचीं बा! सौमित्रे! मदर्थ बरी चिता.
न गणुनि तसीं तीं[1] दुर्वाक्यें, करीं सुगुणा! हिता.' ॥ ९३
अ[2]सु, वै[3]सु, सुखें तत्कार्या तो दयाकर वेचिता.
रचवि गु[4]रुता, न स्वातंत्र्यें तया करवे, चिता. ।
शिरलि, पतिच्या, ध्या[5]त प्रेमें तदा चरणास, ती
ज्वलितदहनीं, तज्ज्वालासी, स[6]दाचरणा सती. ॥ ९४
सशपथ करी दि[7]व्या, ख्याता जिची महि माय ती.
हरविधिमुख ज्ञाते गाती, महामहिमा, य[8]ती. ।
बसवि द[9]हन श्रीरामांकीं ज[10]गत्रयसंपदा.
बहु निजपदीं शोभे सीता र[11]मा, क[12]लिकंपदा. ॥ ९५
निववि[ल]ि रमा प्रेमें, रामें, करूनि अ[13]नुग्रहा.
यश करि जगीं तैसें बोले, परंतु अनुग्र हा. ।
दशरथ नृप प्रेमें भेटे सुतांसि, निवे; दिला
ब[14]हुमह शिवें, तो त्या विश्वस्तुतांसि निवेदिला. ॥ ९६
नमिति, रडती, हें, भक्तांची सभा, परिसून, ती;
करि, गुरुपदा साक्षात् विश्वप्रसू, परिसू, नती. ।
प्रभु विनवि, दे कैकेयीतें अ[15]भी, भर तापवी.
बहुत नच हो, शोकाचा बा! न[16]गा भरता पवी.' ॥ ९७
दशरथ म्हणे, 'रामा! माझें असें मन भावितें,
सकळ घडलें शापें, होतेंचि जें बळि भावि तें. ।
दशमुखवधा, देवांनीं या, स[17]भापदका मति
भ्रमविलि तिची; यामूळें बा! धरी प[18]दकाम ती[19]. ॥ ९८
नरपति, महाबाहो! बा! हो; असो बरवि प्रजा;
चरित रच तें, गाती ध्याती मनीं वरविप्र ज्या. ।

---

१. तीं अरण्यामध्यें मारीचवधप्रसंगीं केलेलीं दुष्ट भाषणें लक्षांत न आणितां. २. प्राण. ३. धन. ४. वडिलपण; तिच्या आज्ञेमुळें त्यानें चिता रचिली, स्वेच्छेनें नव्हे. ५. प्रेमानें चरणाचें ध्यान करीत. ६. शुद्ध आचरण जीचें, अशी. ७. शपथपूर्वक ती दिव्य करी. ८. इंद्रियनिग्रहीजन, मोक्षेच्छु. ९. अग्नि. १०. त्रिजगताची संपदा, सीता. ११. रमणारी, प्रिया. १२. कलीला भीति देणारी. १३. कृपा करून. १४. फार आनंद. १५. अभय. १६. भरतरूप पर्वतांवर अधिक शोकरूप पवि (वज्र) न पडो. १७. सभेला शोभा अशी. १८. राज्याची इच्छा. १९. कैकयी.

पुरविं सकळा कामा, रामा! करीं मुनिरंजना.
स्थिर यश असो; बापा! तापा हरो; [१]सुनिरंजना!' ॥ ५९

[२]विधिगुरुहि त्या अत्यानंदें, 'अवश्य' असें वदे;
हृदयगत जो पुत्रप्रेमा तयासि ढळा नदे. ।
पुसुनि [३]सगुणब्रह्मातें तो [४]विमानवरीं बसे.
[५]शतमखसख स्वर्गी देहें, मनें, [६]अजितीं वसे. ॥ ६०

[७]सुरप, अमृतें, मेलें होतें रणीं बल, सर्व तें
उठवि; हनुमान् जैसें पूर्वी महौषधिपर्वतें. ।
प्रभुसि कळवी पूजायाची, बिभीषण, कामना.
प्रिय विभु कथी जें, तें त्याच्या न येइल कां मना? ॥ ६१

'सबळसुगळा पूजीं बा! या; न त्या भरताविना,
वद, मम मना [८]तत्तापाचा कसा भर ताविना? ।
[९]मंदपचिति हेत्याची, तर्पावया [१०]अंसु, [११]खेंव दे.'
प्रभुवर असें, जाया, सारीं, लया, असुखें, वदे. ॥ ६२

सबळसुगळा पूजी प्रेमें, जगज्जनका मग,
[१२]द्रविणपतिचें, दे बैसाया, विमानहि [१३]कामग. ।
अनुज, दयिता, [१४]किष्किंधेश, [१५]क्षपाचरनायक,
प्लवगहि, नभोयानीं घे तो प्रभु प्रियदायक. ॥ ६३

रघुपति जयें त्रैलोक्यातें प्रहृष्ट करूं निघे.
[१६]अवनिजनितें अंकीं भ्राल्या प्रहृष्ट करूनि घे. ।
[१७]रणमहि तिला दावी, लावी कथा; विरहव्यथा
कळवि, पुरवी, गानें पानेंहि, जी सुमनोरथा. ॥ ६४

प्रभुवर म्हणे, 'प्रेक्षीं शोभा, [१८]सुधानदिसेतुला.
[१९]सुपटु नळ हा, याला कोठें बुधा न दिसे [२०]तुला. ।
[२१]सुकवि रचिता, त्वत्प्राप्तीच्या न या, जरि, हेतुतें,
सखि! निरखिते माझे डोळे कसे तरि हे तुतें? ॥ ६५

१. हे पापरहिता, रामा. २. ब्रह्मयाचा पिता. (राम.) ३. रामाला. ४. श्रेष्ठविमानीं. ५. इंद्रसख, दशरथ. ६. परमेश्वराच्या ठायीं. ७. इंद्र. ८. भरताच्या तापाचा भर. ९. माझी पूजा. १०. प्राण संतुष्ट करायाला. ११. त्याची खेंव, आलिंगन. १२. कुबेराचें. १३. यथेच्छ फिरणारें. १४. सुग्रीव. १५. राक्षसेंद्र. (बिभीषण.) १६. सीतेला. १७. रणभूमि. १८. समुद्रसेतूला. १९. फार चतुर नळ. २०. तुलना. २१. नळ.

सुमुखि! मज या स्थानीं भेटे बिभीषण आडवा;
विजयचि गमे, किंवा आमंत्रणोत्सव वाडवा[1]. ।
सुगळहि सखा झाला, या ऋष्यमूकनगीं भला;
सुदति! जय हा या साधूनें द्रवोनि दिला मला.' ॥ ६६
जनकतनया स्वस्वामीतें मनोगत जाणवी,
सुगळदयिता तारा तारावयास्तव आणवी. ।
मुदितहृदया आली, आली तैसी[2] बहुमानिली;
उपकृति मुखें सत्या अत्यादरें बहुवानिली. ॥ ६७
अजित कथि, 'हे पंपा, संपावया श्रम, सेविती.
बहु मुनि इतें, आले, धाले सदा, तरि[3] देवि ती. ।
न, तव, विरहीं, रीति प्रीतिप्रदा मज आढळे;
न निववि मना, रामें वामें(?) धृति त्यजि या, ढळे. ॥ ६८
सति! ममगुणासक्ता, भक्ता, तपोनिधि[4] पाहिली;
अनुदिनहि मद्ध्यानीं ज्ञानी जसे, तसि राहिली; ।
मधुर बदरें[5] अर्पी, तर्पी, प्रिये! मज मायसी;
तदपचितिनें[6] धाली, झाली मति, क्षण, हायसी[7]. ॥ ६९
सति! धरि मला खाया, वत्साहि[8], राक्षस[9] या वनीं.
परि पर[10] मरे; भारी तेज व्रतीं तव पावनीं. ।
भुज उतरिले दोघांनीं दोन, जे गुरु योजन[11];
त्रिदशपतिसा[12] झाला प्राप्ताखिलामिषभोजन[13]. ॥ ७०
सुतनु! दनु[14] तो त्वत्प्राप्तीचा उपाय मला भला
कथि हित; तयाऐसा कोणीहि साधु न लाभला. ।
तरणितनया[15] सुग्रीवासी महासति! भेटलों;
खळबळवनीं[16], या वातें, मीं दवानळ पेटलों. ॥ ७१
मतिमति! सति! प्रेमें गोदावरीस पहा, नमीं.
तट गुरु म्हणे ईचें, 'सर्वाहि सिद्धि, लहान मी.' ।

---

१. ब्राह्मणाला. २. सखीतसि. ३. उतरून नेणारी नौका. ४. एक शबरी. ५. बोरफळें. ६. तत्+अपचितिनें=तिच्या पूजनेंकरून. ७. त्रासापासून सुटलेली. ८. लक्ष्मणालाही. ९. विराधनामा. १०. शत्रु. ११. योजनभर लांब. १२. इंद्रासारिखा. १३. प्राप्त+अखिल+आमिष+भोजन. (राक्षस.) १४. राक्षसविशेष, दनुकबंध. १५. सूर्यपुत्र सुग्रीवाला. १६. दुष्टाचें सैन्य हेंच वन, यामध्यें.

तव उटज[1] तें, जें प्रासादाधिक[2] प्रिय लेखिलें,
खगमृगशत[3] स्नेहें जेथें अपत्यचि लेखिलें. ॥ ७२
स्मर, करि परित्राण, त्यागूनि देह, जटायु, तें;
नत सुमुकुटें शीर्षें जेणें, तसींच जटायुतें[4]. ।
दशरथ तसा, पावे कांते! तिलोदक पिंड तो.
निर्पटुनि[5] भिदा गेली, जीर्णें भवीं जन हिंडतो.' ॥ ७३
घटजमुनिच्या[6] स्थाना, नानालताद्रुम[7]मंडिता,
निरखुनि नमी लोपामुद्रासतीसह पंडिता. ।
प्रभु मग तिला दावी त्या चित्रकूटनगा, 'महा,
सुचपळमनोमत्ताश्वाचा, वरोरु[8]! लगाम हा.' ॥ ७४
रघुपति म्हणे, 'हा तीर्थेंद्र प्रयाग, असा धुतो
दुरित; भजतां यातें, होतोचि साधु[9] असाधु तो. ।
सतत यमुना गंगा संगा न सोडिति यांचिया[10].
म्हणति पतितां जीवां, 'तारूं पळांतचि या चि या.' ॥ ७५
उतरुनि[11] भरद्वाजा वंदी, मुनींद्र गळां पडे,
दशरथ तसा, प्रेमें गोंजारुनि[12] प्रभुला, रडे. ।
पवनतनया[13] धाडी स्वामी गुहाभरताकडे.
पर किति सुखीं त्या योग्यांचे समाधिजहीं दडे. ॥ ७६
करुनि चवदा वर्षे पूर्ण, प्रयागपदीं गुहा
निववि, मग त्या भक्ता भ्रात्या[14], महेश जसा गुहा[15]. ।
सुखविलि पुरी रामें, मेघें मही अखिला जसी;
शचि मानि म्हणे कैकेयीतें 'वृथा सखि! लाजसी.' ॥ ७७
स्वगुरु, जननी, भ्राते, पौर, प्रधान, तथा रसा[16],
सुखवि सकळां, प्याया लावी पवित्रकथारसा. ।
करुनि करुणा, राजा होय प्रजापरिपाळणा.
जग मुल म्हणे, 'कैसें त्रात्या म्हणों परि 'पाळणा.' ॥ ७८

---

१. झोंपडें. २. राजवाड्याहून अधिक. ३. पक्षी, पशु, यांचें शत, शेंकडा. ४. जटायुक्त. ५. भेद निघून गेला. ६. अगस्त्याश्रमाला. ७. द्रुम=वृक्ष. ८. हे सुंदरि. ९. जो असाधु तो साधु होतो. १०. याच्या. ११. विमानांतून उतरून. १२. कुरवाळून. १३. मारुतीला. १४. भरताला. १५. कार्तिकेया. १६. पृथ्वी.

[1]प्लवगखचरक्ष्मापाळांचा करि प्रभु गौरव,
    स्मरण चुकवी ज्या देवाचें सुदुस्तर रौरव[2]. ।
जनकतनया कौसल्येनें जसी बहु मानिली,
    सुगळमहिषी तारा प्रेमें तसी बहु वानिली. ॥ ७९
प्रभु करि मरुत्पुत्रीं प्रेमा, तदर्ह असीम हा;
    सुभजक जसी पावे पूजा, न अन्य असी महा. ।
स्वशुचियश तो 'वांच, प्राशीं यथेष्ट यशा वरा[3]!'
    प्रभुवरमुखें पावे सद्वृंदवंद्य[4] अशा वरा. ॥ ८०
तिळहि उरवी मूळाविद्या[5] सदैन्यभयाघ न,
    स्वजनहृदयीं स्वप्नींही सन्मयूरदयाघन, ।
न लवति कुधी कामी लोभी, जरी पर मागती,
    नच, गुरु जना तैशांही दे स्वयें परमा गती. ॥ ८१
'सच्छ्राव्यरामायण' हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. ॥ १

---

## ६२. श्रवणामृतरामायण[6].

(नर्दटकवृत्त[7].)

दशरथनंदन त्रिभुवनप्रभु होय, दया
    करि भजकांवरि, स्वजनचातकतोयद[8] या; ।
सुरुचिस ठेविलें रुचिर नामहि 'राम' असें[9]
    स्वंजपरता[10] म्हणे, 'गतिस होउनि धाम[11] असें[12].' ॥ १
प्रभुवर कोसलाधिपसुतासुत[13] होय जसा,
    भरतहि तोचि, जो वरपद प्रभुभक्तिरसा; ।

---

१. वानरराजा आणि राक्षसराजा यांचा. २. ज्या देवाचें स्मरण रौरव (नरक) चुकवी. ३. श्रेष्ठा. ४. साधुजनांच्या समुदायास मान्य, वंदनीय. ५. मूळमाया. ६. श्रवणांला (कानांला) अमृतासारखें मधुर हें काव्य आहे, म्हणून यास 'श्रवणामृतरामायण' असें नांव दिलें. ७. 'यदि भवतो नजौ भजजला गुरु नर्दटकम्' असें या वृत्ताचें लक्षण आहे. यांत न, ज, भ, ज, ज, लघु (अक्षर), गुरु (अक्षर)–अशी गणांची व अक्षरांची आवृत्ति असते, आणि यति आठव्या आणि सतराव्या अक्षरावर असते. ८. स्वजनरूप चातकांचा मेघ. ९. याप्रकारें. १०. स्व+जप+रताला. ११. स्थान. १२. रहा. १३. कौसल्यासुत.

गुणनिधि लक्ष्मण, स्तुत अरिघ्न चतुर्थ कृपा
करुनि, सुपुत्र [1]शर्म बहु दाखवि साधुनृपा. ॥ २
प्रथमचि [2]गाधिजक्रतुविनाशकरांत करी,
चरणरजें [3]महामुनिसतीप्रखराघ हरी, ।
हरधनु भंगुनि क्षितिसुतेप्रति राम वरी,
जनकसुतोर्मिळाकरहि लक्ष्मण वीर धरी. ॥ ३
भरत अरिघ्न जे वरिति ते [4]जनकानुजजा,
हरि रघुवीर राम सकळा भृगुरामरजा, ।
प्रभु [5]भरतप्रसूप्रिय करी, 'पितृसत्यधना
व्यय न घडो,' म्हणे वरुनि वल्कल, जाय वना. ॥ ४
प्रमुदित लक्ष्मणक्षितिसुतायुत साधु निघे,
वसुनि तपोवनीं मुनिजनप्रिय साधुनि घे; ।
नृप विरहीं भरे, भरत ये प्रभुला शरण,
प्रभुवरपादुका करिति [6]तच्छ्रमसंहरण. ॥ ५
सुखवुनि अत्रितें, मग करूनि विराधवधा,
विमळयशें म्हणे मुनिजनासि रमाधव 'धा;' ।
[7]श्रुतियुगनासिका अनुज योजुनि कापविली,
[8]खचरपतिस्वसा कुमति दंडुनि तापविली. ॥ ६
सकटक मर्दिला खर निशाचर; शूर्पणखा
दशवदना म्हणे, 'खळ नराप्रति आपण खा. ।
कपट करूनि, तो जनकजेसि कुधी उडवी;
वधुनि जटायुला, प्रभुवरा असुखीं बुडवी. ॥ ७
पवनसुत स्वयें रविसुता [10]सुगळा [11]अजिता
मिळवि; उरों दिला रघुवरें [12]हरिभू न जिता. ।
[9]पवनसुतें पयोनिधि विलंघुनि, [13]भूमिसुता
सुखविलि, मुद्रिका जपुनि देउनि, विश्वनुता. ॥ ८

---

१. सुख. २. विश्वामित्राच्या यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या राक्षसांचा नाश. ३. अहल्येचें तीव्र पाप. ४. जनकाच्या धाकट्या भावाच्या कन्या. ५. भरताच्या मातेचें, (कैकेईचें) इष्ट. ६. त्याच्या श्रमाचा नाश. ७. दोन्ही कान आणि नाक. ८. राक्षसराजाची बहीण. ९. मारुती. १०. सुग्रीवाला. ११. रामाला. १२. वाली. १३. सीता.

खळबळ मर्दिलें, नगर जाळुनियां, अरितें
भिववुनि अर्पिला प्रमद दंभनरा हरितें. ।
अमित सुरांश [1]ऋक्ष, [2]कपि, ने.......भिववी
जलधिस, [3]देवराजनयनें प्रभु तो निववी. ॥ ९
[4]दशवदनानुजें [5]नति [6]सकृत् करितांचि, तया
प्रभुवर राज्य दे; करि पित्याहुनि फार दया. ।
रचवुनि सेतुतें, जलधितें उतरे, अरितें
कळवि, 'यश, क्रिया बरवि न त्यजितां, वरितें.' ॥ १०
कुमति दशानन त्यजुनि साम, करी समर;
प्रभुहि म्हणे तया, [7]मृगप जेंवि करीस 'मर'. ।
जय न दिसे, बळक्षयचि; [8]मेघरवें अहितें
[9]प्रभुयुगबंधनें करुनि कांपविलें महितें. ॥ ११
सकळखगेंद्र जो, भुजगबंधन तो हरि; तें
हृदय भरी [10]महें, गमवि [11]ज्या गुरु मोह, रितें. ।
प्रमुदित सानुज प्रभु उठे, सुर तोयज या
रवि विनतासुता म्हणति, सिद्धचि होय जया. ॥ १२
मग घटकर्ण ये धरि रविप्रभवास, वधी
अजित तया, यशें निववि सामर वासवधी. ।
घनरव सर्व ते प्रभुसमेत सुवीर खिळी,
अजगरसाचि तो प्रबळ मोह, तयासि गिळी. ॥ १३
उठवि मरुत्सुत त्वरित ओषधिपर्वत, तें
यश मिळवी महें जग; भरी बळ सर्व [12]ततें. ।
कपटसतीवधें म्हणवि, 'हाय!' तया सरणी
धरवुनि मृत्युची, सुपद होय जयास रणीं. ॥ १४
घनरव लक्ष्मणें निवटितां, दशकंठ रडे,
धरि महिजावधा [13]असि, सुमंत्रिप आड पडे. ।
बळ चतुरंग जें प्रभुवधा खळ पाठवि, तें
[14]भसित करी, प्रभु त्रिदशमानस आठवितें. ॥ १५

---

१. अस्वल. २. वानर. ३. इंद्राचीं नयनें. ४. बिभीषणानें. ५. नमन. ६. एकवार. ७. सिंह. ८. मेघनादानें. ९. रामलक्ष्मणांच्या बंधनेंकरून. १०. उत्सवें. ११. ज्या हृदयाला. १२. विस्तृतें. ('महें' या शब्दाचें विशेषण.) १३. खड्ग. १४. भस्म.

खरतरशक्तिनें मग विदारुनि वक्ष, अरी
सुविकळ लक्ष्मणा रघुवराहि, मुहूर्त, करी. ।
उठवि रणीं तया कपि, महौषधिशृंग जवें.
पुनरपि आणुनि, स्वयश गाववि भव्य नवें. ॥ १६

परमविभूतिचा, वरुनि शक्ररथासि, धणी,
रण करि भारती, दिवसरात्रिहि सप्त, गणी. ।
चळचळ कांपवि क्षितिसि, कंपित राजफणी.
न घण मणी शिरें उडवितां शत यातुमणी. ॥ १७

घटज सुमंत्र दे, द्युमणिही वर, तच्छमना;
वधुनि दशानना, वरि जय, प्रभु अच्छमना, ।
'जय! जय!' बोलिले, कुसुमवृष्टि करूनि, सुर.
द्रुहिण[1] म्हणे, 'द्विजव्रज सुकर्म करू निसुर[2].' ॥ १८

दशवदनक्रिया करवुनि, प्रभु राज्यपदीं
बसवि बिभीषणा सुचिर, जेंवि झषासि[3] नदी. ।
मग करि दिव्य ती सुकृतकीर्ति, अनादि सती.
दशरथ मेघ ते, सुत मयूर, जना दिसती. ॥ १९

रणमृत सैन्य तें अमृत वर्षुनि वांचविलें.
सुरपतिनें यश प्रभुयशासम सांचविलें. ।
प्रभुवचनें, करी सुगळ सत्कृति फार बरी.
धनद[4] विमान दे, कवि बिभीषण पाय धरी. ॥ २०

बसवुनि पुष्पकीं, सबळ[5] कीशपलाशपती,
बसुनि सदार सानुज, निघे प्रभु वायुगती. ।
रणमहि दाखवि प्रभु सतीस सुवीरकथा
कथि, अवलोकवी नळकृताद्भुतसेतुपथा. ॥ २१

स्थळ कळवी, कथी, 'मज बिभीषण देवि! 'जय'
प्रथम म्हणे रणीं अतुळ साधुनि दे विजय.' ।
मग सुगळातिची हितकथा तिस आयकवी,
त्यजिल अशा रसा, इतर वर्णुनि काय कवी? ॥ २२

---

१. ब्रह्मा. २. निष्काळजी असा. ('द्विजव्रज' या शब्दाचें विशेषण.) ३. मत्स्यासि. ४. कुबेर. ५. वानर, राक्षस, यांचे पति.

चिरविरहव्यथाशतकथाहि रसें कथित,
प्रथितयशा सुखी करि सतीमन, जें व्यथित. ।
स्थळ अनुभूत तें अखिल दाखवि, ये नगरा,
प्रभु भरतासुखा उरवि, शंभु जसा, न, [1]गिरा. ॥ २३
करि अभिषेक या प्रभुवरासि वसिष्ठमुनी,
स्तवि विभुकीर्तितें कविसभा, तसि [2]देवधुनी. ।
सुगळबिभीषणप्रमुख सर्वेहि हर्षवुनी
गमवि गुणें उणें अमृत, सद्रस वर्षवुनी. ॥ २४
पवनसुतीं करी बहु दया, वर दे शतदा.
उपकृति आठवि, स्तविहि तो वरदेश तदा. ।
अति सुखवि प्रजा सकळभक्तमयूरघन
त्रिभुवन पावनस्मरणकीर्तन सुज्ञधन. ॥ २५

---

## ६३. विबुधप्रियरामायण.

(हरनर्तन अथवा विबुधप्रिया छंद.)

[3]श्रीश, पद्मजऋष्यशृंगसनत्कुमारतपोबळें,
अश्वमेधवसिष्ठसत्सुकृतें, [4]स्वकीयकुतूहलें, ।
[5]दिग्रथात्मज होय, चार धरी सुमूर्ति, समुज्वळें
[6]आदिसत्कविविश्वभाग्यभरें, [7]दशास्यकृतच्छळें. ॥ १
[8]कोसलेश्वरजा जया प्रसवे, तया शुभ 'राम' हें
नाम ठेवुनि, दिग्रथप्रभु, रंजवी भुवना [9]महें; ।
[10]केकयप्रभवात्मजा 'भरत;' [11]प्रिया तिसरी तिच्या
[12]भव्य 'लक्ष्मण' हें, '[13]अरिघ्न' असें, पदासि सुरीतिच्या. ॥ २
श्रीवसिष्ठ तयां करि [14]द्विजें; आदरें पढवी श्रुती;
गाधिजा, गुरु राम लक्ष्मण देववी, करुनि स्तुति. ।

---

१. विषा. २. भागीरथी. ३. श्री+ईश=लक्ष्मीपति (राम). ४. आपल्या कौतुकानें. ५. दिग्+रथ+आत्मज=दशरथाचा पुत्र. ६. वाल्मीकिच्या सर्व भाग्याच्या भरानें (अतिशयानें). ७. श्रीश चार सुमूर्ति धरी–हें मुख्य वाक्य. इतर वाक्यें या वाक्याचीं कारणें होत. ८. कौसल्या. ९. उत्सवानें. १०. कैकेयीपासून झालेल्या पुत्रास. ११. तिसरी स्त्री सुमित्रा. १२. कल्याणकर. १३. शत्रुघ्न. १४ त्यांचें उपनयन करी.

दे बळातिबळा[1] तयां मुनि, सर्व अस्त्र, पथीं, कथी;
ताटकेसि, मखघ्न राक्षस जे तयांसहि, तो मथी. ॥ ३
गौतमर्षिवधूसि[2] पादरजोनिळें[4] प्रभु उद्धरी[3];
शंभुच्या धनुचे, पळांतचि ओढितां, तुकडे करी. ।
जानकी, पणसिद्धि पाहुनि, हर्षुनि, प्रभुतें वरी,
दे तिघांसि सुता तिघी, जनकासि कीर्ति मिळे बरी. ॥ ४
होय भार्गवरामहि, प्रभुदर्शनेंचि तपोनिधी;
शुद्ध शांतिमती करि, श्रुतितें जपोनि, तपोनि, धी ।
हर्षली नगरी; करी, यश, फार लज्जित, कापुरा;
सानुजा भरतासि मातुळ ने, धृतोत्कुतुका[5], पुरा. ॥ ५
दिग्रथाप्रति योजितां युवराज राम करावया,
सप्रधान म्हणे वसिष्ठहि, 'हा विचार बरा वया.' ।
मध्यमा दयिता[6] वदे, वर दोन हे रुचले मना,
'मत्सुता अभिषेक[7], राम चतुर्दशाब्द भजो वना.' ॥ ६
राय तीस म्हणे, 'दिलें तुज राज्य; दृक्कुतुकानना[8]
राघवा, सति ! सख्य आठिव तूं, न पाठिव कानना. ।
मंथराहृतबुद्धि[9] ती न वळेचि; तें कळतां निघे
राम, सानुजदार, मातृनिदेश[10] वेद गणूनि, घे. ॥ ७
तातसत्यमहाव्रतावनकाम[11] राम महापथीं
चालतां, जन 'हा!' म्हणे, बसवी नरेंद्र तया रथीं. ।
वल्कली प्रभु, जो सखा गुरु, त्यास भेटुनियां, जटा
यत्पयें रचि साश्रु, धन्य करी निषादवरा, वटा[12]. ॥ ८
त्यास्थळींच सुमंत्र सोडुनि, देव सिंधुसि तो तरे,
यद्यशःकथनें गुरूसहि[13] होति संमत तोतरे[14]. ।

१. विद्यानामविशेष त्या. २. गौतम+ऋषि+वधूसि=गौतमऋषीच्या स्त्रीला. (अहिल्येला.) ३. अहल्येला. ४. पाद+रज+अनिल=चरणधूलीसंबंधी वायूनें. ५. धृत+उत्कुतुक=धरिलें उत्कृष्ट कौतुक ज्याणें अशा. ६. मधली राणी कैकेयी. ७. राज्याभिषेक. ८. दृक्+कुतुक+आनन=दृष्टीला कौतुक देणारें मुख ज्याचें अशा रामास. ९. मंथरादासीनें हरिलीं आहे बुद्धि जीची, अशी कैकेयी. १०. आईची आज्ञा. ११. बापाचें सत्यरूपजें महाव्रत त्याच्या रक्षणाची इच्छा करणारा. १२. वडाला. १३. बृहस्पतीला. १४. बोलत्यावेळीं अडखळोन एक एक अक्षर दोनतीनवेळ ज्यांच्या बोलण्यांत येतें ते.

श्रीप्रयागगत स्वतातसखा[1] महामुनितें नमी,
चित्रकूटनगीं करी मग धन्य सर्व यमी[2] शमी[3]. ॥ ९
रामवृत्त कथी सुमंत्र, पुरासि येउनि दिंप्रथा[4];
ऐकवी महिषीस[5] तो, निजशापकारण जी कथा; ।
'राम! राम!' असें वदे, सुतशोकरूपमहाव्यथा
पावुनि, व्यसु[6] होय, लंघुनि जाय संसृतिच्या[7] पथा. ॥ १०
दूत धाडुनि, सानुजा भरता गुरु द्रुत आणवी;
भेटतांचि, तयासि ती जननी स्वकौशल[8] जाणवी. ।
तो वदे तिस, 'धिक्! तुझें कृत लाजवीलचि यातुतें[9].
हा जडे! त्यजिलें सुधाफळ; काय गे! हित या 'तुतें[10]?' ॥ ११
क्षिप्र तैलनिमग्न तातशरीर काढुनि, तत्प्रिया,
राम मात्र मन प्रसन्न करूनि, साधु करी क्रिया. ।
'राज्य घे,' म्हणतां, गुरूक्तहि[11] तो विलंघुनि, अग्रजा[12]
गाय; जाय, धरावया शिरिं पापपर्वतधग्रजा[13]. ॥ १२
भेटतांचि सुशील तो बुध, संहरी गुहसंशया;
गौरवी मुनि, विष्णुचा समजे मनीं शुचि अंश यां[14]. ।
चित्रकूटनगीं नमी, गुरुची[15] कथि प्रभुला गती[16];
तो पित्या जळ दे, यदंघ्रिस पद्मजादिक लागती. ॥ १३
भक्त तो विनवी दयाब्धिस, 'दीनपा[17]! परत; क्षण[18]
स्वप्रजेप्रति देचि; एकहि, मी न पापरत, क्षण. ।
माय बालिशबुद्धि केवळ; काय ते धरिसी मनीं?
हाय! हे, न वसावया, मृदु पाय, योग्य नगीं[19] वनीं. ॥ १४
दे प्रभो! अभया मला, घन दे तसें खगपा[20] वना[21];
पाव; नाम यशस्वि हो; द्रवलासि बा गजपावना[22]! ।

१. आपल्या पित्याचा मित्र महामुनि त्यातें. २. इंद्रियें जिंकिलीं ज्यांहीं असे ऋषी. ३. शांत, अक्षुब्ध. ४. दशरथा. ५. स्त्रीस. ६. वि+असु=गतप्राण. ७. संसाराच्या. ८. आपलें चातुर्य. ९. राक्षसातें. १०. तुला. ११. वसिष्ठाचें सांगणें दखीले. १२. रामा. १३. पाप्+पर्वत+धक्+रज=पापरूपपर्वताला जाळणाऱ्या धुळीला. १४. भरताला. १५. पित्याची. १६. गमनं, मरण. १७. अनाथरक्षका. १८. उत्साह. १९. पर्वतीं. २०. चातकपक्ष्यास. २१. उदका. २२. गजेंद्राच्या रक्षणासाठीं.

पावना[1] तव कीर्ति मोहिती, जेंवि जंतुसि आसरा[2],
आ सरा[3] करिती तुला जन; दे नताप्रति आसरा[4].' ॥ १५
साश्रु होय, वदे, तया कुरवाळुनि प्रभु बापसा,
'तापसा[5] न गमो अनुग्रह, भार हा मज बा! पैसा[6]; ।
कीं तुलाहि, मलाहि, युक्त गुरूक्तपालनधर्म हा,
शर्महानि करी, जना म्हणवी सदा परधर्म 'हा[7] !' ॥ १६
पादुका प्रभुच्या शिरीं धरि, 'संपतां चवदा समा[8],
तूं न येसिल, होमिन ज्वलनीं तनू समिधासमा.' ।
स्पष्ट यापरि तो वदे भरत; स्वयें परते; करी
वास बाहिर, वल्कलाजिन वन्यवृत्ति[9] सुखें वरी. ॥ १७
जाय तेथुनि, सत्तपःफळ अत्रिचें मन लोभवी.
तत्प्रिया[10] बहु, मायसी, जनकात्मजातनु शोभवी. ।
जो विराध[11] धरी, हरीहि समुद्धरी प्रभु हा तया;
जाणवी उदयार्थ जोडुनि, कीं न जोडुनि हात, या. ॥ १८
[12]दंडकीं शरभंग आणि सुतीक्ष्ण, कुंभज, सन्मुनी,
जे स्वदर्शनकाम संतत सत्तपोरत[13] जन्मुनी, ।
त्यांसि भेटुनि, तन्मतें शरणागताभयदायकें
गृध्र तातसखा जटायुहि पूजिला रघुनायकें. ॥ १९
वास पंचवटींत लक्ष्मणनिर्मितीं उटजीं करी;
[14]यातुपत्यनुजा कुबुद्धि सुरूप शूर्पणखा धरी. ।
ये, गळींचि पडे रतार्थ, जसी बळें [15]हरिच्या खरी[16].
घ्राण कर्ण, रघूत्तमानुज तो, तिचे असिनें[17] हरी. ॥ २०
मूढ बंधु तिचा, न जो प्रभुची धरी परवा, खर;
राम तो सदसि[18], प्रशस्त महा गमे, परें[19] वांखर[20]. ।

---

१. पवित्र करणारी. २. अप्सरा, पिशाच, जलदेवता. ३. तुला सरोवरा. ४. थारा. ५. संतापासारखा. ६. हात जोडणें. ७. हाय. ८. वर्षें. ९. वनवासता. १०. अत्रिस्त्री. ११. राक्षसविशेष. १२. दंडकवनीं. १३. उत्तम तपामध्यें रत. १४. यातु+पति+अनुजा= राक्षसपती जो रावण त्याची कनिष्ठ भगिनी. १५. सिंहाच्या. १६. गर्दभली. १७. खड्गानें. १८. सत्+असि=उत्तम खड्ग. १९. शत्रु. २०. वस्तरा.

जे सहस्र चतुर्दश क्षणदाचर[1] त्रिदशारि[2], ते
संगरीं पडले, पळांतचि हारवूनि यशा, रिते. ॥ २१
राम हर्षवि जिष्णुची[3] जयफुल्लदृष्टि सभा, जन-
स्थान शून्य करी, वरी स्तव, पुष्पवृष्टिस भाजन[4]. ।
ती कुबुद्धि निशाचरी दशकंधरा मुख दाखवी;
जानकीगुणरूपलक्षणसत्सुधारस[5] चाखवी. ॥ २२
जानकीहरणार्थ युक्ति मनीं दशानन आठवी;
स्वर्णरत्नमृग क्षपाचर[6] आश्रमीं खळ पाठवी. ।
श्री[7] विलोकुनियां सुरंग, 'कुरंग[8] हा अजि तापसा[9]
दर्शनें न पळो, धराचि,' म्हणे; करी अजिता[10] पसा[11]. ॥ २३
स्वानुज क्षितिजावना[12] उटजांत ठेवुनि राघवें,
दूर ओढुनि ने, पळे, परि मारिला मृग लाघवें. ।
'हाय जानकि! हाय लक्ष्मण! धांव,' यापरि हाकली[13];
वाढवी शुचि मानसांतहि तत्क्षणीं अरि हा कली[14]. ॥ २४
हाक आयकतां, सखी करि कांपल्या कदलीस[15] ती,
'दे वरा मज, देवरा[16]! द्रुत धांव,' हें वदली सती. ।
तो म्हणे, 'कपटिक्षपाचरशब्द होय; परा महा[17]
मुख्य आश्रय देव देवि! कधीं म्हणेल न राम 'हा[18]!' ॥ २५
श्री म्हणे, 'अभिलाष मद्विषयीं तुझा; प्रभुहानितें,
दुर्जना! तव दुष्ट मानस, इष्टसिद्धिस मानितें.' ।
साश्रु, तो उटज त्यजूनि, निघेचि बोलत 'हाय!' तें
रंध्र सांपडलें, सतीहरणा, अरातिस[19] आयतें. ॥ २६
पूजनादृतमानसा[20], सुविरक्त भावुन, होय ती;
'स्वाश्रमांत म्हणे, 'प्रसन्न, अभीष्ट पावुन, हो, यती'. ।
तोंचि दावुनि रूप, 'सुंदरि! सर्वसद्गुणसंपदे!
चाल, हो महिषी,' दशास्य असें वदे, बहु कंप दे. ॥ २७

१. रात्रिंचर, राक्षस. २. देवांचे वैरी. ३. इंद्राची. ४. पात्र. ५. जानकीचे गुण आणि रूप यांचें वर्णन हाच अमृतरस [त्या दशकंधरा] चाखवी. ६. राक्षस. ७. सीता. ८. मृग. ९. संतापसा. १०. रामास. ११. अंजुली. १२. सीतेच्या रक्षणास. १३. हाक मारी. १४. कलह. १५. केळीस. १६. दीरा (लक्ष्मणा). १७. तेजा. १८. हाय. १९. शत्रूला, रावणाला. २०. पूजन+आदृत+मानसा=पूजेविषयीं सादर चित्त जीचें अशी.

श्री म्हणे, 'निघ रे! कधींहि न कर्म हें शुचि, राक्षसा!
भस्म होसिल; देखिला न तुवां जगीं [1]रुचिराक्षसा.' ।
तों बळेंचि महासतीस घडावया, खळ हा निघे;
भग्न होय, जटायुसीं करुनि स्मयें कलहा, निघे. ॥ २८
पूर्ण षष्टिसहस्रवत्सर ज्या जटायुस जन्मुनी,
सून सोडवि शत्रुपासुनि तो, असें कथि सन्मुनी. ।
वृद्ध गृध्र [2]खरासिनें दशकंधरें मग ताडिला,
पक्षमूळ पळांत तोडुनि, धर्म सोडुनि, पाडिला. ॥ २९
ती म्हणे, 'रघुनाथजी! करितां उपेक्षण काय [3]हो!?
हाय! लक्ष्मणजी छळीं, परि दूर न, क्षण, [4]काय [5]हो. ।
कीर्ति मी तुमची; अहो! मज शीघ्र, धांवुनि, सोडवा;
खोडवाल ललाटलेखहि, शत्रुला कर जोडवा.' ॥ ३०
'हाय! हाय!' म्हणे सती; दशकंठ तीस बळें हरी.
[6]सोत्तरीय [7]नग त्यजी, कपिपंचकीं [8]अचळावरी. ।
ने [9]जड स्वपुरींत, जी [10]अजिताग्निची फुणगी, तितें
हात जोडितसे [11]सुधा शतदा जिच्या [12]गुणगीतितें. ॥ ३१
रामभद्र मृगासि मारुनि, होय शंकितधी, फिरे;
साश्रु लक्ष्मण ये, नमी, कथि वृत्त; आयिकतां विरे; ।
येउनि द्रुत, शून्य आश्रम पाहुनि, प्रभु 'हा!' वदे
[13]तो [14]नगांसहि मोह [15]आत्तवियोगिमानवभाव दे. ॥ ३२
शोधितां [16]गहनांत, मूर्छित गृध्र दूरुनि पाहिला;
[17]दक्षिणोरुवरी, द्रवोनि, तदीय मस्तक वाहिला. ।
रावणें हरिली वधू, कळवूनि हें, [18]व्यसु राहिला.
'हा!' म्हणोनि रघुत्तमें [19]विधिनें खगोत्तम [20]दाहिला. ॥ ३३

---

१. रुचिर आहेत नेत्र ज्याचे असा. २. प्रखर खड्गानें. ३. अहो. ४. देह. ५. होऊ. ६. स+उत्तरीय=अंगावरच्या वस्त्रासह. ७. अलंकार, दागिने. ८. पर्वतावर. ९. मूर्ख. १०. अजित राम हाच जो अग्नि त्याची फुणगी सीता तितें. ११. अमृत. १२. गुणवर्णनाला. १३. राम. १४. वृक्षांसही. १५. स्वीकारिला आहे वियोगिमनुष्यपणा ज्याणें असा. (रामाचें विशेषण.) १६. अरण्यांत. १७. उजवे मांडीवर. १८. गतप्राण. १९. शास्त्ररीतीनें. २०. अग्निसंस्कार केला.

धुंडितां विपिनें पुन्हाहि, **क**बंध राक्षस मारिला,
तारिला; **श**बरी महामति जी, तिचा भव सारिला. ।
वारिला [1]**ह**नुमन्मनोगद; तो **सु**कंठहि पाळिला;
**वा**ळिला निवटूनि, [2]तत्सुत **रा**घवें कुरवाळिला. ॥ ३४
बैसवी [3]अनुजासि सांगुनि, [4]कीशराज्यपदीं नता.
केंवि पाहिल [5]वज्रभृत्कपिलावराज्यप दीनता? ।
धाडिले हुडकावया कपिकोटि, ते श्रमले [6]मुधा.
प्राप्त, **शं**करहाससें, यश होय **वा**युसुता बुधा. ॥ ३५
दाखवी बळ तोषवी न बसे **हि**[7]माद्रिसुतावरी
रंजवी [8]**सु**रसेसही, बहुयोजनें मुख जी करी. ।
**सिं**हिका वधिली पळांतचि, सावुलीसहि ती धरी,
सिंधु लंघुनि, [9]शत्रुपुर्यधिदेवताभ्रम तो हरी. ॥ ३६
रात्रि होउनि [10]ओतुंसा हुडकी पुरींत; न देखुनी
होय खिन्न मनीं, उणें निजदैव केवळ लेखुनी. ।
तो **अ**शोकवनीं शिरोनि [11]**वि**भूतितें मग पाहुनी,
[12]शिंशेपातरुतें कपी बहुमान दे [13]नगपाहुनी. ॥ ३७
तों **द**शास्य, **म**हाविभूतिस, रात्रि ये, विनवी, 'रहा
मंदिरीं, तुज चिंतितों; इतरांसि सेवि न वीर हा.' ।
**श्री** वदे, म्हणुनि स्वमानसिं, '**राम**! **राम**! रणा रची,'
'[14]सद्विसी अहि तूं; तयापरि पामरा! मरणारची.' ॥ ३८
[15]प्रासधिक्कृति **रा**वण [16]क्षणदाचरींस म्हणे दिला.
स्पष्ट [17]मासयुगावधि, त्यजितां मदुक्त, वधा इला. ।
मांस भक्षिन मी इचें; मज [18]मानुषी अपमानिती.

१. हनुमत्+मनोगद=मारुतीचा अंतःकरणसंबंधी रोग. २. अंगद. ३. बंधू लक्ष्मणाला सांगून. ४. वानरांच्या राज्यपदीं. ५. वज्रभृत+कपिला+वर+आज्यप=इंद्राच्या कपिलेचें श्रेष्ठ आज्य जें त्यातें पिणारा. ६. व्यर्थ. ७. मैनाकपर्वतावर. ८. देवांनीं पाठविलेली राक्षसी, तिलाही. ९. शत्रु+पुरी+अधिदेवता+भ्रम=लंकाधिष्ठात्री जी देवी तिचा भ्रम. १०. मांजरासारखा. ११. सीतेतें. १२. शमीवृक्षातें. १३. श्रेष्ठ जो वृक्ष (कल्पवृक्ष) त्यापेक्षां. १४. सत्+वी=उत्तम गरुडसी. १५. भाल्यासारखा तीक्ष्ण धिक्कार ज्याचा असा. १६. रात्रिचरींस, राक्षसींस. १७. दोन महिन्यांचा अवधि. १८. मनुष्यस्त्री.

मत्तपाहुनि[1] आपुलें बहु उग्र हे, तप मानिती. ॥ ३९
जाय दुष्ट, असें दटावुनि, राक्षसी अति जाचिती;
पाश घालि गळां, म्हणे क्षितिजा असूंप्रति[2] 'जाचि,'[3] ती. ।
मुद्रिका तिस दे मरुत्सुत; जानकीहि शिरोमणी,[4]
तो महोपवना[5] चुरी, विपि[6] होय, शत्रु करी फणी. ॥ ४०
मत्त राक्षस लक्ष, अक्षकुमारही करि चूर हा,
'शूर हा,' वदले; म्हणे अमरर्षि 'जों रवि, भू, रहा.'[7] ।
इंद्रजित् प्रकटी सरोजभवास्त्र;[8] सांपडला बळें;
बोलिला[9] गुरुसा[10] सभेंत विशंक, बोलवितां खळें. ॥ ४१
पेटवी खळ पुच्छ; पावक[11] होय या करका[12] पुरा.
भेटवी चुलत्यासि,[13] लाववि तो जसा कर कापुरा. ।
दोन भाग करूनि भस्म, निघे कृती स्वरिपूंस 'हा!'
'हा!' असें म्हणवि; प्रशांत नदीश्वरीं[14] करि पूंस[15] हा. ॥ ४२
जानकी, नमितां पुन्हा, वदली द्रवोनि, 'शमस्तु'[16] तें
वायुजें, वरवाक्य घेउनि, शर्वशक्रयमस्तुतें, ।
क्षिप्र, गोष्पदसा, पयोनिधि लंघिला शतयोजनें.
हर्षले बहु अंगदादि, जसे सुधारसभोजनें. ॥ ४३
जानकी हुडकावयास्तव, धाडिलीं बहु जीं बळें,[17]
आपुलें मधुसंज्ञ जें वन, तें तिहीं लुटिलें बळें. ।
ताडिला दधिवक्र, हें कथि. कार्यसिद्धिस जाणुनी
हृष्ट होय सुकंठ, आग[18] मनांत लेश न आणुनी. ॥ ४४
पातले कपि, हृष्ट होउनि, वंदुनि प्रभुतें, फणी[19]
तेंवि मारुतिबाहु दे अतिभव्यदीप्ति शिरोमणी.[20] ।
सुप्रसन्नमनें रघूत्तम भेटला पवमानजा.[21]

---

१. माझ्या तपाहून. २. प्राणांला म्हणे, तुम्ही जाच. ३. जा, राहूं नका. ४. मस्तकांतील अलंकार. 'दे' अध्याहृत. ५. महा+उपवन=मोठी बाग तिला. ६. गरुड. ७. चिरंजीव हो. ८. कमलोद्भव ब्रह्मा, त्याचें अस्त्र, ब्रह्मास्त्र. ९. बुद्धया. १०. बृहस्पतीसा. ११. याला अग्नि गारेसारखा (थंड) होय. १२. गारा. १३. बिभीषणास. १४. सागरांत. १५. पुच्छ. १६. शम्+अस्तु=कल्याण असो. १७. सैन्यें. १८. अपराध. १९. सर्प. २०. सीतेच्या मस्तकावरील अलंकार. २१. वायुपुत्र (मारुती) त्याला.

त्या म्हणेल न 'धन्य' कोण, मिळे असा नैव मान ज्या! ॥४५
फार भारचि वाटला उपकार हा, भवभंजना.
वातपुत्रमनाचिया, करि भेटुनि प्रभुरंजना. ।
होय धन्य जगत्रयीं, प्रसवोनि सन्मणि, अंजना.
कंजनाभ यदाश्रिताप्रति दे यशा सुनिरंजना. ॥ ४६
कोटि कोटि सुरांशसंभव ऋक्ष वानर, बाहुनीं
चंड पर्वत, तच्छिला शिखरें महाद्रुम वाहुनी; ।
गर्जती घनसे, महाबळ युद्धकामुक पाहुनी,
शोभनीं समयीं निघे प्रभु, राजसंमत लाहुनी. ॥ ४७
वाहिला पवनात्मजें प्रभु राम लक्ष्मण अंगदें,
पावलीं कटकें, पयोनिधिच्या तटा, परभंगदें. ।
रावणें अपमानिला, सुकृती बिभीषण पातला,
सत्सुखीं, शरणागत प्रभुनें पळांतचि, घातला. ॥ ४८
त्या स्वबंधुकरें नता, अभिषेक तो करवि प्रभू
क्षिप्र राक्षसराज्य दे, सुखवी दिवाकर विप्र भूं. ।
अस्त्रभीत समुद्र भेटुनि, सेतुतें रचवी रते.
या यशीं जग सर्व भीति सुदुर्जया नच वीर ते. ॥ ४९
सिंधुतें, नळनिर्मिताद्भुतसेतुरूपपथें, तरे.
राम रावणदूत सोडवि, भासले कपि जे खरे. ।
राक्षसासि विलोकितांचि, उडे सुकंठ, गळां पडे;
बाहुयुद्ध करी, हरी मुकुटा, मदाहि, असें घडे. ॥ ५०
ये फिरोनि कृती, करी अमृतासि नीरस हा यशें.
त्या म्हणे प्रभु, 'काय हें? असतांहि वीर सहाय शें. ।
घातली कसि रे सख्या! उडि? उग्र तो दवसा; हसें
येतसे तुज; बा! नये मज, कांपलों तव साहसें.' ॥ ५१
रावणें प्रभुचें धनुष्य, शिरोब्ज, कृत्रिम दाविलें.
श्रीहि 'हा!' वदली, मनीं क्षणमात्र सत्यचि भाविलें. ।

१. नूतन. २. साधुश्रेष्ठ मारुति. ३. मारुतीची माता. ४. कमलनाभ. (राम.) ५. निर्दोष, निष्पाप. ६. प्रचंड. ७. मोठे वृक्ष. ८. सुमुहूर्तीं. ९. दुसऱ्याला नाश देणारीं. १०. पृथ्वी. ११. सुग्रीव. १२. हरण करी. १३. शत. १४. शिरस्+अब्ज=शिरकमळ.

ये बि[1]भीषणगेहिनी सरमा, वदे, 'सखि! आइक;
व्यर्थ शोक नको करूं. गमलें खरें, परि मा[2]यिक.' ॥ ९२
प्रेषिला प्रभुनें महामति दूत अंगद, बोलिला
धर्म तो गुरुसीं महाकविंनीं प्रभुप्रिय तोलिला. ।
'दे जडा प्रभुरत्न हें; म्हणवील 'हाय!' कसा जिरे
राहुला रस? सयशें रघुवीरसायक साजिरे. ॥ ९३
प्रेरुनि क्षणदाचरांसि दशास्य तो, धरवी रं[3]या;
नेणते धरिती मदांध भुजद्वयीं परवीर यां[4]. ।
अंगदें गगनीं उडोनि महाबळें, भुज झाडिले;
पाडिले मदमत्त चार, यमाकडे जड धाडिले. ॥ ९४
साम सोडुनि, मांडिलें, नय धर्म लंघुनि, उद्धतें,
युद्ध, तेंवि न ऐकिलें, करि वर्णितां, अतिशुद्ध तें. ।
आंत बाहिर, वीर वीररसें, निरंतर रंगले.
अंग लेखिति ते तृण, त्यजिती न संगर भंगले. ॥ ९५
नाचले समरीं कबंध असंख्य, रक्तनदीशतें.
चित्र, जें करिती निशाचरकीश तेहि तं[5]दीश तें. ।
वाजिवारणमार्गरोधक मांसकर्दम सांचलें.
रामलक्ष्मणसन्मुखागत मा[6]नुषाद न वांचले. ॥ ९६
कीश वृक्षमहाशिलाशिखरें धराधर खाणिती;
याचि भव्यनवायुधें समरीं स्वशत्रुसि हाणिती. ।
जे प्रहस्तमुख क्षपाचर ते बहु क्षय पावले,
काय कल्पनटापुढें नटकोटिदर्शित पां[7]वले? ॥ ९७
मेघनाद महाखळ च्छळदक्षलक्षशिरोमणी,
राम लक्ष्मण हे प्रभू, अहिपाशबद्धकरी रणीं. ।
श्री विलोकुनि 'हा!' वदे; त्रिजटा निवारि तं[8]दश्रु ती,
'तो हे[9]री विपदा, जया म्हणतात 'आत्मपद' श्रुती.' ॥ ९८
प्रेरिले अयुत क्षपाचर तत्प्रयत्नशतें; मग,
कुंभकर्ण उठे दिनद्वय कष्टवूनि जसा नग ।

---

१. बिभीषणाची गृहस्वामिणी. २. मायावी. ३. वेगा. ४. अंगदा. ५. तत्+ईश=त्याचे स्वामी. ६. मनुष्य भक्षण करणारे राक्षस. ७. चाल. ८. तत्+अश्रु=तिचें रोदनोदक. ९. हरण करी.

कीशपा[1] धरि, तो सुटे, हरि नाक कान, बळा तग
ज्यापुढें न निघे; वधी प्रभु त्यासही, सुखवी जग. ॥ ५९
ब्राह्म[2] मेघरवें रणीं प्रकटूनि, पक्षिवरें फणी
तेंवि, ते खिळिले क्षणीं, रघुवीर वीरशिरोमणी. ।
क्षिप्र ओषधिवन्महानगशृंग[3] आणुनि अंजना-
पुत्र त्या उठवी, बळासह सानुजा भवभंजना. ॥ ६०
ख्यात जे अतिकाय, देवनरांतक, त्रिशिरा असे
रावणात्मज, यद्भय त्रिदशांचिया हृदयीं वसे, ।
वीर कुंभ निकुंभ हे, घटकर्णपुत्र हि, टोळसे
जाहले प्रभुदृग्दवीं, परिघासि शूळहि, कोळसे. ॥ ६१
जानकीवध दाखवी घननाद, सत्यचि वाटला;
दाटला प्रभुकंठही; हृदयीं सुकंठहि फाटला. ।
आटला परि शोकसागर, कुंभसंभव भेटतां,
तो बिभीषण तेंवि कीं घन, काननीं दैव पेटतां. ॥ ६२
लक्ष्मणासि अहर्निशत्रय तद्वधा मग लागलें.
भागलें बहु कीशसैन्य[5], न भक्षिलें फळ, जागलें. ।
बंधुच्या विजयें प्रभूत्तम मानसीं बहु हर्षला.
तच्छिरीं, कुरवाळितां तनु[6], शीत दृग्जळ[7] वर्षला. ॥ ६३
घे प्रतप्त दशास्य, जे प्रभुदार तच्छमना, असी[8].
श्रीस वांचवि, कीर्ति जोडि, सुपार्श्व अच्छमना[9] असी. ।
शोक कोप न आवरे, दशकंठ फारचि बावरे.
काळसा बळि वावरे प्रभु, त्या म्हणे धर आंव[10] रे! ॥ ६४
रावणें खरशक्तिनें स्वसुतारिचें[11] उर फोडिलें;
तोंचि आणुनि शृंग तें पवनात्मजें यश जोडिलें. ।
प्रार्थुनि प्रभुतें रणीं, बसवी रथावरि मातली[12],
द्विट्चमू[13] झगडोनि संयमिनीपथावरि मातली. ॥ ६५
रामरावणदर्शिता मुनि वर्णिती, परमारणा;
काळ सप्तदिनक्षपामित लागला परमा रणा. ।

१. सुग्रीवास. २. ब्रह्मास्त्र. ३. ओषधिवत्+महानग+शृंग. ४. वणवा. ५. वानरसैन्य. ६. शरीर. ७. दृक्+जळ=नेत्रसंबंधी जळ. ८. खड्ग. ९. स्वच्छमना. १०. प्रभाव. ११. लक्ष्मणाचें. १२. इंद्रसारथी. १३. शत्रुचमू.

मस्तकें शत खंडिलीं, उठलीं नवीं, पैर, मागतीं.
ब्राह्म योजुनि, भेदिलें उर, त्यां दिली परमा गती. ॥ ६६
कुंभजा, रविलाहि, मातलिलाहि, दे यश राम हा,
मागुनि प्रभु आपुल्या, करि, तज्ज्ञगेय शरा महा. ।
पारिजातसमुद्भवें कुसुमें प्रभूवरि वर्षले.
शक्र, शर्व, सरोजसंभव; सर्वही सुर हर्षले. ॥ ६७
दिव्य दुंदुभि वाजला; गमला महाघन गाजला;
सद्यशें प्रभु साजला; त्रिजगीं महोत्सव माजला. ।
या सुरद्रुम लाजला, जनदोष सर्वहि भाजला.
हा खळीं मह डाजला(?) नसताचि एकहि आजला. ॥ ६८
नृत्यगानकळा प्रकाशिति अप्सरा; सुरनायक
प्रेमगद्गदकंठ होउनि गाय निर्जरनायक ।
रामचंद्र, चकोर सन्मुनि, होय त्यां सुखदायक,
काय कल्पतरू स्तवीं प्रभुच्या अयेंद्रुत जायक(?) ॥ ६९
प्रांजलि प्रभुला बिभीषण साधु तो विनवी, 'न या
हस्त लाविन काय गोद्विजधर्मनाशरतीं दया; ।
राम रावणदारसांत्वन, तत्क्रिया, करवी रसें
'हा त्वदीय जसा, तसाचि मदीयही,' वदला असें. ७०
लक्ष्मणें अभिषेचिला, दैर हस्तकें धरिला; स्वयें
स्थापिला; स्वशिरीं पदें प्रभुभक्त तो वरिला स्वयें. ।
त्यावरि प्रभु मानसीं जनकात्मजेप्रति आठवी;
मारुतीस सतीकडे कळवावया जय, पाठवी. ॥ ७१
श्रीस मारुति बोलिला नतकाय, 'आइ! कसी महा
हानि होइल या तुझ्या? कथुं काय आइकसी महा? ।
पावला जय रामवारिद तो खरा वणवा सवा,
त्याहि अर्पितसे न वांचुनि तोख रावण वासवा.' ॥ ७२
बोलिली, 'प्रियसांगत्या! तुज देय वस्तु, नसे' असें.
तो वदे, 'परिपूर्ण मी सति! या तुझ्या वचनें असें. ।

---

१. परंतु. १. फिरून. ३. करणि तृतीया. ४. गर्जला. ५. आजचे साठीं. ६. तुझा. ७. शंख. ८. सु+अयें=शुभावह विधीनें. ९. नम्र शरीर ज्याचें असा. १०. तेजास. ११. उत्सवास. १२. यज्ञा. १३. या प्रकारें. १४. आहें.

एक हा वर दे जिहीं बहु गांजिलीस, वधीन या.
श्री म्हणे, 'अबळाल्ययें बुध लंघिती न कधीं नया.' ॥ ७३

सूक्त[1] सेवुनि, नम्र होउनि, सूत मारुतनंदन
प्राप्तहर्ष पुनःपुन्हा वदतां तितें करि वंदन, ।
'धन्य शील तुझें, जसें प्रभुचें तसेंचि, महासती!
तूंचि या उचिता; न जी असि पात्र या, न महास ती.' ॥ ७४

भक्तवत्सलरामदर्शनकाम सन्मति जाणवी,
तोहि त्या प्रभुला; तिला प्रभुहि स्वसंनिधि आणवी. ।
आपणा न शिवावया अपवाद, दिव्य[2] करी सती,
लोपवी स्वयशीं पयोधिसही, न दिव्यकरीस[3], ती. ॥ ७५

शक्रसा, स्वविमान सोडुनि भेटला प्रभुला पिता,
स्थापिता शिर होय तच्चरणीं स्मरादरि[4] दापिता[5]. ।
तापिता[6] निववी तया भरताहि, घे वर शापिता,
पापिता हरि, या यशेंचि, न लावुं दे कर नापिता[7]. ॥ ७६

'त्वद्यशश्रवणीं, मुखीं अमृत श्रुतज्ञ न, ओतु तें,
ओ तुतें जय देउ, घे पद वाद्य हो तमओतुतें[8].' ।
पुत्रवत्सल तात दिग्रथ यापरि प्रभुला वदे,
भाव देव तदीय वर्णिति पुण्य तच्छुभ नाव दे. ॥ ७७

सर्वही उठवी मृत स्वकपि प्रभूत्तम दृष्टिनें,
वर्णिती मुनि, आत्मभू पविभृत्कृतामृतवृष्टिनें[9] ।
दे तया यश, राम हा महिमा स्वयें बहु वाढवी,
संकटांतुनि आपणासहि भक्तमानद काढवी. ॥ ७८

प्रार्थुनि प्रभुला बिभीषण हार्दसद्रसभाजन[10]
'घे' म्हणे, 'सुगळा बळासह विश्वभद्र! सभाजन[11].' ।
बोलिला प्रभु, 'पूज कीशप हें नको भरताविना'
जो जटाधर कष्टतो; मज काय हो भर[12] ताविना[13]? ॥ ७९

---

१. सु+उक्त=उत्तम भाषण. २. शपथ. ३. देवांच्या हत्तीस. (ऐरावतीस.) ४. स्मर+आदि+अरि=कामादिशत्रु. ५. दबविणारा. ६. तप्त झालेल्यास. ७. क्षौरावांचूनहि महापातकी प्रभुयशाच्या श्रवणानें पवित्र होतात. ८. अज्ञानरूप मार्जारास. ९. पविभृत+कृत+अमृत+वृष्टि=इंद्रानें केलेल्या अमृतवृष्टीनें. १०. प्रीतिरूप उत्तम रसाचें पात्र. ११. पूजा. १२. पूजारूप. १३. तापविना.

क्षिप्र तो मज भेटिव, प्रिय हेंचि पूजन बा! सरा.
मानसा भजु हंस, गाय मिळो क्षुधाकुळ वासरा. ।
ज्यांत पाहिन त्यास, 'धन्य' म्हणेन त्याचि सुवासरा;
कीं असूंसि म्हणे सदा न धरूनि तो परवा सेरा.' ॥ ८०
तो ससैन्य सुकंठ पूजुनि, पुष्पक द्रुत आणवी,
'क्षिप्र नेइल हें,' असें प्रभुला बिभीषण जाणवी. ।
रामभद्र म्हणे, 'अशाहि भजोनि यातुपते! लया
पावला जन; होय काम धनंजया तुप तेल या.' ॥ ८१
पुष्पकीं बसवी स्वयें रचितस्वकार्य सखे, दया-
पात्र ऋक्ष, कपीहि; देखवती न आर्य सखेद या. ।
श्रीस घेउनि सानुज प्रभु तो बसे; मग नातु न
त्यांत नेइल कां, सुखें यश गावया गगनांतुन? ॥ ८२
श्रीस दावुनि युद्धभू कथि ज्या चमत्कृति जाहल्या.
होय तो व्यसु, जो म्हणे शमनाचिया, 'पळ जा' हल्या. ।
सिंधुला भव हे महापथ वेद या नळसेतुला
मुक्ति मी म्हणतों न जी कथवे दया नळसे तुला. ॥ ८३
या स्थळीं सहसा बिभीषण पावला; विरहाकुला
धैर्य दे, करि कार्य हो! मत भानुया चिर हा कुला. ।
प्रार्थिला न वळेचि सागर, रागरम्यतनू मला
भेटला, तंव हाहि सेतुपथा उपाय कथी भला. ॥ ८४
देवि! हा नग ऋष्यमूक, सुकंठ मत्सख या नगीं
दाखवी नग यास्थळीं, गमलीस दुर्लभ तूं जगीं ।
'भेटवीन तुझी प्रिया तुज, होउनि स्थिरधी रहा,'
हें वदे, सति! दे करीं कर, मन्मनीं बहु धीर हा. ॥ ८५
वाळिचा वध यास्थळीं, सति! ती सुकंठगुहापुरी;
ते कपीश्वरदार, ईत जयां बहु स्तविती सुरी.' ।
जानकी प्रभुला कथी, प्रभु कीशपा, तिसे आणवी.

---

१. उत्तमदिवसा. २. संपा. ३. पुत्राचा पुत्र. (नारद.) ४. चमत्कार. ५. यमाच्या. ६. रेड्या. ७. पर्वतीं. ८. अलंकार. ९. वानरराजाची स्त्री. (तारा.) १०. सुकंठगुहापुरींत. ११. देवांगना. १२. युगळा. १३. तारेस.

श्रीपुढें तसि ती दिसे, समयीपुढें जसि ठाणवी[1]. ॥ ८६
रामचंद्र पुन्हा कथी, बहु शोकपावक पेटला,
देवि! मारुति हा महाघन या स्थळीं मज भेटला. ।
सुभ्रु! हे सरसी[2] पहा. म्हणती तपा मग या इतें
सत्पयें करिती सदा, सति! जे करी प्रिय आइ तें. ॥ ८७
हा मतंगमुनीश्वराश्रम, पुण्यदेश बरीस ती,
होय फार बरी, मला सुख देवि! दे शबरी सती. ।
या वनीं वधिला कबंध; जिच्या यशें जगधौत, मी
यत्तटाश्रित हे नमूनि पहा महासति गौतमी. ॥ ८८
राम पंचवटीस दाखवि तातबंधु खगालया
दावि; 'हाय!' म्हणे कसें कवि हो! सदैव न गाल या? ।
कुंभजात्रिमुनीश्वराश्रम चित्रकूटहि पाहवी,
सूर्यजा[3] हरिजा[4], प्रयागपदीं स्वपुष्पक राहवी. ॥ ८९
सज्जना भरताचिया प्रभु निश्चयोक्तिस आठवी
वायुजा कळवावयास निजागम[5] द्रुत पाठवी; ।
तातमित्रमुनीस वंदुनि, राम भक्तिचिया बळें,
ज्ञानमुक्तिफळप्रद स्वकपीस मागुनि घे फळें. ॥ ९०
तेथुनि द्रुत रामचंद्र निघे; निषाद[6] चकोरसा
होय हर्षित, जो म्हणे इतरा मनांत नको रसा. ।
स्पष्ट चातकसा जगीं भरत ज्ञ[7]धीस गमे, घसा
वाळवी विरही; प्रभूत्तमही न कां मग मेघसा? ॥ ९१
राम धावुनि भेटला भरतासि, जेंवि कळेवरा
प्राण; हे त्रिजगांत सेवकबंधुरीति कळे वरा[8]. ।
पौर हृष्ट मयूर नाचति, राम हा वळला घन;
श्रीद होय वसंत तो प्रभु, भासलें पुरतें वन. ॥ ९२
भेटुनि स्वगुरुप्रधानजनांस मातृजना मग
यातुकीशप[9] भेटवी, भरतासि हृष्ट करी जग. ।
बंधुच्याहि निजाहि तो करवी जटा अजटा, कवी

---

१. काष्ठाची समई. २. सरोवर. ३. यमुना नदी. ४. गंगा नदी. ५ निज+आगम=आपलें येणें. ६. कोळी. (गुह.) ७. ज्ञात्याच्या बुद्धीस. ८. श्रेष्ठा. ९. राक्षस आणि वानर यांचे पति बिभीषण आणि सुग्रीव.

वर्णिती कपि राक्षसा कथि रूप तो अज टाकवी. ॥ ९३
जीवसा प्रभु बंधुतें असुसे प्रवेश करी रसें;
शोभलें पुरतें महापुर तें महाढ्य शरीरसें. ।
जानकीसह वानराधिपदार फारचि शोभले,
पौरदार तयांसि पाहुनि तेहि त्यांसहि शोभले. ॥ ९४
राजवेषविराजित प्लवग द्विपावरि साजले;
त्यांसि त्या परमोत्सवीं अवलोकितां नृप लाजले. ।
लाज[1] अक्षत पुष्पराशि पुरस्त्रिया बहु वर्षल्या
त्यां परीस सुरस्त्रिया अतिभाग्य वर्णित हर्षल्या. ॥ ९५
कीशे[2] पाठविले महें सकळाब्धि पंचनदीश ते
प्रार्थुनि द्रुत तीर्थ आणिति, दे गुरूसि तदीश ते.[3] ।
श्रीवरी अभिषेक होय, महोत्सवें कविराज ते
वर्णिति, श्रुतिवृंद पुष्कळ याविना न विराजतें. ॥ ९६
अमरगायक गाति नाचति अप्सराहि न राहुनी;
अधिक भाग्य न जिष्णुचें पुर पामराहि नराहुनी; ।
विविधवाद्यरवस्तव प्रवरर्षि आदरिती मैंही,
रघुपुरी किति दे उरों नच साधुवाद रिती मही. ॥ ९७
मुकुट सन्मणिहार पाठवि शतमख प्रभु आदरी.
करि रित्या चिर मेरुच्या बहुमत महोत्सव हा दरी; ।
कनकरत्नरथाश्ववारण अमित गोधन देववी,
प्रभुवर स्वकरें कपींसहि विविध भूषण लेववी. ॥ ९८
मारुतीस अमूल्य मौक्तिकहार दे महिजा[6] सती;
गौरवी करि धन्य धन्य जगत्रयीं निजदास ती; ।
प्रेम फार मरुत्सुतीं प्रभु अंगदींहि करी; मुलें
तेंवि भूषवि. अंक दे गणि नाकसत्तरुचीं फुलें. ॥ ९९
जांबवान् सुगळ प्लवंगप सर्व यूथप यातुप
श्रीश पूजि, तयांसि जें स्वचरित्रभोजन या तुप. ।
रामराज्य तसें जगांत न भूतपूर्व, न भावि कीं,
नित्य तेंचि अभाविकीं कवि गीत, जें सुख भाविकीं. ॥ १००

---

१. लाह्या. २. वानर. ३. पंचनदीश. ४. उत्सवी. ५. गुहा. ६. पृथ्वीपासून झालेली. (सीता.)

ज्यांत न मशक [1]दंश [2]मत्कुण [3]मक्षिका न [4]उंवा [5]पिसा;
मधुप न खळ चोर जार, न खेळता न जुवा [6]पिसा. ।
व्याघ्रवृकपवनाशवृश्चिकरोगआधिजरा जन
नेणतिच, सकळ प्रजा सधना महोदयभाजन. ॥ १०१
काम कोपहि [7]सौ असे परमोग्र जे सहजारि ते
सर्वही पडलेच सोडुनि दुर्गुणा सहजा रिते. ।
आळ घेउनियां, कधींहि न बाळही कलहा निघे.
रामराज्यपदांत केवळ वासनाबळ हानि घे. ॥ १०२
होय विप्रशिशु व्यसु प्रभु त्यासि सत्वर वांचवी;
सांचवी यश गोड तें, कविमानसें बहु लांचवी. ।
तीन कोटि [8]अमर्त्यगायक मारिले भरतें रणीं.
लक्ष्मणानुज [9]तार्क्ष्य होय, करी खळा लवणा फणी. ॥ १०३
दोन दोन कुमार त्या चवघांस होउनि शोभले;
तातसेच यशें महाकवि तद्गुणा बहु लोभले. ।
श्रीकरें अभिषेचिले विधिनें स्वनंदन अष्ट ते;
भूभरें जरि शिक्षिले नसते, स्वयें तरी कष्टते. ॥ १०४
आदिकविवरशिष्य कुशलव रामसुत गुणशेवधी
तातसुचरितगानरतमति रंजविति मुनिदेवधी. ।
श्रीश करि हयमेध; निजसुतगीत निजयश आपण
स्वाप्तजनसह पी; करवि न पुरे रसिक पति हा पण. ॥ १०५
[10]त्रिजंगदघहर परम सुखकर चरित रघुवर वरद या
स्तविति; सुरमुनि म्हणति करि असि पशुहिवरि नच पर दया. ।
अजित गुणयश सकलनतजनिमरणजलधिसि [11]सुकविते;
अमरतरुहुनि अधिक शतगुण फळद बहुमत [12]सुकविते. ॥ १०६ ॥
सर्वभक्तमयूर हर्षदराममेघमहोदया
हेतु या प्रभुचीच हो, दुसरी कदापि न हो दया. ।
पुष्पसें 'विबुधप्रिया'ख्य चरित्र हें शुचि पाहिलें;
वंदुनि प्रभुच्या पदांवरि मस्तकासह वाहिलें. ॥ १०७

---

१. मच्छर, मुरकूट. २. ढेंकुण. ३. माशा. ४. मस्तकांतील कीट. ५. पुशा. ६. वेडा. ७. सहा. ८. गंधर्व. ९. गरुड. १०. त्रैलोक्याचें पाप घालविणारें. ११ शुष्क करितें. १२. उत्तम कवीला.

# ६४. त्रिः[1]सप्तमंत्ररामायण.

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

श्रीकंठादिसुरर्षिसंस्तुत धरादेवामरांच्या हिता
जन्मे, [2]यक्षवरानुजप्रमथना, सूर्यान्वयीं रक्षिता. ।
धर्माचा मनुज, स्वयें यश जगीं व्हाया, भय ध्वंसिता,
झाला राघव दिग्रथात्मज महातेजा विधीचा पिता. ॥ १
[3]कौसल्योदरसंभव प्रभु, तया श्रीराम सन्नाम हें,
ज्ञाता तो अजपुत्र, सत्प्रियगुणाधारासि ठेवी [4]महें. ।
कैकेयीज यशोनिधी भरत तेजस्वी; सुमित्रा [5]यम
पावे लक्ष्मण जो बरा पटु, दुजा शत्रुघ्न [6]सद्विक्रम. ॥ २
ने श्रीगाधिज अध्वरार्तिशमना, [7]अस्त्रें कथी, ताटका
संहारी जगदीश, यज्ञ मुनिचा राखे महानेटका. ।
विप्रस्त्रीरज तत्क्षय प्रभु करी मोठें जगीं दे यश;
भंगी रुद्रशरासना, वरि [8]महीजा, [9]राम केला वश. ॥ ३
श्री त्यागी, प्रभुराज, धर्म समयीं, रक्षी [10]प्रसूचें प्रिय,
तो सीतानुजयुक्त सत्प्रिय वसे रानीं [11]महर्षिक्रिय. ।
शोकानें [12]जगतीवरा लय घडे, झालें जनाला भय,
दे धीरा भरता, न माय, न मही, तोष; त्यजी [13]आलय. ॥ ४
निःश्रीका स्वपुरा त्यजी सुमति; दे आधीं पित्या पिंड हा.
भेटे साप्तजन, प्रयत्न नगरा [14]आणूं करी, जो महा; ।
त्या अर्पी निजपादुका, यति तसा, निर्व्याज शुद्धाशय,
नंदिग्राम बरा म्हणे, प्रभु मनीं चिंती, तपोनिश्चय. ॥ ५
श्रीयुक्त प्रभु अत्रिचित्त निववी तारी विराधा मग

---

१. या प्रकरणांत ‘श्रीरामजयरामजयजयराम’ हा मंत्र ‘त्रिःसप्त’वार म्हणजे एकवीसवेळां आलेला आहे म्हणून या रामायणाला ‘त्रिःसप्तमंत्ररामायण’ असें नांव पंतांनीं दिलें आहे. २. कुबेराचा कनिष्ठ बंधु जो रावण त्याच्या नाशाकरितां. ३. कौसल्या+उदर+संभव=कौसल्येच्या उदरापासून उत्पन्न झालेला. ४. उत्सवें. ५. दोघे. ६. सत्+विक्रम=उत्तमपराक्रमी. ७. जृंभकसंज्ञक अस्त्रें. ८. सीता. ९. परशुराम. १०. मातेचें. ११. महर्षिसारिखें कर्म ज्याचें असा. १२. दशरथा. १३. गृह. १४. आणावयास.

आजन्मप्रयत स्मराविषय जे चिद्योमचारी खग ।
त्या दे हर्ष; जटायुला तनयसा वंदी, जपे मायसा;
राहे पंचवटींत; सेवि मधुरा गोदावरीच्या रसा. ॥ ६
श्रीसी शूर्पणखा 'वरा मज' म्हणे; दंडी तिला जो; खर
जैन्या ये; करि तत्क्षय प्रभु; रुचे दिक्कंधरा मत्सर. ।
चोरी तो जनकात्मजेसि, नय न प्रेक्षी, जटायु व्यय
क्रूरात्मा समजे स्वइष्ट; न धरी कांहीं अधर्में भय. ॥ ७
श्रीचा, लुब्धनरा, वियोग परम क्लेशी करी; त्यापरी
तो मायामनुज प्रभू सदय हा ! रानीं म्हणे मैध्वरी, ।
स्नेहें होय जटायुतोयद जगन्नाथ; स्वकीयप्रिया
साधी, राहुं न देचि दैन्य तम; याऐसी न कोठें दया. ॥ ८
श्रीशें, राहुतसा कबंध धरि जो, क्रूरा तया मर्दुनी,
केंवी कीर्ति जगीं, यैशस्विनिकरामध्यें, जसी स्वर्धुनी. ।
जैन्मेड्या शबरी, विर्यन्मणिजही वाळीहि कीं सायकें
शूरार्यातिमता दिली गति रघूत्तंसें जगन्नायकें. ॥ ९
श्रीचा शोध पराक्रम, श्वसनजें केला; तया गौरवी;
दे राजत्व नतासि अक्षय परा; दावी ममत्वा कवी; ।
बांधी सेतु जळांत; यैक्षपतिचा भ्रैतानुजन्मा नय
त्यागी, राज्यवरातिमत्त मनुजें होतां बळाब्धिक्षय. ॥ १०
शैक्रश्रीघ्न पराक्रम व्यसु करूं, बद्ध प्रभूतें करी;
सीताश्रु त्रिजटा पुसी, भय न राहूं दे मनीं ती बरी. ।
नागातें भुजगारिचा रैय पिटी; साजे जगीं तो यशें;
राजीवाक्ष मैहा धरी; खळव्रजें झालीं प्रैचिंतावशें. ॥ ११
श्रीदाच्या अनुजें पराक्रमपटु भ्रैाता वधा धाडिला;
तो ही, त्या जगदीश्वरें लैयकरामर्षी, रणीं पाडिला. ।
मेघध्वान करी पराजय जया तें सैन्य मानी यम.

---

१. आजन्मशुद्ध. २. युद्धा. ३. हाय. ४. मधु+अरि=मधुदैत्याचा नाशकर्ता. ५. यशस्व्यांच्या समूहामध्यें. ६. गंगा. ७. जन्म+ईड्या=जन्मेंकरून स्तुत्या असी. ८. सूर्यपुत्रहि. ९. शूर+आर्य+अतिमता=शूर, श्रेष्ठ, यांला अतिमान्या असी. १०. वायुपुत्रें (मारुतीनें). ११. कुबेराचा. १२. रावण. १३. इंद्रजित. १४. वेग. १५. तेजा. १६. अतिचिंतेच्या स्वाधीन असीं. १७. कुंभकर्ण. १८. नाश करणारा असा क्रोधी.

आणी ओषधिशृंग नंदन समीराचा महाविक्रम. ॥ १
श्रीश स्वस्थ विशल्य होय सबळ क्रूरारि मर्दी तया
दे माया जनकात्मजाक्षयकराराती महोग्रा भया. ।
सीतेशानुज तो तदत्यय करी; जन्यांत यत्नें अरी
माराया महिजेसि, शोकवशधीक्रोधी असीतें धरी. ॥ १३
मंत्री श्रीवध राहवी; मग अरी सैन्यें प्रभूच्या वधा
प्रेषी; तों अज, 'पी यथेष्ट रुधिरा, मधा,' म्हणे भूस 'धा.' ।
जन्या आपण ये यमाभ; जगती झाली भयव्याकुळा
धीरा मूर्छित लक्ष्मणा करि, मदें देऊनि काळा कुळा. ॥ १४
श्री वीरा मरुदात्मजें दिलि पुन्हा दिव्यौषधीच्या बळें
आरंभी अजपौत्र संयति सुरार्थे मराया खळें ।
शक्राच्या बसतां रथीं, 'जय जय' ध्वाना मुनीच्या मुखें
ऐके रावणकामरामहर तो, ब्रह्मांड कोंदी सुखें. ॥ १५
लंका श्रीसि करी प्रभूत्तम वरामत्र; स्वपादानता
दिव्यामाजि धनंजय स्तवि वरा सीतामनःशुद्धता. ।
आलिंगी अजपुत्र त्या यतिजनश्रेयस्करा, तो मग
यानीं बैसुनि राजराज महितीं, हर्षे निघे सानुग. ॥ १६
श्रीला राघव दाखवी समरभू, सेतु, स्वकीया कथा
सांगे, आक्रमितां जगत्प्रिय परात्मा व्योमयानें पथा. ।
तारा घे जनकात्मजा, यमिजनध्येय प्रभू गौतमी
दावी; त्या विरहज्वरा कथि, धरी जो अर्यमत्वा तमीं. ॥ १७
श्रीकुंभोद्भवसद्वराश्रम तिला दावी जगाचा धणी;
तीही जन्हुसुता, पय स्मरहरा जीचें सुचूडामणी. ।
तेजस्वीश महायशोनिधि भरद्वाजर्षि यज्वा कृती,
तो भाग्यें करि शर्मराशि विभुची प्रेमस्तवें सत्कृती. ॥ १८
श्रीभर्ता चतुरा मरुत्तनुभवा धाडी पुढें सत्तम;
भेटे तो जवन; प्रभु प्रियगुहा वाराव्या तच्छ्रम. ।
हर्षे सानुज निर्मळाशय निजश्रेयस्करार्यागमें;
प्रेमें त्या नमि वानरा भरत तो, नाचे महासंभ्रमें. ॥ १९

१. शल्यरहित. २. तत्+अत्यय=त्याचा नाश. ३. युद्धांत. ४. खड्गातें. ५. यमासारिखा. ६. वंशा. ७. युद्ध. ८. वर+अमत्र=श्रेष्ठपात्र. ९. अग्नि. १०. सूर्यत्वा. ११. वेगवान्.

श्रीमत्पुष्पक दे पुरा मह, जसा [1]बर्हिव्रजाला घन.
भेटे सानुज हृत्प्रिया; सदय तो राज्यांत घाली मन. ।
गाती सर्व [2]अजस्त्रधर्मनयजप्राज्या यशातें असें,
राजाराम करी, कवीस निववी निर्दोषलीलारसें. ॥ २०

श्रीदव्रीडदभाग्य लोक, नगरामध्यें न कोठें भय,
नाहीं मृत्यु; जरायमस्मृति, नरा; [3]मत्यंतिं भेद स्मय; ।
सौजन्यें यश जोडिलें [4]जगदिनें रामें यथार्थाभिधें;
केलीं सच्चरितें हरादिमहितें मोक्षार्थ नानाविधें. ॥ २१

'[5]त्रिःसप्तमंत्रमय' हें रामायण निवेदिलें ।
येथें मन मयूरें श्रीरामचंद्रा निवेदिलें. ॥ १

---

## ६५. सत्स्वरामायण.

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

श्रीश [6]ब्रह्महरामरर्षिवचनें सूर्यान्वयीं जन्मता
झाला; सर्वजगीं यशें करि सदा, सारा मही सन्मता. ।
कौसल्या [7]जयतीड्य राम जयतां वारी यमोपद्रवा,
ज्याचें [8]भावुकराशि नाम रुचलें अत्यंत [9]दुर्गाधवा. ॥ १

कैकेयीसुत तोचि होय भरत, श्रीला [10]वेरामत्र हा
पावे नंदन जन्मतां यम सुमित्राही, उदारा [11]मह; ।
तेजस्वी नयधर्मजन्य यश ज्या सेवी सुधी लक्ष्मण
श्रीशत्रुघ्न दुजा, विराजति, मना देती जनाच्या [12]क्षण. ॥ २

श्रीमान् गाधिजराज या दशरथा मागे महात्मा सखा
ओजस्वी तनय, [13]क्षपाचरहता राखावयाला मखा ।
दे व्हाया जयरामलक्ष्मण जगच्छ्रेयस्कर क्षमापती.

---

१. मोरांच्या समुदायाला. २. सनातन धर्माच्या न्यायापासून जन्मलेल्या मोठ्या यशातें. ३. मति+अंतिं=बुद्धीच्या अंतीं. ४. जगदीशें. ५. तीनदा सात म्हणजे एकवीस मंत्रांनीं रचिलेलें. ६. ब्रह्म+हर+अमरर्षि+वचनें=ब्रह्मदेव, महादेव, देवऋषि, यांच्या वचनें. ७. जयति+ईड्य. ८. कल्याणराशि. ९. पार्वतीपति शिव, त्याला. १०. श्रेष्ठपात्र. ११. तेजा, आनंदा. १२. उत्साह. १३. राक्षसांनीं भंगिलेल्या यज्ञाचें रक्षण करण्याला.

ते रात्रिंचर मर्दुनी, विनविती त्या कौशिकाची मती. ॥ ३
श्रीतें पावविली पुन्हा पदरजें दारा म[1]हर्षींदुची;
गांती सद्विज हें यश द्रुत करायाला मनाला शुची. ।
जेथें बा! भुजयत्नकुंठित जगन्नाथ प्रिय ख्यात, या.
काढी दिव्य शरासन प्रभु, मथी दोःशक्तिलेशें तया. ॥ ४
श्रीसीता प्रभुला पराक्रमजिता प्रेमें वरी; दे सुता
· हर्षें तीन तिघांजणा; करि यशा राजा महाविश्रुता; ।
जिंकी राघव बाहुजक्षयकरा [2]रामा; जय [3]क्षेमासुर
ध्याती वर्णिति, 'हा नरामर जगीं झाला महाभासुर. ॥ ५
श्रीश क्षोणिवरा पित्याहि मग दे धन्यत्व सत्यावनें,
सस्त्री सानुज जाय, राज्यपद तें सोडूनि, हृष्टें मनें. ।
तो राज क्षय जन्मदान यम हा दुःखें प्रभूतें नमी
धीरार्यस्तुत पादुका भरत घे, मध्येंच राहे श्रमी. ॥ ६
श्री सेवी न, धरावनीं परि मन स्थापी, तपस्वीपण
स्वीकारी, निज निश्चय स्थिर धरी, राहे महें आपण ।
भक्तज्ञानिमुनिव्रजप्रिय करी देते जनाशी भय,
क्रूरारातिं मथी, प्रियाहि हरवी, त्याचा कराया क्षय. ॥ ७
श्रीसंत्राणकरा जटायुस महाप्रेमें गती दे हरी;
हा निर्व्याजदय स्मरासम अतिक्रूरा कबंधा करी. ।
पूजी जी शबरी, जगत्त्रयमता [5]जन्मात्ययव्यापदा-
हीना तीस करूनि, पाववि वरा निःसीम भव्या पदा. ॥ ८
श्री दे मारुतिला; तसीच सुगळा ताराहि दावी महा;
तेजस्वीय हरादि गाति महिमा, अन्यत्र कोठें न हा. ।
शोधी भूजनितें, प्रभुप्रिय करी, साधी जय, [6]द्वेषिपू
जाळी; रावणसैन्य पुत्रहि मथी, चिंतेंत घाली रिपू. ॥ ९
श्रीचें हृष्ट करावया मन निघे, घे कीशसेनाशतें,
भारानें जगती धरी भय तदा, राजाहि मस्तें नतें. ।
झालीं; जों जळधीस ये, प्रयत तों बद्धांजळी तो यदा,

१. गौतम ऋषीची स्त्री. (अहल्या.) २. परशुरामा. ३. ब्राह्मण. ४. राक्षसविशेष, त्याला. ५. जन्म+अत्यय+वि+आपदा+हीना=जन्ममरणरूप जी विशेष विपत्ति तद्रहिता. ६. शत्रुनगरी (लंका) ती.

जैसा मोर तसा बिभीषण नमी, सारा मनोज्ञा पदा. ॥ १०
लंका श्री खचरा नमस्कृतिपरा दे देव, दावी दया;
बोधी सेतु जळांत आयतवरा, गावें महेंद्रें जया. ।
शस्त्रास्त्रें रजनीचरक्षय करी, जन्यांत अन्याय शें
ज्यांचे, त्यां गति दे प्रभु, श्रुतिपरा मर्त्याहि धन्या यशें. ॥ ११
श्रीकंठा चतुराननां अमरभूपा जो न मानी, तपा
नाशी, जन्म खळा वियच्चरवरा मांसाशना मद्यपा ।
मारी राम मुकुंद; तैं जयजयध्वानें स्तवें दाटलें;
ब्रह्मांडोदर सर्वसज्जननरामर्त्यां बरें वाटलें. ॥ १२
श्रीतें घेउनि राक्षसारि सुमनोयानीं बसे, ये पुरा,
सद्भक्तानुजहृत्प्रिय प्रभु करी राज्यें महीच्या सुरा.।
सर्वांही निववी जगासि सुयशें, अर्पी निजश्रेय तें,
राजीवाक्ष कवींद्र कोटि महितें तारी चरित्रें ततें. ॥ १३
'सत्स्वरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें ॥ १

---

# ६६. सत्कीर्तिरामायण.

(स्रग्धराछंद.)

श्रीभर्ता ब्रह्मवाक्यें दशरथसुतता घे, चतुर्मूर्ति झाला,
नामें तो राम विश्वप्रिय भरत सुधी लक्ष्मणारिघ्न आला; ।
ने विश्वामित्र, अस्त्रें प्रभुसि पढवि; तद्यज्ञ रक्षी, शिळेतें
तारी; जें दुर्लभ, श्रीहरधनुदलनें, रत्न, रामा मिळे तें. ॥ १
तेजातें भार्गवाच्या हरि; जनकवचोरक्षणा राज्य सोडी;
मातेच्या, दिङ्मुखार्तामरमुनिततिच्याही, प्रियातें न मोडी; ।
ताताला तोय दे, त्या धृतपद भरता पादुका; कीर्ति जोडी;
अत्र्यादिष्टें विराधा वधि, करुनि जटायुद्विजासींहि गोडी. ॥ २
प्रेमें गोदावरीच्या मुनिमहिततटीं जानकीयुक्त राहे;

१. युद्धांत. २. 'देवराजाला. (इंद्राला.) ३. पुष्पक विमानीं. ४. रावणानें पीडित जे देव आणि ऋषि त्यांच्या परंपरेच्या, समूहाच्या.

दिक्कंठ, स्वस्वसेचें प्रभुवर नुरवी नाक जें, तें न साहे; ।
ने सीतेतें, छळानें वधुनि खगवरा. क्षीणसा तो वदे 'हा !'
संस्कारी तातभावें प्रभु खगपतिच्या [1]स्वांकमुक्ता सुदेहा. ॥
मारी तारी कबंधा, वरगति शबरी जी तिला दे; समीरा
घाली हर्षी, करूनि प्रिय अनुग सुता त्याचिया त्या [2]प्रवीरा. ।
सुग्रीवा सूर्यपुत्रा प्रियसख करि, ने त्याहि बाळीस अंता;
सीता शोधूनि ये, त्या कवळुनि, हृदयीं गौरवी सर्व संतां. ॥
[3]देवांशर्क्षप्लवंगामितबळजळधी सिंधुतीरासि नेला,
भ्राता रक्षोधिपाचा, प्रथमचि, नमितां पाय, लंकेश केला. ।
भीतां अग्न्यस्त्रतप्तांबुनिधि, रचविला सेतु अत्यंत भारी,
संख्येनें लांब गावें शत, दश बरवा रुंद, आश्चर्यकारी. ॥ ५
दिक्कंठातें सुकंठ प्रथम निरखितां दाखवी तेज, ताडी;
तो दूता अंगदातें धरवि, धरितयां बाहु झाडूनि पाडी. ।
युद्धप्रारंभ होतां, बहुबळ खपवी राम कोदंडधारी.
बांधी [4]उग्राहिपाशीं घनरव विभुला लक्ष्मणा [5]नाकपारी. ॥ ६
'हा !' बोले दाखवीतां विकळ महिसुता; दे 'जटा' जी '[6]त्रि'पूर्वा,
ती धैर्या; स्वास्थ्य पावे करपलिहि सती, वृष्टिनें जेंवि दूर्वा. ।
[7]पक्षीश व्याळमूर्छा उडवि, करि तनू स्पर्शतां अक्षता; तें
ऐकोनि प्रेषिला जो यमसम [8]कलशश्रोत्र तो [9]अक्षतातें. ॥ ७
युद्धीं मारी प्रचंड प्लवगबळ, धरी मूर्छिता कीशपाळा;
तन्नासाकर्ण, वेगें सुटुनि [10]हरि, [11]हरी. त्याकरि क्रुद्ध काळा. ।
तो भक्षी कीश कांहीं, किति गिळि सगळे, जेंवि सुग्रास; 'हाय !'
सेना 'झाला' म्हणे, 'या प्रलयकर महाकाळ उग्रा सहाय !' ॥ ८
ध्वंसी त्या कुंभकर्णा प्रभु; दशमुख तो 'हा !' वदे. वासवारी
मायासीतावधें दे क्षण जडजनताभाव देवास वारी. ।
त्यातें सौमित्रि मारी; दशवदन रडे; श्रीवधा घे [12]असीतें;
त्यातें मंत्री म्हणे, 'बा ! न वधुनि अरितें, मारिसी कां असीतें ?' ॥ ९
सांगे, 'माराचि रामा कपिपतिसहिता.' पाठवी सैन्य भारी,

---

१. आपल्या मांडीवर सोडलेल्या. २. श्रेष्ठा. ३. देवांश असे जे ऋक्ष (आस्वल) प्लवंग (वानर) यांच्या अमितबळाचा (सैन्याचा) जळधि (समुद्र). ४. उग्र+अहि+पाशीं=उग्र अशा सर्पपाशीं. ५. नाक+प+अरि=इंद्रशत्रु. (इंद्रजित.) ६. त्रिजटा. ७. गरुड. ८. कुंभकर्ण. ९. अक्षाचा पिता रावण, त्यानें. १०. वानर. (सुग्रीव.) ११. हरण करी. १२. खड्गातें.

मारी त्या रुद्रसाचि प्रभु; उदधिस तो विप्रसा क्षिप्र सारी. ।
सारी घे शेष सेना, दशमुख समरीं लक्ष्मणा शक्ति हाणी;
न्हाणी रक्तें; तयातें पवनज उठवी, तें पुन्हा शृंग आणी. ॥ १०
प्रेषी वज्री रथातें; प्रभुसि बसवि तो मातली त्या सुयानीं.
वेधी त्या मार्गणांनीं प्रभु, न गणि अरी, विद्ध जैसा सुयानीं. ।
छेदी श्रीराम मूर्धे शतमित, उठले रावणाचे तथापी.
कर्णाहीं, भक्तिमान् जो परम रसिक, तो अद्भुता या कथा पी.॥ ११
सांगे जें कुंभजन्मा रविहृदय रणीं देवदेवा, जपे या
तो, यन्नाम स्वभक्ता सुकृत, हयमखा दे वदे वाजपेया. ।
भावें मायामनुष्यें स्तवुनि विनवितां, त्या असारा मराया,
सूर्यें, 'मारीं दशास्याप्रति,' वर दिधला या असा रामराया. ॥ १२
शक्राचा युद्धयज्ञांतिल सुमति सखा सारथी कारभारी,
सांगे जोडावयाला विजय निजयशोदायका फार भारी. ।
बाण ब्राह्में कराया परम निपुण जे भादि ते कैठ भारी
मारी दिक्कंधरातें उर चिरुनि महासंगरीं कैठभारी. ॥ १३
स्वर्वाद्यध्वान झाले, सुरवर विजयीं वर्षले सुप्रसूनें
सावित्रीनें शचीनें प्रभुनुति वरिली तारकारिप्रसूनें. ।
वैरीही पाववीला, करवुनि विधिनें सत्क्रिया, धन्यतेला.
तो, जों भू चंद्र सूर्य स्वयश, रघुवरें भक्त लंकेश केला. ॥ १४
देवीनें दिव्य केलें. स्वबळ उठविलें, जें रणामाजि मेलें;
अंतातें दुःख नेलें, प्रभुवरयश जें तें दिगंतासि गेलें. ।
शोभे या भूमि चेलें, सुरुचि वरि दिवा, बोध या स्वच्छतेलें;
वंदावें यासि वेलें अमरवसतिच्या, शंभु या हृष्ट बेलें. ॥ १५
पूजार्थी रावणाचा सदनुज विनवी; त्या म्हणे राम, 'बा! जें
सुग्रीवाचें कपींचें प्रिय करिसिल, तें पूजन श्रेष्ठ माजें. ।
स्त्री, तैसा भेटवूनि त्वरित भरतही, सद्यशें फार साजें;
मी त्यावांचूनि, चित्तीं श्रवणहि करितां भोगपूजोक्ति, लाजें.' ॥ १६
तो सत्कारी सुकंठा कपिबळसहिता; पुष्पक प्रैह्वभावें

---

१. परशुरामाप्रमाणें. २. स्वर्गसंबंधी वाद्यांचे शब्द. ३. उत्तम पुष्पें. ४. पार्वतीनें. ५. वस्त्रें. ६. माझें. ७. नम्रपणानें.

बैसाया दे; म्हणे त्या प्रभुवर, 'भरता त्वां पाहायासि यावें.' ।
सेना मुक्ता, कपीशा बसवि, मग निघे व्योममार्गें विमानें;
देवीतें युद्धभूमि स्वपरयश कथी, सेतुतें दावि मानें. ॥ १७
श्रीनें तारा विमानीं करुनि बहु दया आणवीतांचि, आली.
झाली हृष्टा, पहातां जनकनृपसुता, ती करी तीस आली[1]. ।
श्रीस श्रीराम सांगे, 'मज, तव विरहीं, हे करी आर्त पंपा
कंपा दे, या असूंतें; सति! सुदति! म्हणे, ताप देऊनि, 'संपा.' ॥ १८
श्रीतें दावी कबंधस्थळ, कथुनि कथा, राम, गोदावरीतें;
जें होतें खिन्न, तीचें, श्वशुरसुगतिनें, चित्त, मोदा वरी तें. ।
पाहे त्या त्या अगस्त्यप्रमुखसुमुनिच्या साधुगीताश्रमातें.
सोडी, ती चित्रकूटा निरखुनि हृदयांतूनि सीता श्रमातें. ॥ १९
राहे राम प्रयागीं. सुकृतनिधिभरद्वाजपादांसि वंदी;
बंदीसा वेद ज्यातें स्तवि, शतधृतिही[2], तोहि, यत्पत्र[3] नंदी. ।
प्रेषी वातात्मजा, तो कळवि कुशळ, ते पावले हर्ष भारी.
सारी वर्षें प्रयागीं, प्रभु पदनिरतां त्यांसि भेटोनि तारी. ॥ २०
जें होतां, श्रीश राजा, शिवें[4] कथिल, कृती[5], काय तें, विप्रजाया[6]
जेंवि स्वोद्धार होतां प्रमुदितहृदया गाय, तेंवि प्रजा या. ।
हा देवांयास[7] तैसा निपटुनि, उडवी पामरायास[8]. मोर
प्रेमें होऊनि नाचे सकळजन घना रामरायासमोर. ॥ २१
'सत्कीर्ति' स्रग्धरा कन्या हे रामायणसत्कथा ।
मयूरें अर्पिली रामा वरा, जाया मनोव्यथा. ॥ १

---

# ६७. कविप्रियरामायण.

(अश्वधाटी छंद.)

धाता स्तवी, अभयदाता स्वयें दशरथा तात माधव करी.
माता तिघी तनयशाता[9]; महांवसति[10] हा ताप सर्वहि हरी. ।

---

१. सखी. २. ब्रह्मदेव. ३. ज्याचें वाहन नंदी, तो शिव सुद्धां स्तवी. ४. कल्याण. ५. कृतकृत्य. ६. अहिल्या. ७. देवाचे श्रम. ८. पामरांचे श्रम. ९. पुत्ररूप सुखाला. १०. मोठें स्थान.

या तारका सुकवि गातात; राम अघवाताहि[1]; यापरि रसें
भ्राता जगीं भरत माता[2] न, लक्ष्मणहि, पाता अरिघ्नहि, असे. ॥ १
झाला द्विजत्वपद[3]; आला अशांत मुनि[4], त्याला सहानुज[5] दिला.
व्याला यश; स्वरिपुकालाहिताक्ष्र्य[6]; गुरु धाला; नित्रे बहु ईला[7]. ।
हा लावि पादरज; बाला[8] शिलेसि करि; भालाक्षचापहि[9] चुरी.
याला समर्पि मति; माला वरी; अवनिजा लाभली रति पुरी. ॥ २
धामा[10] हरूनि, वधकामा[11] प्रशांत भृगुरामा करी रघुपती;
धामासि[12] ये; नृपति यामागुनी भरतमामा वरी स्ववसती; ।
सामात्य भूप, 'अभिरामा स्वराज्यपद रामासि देइन,' वदे.
वामा[13] म्हणे, 'वनचि द्या, माजियाचि पद,' सामा न मान लव दे. ॥ ३
जो डीक तेंवि, परि, जोडी नृपासि कर, सोडी प्रियानुजसह[14];
खोडी ललाटलिपि, गोडी यशींच बहु, तोडी श्रितानुगमह[15]; ।
फोडी न गुह्य, तम झोडी, दया करि न थोडी पदानत जनीं.
मोडी न रीति, तरि होडी तसी, सुगति घोडी सजी मुनिवनीं. ॥ ४
तोका स्मरे नृपति, जो कातरत्व धरि, शोकार्तमानस मरे.
ओकास ये भरत, लोकापवादहत तो कार्य साधुनि सरे. ।
ओकारि आइ सम धोका करी बहु, अहो! काय तें पद तया?
हो कामद श्रित विलोका म्हणे प्रभुसि झोका[16] न हा म्हणु दया. ॥ ५
व्यापास[17] दे सदय त्या[18] पादुका, हरुनि तापास, पाठवि पुरा[19].
बापास तेंवि, नमि मापाल[20] अत्रिस, उमापा श्रमा करि चुरा. ।
सापा तसाच वश शापा विराध गतिला पाववी, बहुमुनि[21]-
व्यापारभीघ्न सुख पापारि दावि घटजा[22], पादपद्म नमुनि. ॥ ६
पाहे जटायु खग, बाहे म्हणे, 'तनय आहेस, जाण वसती

---

१. पातकरूप वायूला भक्षणारा सर्प. २. मावता. ३. द्विजत्वाला स्थान झालें; त्याचें उपनयन झालें. ४. मुनि विश्वामित्र. ५. बंधु लक्ष्मणासहित. ६. स्वरिपु हाच जो काळसर्प त्याला ताक्ष्र्य (गरुड) असा तो राम. ७. पृथ्वी. ८. स्त्री, अहल्यासती. ९. कपाळीं नेत्र ज्याच्या, अशा शिवाचें धनुष्यही मोडी. १०. तेजाला. ११. वधाची इच्छा करणाऱ्या भृगुरामाला. १२. घरीं. १३. स्त्री, कैकयी. १४. स्त्री आणि बंधू यांसह. १५. आश्रित सेवकांचा उत्साह. १६. 'घोका' असाहि पाठ आहे. १७. वि+आपास=उदकावांचून असणारा जो भरत त्याला. १८. त्या भरताला. १९. नगराला. २०. रामचंद्र. २१. बहुत मुनींच्या व्यापाराला जें विघ्न, त्याचा नाश करणारा. २२. अगस्त्याला.

बा! हे तुझीच, वस, लाहे प्रमोद;' विभु राहे निवे बहु सती. ।
बाहे कुबुद्धि वपु, या हेय तें; प्रभु न साहे, विरूप करवी.
[1]स्वाहेशसाचि शुचि बाहेर घालि तिस, माहेर ती न उरवी. ॥ ७
जो राक्षसेंद्र खळ, चोरा तया परमघोरा सतीहि गवसे.
[2]होरी गणी कुमति तो रावण; क्षुधित मोरा मदें अहि डसे. ।
'भो राज्ञि! भेटचि, नको राग दावुं चिर, थोरा जनीं नच वसे'.
खोरा म्हणे, 'न दृढ हो; राम, केवळ चकोरास चंद्र न दिसे.' ॥ ८
अक्षीणहार्द विभु अक्षि श्रितीं वसवि, पक्षी पित्यासम करी.
स्वक्षीरशुद्धयश लक्षी, कबंध वधि, न क्षिप्र सोडि शबरी. ।
भक्षी फळें, स्वनिधि यक्षीस दे सुगति, रक्षी पदानत हरी.
प्रक्षिप्तबाण कपिवक्षीं शिरे, दहन [3]कक्षीं तसा, असु हरी. ॥ ९
रुद्रावतार न समुद्रास भी, [4]द्विषदसुद्रावक द्रुतगती.
मुद्रार्पणें हरुनि [5]उद्राक्षसाधि करि मुद्राशि तो बुध सती. ।
सुद्राक्षवाक् श्रुति न शूद्रा जिरे, सति न [6]रुद्राक्षराजि उचिता,
क्षुद्रा वदे कपि मरुद्राज पाहुनि समुद्रा तसीच शुचिता. ॥ १०
अंकातिवीर्यपरकंका मराल [7]पविटंकातितीक्ष्णनखर
डंका करी [8]शमनसंकाश, जाळि वरलंकाख्यशत्रुनगर; ।
रंका तसें न गणि पंकाब्धिला, त्यजुनि शंका, शिवे परिभवा
अंका न [9]दास्यविदलंकार [10]तो [11]हरि कलंका यशें अरिभवा. ॥ ११
श्रीराम भेटुनि समीरात्मजा, जलधितीरास जाय सबळ
क्षीराब्धिसें यश करी, रावणानुजनिची राहवी तळमळ. ।
वीराद्य सेतु रचवी, राक्षसांसकट भी रावणास धरवी.
धीरार्यमौलिमणिनीराजितांघ्रि विभु ही राजरीति करवी. ॥ १२
दूता न मानि [12]पुरुहूतारि मंदमति पूता मता नच वळे.
[13]चूता त्यजूनि वरि [14]तूता, सुमंत्रहतभूतापरीच खवळे. ।
[15]लूताभवा न गज सूता, धरे प्रभु चमू तापवूनि खपवी,

---

१. स्वाहा+ईश=स्वाहेश, अग्नि. २. उत्तम मुहूर्त. ३. तृणावर. ४. द्विषद्+असु+द्रावक=शत्रूच्या प्राणांला वाहविणारा. ५. उद्+राक्षस+आधि=मोठा राक्षसरूप व्याधि. ६. आनंदाचा राशि. ७. पवि+टंक+अतितीक्ष्ण+नखर=वज्राघातापेक्षां अतितीक्ष्ण नखें ज्याचीं असा. ८. यमासारखा. ९. दास्य जाणत्यांमध्यें श्रेष्ठ. १०. मारुती. ११. हरण करी. १२. इंद्राचा रिपु. १३. आम्रफळाला त्यजून. १४. तूतनामक क्षुद्र फळाला. १५. कोळ्यापासून उत्पन्न झालेल्या सूत्राला.

धूता मळा, नमनिं भू तारिता, [1]द्रुहिणसूता यशांत लपवी. ॥ १३
से[2]ना रणांत बहु सेना सदा खपति, येना कधीं जय करा.
श्येना पुढें चटकसे नाशले सुभट, वेनाधिकोद्धत खरा. ।
जे नाशहेतु गुरु, ते नागपाशमुख फेना अपाय हसले.
मे[3]नासुतात्तनुति देना स्वहानि, [4]सुइजेना तयास न सले. ॥ १४
हाणी [5]पयोदरव, पाणी असें म्हणवि, न्हाणी बळ [6]क्षतभवें;
बाणीं खिळी, अगद आणी, प्रमोह नग खाणी, मरुत्सुत लवें. ।
[7]प्राणींद्रधी निववि वाणी समेत, [8]शिवराणीहि साधु वदली.
गाणीं शचीहि रचि, वाणी शिवार्थ कपि जाणीव शक्ति बदली. ॥१५
[9]स्वारी सबंधुसुत मारी प्रभु, स्वहत तारी, दया बहु करी.
वारी जनुर्मरण, सारी अघें, परमभारीहि दुर्मति हरी. ।
[10]नारीश्वरी सुखवि, खारी सुधा गमवि, चारी यश त्रिभुवना.
हा रीति चापशरधारी असी प्रकटि [11]सारी, बरी कविमना. ॥ १६
प्राज्यानुकंप करि राज्याधिकार, बहु[12]वाज्यादि दे द्विजजना.
आज्यासि होमि, मुनि याज्यातिमुख्य मग हा ज्या न ओढि [13]दमना. ।
त्याज्या न त्या भजति याज्या प्रजा गति [14]विभाज्या तयां करि महा
आज्यादि दीक्षित धराज्यानिजित् त्रिदशराज्यार्तिनाशक महा. ॥ १७
व्हावें कृतार्थजनु जावें लयासि अघ, यावें महागतिमना.
व्यांवें विशुद्ध यश, मात्रे जगीं न तरि, भावें दशास्यदमना. ।
ध्यावें, स्वतत्व उमगावें, असेंच शुचि, ठावें असें गुरुमुखें
'पावें प्रभो! म्हणुनि नावें सदा जपत गावें चरित्रचि सुखें. ॥ १८
धाया, मयूरमतिला या यशीं शिरवि, मायानियामक बळें.
गाया तरीच गुण हा यामिनी दिवस, नायास नाकुळ खळें, ।
कायादि सर्व रघुराया समर्पुनि, निवाया सुबुद्धि सजले,
माया करी प्रभुचि दायादसे भजक पायां म्हणोनि भजले. ॥ १९

---

१. शिवपुत्र स्कंद याला. २. स+ईना=अधिपतिसहिता सेना. ३. मेनासुत मैनाकपर्वत, त्यापासून मिळविली आहे स्तुति ज्यानें, असा मारुती. ४. बुरणुसाला. ५. मेघनाद. ६. रक्तानें. ७. प्राण्यांचा इंद्र राम, त्याची बुद्धि. ८. पार्वती. ९. स्वअरि, रावण. १०. पार्वती. ११. सर्व (रीति). १२. वाजी+आदि. १३. दमविण्याला. १४. विभागण्याला योग्य.

# ६८. सद्रत्नरामायण.

(अमृतध्वनि अथवा अश्वधाटी छंद.)

मा[1]पाल देव वि[2]धिच्या पावला स्तुतिस; हा पावना रचि कथा.
क्ष्मा[3]पा, करि स्व[4]गुरुतापात्र, शक्र[5]नुतचापाशुगा, दशरथा. ।
स्थापावया सुपथ, दापावया सदरि, बापाचिया प्रिय[6]सखा,
शापालसा सुखवि, तापा हरूनि, नत[7]पापारि, रक्षुनि मखा. ॥ १
क्षिप्र[8] प्रभूत्तम हरी[9] ग्रावभाव[10], बहु विप्रप्रियेसि निववी.
त्र्यक्ष[11]प्रसिद्धधनु लीलेकरूनि चुरि, रक्षः[12]क्षितीश भिववी. ।
सीता वरूनि, भृगुराम[13]प्रतापदवभीतात्मतात जिववी.
पर्वा[14]मृतांशुशतगर्वापह, स्वयश सर्वा यथेष्ट पिववी. ॥ २
रा[15]मा अरण्य, भरता यौवराज्य, वर रा[16]मा असे गुरु[17] वरी.
राजा जरी विनवि, ऐकेचिना; हृदय भाजावया, हट करी. ।
लक्षी न राज्य, पितृसत्यव्रता अजित रक्षी, त्यजी निजपटा.
भार्यानुजांसहित वल्की, निघे त्रिदशकार्या, शिरीं धरि जटा. ॥ ३
पेटे पुरीं असुख भारी, तरि त्यजुनि, भेटे गुहासि, विरवी.
पूता सुसांत्वुनि, सुमंत्राभिधा स्वगुरुसूता दयालु फिरवी. ।
गंगा तरे, मग भरद्वाजसन्मुनिस [18]संगापहस्मृति, नमी.
यो[19] चित्र[20]कूटनगवासी स्तवी, अभय याची[21] कृपाब्धिस शमी[22]. ॥ ४
शोकें मरे नृपति; होता सुधी भरत आधींच मातुळपुरीं.
त्या आणिती सचिव; जाणोनि मातृकृत तो होय सक्षत उरीं. ।
तातक्रिया करुनि भेटे, म्हणे, 'परत, रक्ष प्रजा, कर दया.'
'वर्षे चतुर्दशचि राहेन बा! न चिर,' सांत्वी असें वरद या. ॥ ५

---

१. लक्ष्मीपति. २. ब्रह्मदेवाच्या. ३. पृथ्वीपतीला. (दशरथ.) ४. आपल्या पित्याची पदवी देई. ५. इंद्रानें स्तुत धनुष्यबाण ज्याचे अशा दशरथा. ६. ही द्वितीया विभक्ति आहे. ७. नत+पाप+अरि=नम्रजनाच्या पापांचा शत्रु राम तो. ८. सत्वर. ९. हरण करी. १० पाषाणत्व. ११. शंकराचें प्रसिद्ध धनु. १२. रावण. १३. भृगुराम+प्रताप+दव+भीत+आत्मतात=परशुरामाच्या प्रतापरूप वणव्यानें भ्याला जो आपला बाप दशरथ तो. १४. पूर्णिमादि पर्वसंबंधी जे शंभर चंद्र त्यांचा गर्व दूर करणारे. १५. रामचंद्रास. १६. स्त्री कैकेयी ती. १७. मोठें. १८. संग दूर करणारी स्मृति ज्याची असा राम तो. १९. रामा. २०. चित्रकूटपर्वतीं रहाणारा. २१. प्रार्थी, मागे. २२. योगी. 'चित्रकूटनगरवासी' या शब्दाचें विशेषण.

मागोनि घे, सुमति हा, पादुका, नमुनि मागें सखेद परते.
राहे पुरीनिकट, भक्षी फळेंचि, विषयीं शुद्धबुद्धि न रते. ।
भेटोनि अत्रिस, विराधा समुद्धरुनि तो भाउ दंडकवनीं
घाली सुखांत, मुनि याच्या जगांत सुखशोभा उदंड कवनीं. ॥ ६
संगा त्यजूनि, सुतपोनिष्ठ साधु शरभंगादि जे मुनि सदा,
देवीसह[1] प्रणत[2] होवूनि, सानुजनि[3] सेवी तदाश्रमपदा. ।
वंदी अगस्त्यचरणातें, श्रुतिस्तुतहि[4] बंदीतसा[5], स्तव करी.
चित्राचि रीति गुरु गृध्रा म्हणे स्वगुरुमित्रा[6] सुतत्वचि[7] धरी. ॥ ७
गोदावरीतट विलोकूनि, रम्य शुचि[8], मोदा वरी बहु मनीं.
शोभा करूनि, दशकंठस्वसा, विषयलोभा धरी मुनिधनीं[9]. ।
नांसा[10] तिची असिस[11] सौमित्रि दे, ऋषिगणा 'साधु साधु' वदवी.
भ्राता तिचा खरहि सेवी रणीं, वरुनि घातासि, मृत्युपदवी. ॥ ८
मीनासि जेंवि गळ, सांगे जडा युवति ती नाशहेतु, ढवळी.
दावी विरूप मुख दिक्कंधरा, धृतमदा, वीतबुद्धि[12] खवळी. ।
मायासुवर्णमृग धाडी, तयासि परमा याचि, राम अनुजा
देवीसमीप मग ठेवी, निघे, सुतनु[13] दे वीरपा[14] सुधनु ज्या. ॥ ९
हाणी शरें कपट जाणोनि राम, मृग वाणी करी प्रभुपरी.
आणी अनिष्ट, विभुची ती, मनीं भिवुनि, राणी सुबुद्धिहि बरी. ।
खाणी[15] विवेकसुगुणांची, सदा संनुति[16], वाणी प्रभेदद[17] वदे.
पाणी मुखीं नुरवि सौमित्रिच्याहि, तिर्जवाणी[18] न खेद दव दे. ॥ १०
जाची[19]; म्हणे 'मदभिलाषीं न तूं उचित, जाचि, प्रभुप्रियतमा.'
केला उदश्रु, कळवायासि तो असुख, गेला तया पितृसमा. ।
तों देवशत्रु हरि सीतेसि, दुःखतम कोंदे तिच्या मृदुमनीं.
तोंडी, करी कपट जेव्हां त्यजूनि नय, पाडी जटायुस वनीं. ॥ ११
लंकापुरीं तिस अशोकीं वनीं बसवि, पंकां[21] न भी, न मरणा;

---

१. सीतेसह. २. नम्र. ३. कनिष्ठबंधू जो लक्ष्मण त्यासह. ४. वेदांनीं स्तुत असाही राम. ५. भाटसा. ६. आपल्या बापाचा मित्र जो जटायू त्याला. ७. पुत्रत्वचि. ८. शुद्ध. ('गोदावरीतट' या शब्दाचें विशेषण.) ९. ऋषीचें धन जो राम त्याचे ठायीं. १०. नासिका. ११. ख[illegible]. १२. गेली बुद्धि जिची असी शूर्पणखा. १३. सीता. १४. वीररक्षणकर्त्या रामाला. १५. खाण. १६. निरंतर प्राप्त स्तुति जीला असी. १७. भेद देणारी. १८. त्या सीतेच्या वाणीसारिखा. १९. जाच करी. २० लक्ष्मण सांगे. २१. पापाला.

अंका म्हणे पदक; चंडांशुसीं, त्यजुनि शंका, सजे तम रणा. ।
सांगे[1] स्वताप गुरुतें. तो वदे, 'सुमुखि! भांगेपरीस वरिलें
कां गे! कटुत्व? शिशुसें कीं मुखीं सुवच रांगे सदैव धरिलें. ॥
तो[2] 'हां[3]!' वदे, उटज[4] पाहोनि शून्य, धरि मोहा मनुष्यचरित[5].
श्रीला वनीं हुडकि, नाना विलाप, निजशीला त्यजूनि, करित. ।
वाटे जनांत अजित स्त्रैण, शोक रस दाटे, जगीं न कथवे.
क्षोणी भिजे; खग मृगांचे, वनीं चरति, कोणी उदश्रु, न, थवे. ।
आर्ता पुसे पितृसखा; तो कथी अहित वार्ता, मरे; मग तया
दे तोय, पिंड, जनका तेंवि; 'हाय!' हि वदे, तोषवी, करि दया.
बंधा हरि प्रभु कबंधाचिया; दुरितगंधाहि राम नुरवी.
तारी द्रवोनि शबरीतें, तदिष्ट दुरितारि क्षणांत पुरवी. ॥
पंपातटीं करि विलाप, प्रियाविरहसंतप्तमानस हरी[6];
'शंपावियुक्त[7] घनसा मी,' म्हणे, 'धृतिस कामाप्त[8] कोकिल हरी, ।
कंपावह श्वसन आलिंगुनीहि लसदंभोजराजि[9] लहरी,
संपादिना विजय कां? होउनि त्रिपुरकाळ स्मरद्विपहरी.' ॥
सौमित्रि बोध करि, 'मारूं रणांत अरि, जाईल दूर जरि तो.
गांठी गजासि हरि[10], शोधूनि जीव हरि[11], जो मत्त मंतु[12] करितो. ।
आचार्यदत्त वर, आहेत, चाप शर; चिंतेंत चित्त न रतो.'
सांगे कबंध, 'वर कीशस्वकार्यकर, हो स्वस्थ, शत्रु मरतो.' ॥
वातात्मज प्रथम भेटे, सुकंठ मग, या तापसव्रतधरा;
झाला सखा अजित; पावोनि तो अभय, धाला इनात्मज[13] बरा. ।
दावी अलंकृति[14] सतीच्या; तिला स्मरुनि 'हां[15]!' वीतमोहहि[16] वदे.
मित्रास[17], वालिदलनानें परंतु करि वित्रास, राज्य शिव दे. ॥
शोधास पाठवि सतीच्या, सुकंठ कपि; योधायुतें न वनभू
राहे न धुंडिलि, विलंघूनि सिंधु, तिस पाहे कृती पवनभू. ।
मुद्रा समर्पुनि महीजाकरीं[18], अतुळ मुद्राशि[19] दे, खळबळें

१. याचा कर्ता 'जटायु' अध्याहृत. २. राम. ३. हाय. ४. पर्णशाला. ५. मनुष्यासारिखें आचरण ज्याचें असा. ('तो' याचें विशेष्य.) ६. राम. ७. विजेनें रहित. ८. मदनाला आप्त. ९. लसत्+अंभोज+राजि=शोभणारी कमलपंक्ति. १०. सिंह. ११. हरण करी. १२. अपराध. १३. सूर्यपुत्र (सुग्रीव). १४. दागिने. १५. हाय. १६. गेला मोह ज्याचा असाही राम. १७. सुग्रीवास. १८. सीतेच्या हातीं. १९. आनंदाच्या राशि.

मारी रणीं, दशमुखा तेज दाखवुनि भारी, म्हणे, 'खळबळें.' ॥ १८
अक्षा दशास्यतनया संहरी, कपटदक्षा धरू घनरवा
दे, हा अजस्त्र करि युद्धांत बद्ध जरि देहा, धरी न परवा; ।
मत्ता कथि क्षय, पुरारातिबाणबळवत्ता शिरे गगनिं घे.
पाळी बिभीषणगृहातें मरुत्तनय, जाळी पुरी, मग निघे. ॥ १९
दे अंगदादिकपिचक्रा प्रमोदभर, शक्राहि तो बहु बरा.
श्रीच्या शिरोमणिस अर्पी, कथी कुशळ, तर्पी तया प्रभुवरा. ।
भेटे मरुज्जनिस[1], हर्षे, हिमाश्रुजळ वर्षे, स्वयें जरि धणी;
लागे विशुद्ध यश गाया, स्वभक्तिवशगा या असुप्रद गणी. ॥ २०
ज्यांच्या रजें रवि दिसेना, अशा प्लवगसेना सजूनि, सहिता;
पावे समुद्रतट, तारावया त्रिजग, मारावयासि अहिता, ।
ज्ञाता बिभीषण नमी पाद; त्या पदसमीपागता वरद, 'या'
ऐसें म्हणोनि पद दे; हा करी विनयगेहा नतावर दया. ॥ २१
होऊनि ज्यासि नत गावें, सुसेतु शतगावें[2] असा करविला.
साधूंसि हा सुमहिमा, ज्या नसे अवधि, माजानिनें[3] भरविला. ।
रोमांच, सोडवुनि गर्वा, हरिप्रमुखसर्वां सुरां धरविला,
कोणी दिसे अमर अन्य त्रिलोकमत, धन्य स्वयें न रविला. ॥ २२
लंघी नदीपतिस, वेंधे सुवेळनगशृंगीं सुकंठसहित,
प्रेक्षी सुवर्णमयदुर्ग प्रभु, प्रभुबळौघासि मोहि अहित. ।
क्रोधें उडे सुगळ, ताडूनि तन्मुकुट पाडूनि, दावुनि बळ,
श्रीतें हरूनि, जय संपादुनि प्रथम, दे त्या खळा अघफळ. ॥ २३
जो वाळिपुत्र, पटु पूतस्वभाव, धरि दूतत्व, अंगद वदे.
'राजा, पहा पवन तूला, नगा सुदृढमूलाहि भंग दव दे. ।
पावो प्रभूत्तम न रोषा, हिता हि परयोषा न, साम कर गा!
अन्या असें समज, बापा! धरूनि मद चापा न रामकरगा. ॥ २४
दुर्वार दुष्टमतिचा वेग, पापअहि चावे, सुधा भरविल्या.
कोपे दशास्य खळ, सामा न मत्त पशुसा मान दे, धरवि त्यां[4]. ।
बाहू अरी धरिति जे, त्यां करि व्यसु, उडे तो हरी विवैरसा[5].
भारी जरी रिपु पहाती, तरी न सुजनाभीतरी विवर सा. ॥ २५

---

१. मारुतीस. २. शंभर गावें. ३. लक्ष्मीपती जो राम त्याणें. ४. मारुतीला. ५. गरुडसा.

मानी न साम वरि कोपोनि; राम धरि चाप स्वधामक[1] रणीं.
  प्रेरी बेळें[2], अवनि रक्तें पळें भरवि, मेले छळें भटमणी. ।
तो शोणितें कुमति रंगे, नुरे कटक, भंगे चमूपति मरे.
  मागें सरे तरि न, रागें भरे जरि, न आगें[3] तरे बळ, सैरे. ॥ २६
श्रीरामलक्ष्मण करी बद्ध मेघरव, चिंतेंत सर्व बुडवी.
  श्री 'हा!' म्हणे; करि खगेंद्र प्रिय, त्वरित ते नागपाश उडवी. ।
जो कुंभकर्ण यमसा, त्यासहि प्रभु, रणीं ठाकुनि स्थिर, वधी.
  दे शोक दुःसह दशास्या, तदात्मजहि मारूनियां निरवधी. ॥ २७
शल्यार्त मूर्छित, ससैन्य प्रभुद्वय, रणीं, तो घनध्वनि करी.
  कैलासपर्वतसमीपस्थ ओषधिनगातें मरुत्सुत हरी; ।
आणी सदोषधि, सुगंधानिळें सकळ झाले विशल्य सबळ;
  श्रीरामलक्ष्मण, कराया, पुन्हा दशमुखाचा बळौघ, कवळ. ॥ २८
मायामयी जनकजा दाखवूनि, वधि जो मेघनाद कपटी,
  त्यातें बिभीषणमतें राम, बंधुशरकाळाननांत, दडपी. ।
सीतावधार्थ उपसी, तापला खळ, असी[5]; तारकापतिस ती
  चिंती; तया सचिव वारी, म्हणे, 'प्रभुचि तारी, महामति मती.' ॥ २९
धाडी दशास्य चतुरंग स्वसैन्य, विभु पाडी; तयासह रसा-
  भारापहार करितां ईश्वरें बहु, निवे धातयासह रसा. ।
पाहे पुरीं सतत ओकें, मृताप्तपतिशोकेंकरूनि भरितें.
  जें राक्षसीकृतविलापाप्रियश्रवण, साहे न तो सदरि, तें. ॥ ३०
घेऊनि शेष बळकोटी, धरूनि धृति मोठी, दशानन निघे,
  निर्भी असामकर वेगें, जसा मकर, सैन्यार्णवीं मग रिघे. ।
मारूनि शूरवर, सारूनि दूरवर, न स्वल्पसें क्षतहि घे.
  तो मांसरक्तमयपंकें शतायुत, विशंके मनें भरि, विघे. ॥ ३१
तो शक्ति हाणुनि उरीं, लक्ष्मणास अरि तत्काळ मूर्छित करी;
  तत्तेज जो प्रभु मरुत्पुत्र, तोचि भगवद्बंधुकश्मळ हरी. ।
दिव्यौषधि, क्षितिधराच्या, पुन्हा अतिजवें आणिल्या, सुशिखरें.
  हस्तें, निजोनि उठल्याचें, सुवत्सल सुहृद्युग्म, तो पुशि खरें. ॥ ३२
प्रेषी महेंद्र रथ, बैसे पवित्रकथ, देवद्विजारिमथना;

---

१. आपलें तेज असें. ('चाप' या शब्दाचें विशेषण.) २. सैन्यें. ३. अपराधें. ४. खपे.
५. खड्ग.

द्यायासि तृप्ति, नवि लावावयासि कविकोटि स्वकीर्तिकथना. ।
श्रीराम दिग्वदन दोघे परस्परहि मोघेप्सित[1] क्षणभरी
होती, क्षण स्वजय मानून हर्षति, न भानूनमार्गण[2], अरी[3]. ॥ ३३
छप्पन्न[4] याम करि संग्राम राम, जरि तोडी शिरें शत, तरी
पावे न मृत्यु अरि, लीलामनुष्य हरि चिंता मनीं बहु धरी. ।
भेटे अगस्त्य कवि, सांगे सुमंत्र, रवि होय प्रसन्न, वर तो
दे, 'हो पराद्रिपवि, सत्कीर्ति नित्य नवि, अन्यत्र विश्व न रतो.'॥ ३४
ब्रह्मास्त्रमंत्रितशरें, रामभद्र उर भेदूनि, शत्रुस वधी.
विश्रांत होय, विजयें त्या, सुखोदय, जयाला नसेचि अवधी. ।
तों पुष्पवृष्टि बहु, वाद्यध्वनिस्तवजयध्यानगाननटनें
झालीं मनें शुचि, यशें या; असीं सकळतीर्थांचिया न अटनें. ॥ ३५
ज्ञाता बिभीषण यथोक्त क्रिया, रघुकुलेशप्रियास्तव, करी.
स्थापी तया मग पदीं, लक्ष्मणा कथुन, दीनानताश्रय[5] हरी[6]. ।
कीर्त्यर्थ दिव्य[7] रचि सीता, सुरर्षिशतगीता, तितें प्रभु वरी.
प्रेतें[8] बळें उठवि, लावी निज स्तुतिस, दावी कृपा बहु बरी. ॥ ३६
स्वर्गागता[9] दशरथा, रामचंद्र करि थारा[10], सदा नवमहा[11].
वंदूनि पाय, अतिधन्या तया कळवि, अन्या सुखा अवम[12], हा. ।
जो चातकाचिपरि होता, सदा करुनि अत्यार्त आ, शुभरता
त्या, पुष्पकीं[13] बसुनि ये, तो दयामुदिर[14] दे भेट आशु भरता. ॥ ३७
माता, वसिष्ठ गुरु, बंधु, प्रधान, जन पौर, प्रजा, न वन तें;
भेटे वसंतविभु, झालीं तया[15] सकळ शोभा सुखें अवनतें[16]. ।
सिंहासनीं बसुन, ते हर्षवी, करित होते सदा नवस जे.
श्रीकांतरंजन कराया, बहु द्रवुनि, होऊनि मानव, सजे. ॥ ३८
कामारि[17]चित्तसुखधामा! सुराहितविरामा! समस्तसदया[18]!
नामा मुखीं वसिव, बा! मागणें न बहु, रामा! बळेंचि सदया! ।

---

१. व्यर्थ इच्छा ज्यांची असे. २. सूर्यापेक्षां उणे बाण ज्यांचे असे. ('अरी' या शब्दाचें विशेषण.) ३. रामरावण. ४. सात दिवस. ५. दीन, नम्र यांचा आश्रय असा. ६. राम तो. ७. शपथ, रवा. ८. मृत सैन्यें. ९. स्वर्ग+आगत=स्वर्गापासून आलेल्या. १०. आश्रय. ११. नूतन आनंदास. १२. निंद्य, निकृष्ट. १३. विमानीं. १४. दयामेघ राम तो. १५. वना. १६. नम्रें. १७. मंदनाचा शत्रु जो महादेव त्याच्या चित्तसंबंधीं सुखाचें स्थान अशा हे रामा. १८. सर्व साधूंच्या उत्तम दैवा हे रामा.

घामा स्वयें पुससि, सामादृता करिसि, आमासि पक्क रसदा !
सामान्य हा तुज असा, मान्य तूं, अतिथिसा मान किंकर सदा. ॥ ३
'सद्रत्नरामायण' हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणीं भावें वाहिलें कृतवंदनें. ॥

---

## ६९. सवाईरामायण.

(मदिरा वृत्त.)

### बालकांड.

श्रीपतितें विधि[1], 'रावणपीडितविश्वसुखार्थ,' म्हणे, 'नरसा हो.
वृद्ध, अपुत्र, न आधि सदा, 'दश'पूर्व'रथा'भिध भूवर[2], साहो. ।
कश्यप तेंवि, पितृत्व तुझें, रविवंशज हा शुचि सुव्रत लाहो.
या परमाश्वमखें[3] यजितां तुज, यावरि दुःख न लेशहि राहो.' ॥ १
विष्णु, 'अवश्य' म्हणे; अनलार्पित[4] पायस, जें करि कारण याला,
प्राशिति त्या नृपदार यथाविधि, तद्विमळा उदराप्रति आला. ।
राम दुजा भरताभिध, लक्ष्मण पुत्र अरिघ्न, चतुर्वपु झाला.
पाहुनि चार कुमार गुणाकर, तो अजनंदन फारचि धाला. ॥ २
ते, गुरुनें करुनि प्रथम द्विज सद्गुणमंडित पंडित केले.
गाधिसुतें मग लक्ष्मण राघव यागसमाप्तिस मागुनि नेले. ।
पावुनि अस्त्ररहस्य, पथीं हतताटक, हर्षित होउनि गेले.
तद्विशिखप्रकरें[5], मखपीडक दारुण दुर्मद राक्षस मेले. ॥ ३
त्यावरि तो मिथिलेसि महामुनि जाय, पथीं प्रभु गौतमजाया
उद्धरि, पादसरोजरजें; बहु जी भ्रमवी मन, ती हरिमाया. ।
त्र्यंबककार्मुकभंग करी क्षितिजाजनकाधि लयाप्रति जाया.
कांडहि[6] केवळ होय थिटें[7], अतुळ प्रभुचें भुजसद्यश मा‍या[8]. ॥ ४
श्रीजनक क्षितिपाळक, सत्वर आणवि पंक्तिरथा[9] अतिधन्या.
तत्तनुजां चवघांसिहि तो अनुजासह, दे, चवघी निजकन्या; ।

१. ब्रह्मा. २. राजा. ३. उत्तम अश्वमेधें. ४. अग्नीनें अर्पण केलेलें. ५. तत्+विशिख+प्रकर=त्या रामाच्या बाणसमूहें. ६. ब्रह्मांडहि. ७. अपुरतें, अवकाशरहित. ८. मावण्यास. ९. दशरथा.

ग्रामगजा अवलोकुनि, ये बहु कोप जसा पर दुःसह वेन्या,
क्रोध करी भृगुराम तसा नच तो वळता प्रभुवांचुनि अन्या. ॥ ५
भार्गवराम पराभविल्यावरि पंक्तिरथ स्वपुराप्रति पावे;
पौर असें वदले, 'न सुरद्रुम रामभुजाधिक हे गुरु गावे.'।
मातुळ ने स्वपुरा भरताप्रति, दे अनुमोदन भूपति पावे.
हे प्रभुचे परमाद्भुत सद्गुण सोडुनि, अन्य न मंत्र जपावे. ॥ ६

## अयोध्याकांड.

भूप म्हणे, 'नयधर्मविशारद राम उद्यां युवराज करावा.'
मंथरिका मतिभेद करी, गणि केकयजा प्रभुतेंहि पॅरावा.।
देयँ वरद्वय मागुन घे, 'वनवास चतुर्दशवर्ष वरावा
ज्येष्ठसुतें, भरतें अभिषेक; न याविषयीं हठ लेश धरावा.' ॥ ७
तीस म्हणे नृप, 'राज्य दिलें, तव पुत्र करो क्षितिच्या अवनातें.
माग दुजा वर, देवि! दया कर, पाठिव राम हठें न वनातें.'।
काकुलती करि फार; परंतु न लेश वळे पतिला, 'भवनातें
सोडुनि आजिच जावु,' असें विषसें वदली; न गणी लव नातें. ॥ ८
जाणुनियां जननीप्रिय, सत्य चळोंचि न दे तिळही जनकाचें.
नेसुनि वल्कल, बंधुवधूसह सोडुनि धाम महाकनकाचें,।
तीस, सदार पित्यासि नमूनि, पुसोनि निघे, न करी मन काचें.
पायिंच जाय, रथीं बसलें मग तात वचें, धन तें सनकाचें. ॥ ९
'हाय!' म्हणे रघुराय, रडे बहु, शीघ्र भॅजे महिषीनिलयातें.
राजवरें निघणें वरिलें लघु, जेंवि करें भुजगी बिलयातें।
'चित्र'पदोत्तर'कूट'नगा प्रभु जाय; नॅरोत्तमही विलयातें.
त्या भरत द्रुत ये, जल दे, पद घे न; कसें सुख दाविल या तें? ॥ १०
सर्वगुरुप्रमुखस्वजनासह रामपदाप्रति वंदुनि, भावें
साश्रु कथी पितृमृत्यु; म्हणे प्रभु, 'हाय!' जया यतिनीं बहु गावें.।
पिंड तिलोदक दे, पितृतर्पण तो करि, सादर घेउनि नावें.
पाय धरी, विनवी, भरत, 'स्वपुरास तुवां वन सोडुनि यावें.' ॥ ११
राम म्हणे, 'त्यज आग्रह; येइन, वर्ष वनीं सरतां चवदावें.

१. गांवांतील हत्तीला. २. अरण्यांतील हत्तीला. ३. परकी. ४. देण्याचें ठरलेलें. ५. स्थान, गृह. ६. दशरथ. ७. सेविता झाला. ८. चित्रकूटपर्वता. ९. दशरथ.

देवनें[1] वसतींत जसी, तसि दाखविजेल मला चव, दावें. ।
बा! स्वगुरूक्त यशस्कर, केवळ वेद; तदून[3] कदा न वदावें.
प्रेम तुझें बरवें दृढ; हें मज गायिस होय सदा नव दावें.' ॥ १२
सत्य महाव्रततत्पर जाणुनि, तो प्रभुतें वृतपादुक वंदी.
'होमिन देह,' म्हणे, 'ज्वलनीं[2], टळतां अवधि क्षण, होउनि बंदी.' ।
केकयजासुत साधु निघे, यश साधुनि घे, परते मग नंदि-
ग्रामि वसे अतिखिन्न, जसा शिवपादसरोजवियोजित नंदी. ॥ १३
केवळ सन्निध तो गिरि, यास्तव आश्रम त्यासि करूनि न राहे;
राक्षसपीडितभूसुररक्षण, हेंहि मनीं जगदीश्वर पाहे. ।
सानुज सांगन[4] तेथुनि जाउनि, राघव अत्रिपदीं शिर वाहे.
भूमिसुता मुनिदारकृताद्भुत[5] देहसुखप्रद सत्कृति लाहे. ॥ १४

## अरण्यकांड.

शापविमुक्त करी प्रभु, मारुनि दंडकनामवनस्थविराधा;
तो सकळाहि म्हणे, 'क्षण अर्पुनि या सुयशांत मन, स्थविरा[6] धा[7].' ।
हर्षवि ते शरभंग सुतीक्षण घटोद्भव, वारुनि संसृतिबाधा[8],
दे परमाभय कीं; स्थिर होउनि, जोडुनि सत्तप, सद्गति साधा. ॥ १५
गृध्रवरा निजताततसखा प्रभु भेटुनि, पंचवटींत विशाला[9],
सांगुनियां अनुजा[10] मनुजाधिप तो, करवी बरवी दलशाला[11]. ।
शूर्पणखाश्रुतिनासिक कापवि; तापवि त्याहि खरास; शशाला
सिंह तसा वधि सैनिक; एक न वांचवि, सांचवि भव्ययशाला. ॥ १६
पाहुनि ती भगिनीकुदशा, खळ रावण दुर्मद फारचि कोपे,
पाठवि हेमकुरंग निशाचर; पाहुनि त्या महिजामति[12] लोपे. ।
'यासि धरूनि' म्हणे. प्रभु पाठिस लागुनि, संहरि, कीं नच थोपे.
तो मरतां, प्रभुसाचि करि ध्वनि, ज्यास असे छळ केवळ सोपे. ॥ १७
आर्तरवें कुशलेतर[13] मानुनि, देवरें[14], दुर्वच बोलुनि, सीता

---

१. पर्जन्योदकानें. २. अग्नीनें. ३. तत्+ऊन=त्या वेदाहून उणें. ४. स्त्रीसह. ५. मुनिदारकृता देहसुखप्रद अद्भुत सत्कृति लाहे. ६. वृद्धा. ७. तृप्त व्हा. ८. संसारपीडा. ९. मोठी पर्णशाळा. १०. लक्ष्मणा. ११. पर्णशाला. १२. सीतेची बुद्धि. १३. कुशल+इतर= अशुभ. १४. दीर (लक्ष्मण) त्याला.

ती दवडी उटजांतुनि, कोपुनि, होउनि [1]पत्यसुसंकटभीता. ।
तों यतिरूप दशानन ये, हरि कांपलि सांपडली अति सीता.
'हा !' वदली, कदली वनवन्हिस, कीं गुरुवेदपथारिस गीता. ॥ १८
त्यास जटायु करी विरथ, क्षण सोडवि सून रणीं, पण रक्षी.
श्रीस पुन्हा हरि रावण, [2]पक्षति तोडुनि, पाडुनि मूर्छित पक्षी. ।
ती नग टाकि, तयांतचि, जें गिरिच्या शिखरीं, कपिपंचक, लक्षी.
ठेवि अशोकवनीं स्वपुरीं तिस, ती फळ कीं जळ लेश न भक्षी. ॥१९
त्या हरिणासि वधूनी, फिरे प्रभु, तों करि वंदन लक्ष्मण [3]वाटे.
ऐकुनि वृत्त, शिवादिरव, क्षति जाहलि हें प्रभुबुद्धिस [4]वाटे. ।
धावुनि ये, तंव शून्य दिसे गृह, 'हाय !' म्हणे, विरहें उर फाटे.
रामविलापभरें [5]वनदैवतपक्षिमृगोरगकंठहि दाटे. ॥ २०
शोध वनीं करितां अवलोकुनि केवल मूर्छित [6]तातसखातें,
'हाय !' म्हणे. हरि [7]तत्तम सानुज शीतजळें निजवल्कलवातें. ।
त्या क्षतहेतु पुसे; कथि रावणकृत्य, वधूहरणादिक, यातें.
प्राण मग त्यजि; राम वदे, '[8]मरणद्वय हें मम बुद्धिस खातें.' ॥ २१
राम तदुत्तर कार्य करी, मृगमांस खगांप्रति वाढुनि हातें.
धुंडित जाय वनीं दयिता, हरिणा करि साश्रु म्हणे बहु 'हा !' तें. ।
योजनबाहु कबंध धरी; प्रभु हर्षवि फारचि तन्मन घातें.
तो कथि, कार्य सुकंठ करीलचि. ये सुविमान तया अनघातें. ॥ २२
फार बरी शबरीमति जाणुनि, तीवरि देव करी [9]अनुकंपा;
होमुनि देह, विमान वरी; बहु शोभलि बैसुनि ती, जसि [10]शंपा. ।
तिथुनि जाउनियां अनुजासह त्या प्रभुनें अवलोकिलि पंपा.
श्री अतुळा तिचि रामधृतिस्मृति शक्ति, तयांसि म्हणे क्षण'संपा.' ॥२३

## किष्किंधाकांड.

श्रीविरहाग्निस लक्ष्मण वारिद होय; तयावरि मारुति रामा
भेटुनि, भेटवि त्या सुगळा, नग दाखवि, जे त्यजि तन्मतिं [11]रामा. ।

---

१. नवऱ्याच्या प्राणाला जें संकट त्यास भ्याली असी. २. पिसांचीं मूळें. ३. मार्गीं. भासे. ५. वनांतील देवता पक्षी मृग उरग (सर्प) यांचाही कंठ दाटला. ६. जटायूला. तत+तम=त्याची मूर्छा. ८. दशरथ आणि जटायु यांचें मरण. ९. दया. १०. वीज. स्त्री (सीता).

'हाय!' म्हणे रघुराय, सखा पुसि अश्रु, करूनि परोपरि सामा.
कीशप वैरनिदान पुसे, अज तो कथि, ये प्रथम प्रभुकामा. ॥ २४
त्या सुगळा कपिराज्यपदीं प्रभु बैसवि, तत्क्षण मारुनि वाळी.
मेळवि तो बहुकोटि महाकवि ऋक्ष, सुरांश, पण प्रतिपाळी. ।
त्यांसि कथी, हुडका महिजा. कपि पाठवि, अंशु जसा क[1]रमाळी.
अंगद मारुति दक्षिण शोधुनि, ओपिति दि[2]ग्वदना बहु गाळी. ॥ २५
स्वामिकृतावधिमास विलंघुनि अक्षम दंड भवास तराया.
सिंधुतटस्थ महेंद्रनगीं कपि बैसति शोकनिमग्न मराया. ।
गृध्र जटायु त[3]दग्रज तो कथि शोध न संशय यांत धराया.
सांगुनि दाहनिशाकर सन्मुनिवाक्य, उडे हरि हृष्ट कराया. ॥ २६

## सुंदरकांड.

[4]ऋक्षपतिस्तुत मारुति, प[5]क्षिप तेंवि उडे; हि[6]मवत्सुत पाडी;
लाजवि त्या; सुरसेसहि, सावलि जी धरि, तीसहि तो पटु नाडी. ।
गोष्पदसा शतयोजन सागर लंघुनि शत्रुपुरी मद झाडी.
शोधुनि सर्व गृहें, विरमे मग त्यासि अशोकवनीं मति धाडी. ॥ २७
रात्रि तरूपरि बैसुनि, तो अवलोकि धरातनया, श्रुति शुद्रा.
त्या कु[7]मतोपगताहि, सतीकृतदुर्मतिधिकृति मानलि रुद्रा. ।
दि[8]ग्वदनापगमावरि, वर्णुनि राजसुता, गुणरत्नसमुद्रा,
संशयलेश मनीं नुरवी, प्रणतिस्तुतिपूर्वक दे तिस मुद्रा. ॥ २८
वृत्त [9][10]अशेषहि सांगुनि ऐकुनि, खूण शिरोमणि घेउनि, तोषें
दिव्य अशोकवनद्रुम मोडुनि, सर्व दिगंतर तो भरि घोषें. ।
कोट्यधिक क्षणदाचर, रावणनंदन अक्षहि, मारुनि रोषें,
होय, बळें घननादमहास्त्रनिबद्ध, रणीं नच मारुति दोषें. ॥ २९
तो दशकंठसभेप्रति बांधुनि घेउनि, बोलविला बहु वक्ता.
स्पष्ट तया कळवी, सकळक्षय हें फळ केवळ उ[11]त्पथसक्ता. ।
पेटवि तैलपटावृत पुच्छ. न शक्त असें खळ मानुनि शक्ता,

---

१. सूर्य. २. रावणा. ३. तद्+अग्रज=त्या जटायूचा वडील बंधु (संपाति) तो. ४. जांबुवंतानें स्तविलेला. ५. गरुड. ६. हिमवत्+सुत=हिमाचलाचा पुत्र (मैनाक) तो. ७. कु+मत+उपगत=दुर्बुद्धि प्राप्त ज्याला अशालाही. ८. दिग्वदन+अपगम=रावण नेल्यानंतर. ९. रामचंद्राला. १०. सकल. ११. आडमार्गें जाणाऱ्यास.

त्या, 'फिरवा स्वपुरांत,' म्हणे, अपमान करूनि, महाप्रभुभक्ता. ॥ ३०

चालविला कपिवीर जिहीं, गुरु पुच्छ करूनि, तयां बहु घोळी.
जी अतिभव्य पुरी, मणिकांचनभासुरदीप्ति, तिची करि होळी. ।
रावण, मेघरव, क्षणदाचर[1] सर्वहि, 'हाय!' म्हणे, कर चोळी.
'हा!' वदल्या खचरी, जळतां गृह त्यागुनिही लुगडें, कच, चोळी. ॥ ३१

पुच्छ समुद्रजळीं विझवी; महिजाचरणाब्ज नमूनि उडाला.
वेष्टिति वृत्तरसार्थ[2] तया कपिवीर, पिपीलिक जेंवि गुडाला. ।
ते लुटिती 'मधु'[3]पूर्व'वनीं' मधु, मोडिति त्या दधिवक्रकुडाला.
ऐकुनि शासन लंघन, जाणुनि सिद्धि, सुकंठ सुखांत बुडाला. ॥ ३२

जांबवदंगदनीळनळानिळनंदन गर्जत हर्षित आले.
कीशप, लक्ष्मण दाशरथीप्रभु यांसि महामति ते नत झाले. ।
वातसुतार्पित दिव्यशिरोमणि पाहुनि, राघवपक्ष्म[4] न हाले.
दे परिरंभ[5] मरुत्तनया विभु, तें वदतां यश, जीभ न चाले. ॥ ३३

राम म्हणे, 'रघुराजकुळोपरि बा! रचिला उपकार महा. या
प्राण दिले; करिसील असें बहु, यावरि तूं जरि, साधुसहाया. ।
प्रत्युपकृत्यसमर्थचि[6] मी, तव नित्य ऋणी न पदार्थ वहाया.
योग्य दिसे मज, इच्छितसें स्वमनीं अधमर्ण[7] असेंचि रहाया. ॥ ३४

## युद्धकांड.

राम निघे दशकंठवधार्थ, विलोकुनियां विजयप्रद लग्न[8];
स्यंदन मारुतितें करि, लक्ष्मण वाळिसुता; द्रुहिणा[9] महमग्न[10]. ।
ऋक्ष, कपीश्वर, गर्जति कल्पमहाघनसे, करिती नग भग्न.
प्रेक्षिति कौतुक तेहि महामुनि, जे तनुभानविवर्जित नग्न. ॥ ३५

सिंधुतटीं उतरे प्रभु, तों शरणागत साधु बिभीषण, शंका
सोडुनि, जोडुनि हस्त, म्हणे, 'नमितों, अभयप्रद हो मज रंका.' ।
बंधुकरें करवी अभिषेक, नमस्कृतिचें फळ देउनि लंका.
जे भवतप्त, तयां निववी, असि सून्नत[11] कीर्ति करी अकलंका. ॥ ३६

प्रेरुनि, सिंधुमतें, नळ वानर, राघव सेतु रची शतगावें[12].

---

१. राक्षस. २. सीतेचें दर्शन इत्यादिक जी झालेली गोष्ट तोच रस त्याकरितां. ३. मधुवनीं. ४. रामाचें नेत्रपातें. ५. आलिंगन. ६. प्रत्युपकृति+असमर्थ=प्रत्युपकाराविषयीं असमर्थ. ७. ऋण घेणारा. ८. मुहूर्त. ९. ब्रह्मदेवाला. १०. उत्सवामध्यें मग्न. ११. सू+उन्नत=अतिउंच असी. १२. शंभर कोस.

होउनि हृष्ट, मनांत म्हणे, 'यश हें चिरकाळ,' शचीश 'तगावें.' ।
श्रीशचरित्रचि, देत्तहृतावनिजारिवधूकुचकुंकुम, गावें.
पावुनि मानसशुद्ध सुखें, निज तत्व जडेंहि जनें उमगावें.' ॥ ३७
सेतुपथें उतरोनि पयोधिस, रुष्ट सुकंठ पडे दशतुंडीं.
राम मनीं धरुनि प्रतिबंधक सन्मणि, जेंवि करीं शिखि कुंडीं, ।
छत्र किरीटहि पाडुनि ताडुनि, लेशहि तो नुरवी मद पुंडीं,
त्यासि म्हणे, तुज निर्भय अक्षय रामचि, अन्य नसे, जग धुंडीं. ॥३८
पाठविला प्रभुनें मग अंगद तो परभंगद राक्षसपाळा,
धर्मनयज्ञ, महाजनसंमत बोध करी सुरगोद्विजकाळा. ।
त्या न रुचे, विगतायुस ओखद तेंवि, बळें धरवी; परि टाळा
देउनि जाय, म्हणे प्रभु, 'हूं! खळ सर्व वधाचि, न एकहि गाळा.॥३९
राक्षस वानर वीर महाबळ, वृक्षशिळाशिखरायुध, युद्ध
क्रोधभरें करिती परमाद्भुत, होति रणांत न कोणिहि रुद्ध. ।
प्राण तृणासम मानुनि, सोडिति, जोडिति सत्प्रिय तें यश शुद्ध.
प्रेक्षक सर्वहि हारविती तनुभान, महर्षि सुरर्षिहि बुद्ध. ॥ ४०
रात्रिरणीं घननाद करी अहिपाशनिबद्ध सहानुज रामा,
दाविति ते सुमकस्थ सतीस खळप्रहितादयराक्षस; वामा. ।
दे त्रिजटा धृति तीस, म्हणे 'उगि;' सासुचि हे, व्यय लेश न धामा.
त्या परमव्यसनीं, प्रियबंधु तसा, बहु ये खगनायक कामा. ॥ ४१
सैन्यपतिप्रमुखस्वभटक्षय ऐकुनि, रावण आपण भांडे;
कीशवरादि असृक् स्रवले, कृतरंध्र जसे भरले जळहांडे. ।
लक्ष्मणवक्ष करी क्षत शक्ति, म्हणे तिस भू, 'परती सर रांडे!'
दे पथ, भग्न करूनि तया; प्रभुभानुपुढें परतेज न मांडे. ॥ ४२
जागविल्या प्रबळा कटका घटकर्ण दिनद्वय कष्टवि, जागे;
येउनि कीश बळीं, गहनीं दव जेंवि तसा, परदुःसह वागे. ।
वाल्यनुजा धरि; तो हरि नासिककर्ण; फिरे, कपि भक्षुंचि लागे.
त्या भुज पाद शिरांप्रति खंडुनि, लोळवितां, प्रभु लेश न भागे. ॥ ४३

---

१. इंद्र. २. दिलें आहे हरण केलेलें रावणस्त्रियांचें स्तनसंबंधीं कुंकुम ज्याणें असें. ३. पुष्पकस्थ. सुम=पुष्प. ४. खळांनीं प्रहित (पाठविलेले) अदय (निर्दय) राक्षस. ५. वांकडी. ६. स+असु+चि=प्राणयुक्तचि. ७. तेजा. ८. रक्त. ९. कुंभकर्ण. १०. अरण्यामध्यें. ११. सुग्रीवाला.

शोक करी दशकंठ, तयाप्रति तत्तनुज त्रिशिरा समजावी.
जाय सुरांतक, आणि नरांतक; तो अतिकायहि [1]दोर्बल दावी. ।
त्यासि महाबळ अंगद, मारुति, लक्ष्मण, नीळ समाप्तिस लावी.
'हाय!' दशास्य म्हणे, 'मम संगति हे[2] पविनेंहि लयासि न जावी.४४
ब्राह्मबळें घननाद पुन्हा [3]कपिसैन्य, सलक्ष्मण रामहि, ताडी.
[4]अद्रिगुहानन कोटि [5]वलीमुख वीर करी इषुनीं व्यसु पाडी. ।
प्रार्थुनि वातसुताप्रति, [6]ऋक्षप सांगुनि ओषधिपर्वत धाडी.
पर्वतशृंगचि घेउनि, ये सकळार्तिस ओषधिगंधचि झाडी. ॥ ४५
ओषधिपर्वतशृंग पुन्हा पवनात्मज तें स्वपदाप्रति [7]पावी.
शक्ति जसी अतुळा प्रभुची, तसि मारुतिचीहि, यथामति गावी. ।
होय विशल्य, ससैन्य सहानुज, जो त्रिजगा, प्रभुसत्तम, या वी[8].
तो बहु पावुनि हर्ष, म्हणे, 'न जरा तुझिया सुयशा तुज यावी.' ॥ ४६
कोपुनि वानरराज, म्हणे, 'भटहो! अरिचें उरलें पुर जाळा.'
पेटविलें, गमलें सुबुभुक्षुपुढें द्रुत ओगेरिला गुरु थाळा. ।
आरडती रडती खचरी बहु, आकुळ होउनि ताडिति भाळा.
तो शतयोजन जाय महाध्वनि, होय सुगानचि निर्जरपाळा. ॥ ४७
दाहभयें पडले बहु बाहिर; या कपिंनीं वधिले अरि सारे.
त्यांसि म्हणे हरिराज, 'असाल खळाश्रित जे जड, ते परिसा रे! ।
सर्व असेचि मराल, अधार्मिक निर्दय दुर्जन, भीति न वारे.
[10]पक्षिमहीपतिपासुनि माजुनि, वांचतिल क्षण काय [11]विखारे? ॥ ४८
कुंभ, निकुंभ, [12]घटश्रुतिचे सुत पाठविले समरा बळशाली;
काळमुखीं पहिल्यास कपीश्वर, मारुति त्या दुसऱ्या मग घाली. ।
जो मकराक्ष खरात्मज, त्यां, प्रभुपासुनि अंत्यदशा बरि आली.
ब्राह्ममहास्त्र पुन्हा प्रकटी; परि रावणिधीस विटे [13]धृतिआली. ॥ ४९
स्वस्थमनें विषयांतचि हर्षित होउनि, राक्षसदेव रमाया,
सर्वबळासह कीशवरा, प्रभुच्या अनुजाहि रणीं [14]वैरमाया. ।
होमजदिव्यरथास्तिस इच्छुन हे स्वजयार्थ करी पर माया;
भूमिसुता वधि रावणि, जो विभु 'हा!' म्हणवी, रडवी परमा या.॥५०

---

१. भुजांचें बळ. २. लंका. ३. वानर. ४. पर्वताच्या गुहेसारखें उघडें मुख ज्याचें, असे. ५. वानर. ६. जांबुवंत. ७. पोंचवी. ८. प्रसवे. ९. वाढला. १०. गरुडापासून. ११. सर्प. १२. कुंभकर्णाचे. १३. धैर्यसखि. १४. खिन्न व्हावयास.

यापरि मोडुनि, जेथ निकुंभिल दैवत, तें स्थळ रावणि पावे;
होम करीत बसे, रथयुक्त जयांतुन दिव्य तुरंगम यावे. ।
भक्त बिभीषण तें कळवी; परकृत्रिमयोग तयासचि ठावे.
नेउनि लक्ष्मण, मारवि त्या. सुख शक्रमनीं, न जगीं यश मावे. ॥ ५१
नंदनशोकसमाकुल रावण, घेउनि खड्ग, महीजनिघाता
जाय, अशोकवनीं; अवलोकुनि, आठवि राम मनीं क्षितिमाता. ।
साधु सुपार्श्व करी हितबोध; बळें फिरवी जलदध्वनिताता
दाशरथिक्षयकाम, पुन्हा, बळ पुष्कळ पाठवि, संगरपाता. ॥ ५२
तें बहुकोटि निशाचरसैन्य मुहूर्तयुगें करि भस्म, न भागे
राम; म्हणे, 'मदिषूंतचि, कीं त्रिपुरारिशरांतचि, हें बळ जागे.' ।
पाहुनियां परमाद्भुत तेज, विभुस्तवनास अशेषहि लागे
स्वर्गणिका म्हणती, 'सखिहो! अतिदुर्लभ वीरसमागम, या गे! ॥ ५३
शोकहि, कोपहि, चित्त हरी; मग तो दशकंधर घे बळ भारी;
राक्षस वीर सुकंठ वधी बहु; रावण, मर्दुनि वानर सारी. ।
व्याकुळ मेघरवारिसही करि, तद्दिशिखासि रघूत्तम वारी
युद्ध नवें करिति प्रभु रावण, वीर महाशरकार्मुकधारी. ॥ ५४
लक्ष्मण दिग्वदनध्वजकार्मुकसारथिमस्तक खंडुनि पाडी.
तत्तुरगांसि गदीश बिभीषण धांवुनि, जेंवि मृगा हरि, ताडी, ।
बंधुवधा दशकंधर शक्तिस, कोपविली उरगी तसि, धाडी.
तोडुनि तीस महाबळ लक्ष्मण, त्या अरिचा मद मानहि झाडी. ॥ ५५
रावण शक्ति धरी दुसरी, प्रभु बंधुसख्याप्रति घालुनि मागें,
होय पुढें; तदुरीं, अशनी तसि, ती अरिनें लघु पाडिलि रागें. ।
ओढुनि काढुनि शक्तिस, भंगुनि कोपुनियां प्रभु त्या परमागें
भग्न करी, पळवी. धरिली धृति काय जि! पैक्षिप पाहुनि नागें? ॥ ५६
बंधुसि मूर्छित पाहुनि, राघव साश्रु वदे, 'जरि लक्ष्मण मेला,
याविण वांचुनि काय मला सुख? दीप टिकेचि न सोडुनि तेला.' ।
'ओषधि आण,' सुषेण म्हणे. प्रभुतें नमुनि द्रुत मारुति गेला;
शृंगचि घेउनि ये, कुशळें रघुवीर यथास्थित सावध केला. ॥ ५७
युद्ध पुन्हा करिती रघुराक्षसवीर; रथ स्वें तदा पविपाणी

१. मेघनादपिता रावण त्याला. २. परम+आग=अति अपराधें. ३. गरुड. ४. जगुनि.
५. आपला रथ. ६. इंद्र.

पाठवि; सत्वर तो रणचत्वर शोभवि, मातलि सारथि आणी. ।
त्यावरि मानद राम चढे, बहु मानुनि अग्रजवासववाणी;
द्वैरथ संगर पाहुनि, होय शिवप्रभुची[1], क्षण, चित्रचि राणी. ॥ ५८
पाहुनि मूर्छित रावण, तद्रथ[2] काढियला समरांतुनि सूतें;
सावध होउनि, नेवविला प्रभुसन्निध तो पैळभुक्पुरुहूतें[3]. ।
कुंभज[4] मंत्र कथी; रवि दे वर; तैं म्हणती जय सर्वेहि भूतें[5].
होय, नरेंद्रकृतारिशिरःशतखंडनमंडन, कंपद भूतें[6]. ॥ ५९
जें उडवी शर हाणुनि, तें रघुनाथ तसेंचि नवें शिर, पाहे.
शस्त्रमहास्त्रविपर्यय मानुनि, भानुनिभ प्रभु काळजि वाहे. ।
मातलि सूचवि, 'जो विधिनिर्मित कुंभजदत्त मैहाशुग[7] आहे,
तो सँतदस्त्र[8] पॅरोर[9] विदारिल; न क्षण भानुपुढें तम राहे.' ॥ ६०
श्रीरघुवीर, चतुर्मुखनिर्मित वैष्णवचापगुणीं शर जोडी.
ब्राह्मजपें अभिमंत्रुनि ओढुनि त्यासि निजश्रवणावधि, सोडी. ।
तो पविसाचि कठोर, शिळातळसें अरिचें दृढही उर फोडी.
तेंवि पडे उलथोनि, जसा तरु, ज्याप्रति चंड समीरण झोडी. ॥ ६१
वृत्र तसा, पडतां व्यसु रावण, राक्षस होउनि भीत, गळाले.
'हाय!' असें म्हणत, भ्रमुनि स्वपुराचिकडे, हतशेष पळाले. ।
सांपडले, कपिसैन्यदवाग्निस ते खळटोळ समस्त जळाले.
शक्र, चतुर्मुख, शंभु म्हणे, 'जय देव! रमास्यसँहस्त्रदळाले[10]!' ॥ ६२
वृष्टि सुरद्रुमपुष्पमयी बहु होय तदा; सुरदुंदुभि वाजे;
स्वर्गणिकाशतनृत्यसुगायकगीतसुवाद्यरवें नभ गाजे. ।
मंद सुगंध हिम प्रसरे सुखवायु, सँभ[11] ग्रहमंडळ, साजे.
श्रीरघुराजयशासि हिमाचळ, दुग्धसमुद्र, सुधाकर लाजे. ॥ ६३
सांत्वुनि रावणदार, विचार कथूनि, तयांसि करी सुख सँस्तें[12];
त्या अरिचेंहि, बरें करवि प्रभु, उत्तरकार्य, बिभीषणहस्तें. ।

---

१. महादेवाची. २. रथ. ३. राक्षसेंद्रें. ४. अगस्ति. ५. प्राणिमात्र. ६. पृथ्वीतें. ७. मोठा बाण. ८. त्याच्या अस्त्रासहित. ९. पर+उर=शत्रूचें वक्षस्थळ. १०. रमा+आस्य+सहस्रदल+अलि=लक्ष्मीचें मुख जें तेंच कमळ तत्संबंधी भ्रमरा! ११. नक्षत्रांसह ग्रहमंडळ. १२. सवंग.

देववि दे[1]यविशेष दयार्णव, जीं विधिनें कथिलीं बहु[2]शस्तें.
त्यावरि, सद्विधिनें वरिला अभिषेक, तया [3]शरणागतमस्तें. ॥ ६४
मारुतितें रघुवीर म्हणे, 'पुस [4]यातुपतीस; मग प्रिय तीतें
सांग; पुसोनि तिचें मजही द्रुत येउनि,' हें कथिलें मुनिगीतें. ।
जाय, नमी, कथि तो, अमृत श्रवणांत भरी, [5]तृषिताशुभधीतें.
'देय नसे तुज योग्य,' असें वदली, नयनें अवलोकुनि [6]शीतें. ॥ ६५
कीश म्हणे, 'तव वागमृतें मन हर्षविलें, नलगे धन कांहीं.
तूं वरदे! वर दे, 'खचरी वध' हा; चिर, दुःख दिलें तुज यांहीं.' ।
श्री वदली, 'असुखें, विषमाकृपकाळकृतें, घडणारचि बा! हीं.
या बटकी परवाग्वशगा, अघ यांजकडे तिळमात्रहि नाहीं.' ॥ ६६
वर्णुनि शील, निरोप पुसे कपि; ती कथि सत्वर दर्शनकाम.
क्षिप्र [7]पैलाशपतिप्रति सांगुनि, आणवि भूजनितें प्रभु राम. ।
तीस म्हणे, 'अरि मारुनि सोडविलीस[8], यशोऽर्थचि. तूं [9]परधाम
क्षोणिसुते! चिर सेवुनि होतिस. मान्य बुधा परभुक्त न दा[10]म.' ॥ ६७
ती वदली, 'दहनीं शिरतां, जरि, हे शुचि मी, तरि, [11]हा मज रक्षू.
जी उचिता शुचिता नसतां, असतां परकाम, हुताशन भक्षू. ।
निश्चळ भव्य सतीव्रत नित्य असेल तरि, प्रभुचें शुभ चक्षू.
प्रेम करूनि, वरूनि पुन्हा पहिल्यापरि, तापनिवारक लक्षू.' ॥ ६८
शंभुविधींद्रसमक्ष, सती करि दिव्य, [12]कसीं उतरे सुरगीता;
बाळपणीं [13]जनकोरुगता तसि, जाहलि ती ज्वलनांत न भीता. ।
वाळलि माळ उटी न तिची, तनु होय हिमीं शिरतां तसि [14]सीता.
तातनिदेश शिरीं धरुनि, प्रभु अंकपदावरि बैसवि सीता. ॥ ६९
जे मृत वानर ऋक्ष, तयां उठवी सुरनाथकृतामृतवृष्टी.
पुष्पकयान वरूनि निघे, निववी प्रभु, चंद्र तसा, जनदृष्टी ।
दाखवि सेतु सतीस, कथी विरहार्तिविलाप, सुखें भरि सृष्टी.

---

१. द्यावयाची कांहीं देणगी ती. २. प्रशस्तें. ३. शरणागतांचा मुकुटमणी अशा बिभीषणें. ४. बिभीषणास. ५. उत्तम बुद्धीची असी सीता. ६. थंडें. ('नयनें' या शब्दाचें विशेषण.) ७. राक्षसेंद्राला. (बिभीषणाला.) ८. कर्मणि प्रयोग. ९. शत्रुगृह. १०. माला. परभुक्त दाम बुधा मान्य न. ११. अग्नि. १२. कसोटीस. १३. जनक+ऊरु+गता=जनकाच्या मांडीवर बसलेली. १४. थंड.

हर्षवि फार गुहा, भरता, जसि भेटुनि वत्स सुखी करि गृष्टी. ॥ ७०
वृद्ध अमात्य, सुधी भरतादिक बंधु, सखे, कपि, राक्षस, राजे,
त्यांसह, घेउनि वेष मनोहर, राम पुरीं शिरतां बहु साजे. ।
निर्जरगायकगानरवें, सुरवाद्यरवेंहि, दिगंतर गाजे.
चंद्र चकार, पयोधर चातक, ते प्रभु या, करिते जन आ जे. ॥ ७१
राज्यपदीं अभिषिक्त जगत्पति राम बसे, परमोत्सव तो कीं.
प्रेम करी प्रभु तेंवि जनीं बहु, जेंवि पिता चरमीं लघुतोकीं. ।
त्या युवराज करी भरता विभु. दुर्लभ जें विधिवासवलोकीं,
तें सुख नित्य म्हणे सकळा निजराष्ट्रपुरस्थजना अवलोकीं. ॥ ७२
'सच्चरित प्रभुचेंचि सदा भरलें,' म्हणती 'तप' तापस 'रीतें.'
यासचि भी भवताप, करी नच ज्या गुरुच्या, दवताप, सरीतें. ।
चातकपक्षिकुळ व्रत घेउनि, अन्य उपेक्षुनि, आपसरीतें.
तेंवि इथेंचि महाकविवृंद, दुजें यश सोडुनि, आ पसरीतें. ॥ ७३

## उत्तरकांड.

दाशरथिप्रति दर्शन देउनि, पूजन घेउनि उत्तम; हर्षी
होउनि, वर्णिति शक्रसुदुर्जयरावणमेघरवान्त महर्षी. ।
त्यांसि म्हणे प्रभु, 'जें घडलें, तुमचेंचि तपोबळ सन्मुनि हो! तें.
युष्मदनुग्रहकल्पनगीं यशपुष्प, जगत्प्रिय, जन्मुनि, होतें. ॥ ७४
दुर्जय राक्षसराज, सुदुर्जय रावणि, तद्वध दुष्कर भूतें,
ज्यां सभयें अवलोकुनि, जीं रचिलीं हरिनाभिजपुष्करभूतें.' ।
ऐकुनि तज्ज्ञजनोक्त असें, प्रभु तत्प्रभवादि पुसे घटजा; तें ।
तो कथि सर्व सविस्तर त्या, मृदु शेज सहस्रमहाफट ज्यातें. ॥ ७५
ब्रह्मतनूज पुलस्त्यमहामुनि; तत्तनयाह्वय विश्रवसा हें;
तत्सुत वैश्रवणाख्य सुधी, स्वमनासि म्हणे, 'विषयांत न वाहें.' ।
स्त्री दुसरी खचरी, तिस दिङ्मुख पुत्र, दुजा घटकर्णहि, रामा
शूर्पणखा तिसरी तनया, चवथा सुत साधु बिभीषण रामा! ॥ ७६
विष्णुपराजित पूर्वनिशाचर सोडिति जी प्रति, ती अकलंका,

१. एकवेळ व्यालेली गाय. २. देवगायक जे त्यांच्या गाण्याच्या शब्दानें. ३. वृद्धत्वीं. ४. बरोबरीतें. ५. आप+सरीतें. कांहीं काळ लागून जावा असा जो पर्जन्याचा झपाटा त्यातें. ६. भययुक्तें. ७. विष्णूचा नाभिकमलोत्पन्न जो ब्रह्मा त्याणें. ८. सहस्रफणांचा शेष. ९. स्त्री.

वैश्रवणा दिधली जनकें, चतुराननसंमत पावुनि, लंका. ।
तींत वसे, स्वपुरींत जसा सुरनायक. तातपदांसि नमाया
ये, सुसभाग्य धृतेर्ष्य[1] दशानन होय विलोकुनि शक्रसमा या. ॥ ७७
फार तपोनि, शिरें नव होमुनि, तो मुनिभू वर दुर्लभ साधी;
वर्जुनियां नर वानर, होय अवध्य, करी सुर सर्वहि साधी[2]. ।
स्वाप[3] वरी घटकर्ण. तसें वदवी भ्रमवी त्रिदशस्तुत वाणी[4].
ब्राह्म अशिक्षित. धर्मरती वरि, साधु बिभीषण जोडुनि पाणी. ॥ ७८
त्यास विधि द्रवला वदला, 'दिधलें त्वदभीष्ट चिरायुहि हो,' हें.
अग्रजकांचनदुर्ग हरी वरदुर्मद तो दशकंधर मोहें. ।
वैश्रवणास करी चतुरानन उत्तरदिक्पति, पुष्पकगामी
तो अलकाख्य पुरी रचि. शंभु म्हणे 'चिरकाळ सखा तव हा मी'.॥७९
धर्म नय त्यजुनि, क्षणदाचरराज जगास करी बहु पीडा.
अग्रज दूतमुखें कळवी हित, त्या खचरा मदवायसनीडा[5], ।
'बा! अनिषिद्धसुखेंचि, भयप्रद होउनि साधुजना न, परा धा.
मी तरलों, मिळता न कधीं मज शंभु सखा, करितां अपराधा.' ॥ ८०
कोपुनि सांगुनि यातुजना[6], फळ तेंवि दशानन खाववि दूता,
जाउनियां अलकेप्रति, तो करि भग्न रणीं वढिला अतिपूता; ।
पुष्पकनाम विमान हरी, प्रभुकेलिवनाप्रति[7] लंघुनि जातां,
कुंठित होय; म्हणे खळ; 'काय उपाय किजे गतिकारक आतां?' ॥ ८१
तो प्रकटे कपिवक्र महेश्वरभक्त, तसाचि महाबळ नंदी;
तो वदला, 'प्रभुकेलिवन प्रभुसेंचि अलंघ्य.' न या जड वंदी; ।
मत्त करी उपहास. तया कुजना शिवसेवक कोपुनि शापी,
कीं 'कपि होतिल काळ तसे तुज, 'हा!' म्हणसीलचि तूं अतिपापी.' ८२
बाहुगिरीश गिरीशतळीं दशकंधर घालि बळें उखळाया.
भी गिरिजा, प्रभुराजपदांगुलिनाथभरें[8][9] रडवी सुखळा या. ।
एकसहस्र समा[10] श्रमला, मग मुक्त करी शिव या, स्तवनांहीं,
रावणनाम, सुखड्गहि दे; न म्हणेचि महाप्रभु यास्तव 'नाहीं.' ॥ ८३

---

१. धृत+ईर्ष्य=धरिली ईर्षा ज्याणें असा. २. स+आधि=मनोव्यथायुक्त. ३. निद्रा. ४. सरस्वती. ५. गर्वरूप कावळ्याचें राहण्याचें स्थान असा. ६. राक्षसजनाः. ७. महादेवाच्या क्रीडावनाप्रति. ८. महादेव. ९. चरणसंबंधीं अंगुष्ठाच्या भारानें. १०. एक सहस्र वर्षें.

तो तुहिनाद्रिवरी[1] अवलोकुनि, वेदवती[2] रुचिरा, तिस झोंबे,
दाटुनि कूपमुखीं चरणद्वय बांधुनि जीर्णगुणें[3] जड लोंबे. ।
त्या अरिपासुनि ती सुटली स्वतपें, 'मजला दुसरें जनु[4] हो[5], मी
मारिन तूज,' वदोनि असें अतिरोषभरें, ज्वलनीं तनु होमी. ॥ ८४
रावण विघ्न मखास करी, धरि चाप मरुत्त, तया गुरु[7] वारी;
खाय महाध्वरवाटगत द्विज, 'हाय!' जगा म्हणवी अविचारी. ।
कण्वसुतापति ऐल तथा गय गाधि कृती म्हणती, 'जित झालों.'
ते वधिले नृप जे वदले, 'क्षणमात्र असद्वचनांत न चालों.' ॥ ८५
त्या अनरण्य[8] म्हणे 'न उतें, मद घातक हा हृदयांत नयो; घ्या;
मारुनियां तुज, मत्कुलसंभव राम यशें निववील अयोध्या.' ।
दुष्ट दशास्य तयासि वधी. मग, नारद यासि यमावरि धाडी;
'योग्य' म्हणे न तुला मृतमारण, 'तो, नरकस्थळ ओसचि पाडी. ॥ ८६
राक्षसराजकृत स्वबळक्षय पाहुनि काळ करीं धरि दंड,
दत्तवरप्रतिपालनतत्पर, त्या विनवूनि करी, विधि थंड. ।
वासुकिचें पुर जिंकुनि, दैत्यपुराप्रति जाय, तयासह भांडे;
धूळि निवारुनि तो प्रभुसख्य बळें करवी भरवी दुधभांडें. ॥ ८७
अश्मपुरीं[9] असुरांसह संगर पंक्तिमुखें बहु दारुण केला,
शालकरस्थकृपाणवरें[10] हृतमस्तक शूर्पणखापति मेला. ।
बा! परमाद्भुतसत्कविगीत पयोधि, जिच्या बहु पावन दुग्धें,
त्या सुरभिप्रति वंदुनिया वरुणात्मजही जिणिले, अतिमुग्धें. ॥ ८८
जाय पुरासि हरूनि, नरेश्वरविप्रसुरासुरपन्नगकन्या;
'मृत्यु बळात्कृतिनें[11] तुज तत्क्षण येइल,' यापरि शापिति धन्या. ।
शुक्रमुखें घननादसुसिद्धिस ऐकुनि, त्या स्वगृहीं खळ आर्ता
रोधि बिभीषण त्यासि कथी, 'मधुनें भगिनी हरिली,' असि वार्ता. ॥ ८९
घेउनियां बहु सैन्य निघे दशकंधर, त्या मधुनाम वनातें
जाय तया भगिनी विनवी करि तोहि तिच्या धृतिच्या अवनातें ।
सख्य घडे मधुसीं; मग शक्रपराभव वांछुनि, भोगुनि रंभा,
घे नळकूबरशाप, दिसे परिणाम न ज्यास, जसा धृतदंभा. ॥ ९०

---

१. हिमाचलावरि. २. कुशध्वज जो बृहस्पतीचा पुत्र त्याची कन्या. ३. जुने रज्जूनें. ४. जन्म. ५. होउ. ६. राजविशेष. ७. संवर्त नामक त्याचा गुरू. ८. अयोध्येचा राजा. ९. नगरविशेष त्यांत. १०. शालवृक्षासारख्या लांब हातामध्यें असलेल्या तरवारेनें. ११. बळात्कारानें.

कार्यविचार पुसे अजितासि. अवध्यदशास्यभयाकुल जिष्णु,
'युद्ध करीच' म्हणे 'समयीं सुरशत्रुसि मी करिन व्यसु' विष्णु. ।
[1]सर्वदिगीशबळांसह बा ! करितां अतिदारुण संगर तातें,
मोहुनि मेघरव स्वबळें धरि [2]गौतमदारकुसंगरतातें. ॥ ९१
भेटुनि, मेघरवासि म्हणे विधि, 'मागुनि घेउनि ईष्टवरातें,
सोड [3]हरीस, वरू शम कश्यप, देचि तया सुत शिष्टवरातें.' ।
तो वर हा वरि, 'होमसमुद्भवदिव्यरथीं समरांत बसावें;
त्यासमयीं परदुःसह होउनि, म्यां सकळांसि अवध्य असावें.' ॥ ९२
त्यासि 'तथास्तु' म्हणे चतुरानन, मेघनिनाद हरिप्रति सोडी.
तो 'मुनिदारवरव्रतखंडनतत्फल हें,' कथितां कर जोडी; ।
वैष्णवयज्ञ गुरूदित साधुनि, तेज पुन्हा पदही निज पावे.
[4]अर्जुनवालिकृत क्षणदाचरराजपराभव यावरि गावे. ॥ ९३
स्त्रीजनयुक्त सुखें करितां जलकेलि, रणा हटकी, नरदेवा,
[5]हैहयराज सहस्रमहाभुजरुद्धगती मुरडी [6]रंय रेवा ।
वाहवि पूजनवस्तु; दशानन कोपुनियां झगडे अभिमानी.
तो करि भंगुनि बद्ध तया, मग सोडि पुलस्त्य मुनिप्रति मानी. ॥ ९४
दक्षिणसिंधुतटीं करितां जप, रावण मागुनि जाय धराया,
तों धरि यासि पराङ्मुखही [7]कपिराज सलील, मदासि हराया. ।
काख भरी, करि सर्वसमुद्रनिमज्जन, ये स्वगुहेप्रति सोडी.
होउनि दीन दशास्य, म्हणे 'चिर सख्य अकृत्रिम दे,' कर जोडी.॥ ९५
मारुतिचेंहि चरित्र पुसे प्रभु, कुंभज तेंहि कथी, 'शिशुभावें
हा गगनांत उडे, रवितें निरखूनि म्हणे पिकलें फल खावें. ।
राहु म्हणे, 'मम भक्ष्य कसें इतरासि दिलें?' कपि [8]जिष्णुस दावी.
त्याहि [9]तमा फलधी पळवी, मग शक्रकरेणुसही फळ भावी. ॥ ९६
जो हरिवाहन वारण, भव्यपयोनिधिफेननिभा धवळा या
पाहुनि, वाहुनि हर्ष मनीं, मुख वासुनि, वेग करी कवळाया. ।
शक्र [10]करेण्ववनार्थ, तदा कवळी पवितें अतिसत्वर हातें,
ताडुनि पाडि नगीं शिशु मूर्छित, हें नव्हतां नच सत्व रहातें. ॥ ९७

---

१. सर्वदिक्पाळांच्या सैन्यांसह. २. इंद्राला. ३. इंद्रास. ४. सहस्रार्जुन, आणि वाळी, यांणीं केलेला. ५. सहस्रार्जुन. ६. वेग. ७. वाळी. ८. इंद्रास. ९. राहुला. १०. करेणु+अवन+अर्थ=ऐरावताच्या रक्षणाकरितां.

भूमिवरी पडतां गगनांतुनि, त्याचि शुची हनु भंगलि वामा.
 'हाय!' म्हणे पवन, त्रिजगन्मळमूत्रनिरोध करी, रघुरामा! ।
वाचविलें विधिनें पवनप्रियतोकें, करें कुरवाळुनि वर्षे,
 जेंवि घनें मृत सस्य; निवे. जग देति तया वर निर्जर हर्षे. ॥ ९८
इंद्र म्हणे, 'भय लेश नसो पविपासुनि; नाम असो हनुमान् या.'
 दे निजतेज, तदीय शतांश सशास्त्ररहस्य, दिवाकर मान्या. ।
काळ वदे पवना, 'तव नंदन नित्य अवध्य असो, मम दंडा'.
 श्रीद म्हणे, न वधील गदा, अशनिप्रतिमा जरि हे अतिचंडा. ॥ ९९
पाशजलाभय दे, वरुण त्रिदशाद्भुतशिल्पनिधी, वर देहा,
 'मद्रचिताखिलशस्त्र शिवेल न यास, जसा झष धीवरदेहा'. ।
शंभु म्हणे, 'भय मारुतितें नच देइल शस्त्रहि अस्त्रहि मौजें,
 हें बहु, पावक भास्करतेज तसें किति तें, हरि वस्त्र हिमा जें?' ॥ १००
पंकजयोनि म्हणे, 'सकळाहितमित्रभयाभयदायक हा हो;
 कामगतीहि, चिरायु, अजेय, रमेशसहाय महायश वाहो; ।
रूप धरील यथेष्ट, विषाद नसेल, असेल अनामय, माया
 या न पुरेल, मदंड न मोहिल या कविराजमना मयमाया.' ॥ १०१
पुष्कळ सद्वर देउनि, सामर देव चतुर्मुख हर्षुनि, गेला.
 मारुति हा पवनें जनकें मग केसरिदारगृहाप्रति नेला ।
बाळपणें करि फार उपद्रव, हाचि पितृप्रिय यासम हर्षी,
 शापिति, शक्ति कळो स्तवनें समयींच, अशापरि यास महर्षी. ॥ १०२
कुंभज यापरि सर्व सविस्तर सांगुनि वृत्त पुसे; मग जाया
 त्यासि म्हणे, 'प्रभुराजऋषींसह द्या वर अश्वमखाप्रति यांया'. ।
मान्य करी मुनि जाय बहु प्रभुपासुनि जें जनका धन ये तें,
 दे मणिकांचनवस्त्रगजाश्वरथादिक आपुलिया तनयेतें. ॥ १०३
जाय पुसोनि नृप स्वपुरा, मग वानर राक्षस तत्पति रामें,
 तत्सचिवांसह पूजुनि, फारचि हर्षविले, प्रियसद्गुणधामें. ।
जे भरतें स्वसहाय नराधिप आणविले स्वपुराप्रति होते,
 पूजुनि बोळवितां वदले, 'तव संस्मरणीं निरता मति होते.' ॥ १०४

१. पर्वतावर. २. बाळक. ३. उदकवृष्टीनें. ४. धान्य. ५. देव. ६. मत्स्य. ७. माझें. मत्+अंड=म्यां निर्मिलेलें ब्रह्मांड. ९. केसरिसंज्ञक स्त्रीच्या गृहाप्रति. १०. यावयाला.

तात तसा प्रभु, पुत्र तसे प्रिय अंगद मारुति घेउनि अंकीं,
दे सदलंकृति, वर्णुनि तत्कृति, लाजवि जो गुण चंदनपंकीं; ।
जे गगनोपळकाळ, तदा कवि जाणति यांचि असाश्रु तिघांस,
मानिति उग्र वियोगचि सागरवार्जनुचा न असा श्रुति घांस. ॥ १०५
भक्ति निरंतर पुण्ययशश्रवणादर, हा वर मारुति मागे.
गद्गदकंठ, कृतांजलि, साश्रु, पदीं प्रभुच्या बहु लागुनि लागे, ।
भक्त सुकंठ बिभीषण मारुति अंगद जांबवदादिक भावें,
वंदुनियां पुसती शिर चाळुनि. त्यांसि तसेंचि म्हणे विभु 'यावें'. ॥१०६
पुष्पक ये अलकेहुनि मागुनिया; परि तो विनवी नरदेवा,
'दे स्वपदाश्रय, योग्यचि तूं, धनदें मज सांगितली तव सेवा'. ।
त्यासि म्हणे प्रभु, 'संप्रति जा; करितां स्मृति भेट; सुखें भज आर्या,
मेळविलें भरतास्ववनें यश. तेंवि अणीकहि येसिल कार्या.' ॥ १०७
सत्य कथी भरत प्रभुतें, 'जन सर्व सुखाढ्य तुझ्या नवराज्यें,
तृप्ति जसी अमृतें प्रभुजी सकळासहि होय, तसी न वैराज्यें. ।
राम विहार अशोकवनीं करि; नित्य विलाससुखें बहु धाली,
भूमिकृतें नवसें चिर न्हाउनि, गर्भवती धरणीजनि झाली. ॥ १०८
तीस पुसे रघुनायक, दोर्हद, मोहदवांबुद, घेउनि अंकीं;
काम तपोवनदर्शन हा कथि, यत्स्मृति दे न बुडों मन पंकीं. ।
राम म्हणे, 'बहु उत्तम; जासिल देवि! उद्यांचि मुनींस पहाया;
जे मुनिदार, तयांसि धनें वसनें मणिराशि यथेष्ट वहाया.' ॥ १०९
भद्रचरासि पुसे प्रभुसत्तम, 'काय मला म्हणती जन? दूता!
तो विनवी, वदतात शुभाशुभ लोक विशृंखळ बा! अतिपूता! ।
कीशवशीकरणांबुधिबंधनरावणमर्दन, सद्यश, गाती,
बोलति हेंहि, कसी सदनाप्रति आणिलि; शत्रुसि जी वशगा, ती?' ११०
हेंचि सुहृद्वदनेंहि निघे. मग राम म्हणे अनुजांसि, 'न वारा
शासन, हा उपहास नसो; यश तेंवि, न बंधु, न देह, न दारा. ।
बा घननादरिपो! त्यज, पावुनि तातसखाश्रम, रक्षिल, जागा
धर्म असे, तुज दोहदपूरक मानिल तापस, लक्षिल जा, गा! ॥ १११

१. समुद्रोदकामध्यें झालेल्या वडवाग्नीचा. २. कान. ३. पाठीमागून. ४. भरताचे प्राण राखिल्यानें. ५. चांगल्या तुपानें. ६. डोहळा. ७. मोह वणव्याचा मेघ. ८. दूतविशेष त्याला. ९. जटायूचा आश्रम.

लक्ष्मण तीस, निशा सरतांचि, म्हणे, 'प्रभु पाठवितो तुज, माते!
चाल, तपोवन, साधु पहा, धन घे बहु, वाटुनि लाजिव दाते.' ।
वंदुनि वंद्यजनांघ्रि, निघे निजकांतरथावरि बैसुनि, हर्षें.
स्वर्धुनिपार कवींद्रपदीं[1] त्यजि; सांगुनि, तो जळ शोकज वर्षे. ॥ ११२
भूतनया वदली, 'जन निंदिति याकरितां त्यजिलें जरि साधो[2] !
युक्त असे प्रभुला यश निर्मळ आत्मकुळोचित, यावरि साधो[3]. ।
रोदन योग्य नसे तुज, हें मज देउनि जा; वद मन्नमनातें.
ध्यान रुचो प्रभुचेंचि, जसें रुचतें शिशुच्या, पय अन्न मनातें.'॥ ११३
साश्रु नमूनि सतीस फिरे, प्रभुतें भरतानुज[4] तन्नति सांगे.
राम उदश्रु[5] म्हणे, 'जनते[6]! दयिता, असतां शुचि, निंदिलि कां गे!?' ।
आदिकवि द्रुत येउनि पूजुनि, वृत्त तिच्या वदनें परिसून;
प्रार्थुनि, सांत्वुनि, ने उटजीं, दुहिता जसि लाडकि, कीं बरि सून.॥ ११४
राम कथी नृगभूपनिमिक्षितिपाळवसिष्ठकथा अनुज्याला;
तीहि ययातिकथा, गुरुशाप घडे, सुरही वदले ननु, ज्याला. ।
न्याय करूनि तया सुखवी प्रभु, जो स्वमनोगद[7] आयकवि श्वा[8].
हृष्ट उलूकखगाहि करी सुयशें, निववी रघुनायक विश्वा. ॥ ११५
श्रीयमुनातटवासि महामुनि सांगति दुःख, तयांसह भावा
पाठवि तत्क्षण राघव, कीं द्विजताप लया अतिसत्वर जावा. ।
जाय अरिघ्न, सदाश्रम पावुनि आदिकविप्रति वंदुनि राहे.
रात्रि कुमारयुग प्रसवे महिजा, तिस तो रचितांजळि पाहे. ॥ ११६
सूर्यतनूद्भवसिंधुतटीं सकळाश्रिततापसमंगलधामीं.
'मां' पहिला मग 'धा' मग 'ता' तिन वर्ण असे गुरु ज्या नृपनामीं, ।
त्यासि वधी लवणासुर, हा हरनिर्मितशूलधर; च्यवनानें
पूर्वकथा कथिली असि ऐकिली रामपदाब्जसमस्तवनातें. ॥ ११७
शूळ करीं नसतां, हरिणादिक मारुनि, जों गहनांतुनि[10] आला,
तों असुरा मुनि गांठविती, रण त्या प्रबळासह दारुण झाला; ।
अग्रजदत्तशरें उर भेदुनि, वीर अरिघ्न वधी लवणातें.
रावणमर्दन तेंवि, खळार्दन, न त्रिदशा गमलें कवणा तें? ॥ ११८

---

१. वाल्मीकीच्या स्थानीं. २. हे साधो. ३. साध्य होवो. ४. लक्ष्मण. ५. उत्+अश्रु= . ६. हें जनसमूहा. ७. आपला चित्तसंबंधी रोग. ८. कुत्रा. ९. मांधाता. १०. अरण्यांतून.

त्या मधुपूर्ववनीं मधुरा रचिली, भरले तंव वत्सर बारा,
ये परतोनि अरिघ्न, कवींद्रधृतादर तो परिसे कृति सारा. ।
भूतनयासुत साधु कुशाख्य, लवाख्य, सुधी मधुरस्वरगाते,
सेविति जे मुनि रामयशा, न मनें स्मरती अमृता स्वरगा ते. ॥ ११९
तो प्रभुपाद नमूनि निवे, ऱ्हद सेवुनि जेंवि महा[1]तपतप्त.
श्रीशनिदेश नलंघि, निघे मथुरेसि वसोनि पुरीं दिन सप्त. ।
द्वार धरी मृतबाळक विप्र; उपाय पुसे, प्रभु नारद बोधी,
पुष्पक ये स्मरतांचि, वसे रघुराज, अधर्मकराप्रति शोधी. ॥ १२०
आढळतांचि, वनांत तपोरत शूद्र, तया प्रभु तत्क्षणिं मारी,
स्वर्गसुखासि करी उचित; द्विजबाळ उठे, मेह[2] दे बहु भारी. ।
श्वेतकथा घटजें कथिली परिसोनि, तदर्पितसद्वलयातें
घेउनि. ये स्वपुराप्रति, लाजवि तापहरत्वगुणें मलयातें. ॥ १२१
'[3]राज'पदोत्तर'सूय' असें अभिधान जयास, तयास कराया,
राम पुसे, विनवी भरत, क्षितिपक्षय हा, तुज योग्य न राया !' ।
लक्ष्मण जोडुनि हस्त वदे, 'हयमेध बरा.' प्रभु ऐकुनि डोले,
'सत्य असा मख अन्य नसे, तरले [4]ईल वासव,' यापरि बोले ! ॥ १२२
राम वसिष्ठमतें करवी स्थळ नैमिषनामवनीं, भरतातें
कार्य कथी; तुरगावन मे[5]घरवारिस, यत्सुयशें जग धातें. ।
प्रेषुनि दूत, अरिघ्न सुकंठ बिभीषण मैथिल मातुळ राजे
आणवि, सर्वमहर्षिमहाकवितेंहि; [6]महासव तो बहु साजे. ॥ १२३
[7]आदिकवि, प्रभुसत्कृत, शिष्यसमेत, वसे शुचिगोमतितीरीं,
तोचि कुशा सलवा कृति, [8]गावविं हा[9]र्द उते श्रवणें रघुवीरीं ।
'कोण तुम्ही? रचिलें कवणें सुमनोहर काव्य?' असें अवसानीं
राम पुसे? कथिती गुरु, तत्कृत, ज्यांस [10]जनु क्षितिच्या नवसांनीं. ॥ १२४
हर्षुनि कांचन पुष्कळ देववि देव, विरक्त न ते लव घेती.
जाणुनि पुत्र, तदीय सुरीति, न रामचि वर्णिति हो ! अवघे, ती. ।
'प्रत्यय देउ जनास, पुन्हा करु दिव्य सती,' परि तो कवि राया
जोडुनि हस्त, असें विनवी, प्रभु देविस पावुनि, शोक विराया. ॥ १२५

---

१. महा+आतप+तप्त=मोठ्या उष्णानें तापलेला. २. आनंद. ३. राजसूय. ४. राजविशेष.
५. मेघनादशत्रु लक्ष्मण, त्याला. ६. मोठा यज्ञ. ७. वाल्मीक. ८. म्हणवि. ९. तद्गत प्रेम. १०. जन्म.

मान्य करी कविराज, मग प्रभुच्या निकट, क्षितिजेप्रति आणी,
'दाशरथे! शुचि हे; नसतां, मम सत्तप मोघ,' वदे असि वाणी. ।
श्रीहि म्हणे, 'जरि मद्व्रत शुद्ध असेल, कळेल तुला, महि माते!;
दे उदरीं स्थळ, जे जन निंदिति, गाउत लाजुनियां महिमा, ते.' ॥१२६
तोंचि उले धरणीतळ, त्यांतुनि भासुरमूर्ति निघे महिदेवी,
ती स्वसुतेप्रति भेटुनि, जें परमासन त्यावरि सादर ठेवी, ।
वर्षति देव तदा कुसुमें, यश गाउनि, वाजविती वर वाद्यें.
होय पळांतचि गुप्त सती; धरिलें बहु दुःख सरोजभवाद्यें. ॥ १२७
कोप करी बहु भूमिवरी प्रभु, सांत्वुनि तत्त्व तया कथि धाता,
'पद्मभवा दयिता तव, तूं हरि मानवसा खळरावणघाता. ।
सांप्रत येथुनि जाउनि, राहिलि पूजन घेत रमा फणिलोकीं,
देइल भेटि निजालयगा तुज! बा! निज भाव मनीं अवलोकीं.' ॥१२८
'आदिकवींद्रकृतामलकाव्य सुरांसह आयकिलें, मन धालें.
तूंहि समग्र करीं श्रवण; प्रिय हेंचि सुधीस सुधाधिक झालें.' ।
प्रार्थुनि यापरि, जाय विधि; प्रभु सोडुनि शोक, पुन्हा सुतगीता
त्या स्वयशा परिसे, हृदयांतुनि दूर न होय पळार्धहि सीता. ॥ १२९
यज्ञ समाप्तिस नेउनि, गौरवि राघव वर्ण मखागत सर्व,
प्राज्य अचिंतित दे प्रियवस्तु, हरी अखिलत्रिदशद्रुमगर्व. ।
ये स्वपुरा, मग तो, अयुताब्द सुवर्णमयी दयिता हयमेधा-
माजि तसीच वरूनि, करी मख कोटि, बहु स्तवि सामर वेधा. ॥१३०
सोडुनि हा नरलोक सुखें मग कोसलराजसुतादिक माता,
दिव्य विमान वरूनि, पतिप्रति भेटति, धन्य करी प्रभु ताता. ।
यावरि मातुळ आत्मपुरोहित वित्तहि पुष्कळ पाठवि रामा;
तो कळवि द्विज, मत्ततरामरगायकमर्दन या नृपकामा. ॥ १३१
पाठविला भरत प्रभुनें, दिन सप्त निरंतर भांडुनि मोठी
ख्याति रणीं करि, योजुनियां प्रळयास्त्र, वधी अरि तीनहि कोटी. ।
त्या विषयांत पुरद्वय निर्मुनि बैसवि राज्यपदीं सुत दोघे,
स्वामिपदाब्जरजेंचि शिरीं बहु जाणुनि राज्यपदाहुनि, तो घे. ॥ १३२

१. जर ही पवित्र नसेल तर माझें तप व्यर्थ. २. ब्रह्मयाच्या पित्यानें, रामानें. ३. कमलो-
ा. (लक्ष्मी.) ४. स्वस्थानीं गेल्यावर तुला. ५. दहासहस्र वर्षें. ६. ब्रह्मा. ७. अतिमत्त
ा गंधर्वांचें मर्दन. ८. देशांत.

कारुपथाभिध देश सुशोभन, त्यांत पुरद्वय निर्मुनि केले
लक्ष्मणनंदन भूपति, जे भरतात्मजसे अभिषेचुनि, नेले ।
काळ धरासुररूप[1] वदे प्रभुतें, 'तुजसींच रहस्य वदावें;
त्यासमयीं तिसरा जन येइल, जो स्वसमीप, तयासि वधावें.' ॥ १३३
द्वारप लक्ष्मण, राजवरें, 'वध' हा पण आपण सांगुनि, केला;
ब्राह्मण, हस्त धरूनि रहस्यगृहांत समर्चुनि, सादर नेला. ।
सांजलि तो विनवी, नत होउनि, पाठविलें विधिनें मज काळा,
कृत्य नसे उरलें, स्वपदाप्रति ये, रुचल्यास, जगत्रयपाळा ! ॥ १३४
त्यासि 'अवश्य,' म्हणे जगदीश्वर, तोंचि महामुनि अत्रिज[2] आला;
'दाशरथिः क![3]' असें पुसतां, विनवी कर जोडुनि, लक्ष्मण त्याला, ।
'आसन हें, क्षण बैस मुने! प्रभु येउनि पूजिल, सांप्रत कार्या;
गुंतुनि, बा! सदनांत असे, तव दर्शन घेइल सत्वर आर्या!' ॥ १३५
चंड वदे, 'पितृपूर्वजसन्नति सोडिलि होउनि मत्त, पहा, रे!
हें कुळ भस्म पळें करितों, प्रलयाग्निपुढेंहि न मत्तप हारे.' ।
तो स्वविनाश बरा, न कुलक्षय, हें मनिं आणुनि, 'सत्वर तातें
शापु नये,' विनवूनि असें, कथि अत्रिसुता मग, सत्वरतातें[4]. ॥ १३६
काळ पुसोनि निघे, मग येउनि, अत्रिसुतासि नमी प्रभु राम.
प्रांजलि[5] होउनि कार्य पुसे. कथि तो क्षुधित द्विज, भोजनकाम. ।
अन्न चतुर्विध अर्पुनि, तर्पुनि, अर्थिसुरद्रुम घेउनि आशी,
देउनि त्यासि निरोप, वसे हृदयांत धरूनि महासुखराशी. ॥ १३७
बंधु वदे, 'सुयशस्कर मद्वध होचि, नसो वितथा तव संधा[6].'
त्याग वधासम, हे स्वगुरूक्ति नृपा तसि, यष्टि पथीं जसि अंधा. ।
'जा त्यजिलासि' म्हणे अनुजा प्रभु, जो हरिता, स्मरतां भवबंधा.
लक्ष्मण वंदुनि पाय निघे; त्यजि शील न, ज्यापरि चंदन गंधा. ॥ १३८
जाय, वरी सरयूतट लक्ष्मण; तैं पुर सर्वहि दुःखित झालें.
तोंचि विमान रविप्रभ आणुनि, निर्जरवृंद नभांतुनि आलें. ।
यानवरीं मग बाहुनि लाहुनि, संमद गाजत वाजत नेला.
तें अवलोकुनि सर्वजनें सुगुणास्तव युक्त जयध्वनि केला. ॥ १३९

---

१. धरा+सुर+रूप=ब्राह्मणवेषानें. २. दुर्वासा. ३. दाशरथिः क=राम कोठें? ४. सत्व+रतातें. ५. हात जोडून. ६. प्रतिज्ञा.

राम म्हणे भरतास, 'नको पद, जाइन लक्ष्मण जेंवि, तसा मी.
राज्य करीत पुरींत रहा सचिवासह हर्षित या पितृधामीं.' ।
तो प्रभुभक्त म्हणे, 'तुजवांचुनि होइल हें पद तापद काया;
त्वत्पदपद्मचि भूषण सोडिल हा न, असें वदतां पदका या. ॥ १४०
धाडुनि दूत, अरिघ्न सुकंठ बिभीषण हे प्रिय भक्त बहावे,
जे प्रभुजी! स्मरती तुज संतत दास, तिहीं तत्र पाय पहावे.' ।
पाठविले [1]जवन [2]स्पश, ऐकुनि दोंनगरांत सुतद्वय तोही
स्थापुनि ये भरतानुज, सोडुनि राज्य, न साधुजना धन मोही.॥ १४१
अंगद बैसवुनि स्वपदीं, अतिसत्वर भक्त सुकंठहि आला,
मारुति जांबवदादिहि, तोहि बिभीषण रामपदीं नत झाला. ।
ऋक्षवर, क्षणदाचरराज, मरुत्सुत यांप्रति दे वर इष्ट,
श्रीपति पौरजन, प्लवगादिक हर्षवि, जे गमनोत्सुक शिष्ट. ॥ १४२
ते जन सर्व दयानिधिनें, त्यजुनि स्वपुरी, सरयूप्रति नेले;
मज्जन तीर्थवरीं करवूनि, सुराधिक दिव्य खरादिहि केले. ।
दिव्यविमानसहस्रशतस्थित गाजत वाजत साजत गेले,
पावुनि उत्तम लोक, सदा प्रभु दर्शनहर्षितमानस ठेले. ॥ १४३
श्रीरघुनाथचरित्र जना, बहु भव्य नव्य रस देउनि, तारी.
जोडुनि पातक या सुयशासचि रक्ष लक्ष म्हणती नर नारी, ।
ये सहजांतहि जींत कसेंतरि रामनाम बरवें हितकारी;
ती सकळांसहि भेटविती शुचि उक्ति मुक्ति करिती हित भारी. ॥ १४४
[3]अक्षमनोहर दीनजनावनदक्ष पुमर्थद, साधुसभाधन,
लक्षकविस्तुत, दारुणपातककक्षदवानळ, सत्करुणाघन, ।
तक्षककोट्यभिकोग्रदशाननरक्षउपद्रुतविश्वभयापह,
रक्ष रघूत्तम! [4]मामबलं [5]वृतपक्ष्म[6]नाथमहर्षिमहामह! ॥ १४५
पसरूनि तुला पदर, प्रणती करितों शत बा! भगवच्चरिता!
तव चिंतन नित्य घडो सदया! क्षण एकहि जाउ कधीं न रिता. ।

---

१. वेगवान्. २. दूत. ३. नेत्र आणि मन यांतें हरणारा. ४. मां+अबलम्=बलरहित जो यातें. ५. वृतपक्ष्म=वरला आहे पक्ष ज्याणें असा. '(मां' या शब्दाचें विशेषण.) ६. अनाथ+र्षि+महामह=अनाथ जे महर्षि त्यांचा मोठा आनंद किंवा उत्साह अशा हे रामा. ('रघूत्तम' शब्दाचें विशेषण.)

वर हा मज दे, तरला जन कोण न, कास भवांत तुझी धरिता?
सकळासहि तर्पिसि, अर्पिसि; तूं, शुचि गांग तसें, हरता, हरिता. १४६
परमाद्भुत तूं प्रभुनाम! जनीं न रमापतिहूनि उणें, नमिता
वर मागितला वरितो, म्हणसी चरमात्मज देसि सुखा अमिता. ।
सरमाधवसा तुज सर्व गमे वरि मारुनि राम वधी अरितें.
पर [1]मारमुखादि [2]अजेय सुखें पर मारिसि, लाजविसी अरितें. ॥ १४७
[3]भालदृगर्चित काळमुखाखिलपाळ गमे नत बाळक ज्याला,
सव्यथ ज्या कळि नव्य सदा निज भव्य यशें अज अव्यय धाला. ।
स्फार गुण श्रुतिसार कळाजित मार रमामणिहार नमावा
श्याममनोहर, नामहतात्यघ, राम मनांत निकाम रमावा. ॥ १४८
छंद मनोहर हें, सवया म्हणती बुध यास, सहाय मला
मंदमतीसहि होउनि, सिद्धिस पावविला अभिलाष भला; ।
ग्रंथ रघूत्तमपादयुगार्पित हा तुलसीदलसा गमला
भक्तमयूर म्हणे रसिक प्रभुभक्तचि या सुयशीं रमला. ॥ १४९

## ७०. [4]सीतारामायण.

(अनेक वृत्तें.)

[5]श्रीजनकसुता सीताप्रभृति सुखें भेटल्या [6]स्वसा जावा, ।
तत्संवाद वदावा, सज्जन पावुनि [7]मैह स्व, साजावा. ॥ १
[8]भरताची मांडवी स्त्री, लक्ष्मणाचीहि ऊर्मिळा, ।
श्रुतकीर्ति रिपुघ्नाची; जगीं यद्रीति दुर्मिळा. ॥ २
पडुनि गळां, गहिवरल्या, सीतेच्या, कन्यका तशा गमल्या; ।
श्रमल्या विरहें, श्रीनें भेटुनि कुरवाळितां करें शमल्या. ॥ ३
[9]म्हणति, 'सुदिन भाग्यें आजि हें प्राप्त, झालें;
अमृत, [10]परमरुग्णा वांचवायासि आलें; ।
सुभगिनि! चवदा कीं कल्पसे [11]अब्द गेले,
स्वसम सखि! निजेनें निष्ठुर स्वप्न केले. ॥ ४

१. शत्रु. २. कामप्रमुख. ३. शिवानें पूजिलेला. ४. सीतेनें सांगितलेलें रामायण. ५. गीतिवृत्त. ६. भगिनी. ७. उत्सव. ८. अनुष्टुप्छंद. ९. मालिनी छंद. १०. अतिरोगिष्ठाला. ११. वर्षें.

वृत्त सर्व सति! सांग आपलें, सूक्तिनें निविव चित्त तापलें, ।
दर्शनें पुरलि सर्व कामना, या नसो श्रवणकाम कां मना?' ॥ ५
आलिंगुनि कुरवाळुनि, हुंगुनि शिर, पुसुनि लोचनें पदरें, ।
श्री सांगे निजवृत्त, श्रवणीं ज्याच्या उरों नयेचि दरें. ॥ ६
भावोजी[7] चित्रकूटीं, परतुनि नगरा न्यावया, शीघ्र आले.
माझे डोळे तुम्हांतें निरखुनि, बहु हे तेधवां तृप्त झाले. ।
स्वामीच्या पादुकांतें वरुनि, परतले बोध मानूनि मार्गें;
विप्रांच्या, मानिलें हो! परम सुख, अविघ्नत्व पावोनि, यागें. ॥ ७
देउनि अभय मुनीतें, आशीर्वादप्रसाद जोडून, ।
अत्र्याश्रमासि गेले स्वामी, तो चित्रकूट सोडून. ॥ ८
चालति माझ्या मागें, लक्ष्मणजी काननीं, पुढें स्वामी. ।
धामीं तसीच हर्षें चालें, पाहोनि आपल्या स्वा मी. ॥ ९
जैसे वसिष्ठ गाधिज, जेंवि भरद्वाज गुरु, तसे अत्री ।
नमिले शमिलेखर्षभ, जे सुधवळ मानसीं जसे[11] पत्री. ॥ १०
जेंवि भरद्वाज, तसे द्रवले पाहोनि तेहि, मामाजी ।
झाले अतितर सुखकर; कर जैसे भानुचे हिमामाजी. ॥ ११
तद्भार्या अनुसूया मजवरि करि, सासु मायसी, माया, ।
स्वकरेंचि अळंकारी, आहे प्रेमासि काय सीमा या? ॥ १२
[12]वेणी घालुनि, लोचनीं निजकरें, ती लेववी कज्जळ;
लावी चंदन, सुव्रता; मज गमे गंगाचि तें तज्जळ. ।
गुंफी सत्कुसुमें शिरीं, सुरुचिरा माळा गळां अर्पुनी,
प्रेमें धर्म कथी, सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी. ॥ १३
तैसाचि [13]मल्लुलाटीं, साध्वी सिंदूरतिलक जो लावी, ।
तोहि [14]अंगतसार सदा, कैसी [15]तत्सुकृतसिद्धि बोलावी? ॥ १४
[16]तो [17]अंगराग चिरकाळ तसाचि ओला,
[18]यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला; ।

---

१. रथोद्धताछंद. २. सु+उक्तिनें=उत्तम भाषणानें. ३. इच्छा. ४. कां. ५. भयानें. ६. स्रग्धरा छंद. ७. भरत. ८. धना. ९. शमि+लेख+ऋषभ=योगि, देव, यामध्यें श्रेष्ठ. १०. मानस सरोवरीं. ११. पक्षी हंस. १२. शार्दूलविक्रीडित वृत्त. १३. मत्+ललाटमाझ्या=कपाळीं. १४. नवा टवटवीत. १५. त्याच्या पुण्याची सिद्धि. १६. वसंततिलकाछंद. १७. उटणें, उटी. १८ यत्+सौरभीं=ज्याच्या सुगंधीं.

घ्राणेक्षणासि[1] म्हणती कुसुमेंहि 'डोला.'
वेणी नवीच; न सतीयश शक्य बोला. ॥ १५
उष्णा उटी हिमीं ती, उष्णींही सर्वकाळ परम हिमा. ।
वृष्टि न मदतिक्रम करि; साध्वीचा न वदवेचि पर महिमा. ॥ १६
वत्से **मांडवि**! मद्विवाहचरित प्रेमें पुसे ती सती,
सांगावी मज लागली, निजमुखें, सर्वा कथा, तीस ती. ।
आशीर्वाद, बहुप्रसन्नहृदया, दे मायसी लोभवी;
त्या आर्येसि, तसेंचि ईसहि, महावात्सल्य हें शोभवी. ॥ १७
मग[2] तेथुनि **ऊर्मिळे**! निघाले प्रभु; जों **दंडककाननीं** रिघाले, ।
धरि राक्षस तो शरीर हातें; नच हें, हे नसतां शरी[3], रहातें. ॥ १८
मी सोडविल्यें, मर्मीं ताडुनि उग्रास, शरसदोघांहीं[4] ।
क्षण आपणाहि धरितां, दाखविला त्यास न रस दोघांहीं. ॥ १९
मज सोडुनि, जेंवि **राहु**, दोघे **प्रभु चंद्रार्क** तसेचि, उग्र तो घे; ।
हृदयांतिल सर्व धीर गेला, **श्रुतकीर्ते**! बहु म्यां विलाप केला. ॥ २०
स्वामिनीं, वधुनि तापसारिला[5], त्या क्षणें सकळ ताप सारिला ।
हा **विराध** सुरमान्य तारिला **तुंबरु**प्रबळशाप वारिला. ॥ २१
मज[6] वनीं **प्रभुनीं** समजावुनी, द्विजसमाज सुतांसम जाउनी, ।
निववीले; मुलिहो! बहु मानिती सकळ, तात तसे गुण वानिती. ॥ २२
करि[7] निर्मळ जो, तपोनि, धी, **शरभंगाख्य** महातपोनिधी, ।
**प्रभुनीं** गुरुसाचि पाहिला, चरणीं मस्तकपद्म वाहिला. ॥ २३
करूनि[8] मत्स्वामिसभाजनातें[9], लावी स्तवा, **शक्र**, सभाजनातें. ।
बैसे विमानीं मुनिकाय होमीं[10]; सांगों तुम्हां अद्भुत काय हो! मी? ॥ २४
एकीं सरीं सुवाद्यध्वनि ऐकुनियां विचारितां कळलें; ।
चळलें, दिव्यविषयरत होउनि, मन **मांडकर्णि**[11]चें मळलें. ॥ २५
**सुतीक्षण**[12]नामा मुनिराज देखिला; षट्शत्रुनीं जो निजकाळ लेखिला, ।
तसाचि **कुंभोद्भवबंधु** सन्मुनी, स्वप्नींहि[13] नेणे विषयांसि जन्मुनी. ॥ २६

१. घ्राण=ईक्षण+ नाक आणि डोळेयांना. २. औपछंदसिक वृत्त. ३. बाणयुक्त. ४. शर+सत्+ओघ=बाणाच्या उत्तम ओघांनीं. ५. कर्मणि प्रयोग. तापस+अरिला. ६. द्रुतविलंबित वृत्त. ७. वियोगिनी वृत्त. ८. उपजाति वृत्त. ९. मत्+स्वामि+सभाजन=माझा धनी जो राम त्याचें पूजन. १०. होम करितांचि. ११. ऋषिविशेष त्याचें. १२. इंद्रवंशा वृत. १३. 'कधींहि' असा अन्य पाठ आहे.

[1]लोपामुद्रापति श्रीघटजमुनि, जिहीं प्राशिला सिंधु, अन्या
सांगावी ख्याति काय, त्रिभुवनमहिता सत्तपःसिद्धिजन्या? ।
प्रेमें मानूनि पुत्रापरि रघुवर हे, मानिली हेहि कन्या,
दिव्यें शस्त्रें दिलीं हो! म्हणुनि वरि जयश्री, दुजी कीर्ति धन्या.॥ २७
त्यावरि मामाजींचे गृध्रेंद्र सखे, जटायु या नावें, ।
स्नेहाब्धि भेटले, हो! त्यांचें साधुत्व काय वानावें? ॥ २८
[2]विनयें करितांचि वंदनातें, द्रवले भेटुनि जेंवि नंदनातें. ।
प्रभु मानिति गेह, काननातें; निववी तें बहु देह कां न नातें? ॥ २९
[3]आम्हांतें वदले, 'स्वतातसदना आलां, सुखें या वनीं.
[4]वर्ता पंचवटीस्थळीं, मुनिनुतीं गोदातटीं पावनीं.' ।
मत्स्वामी विनयें असें विनविती, 'बा! हे स्नुषा आपली;
रक्षावी समयीं, निवो मति इची, [5]स्वादर्शनें तापली.' ॥ ३०
वदले ते मामाजी, 'स्वस्थ तपा, मंत्र जा जपा, सून ।
रक्षिन दंडकवनपति मी; व्हा निश्चित आजपासून.' ॥ ३१
[6]स्वामी मातें नेति गोदावरीतें, यद्वातेंही चित्त मोदा वरीतें; ।
भावोजीनीं निर्मिली पर्णशाला; तैसें देना, रत्न वा स्वर्ण, [7]शाला.॥ ३२
निववी मज मातासी, श्रीमत्र्यंबकजटोद्भवा, गंगा, ।
[8]स्मरणें, स्तवनें, स्नानें, शुचि करिती [9]विश्वचित्तवागंगा. ॥ ३३
ये,. म्हणवाया, भेदुनि शोकघनें [10]वक्ष, 'हा!' तदा, [11]विवशी; ।
स्वाम्याज्ञेनें, तीतें हा लक्ष्मण वत्स हात दावि [12]वशी. ॥ ३४
[13]श्रीसीतेतें तिघीही पुसति सुभगिनी, प्रेमळा जेंवि [14]आली,
'कोणाची, कोण, गे! ती? मळमति विवशी सांग कोठूनि आली? ।
दुष्टेनें काय केलें? सुमुखि! सकळही वृत्त तें आयकों दे.
बाई! दुःखें सुखेंही, चरित परिसतां, आमुचा [15]काय कोंदे.' ॥ ३५
[16]सांगे भूमिसुता, 'दशास्यभगिनी मांसाशनें मातली;
नामें शूर्पणखा, कुबुद्धि, विधवा, नक्तंचरी, पातली. ।

---

१. स्रग्धरावृत्त. २. हरिणीप्लुतावृत्त. ३. शार्दूलविक्रीडितवृत्त. ४. राहा. ५. स्व+अदर्शन=आपल्या अदर्शनानें. ६. शालिनीवृत्त. ७. सुखाला. ८. 'ध्यानें गानें पानें' असाही पाठ आहे. ९. विश्व+चित्त+वाक्+अंग=जगाचें मन, वाणी, अंग यांला. १०. वक्षस्थल. ११. दुर्दशेची अभिमानिनी एक देवता आहे. १२. जितेंद्रिय, योगी. १३. स्रग्धरावृत्त. १४. सखी. १५. देह. १६. शार्दूलविक्रीडितवृत्त.

मायारूपवती, प्रभूसि भुलली, मोहीं स्मरें घातली.
ती त्यांच्याहि गळां पडे, मति तुझी ज्यांच्या पदीं रातली.' ॥ ३६
'मला आहे स्त्री, हो मदनुजनिसौमित्रिदयिता;
वधू तूं योग्या त्या, सुमुखि! गुणरूपातिशयिता.' ।
असें स्वामी तीतें कथिति; हित ती मानुनि, 'भजा,'
म्हणे 'मातें' त्यांतें. तिस म्हणति ते भानुनिभ 'जा.' ॥ ३७
'या आर्यांच्या पदाचा, सुदति! सतत मी दास; तूं काय दासी
होसी? मत्स्वामिनी हो. सुमुखि! भज तया मानदा कायदासी.' ।
ऐसें जें उर्मिळे! त्वत्प्रियतम वदला, ये पुन्हा तन्मना तें.
लावूं पाहे प्रभूसीं, समुचित नसतां सद्यशा जन्मनातें. ॥ ३८
प्रभूंसि कळली खरप्रकृति, रम्यकोषा सुरी,
तसी वरि बरी, जसी रुचिरमूर्ति योषा सुरी, ।
गमे मजहि; धी गुणीं जरिहि रंगली, लाज न
त्यजी; सुकुलज स्वयें नुघडि अंगलीला जन. ॥ ३९
प्रभूंतें म्हणे, 'हें पहा आंग. लीलावती मी वरावें मला चांगलीला.' ।
स्तवी, दाखवी ती सये! आस्य, काय, स्वयें; तें पहातां नये हास्य काय? ॥ ४०
कृत्यासी क्रुद्धा, ती माझ्या मंदेंहि, केलि गे! हास्यें; ।
प्रभु देखतांहि धांवे मज खाया, भीतिकेलिगेहास्यें. ॥ ४१
भ्याल्यें मी; स्वामीनीं 'हूं' म्हणतां क्रोधमद तिचा मथिला. ।
लक्ष्मणभावोजीनीं केला जो दंड तो तुम्हां कथिला. ॥ ४२
कथूं दुर्दशा ती तिची काय गे! 'हा!' वदे स्वापराधें, कुधी जाय गेहा. ।
खरा बंधुला अन्यथा, आरडोनी, स्वयें ताप सांगे, करी 'आ' रडोनी. ॥ ४३
जनस्थानवासी खर क्रूरकर्मा न पाहे नया, जो विचारी न शर्मा. ।
स्वसैन्यासि आज्ञा कुधी दे वधाया, प्रभू सिद्ध झाले यशें देव धाया. ॥ ४४
प्रेमें लक्ष्मणजींसि सांगति रणारंभींच मद्रक्षण
स्वामी; लाविति न, द्विषद्बळवधें व्हायासि भद्र, क्षण. ।

---

१. रममाण झाली. २. शिखरिणीवृत्त. ३. गुण, रूप यांहींकरून उत्कर्ष पावणारी. ४. स्रग्धरावृत्त. ५. शरीर देणाऱ्यास. ६. पृथ्वीवृत्त. ७. सुंदर म्यान जीला असी. ८. देवांगना. ९. भुजंगप्रयातवृत्त. १०. मुख. ११. प्रश्नार्थक अव्यय. १२. गीतिवृत्त. १३. भीति+केलि+गेह+आस्य=भयाच्या क्रीडेचें घर अशा मुखें. १४. भुजंगप्रयातवृत्त. १५. हाय. १६. शार्दूलविक्रीडितवृत्त.

हे तार्क्ष्य[1] प्रभु, ते चतुर्दशसहस्र क्रव्यभोक्ते[2] अही;
बाई! देखिलि दूरुनीहि, रुधिरें घाली निवाली, मही. ॥ ४५
मारूं[3] ये जो, स्वामिशरें तो खर मेला;
वाटे झाला दुष्टवधें तोखें[4] रमेला. ।
माता माझी बुद्धि तदा भावि दरीतें[5]
चिंती[6] दावी जें धृतलोभा[7] विदरी[8] तें. ॥ ४६
भावोजीनीं[9] खोटजातें नगीं रक्षुनि आणिलें; ।
स्वामीनीं दृष्टिपीयूषवृष्टिनें मज न्हाणिलें. ॥ ४७
स्वमुख[10], अवदसा, तसेंहि दावी, न धरुनि लाज कलागतीस लावी. ।
प्रकटुनि बळ, पुष्कराक्ष[11] साचें करिति भयें मुख शुष्क राक्षसाचें. ॥ ४८
मायासुवर्णमृग[12] राक्षस त्या खळानें,
जो धाडिला परम रम्य, विशृंखळानें[13], ।
तो वाटला निरखितां, मजला धरावा,
न्यावा पुरा, स्वजन सर्व सुखी करावा. ॥ ४९
'घ्यों'[14] म्हणें 'सुरुचिरा हरिणा' मी, बाइ! दृष्टि न दिली परिणामीं. ।
सोडिली निपट भीड, सतीहो! आग्रहें तिपट मी डसती हो. ॥ ५०
देऊनि चाप भाते, वदल्यें, 'लांबेल मृग, धरा, जाच; ।
टेवुनि लक्ष्मणजीतें, गेले. स्त्रीचा नव्हे बरा जांच[15] ॥ ५१
पळे[16] मृग कळे छळ, प्रभु तया शरें ताडिती,
हरूनि असु, काननीं, अरिस बाइ हो! पाडिती. ।
तशांत खळ हाक दे प्रभुवरस्वरासारखी;
खरेंचि म्हणती श्रुती[17], मन हि जें बरें पारखी. ॥ ५२
'हा सीते! हा लक्ष्मणा!' या परीची, दीना वाणी ऐकिली म्यां अरीची. ।
बाई हो! ती मद्विचारासि मोडी, धैर्या सोडी, शोक चित्तांत जोडी. ॥ ५३

---

१. गरुड. २. हिरवें मांस खाणारे राक्षस. ३. मत्तमयूरछंद. ४. संतोष. ५. गुहेतें. ६. 'चिंता' असाही पाठ आहे. ७. धरिला लोभ जीणें असी. ८. विरूपस्त्री. ९. अनुष्टुप्छंद. १०. पुष्पिताग्राछंद. ११. कमलाक्ष, राम. १२. वसंततिलकावृत्त. १३. उन्मत्तानें, आडकाठी ज्याला नाहीं अशानें. १४. स्वागताछंद. १५. गांजणूक. १६. पृथ्वीछंद. १७. कान.

वदल्यें मी, 'लक्ष्मणजि! स्वाम्यसुसंरक्षणार्थ[1] धांवा हो ! ।
धांवा हो ! विपदोघीं[2] म्हणतां सर्वस्व भव्य[3] कां वाहो ?' ॥ ५४
तों भावोजी वदले, 'आर्ये ! हें स्पष्ट राक्षसच्छद्म. ।
पद्मच्छदाक्ष[4] आहे विजयश्रीनित्यकेलिचें सद्म.' ॥ ५५
गमलें लक्ष्मणजींचें वच कटु मधुरहि, असत्य सत्यहि तें. ।
त्यांतें वदल्यें वचनें हृदय विदारावयासि अत्यहितें[5]. ॥ ५६
ताप ते ऐकतां आर्तें हा केला कां न रक्षण ? ।
करितां टाळिता साधु हा केला कां नर क्षण ? ॥ ५७
वर्ततो मदभिलाष मनांत, तूं तरीच सिरलास वनांत, ।
जींत उग्रतरता[6] असिवाणी[7], मन्मुखांतुनि निघे असि वाणी. ॥ ५८
क्रोधें केलें छिन्न प्रेम, हृदय दुष्टवाक्शरें भिन्न. ।
त्रासें झाले खिन्नस्वांत[8] महासाधु कंपित स्विन्न[9]. ॥ ५९
नमुनि मला साश्रु निघुनि, धरुनि विकळमानस त्वरा गेले. ।
मजवरि न, नियंतिवरि[10], हे कवि शिखरिसमानसत्व[11] रागेले. ॥ ६०
भ्रमल्यें भाविबळें मीं, बाई ! कोणासही न गांजावें. ।
साधुपुरुषच्छळें तों, स्थैर्यें[12] सोडुनि मही नगां जावें. ॥ ६१
गेले लक्ष्मणजी त्यजूनि उटजा जों, तोंचि ओकां[13] यती[14]
तैसा ये दशकंठ, दाखवि तनू जी उग्र तो, काय ती ।
सांगावी; भयदा तरी न वदल्यें, पावोनि मी कांप, 'हा !';
मंदावो[15], परि तेज सोडिल निज, ज्वाला, हिमीं कां? पहा. ॥ ६२
म्यां वदोनि शर्महेतु, धर्ममार्ग, दापिला;
स्थापितां निजीं रथीं बळें. कुबुद्धि शापिला. ।
ने नभःपथें मला; प्रभूंसि हाक मारिली;
दूर शूर ते; तिहीं भयांत हे न तारिली. ॥ ६३
ऐकोनियां सुनेची हाक, द्रवले जटायुमामाजी. ।
धांवुनि येतां, न म्हणे जिव्हा, सोडूनि भीति, 'हा !' माजी[16]. ॥ ६४

---

१. स्वामि+असु+संरक्षण+अर्थ=पति जो राम त्याच्या प्राणरक्षणार्थ. २. विपत्+ओघ=विपत्तीच्या प्रवाहीं. ३. कल्याण. ४. कमलपत्राक्ष, राम. ५. अति+अहितें=अतिदुष्टें असीं (वचनें). ६. अतिउग्रत्व. ७. तलवारीसारिखी. ८. खिन्नमन. ९. घर्मयुक्त. १०. दैतावर. ११. पर्वताप्रमाणें अचल आहे धैर्य ज्याचें. १२. मूर्तिमंत शांततेनेंही. १३. गृहा. १४. संन्याशी. १५. मंद होऊ. १६. माझी जिव्हा—असा संबंध.

त्यांच्या षष्टिसहस्रवत्सर वया, नाहीं तरी भागले;
युद्धीं [1]दिग्वदना करूनि विरथ, क्रोधें वधूं लागले. ।
मामाजी मज सोडवूनि विजयी झाले, खळें ताडिले,
खड्गें पक्ष, मदश्रुबिंदुसह ते, क्षोणीतळीं, पाडिले. ॥ ६५
अधर्में असा हा करी घात मोठा; मला जाय घेऊनि अत्यंत खोटा. ।
नग [2]स्वोत्तरीयांत बांधूनि शोधा, कपींमाजि म्यां सोडिलें आत्मबोधा. ॥ ६६
लंघुनि बहुनगगहनें, जलनिधि, सोडूनि मरणशंकेला; ।
लंकेला खळ गेला, वेगें घेउनि मला विपंकेला. ॥ ६७
ताप दे बहु निशाचर मेला, जेंवि अद्भुत पिशाच रमेला. ।
राक्षसी करिति रक्षण दासी होय ती स्थिति चिर [3]क्षणदासी. ॥ ६८
स्वामीचा मज न कळे, माझा स्वामीसही, समाचार. ।
सोसित होत्यें सर्व्वें, अहितांचे मी, महीसमा, [4]चार. ॥ ६९
सुज्ञाना सरमा बिभीषणवधू विद्याचि माना; [5]कला
तत्कन्या [6]त्रिजटाहि, रंजवि, जसी गानाभिधाना कळा. ।
चिंतीं लक्ष्मणजीसमेत सतत स्वामींस मी, चातकी,
जैसी [7]जीवनदासि; बाइ! तिळहीं तो न द्रवे पातकी. ॥ ७०
[8]मामाजींचे [9]शतमख सखे धाडिती अन्नपात्र;
स्वामीतें मी स्मरत कवळीं तत्प्रिया ग्रासमात्र, ।
. केलें देहावन मुनिसतीनिर्मितें [10]अंगरागें.
चिंती चित्त प्रभुजय सदा, शत्रुचा भंग रागें. ॥ ७१
चोरुनि [11]अमराखूंचा, नरभेकांचा, मला बळें अहि ने. ।
लंकेंत अशोकवनीं रोधी तों बहुत लोटले महिने. ॥ ७२
एकाकाळीं रात्रीं प्रार्थी तो, [12]परमदुर्मिळेस मज. ।
पतिभक्तिबळें नाहीं गडबडल्यें, सत्य ऊर्मिळे ! समज. ॥ ७३
प्रत्यक्ष दुर्जनाशीं बोलायाचा प्रसंग पडला गे ! ।
वत्से मांडवि बाई ! श्रुतकीर्ते! तें मनास जड लागे. ॥ ७४

---

१. रावण. २. स्व+उत्तरीय=आपल्या आंगवस्त्रांत. ३. रात्रीसी. ४. चेष्टा. ५. सरमेची कन्या. ६. लंकेंतील एक वृद्ध राक्षसी. अशोक वनांत सीतेवर पाहरा करण्याकरितां ठेविलेल्या राक्षसिणीवर ही मुख्य होती. ७. मेघाला. ८. मंदाक्रांतावृत्त. ९. इंद्र. १०. चंदनाच्या उटीनें. ११. अमररूपी उंदरांना व मनुष्यरूपी बेडकांना सर्पासारखा जो रावण. १२. प्राप्त होण्यास कठीण असीस.

काडी आड करूनि, चिंतुनि मुनिस्त्रीतारकें पांवलें[1].
तेजानें वदल्यें विशंक, समयीं जें सत्त्व तें पावलें. ।
कां श्रीमत्परदारसंग रुचला रे! वांच मूढा! सेंळी[2]
काम क्रोधहि, अन्य काय बुडवी देवां? चमू ढांसळी. ॥ ७५
बुडसि करुनियां महापराधा, नमुनि विभूसि, पहा महा[3] परा, धां[4]. ।
समजुनि बळ, कां असा? वधा न प्रभु चुकतील; नसें असावधान. ॥ ७६
भ्रमसि, खरविनाश आयकोनी, स्वयुवति बैसविणार काय कोनीं? ।
हठ, मद, करि घात थोर; टाकीं प्रभु रघुनायक, तूंहि चोरटा कीं. ॥ ७७
स्मरपुरहरचापभंग केला, सहज सहस्रभुजघ्नगर्व[5] गेला. ।
खर[6] खर[7] खरसा[8] पळांत मेला, तरिहि तव भ्रम कां तसाचि ठेला?' ॥ ७८
बोले तो, 'राक्षसी हो! हित कथुनि पहा; हे सुरामा, सखा[9], या
राया, मासद्वयेंही न करि तरि, इचें द्या सुरा मास खाया.' ।
गेला, मेला वदोनि श्रुतिकटु; मग त्या गांजिल्यें बायकानीं.
प्याले मत्कर्ण, घालूं गरळ तुमचिया, बाइ! तें काय कानीं? ॥ ७९
त्या कृत्याचि, तयांमध्यें त्रिजटा, बाइ हो! भली. ।
क्षोभली ती न, धात्रीसी लोभली, फार शोभली. ॥ ८०
[10]उंद्बधनें मराया, मग वेण्युद्ग्रथन[11] सुगुण हे उकली, ।
तों मारुति मुद्रा दे; मृतिची वेळा म्हणोनि ती चुकली. ॥ ८१
हा वातभू कुशळ वृत्त समग्र सांगे.
दे हर्ष, जेंवि जवळ स्वकुमार रांगे. ।
जे मन्मनोरथ महाधिगदार्त[12] पांगे
झाले, समर्थ अमृतें नुठतील कां गे!? ॥ ८२
मज चवथे भावोजी सुगळ[13] मिळाले वनीं, असें कळलें. ।
टळलें व्यसन, उजळलें यश, मद्धरणें[14]करूनि जें मळलें. ॥ ८३

---

१. अहिल्येचा उद्धार करणारीं पदें. २. छळी. ३ तेजा. ४. तृप्त व्हा. ५. सहस्रार्जुनाला मारणाऱ्या परशुरामाचा गर्व. ६. प्रखर, तीक्ष्ण. ७. राक्षसविशेष. ८. गर्दभसा. ९. या राया सखा न करि तरी–असा अन्वय. १०. गळफांसानें. ११. वेणी+उत्+ग्रथन=वेणी गुंफण्याविषयीं " जे चांगले असे. १२. महा+आधि+गद+आर्त=महत्‌व्याधिरूप रोगानें पीडित असे. १३. सुग्रीव. १४. मत्+हरण=माझ्या नेण्यानें.

मिळालीं, उत्साहें बहु कपिबळें ऋक्षकटकें;
कळे, वाटे, केली मजवरि दया विश्वघटकें. ।
खुणेला म्या चूडामणि निज दिला, 'जा न अटकें,'
म्हणे 'या.' हा भासे जनकचि, वदावें न लटकें. ॥ ८४
जोडी हात मला, निघे पवनभू, खोडी करी हा बळें.
मोडी वृक्ष सुरम्य जे उपवनीं, झोडी अरींचीं बळें[1]. ।
तोडी मस्तक लक्ष, राक्षस रणीं सोडी न एकासही.
थोडी यातुचमू[2] उरे बहु असृग्गोडी[3] सुखें घे मही. ॥ ८५
गाती प्रेमें देवता अक्षमेला[5], याच्या हस्तें जेधवां अक्ष[6] मेला. ।
ज्यातें वैरी पाठवी रक्षणांत स्वीया[7] देती पाठ वीर क्षणांत. ॥ ८६
धरूं दे मेघनादा[8]; हा व्याघ्र, तो शश. काय ती ।
लीला? शक्तहि पीडूं दे पुण्यार्थी मशका, यती. ॥ ८७
वदल्या रागें राक्षसी कपि नेतां बांधून, ।
आंबासा हिरवा बरा, खावा कां रांधून? ॥ ८८
पावे मारुति धर्मनीतिरहिता, पाहे असारा सभा.
मानी त्या[9] अतितुच्छ, सुच्छवि कपी, वाजी जसा रासभा. ।
वर्णी स्वामिभुजप्रताप, करुनि न्यायेंचि धिक्कार हा.
सांगे वाढलि कामवृत्ति, न म्हणे कीं सासु हिक्का[10] रहा. ॥ ८९
माराया कपिला दशास्य असितें घे, घोरकर्मा सये!
प्रार्थी साधु बिभीषण, 'क्षितिपते! हा दूत मारूं नये. ।
वैरी पेटवि पुच्छ, बाइ! सरमा सांगे, तदा अंजली
केला म्यां ज्वलनासि, कीं [11]महित जे तद्धी[12] स्तवीं रंजली. ॥ ९०
ज्या मत्ता राक्षसांच्या पटें[13] अतिकुतुकें होय हास्यां, सभा जी
[14]तीला, [15]त्यांच्या, तयांच्या मळमतिपतिच्या[16], त्यांहि, आस्यांस भाजी; ।
तेजें सर्वांसि घोळी; करि कनकपुरी हा कृती वत्स, होळी.
याच्या पुच्छा न पोळी दहन, खळ, सये! 'हाँ[17]!' म्हणे, हात चोळी. ॥ ९१

---

१. सैन्यें. २. राक्षससेना. ३. असृक्+गोडी=रक्ताची गोडी. ४. वैश्वदेवीछंद. ५. नसोसणेपणाला. ६. मंदोदरीपासून झालेला रावणपुत्र. यास अशोकवनांत मारुतीस धरण्याकरितां पाठविलें होतें, पण मारुतीनेंच त्याला मारिलें. ७. स्वकीया, आपली. ८. इंद्रजिताचें पहिलें नांव. ९. रावणा. १०. उचकी जी ती प्राणयुक्त रहा असें न म्हणे तर मारिले. ११. पूज्य. १२. त्यांची बुद्धि. १३. पात्र. १४. त्या सभेला. १५. राक्षसांच्या. १६. रावणाच्या. १७. हाय.

बिभीषणाच्या परि रक्षि गेहा, पुन्हां मला येउनि लक्षि गे! हा।
देवर्षि दे या बहु तोख गानें, वाटे न केला रंय[1] तो खगानें. ॥ ९२
सांगों काय, रयें दे जें सुख चित्तास वत्स, माज्या तें ?।
प्रभुतें मणिनें जैसें, बोधें देवर्षिसत्समाज्यातें[2] ॥ ९३
रक्षू मला, करुनियां अरिहानि रोपें[3],
स्वामीस सिद्ध, सखिहो ! करि हा निरोप.।
आले महाकपिचमूंसह सागरातें,
प्याया परासु, शिवसे सहसा गरातें[4]; ॥ ९४
धर्मन्यायमतें बिभीषण सभेमध्यें वदे साम, या
धिक्कारी खळ, भाग भेषज[5] गतायुष्का[6] नदे सामया[7].।
त्या लंका प्रभुनीं, पदाब्ज नमितां, वारूनि कंपा, दिली,
हे भारी, शरणागतीं द्रवुनियां, सत्कीर्ति संपादिली. ॥ ९५
भ्याला सागर, भेटला, नळकरें, जो सेतु केला, सये !
तो सांगे, शरण प्रभूंसि, कुमते ! जों तूं न मेलास, ये.।
गांवें शंभर लांब, रुंद दश, हा अत्यद्भुत क्षोभला;
क्षोणीबाहु[8] गमे, सुताहरपरव्यापादना, लोभला. ॥ ९६
मायानिर्मित चाप, मस्तक मला दिक्कंधरें दाविलें,
या माज्या नयनें, मनेंहि सहसा तें सत्यसें भाविलें.।
बाई! काय कथूं खळें हृदय हें शोकानळें ताविलें;
दुष्टें, एक मुहूर्त, अश्रु सहसा सोडावया, लाविलें. ॥ ९७
'हे माया,' हें कथि, करी सरमा परमादर.।
'आले स्वामी तुझे,' ऐसें कळवी, पळवी दरं[10]. ॥ ९८
सुगळ मथिति रावणा सुवेळावरुनि[11] उडोनि सये! तदा सुवेळा।
प्रभुवर वदले सख्या नयज्ञा, समुचित साहस होय या न यज्ञा. ॥ ९९
स्वामीनीं श्रितशर्मद धर्म, दया करुनि, सनय आठविला.।
या ताराबाईचा सुत अंगद पूत दूत पाठविला. ॥ १००

---

१. वेग. २. सभा. ३. बाण. ४. विषातें. ५. औषध. ६. आयुष्य ज्याचें सरलें अशा. ७. स+आमय=रोगयुक्ताला. ८. पृथ्वीचा हात. ९. ही उत्प्रेक्षा फारच गोड आहे. याच प्रसंगास अनुलक्षून दुसरे एके ठिकाणीं कवि म्हणतो—'सेतु न तो, यत्पतिनें स्वबुता नेली वृकें जशी एणी। त्या श्रीभूदेवीनें लंकेची ओढिली असे वेणी ॥'. १०. भय. ११. पर्वतविशेष, त्यावरून.

धर्मज्ञ नयज्ञ कुशळ, ऐसा लोकांत बोलका नाहीं. ।
परि त्या अरिनें याचा एकहि वरिला न बोल कानाहीं. ॥ १०१
वदला, 'घेउनि देवी, प्रभुच्या चरणासि, चाल, वंदाया.' ।
मंदा, याद जळधिसीं विटतां, वांचविल कोण धंदा या? ॥ १०२
कोपे दुष्ट, म्हणे, 'धराचि.' चवघे बाहुद्वया झोंबले.
तों हा अंगद वत्स जाय गगनीं क्रव्याद ते लोंबले. ।
वेगें जाउनि दूर, भव्य भुज या शूरस्तुतें झाडिले;
झाले पंक, धरातळीं, सकळही तत्काळ जे पाडिले. ॥ १०३
बाइ हो! करुनि तें पुर रुद्ध, क्रुद्ध वीर करिती बहु युद्ध; ।
वाहती जरिहि शोणितपूर, क्रूर 'हाय!' न म्हणे रणशूर. ॥ १०४
ज्या, वृत्रारिचमूसमूह समरीं दे पाठ, वीरा, वण
स्वांगीं जो, पविचे, [2]प्रहस्त मिरवी, त्या पाठवी रावण; ।
सेनानी [3]प्रथमाहवींच खपला, घेऊनि सैन्यास, हा.
बोले, पावुनि भंग, हीन कटका देऊनि दैन्या, सहा.' ॥ १०५
त्याचा दारुण इंद्रजित् सुत सये! युद्धांत मायाबळें
[4]कीशांचीं अति शोक पावुनि, पळें, सारीं शमाया, [5]बळें, ।
विस्तारूनि भुजंगपाश समरीं, स्वामीस बांधी, सये!
स्वोत्कर्षें मग उद्धतत्व अरिच्या, तेव्हां, न कां, धीस ये? ॥ १०६
केलें लक्ष्मणजीहि बद्ध अहिनीं, मर्मस्थळीं चाविले.
दोघांनींहि सुनेत्रपद्म मुलिहो! मूर्छाभरें लाविले. ।
दासींनीं मज पुष्पकीं बसवुनी, त्रासावया दाविले;
शोकें मी रडल्यें बहु, [6]व्यसुचि [7]मत्स्वांतें सये! [8]भाविले. ॥ १०७
सत्संगतिसी त्रिजटा नाशी, बोधेंकरूनि, मन्मोहा. ।
वदलि, 'महाभागे! या मायेनें त्वन्मुखीं न जन्मो 'हा!' ॥ १०८
मातें घेऊनि गेल्या फिरुनि उपवनीं राक्षसी; [9]नागपाशा
संपूर्णा यत्प्रसादेंकरुनि, परिहरी [10]तत्सखा [11]नागपाशा. ।

---

१. जलचरविशेष. २. रावणाचा मामा व त्याच्या तृतीयांश सैन्याचा अधिपति. ३. प्रथम आहवींच (प्रथम युद्धींच). ४. सोस. ५. वानरसैन्यें. ६. राम आणि लक्ष्मण हे गतप्राण झाले असें. ७. मत्+स्वांत=माझ्या मनांत. ८. मानिले. ९. नाग+प+आशा=गजेंद्राची इच्छा. १०. त्या विष्णूचा सखा, गरुड. ११. वर १०६ गीतीमध्यें सांगितलेला 'भुजंगपाश.'

दोघांचे देह केले, स्वकर फिरवुनि, स्वस्थ, तत्काळ जाला[1]
सर्वां साधूंसि मोटा मह; दशमुख जो, ताप तत्काळ[2] जाला. ॥ १०९

तेव्हां[3] तो कुंभकर्णा उठवि अहित, कीं यत्न कांहीं न चाले,
मत्स्वामी सानुजन्मे[4], कटकसह पुन्हां, संगरा सिद्ध झाले. ।
भ्याले, उग्रा पहातां, कपि सकळ सये! काळसा वाटला गे!
प्राणत्राणा धरावी, त्यजुनि रण, तयां सेतुची वाट लागे[5]. ॥ ११०

कळेच्या[6] तातानें निपुण कथिलें हें बुजवणें;
फिरावें त्यांहीं ज्यां स्वजनु[7] पतिकार्यें[8] उजवणें[9]; ।
धरी[10] सुग्रीवातें, पळवुनि भयें सर्व, परते;
सये बाई! तेव्हां सकळ धरिती गर्व पर ते. ॥ १११

मूर्छा जातां, हरिती तन्नासाश्रुति[11] सुकंठभावोजी. ।
ती यांसहि दे समयीं प्रेमें श्रीनरहरींस भा वो[12] जी. ॥ ११२

खिजोनि परते अरी गिळि न चाविताही हरी[13].
कितेक पळती परी, वरुनि कर्णनासादरी. ।
अनर्थ बहु तो करी, नळवनांत जैसा करी[14].
गति प्रभु, बरोबरी करि तयासि, दे ती बरी. ॥ ११३

तच्छिर, बाहु, चरण, हे कटकांचे स्पष्ट काळसे तुकडे. ।
मृतघटकर्णोपद्रुत पळती कपियूथपाळ सेतुकडे. ॥ ११४

अर्यनिष्ट[15] कळवी सरमा जें, होय तापहर तें सर माजें[16] ।
तो[17] वदे, विकळमानस, 'हाय!' ध्वंसतां असुसमान सहाय. ॥ ११५

[18] इंद्रजित् पुत्र तद्बुद्धि भेदी, 'रहा स्वस्थ, ऐसें वदे मूढ दे धीर हा. ।
श्मश्रु हातें पिळी, वीर सारे खिळी, मोह सेना गिळी; खंडि खड्गा[19] विळी. ॥ ११६

स्वामी, लक्ष्मणजी, सुकंठ अवघे शस्त्रव्रजें ताडिले,
शल्यार्त, क्षणदाचरेश्वरसुतें[20] निःप्राणसे, पाडिले. ।

१. झाला. २. 'झाला' अध्याहृत. ३. तो शत्रु म्हणजे रावण. ४. बंधूसहित असे. ५. वाट धरावी लागे. ६. कळा=बिभीषणाची ज्येष्ठ कन्या. ७. आपलें जन्म. ८. धन्याच्या कार्यानें. ९. सार्थक्य करावयाचें आहे. १०. कुंभकर्ण धरी. ११. त्याचें नाक आणि कान. १२. कोणी हाक मारिली असतां जें प्रतिवचन ती. १३. वानर. १४. हत्ती. १५. अरि+अनिष्ट=शत्रूनें केलेलें अप्रिय. १६. माझें. १७. रावण. १८. स्रग्विणी छंद. १९. इळी, भांजी चिरण्याचें शस्त्र. २०. क्षणदा=रात्र; इंद्रजितानें.

होता सावध वत्स मारुति, सुधी, कीं हा कैलातात; मी
सांगों नेमकसें, धरूनि फिरले हस्तीं अलाता तमीं. ॥ ११७
मामाजींसम वृद्ध मान्य सकळां ऋक्षेंद्र, हे ओषधी
आणाया पवनात्मजासि कथिती, पावावया, तोष धी; ।
कैलासाजवळील शृंग गिरिचें, वत्सें पळें आणिलें,
केलें सर्व विशल्य निर्व्रण बळ, प्रेमाश्रुनीं न्हाणिलें. ॥ ११८
प्रेमार्द्रा मांडवी तों वदलि, 'सकटकां नायकां जीवदाना
दे हा. सत्कीर्ति याची अमृत; अमृत त्या काय कांजी वदाना? ।
'साचें सौभाग्य रक्षी पवनसुत', असें बोलिली ऊर्मिळा; तें,
बोले अन्याहि, 'हा, हो सुसदभिमत, जें पात्र त्या दुर्मिळातें'. ॥ ११९
म्हणे जनकजा, 'प्रभु स्वकटकासि आज्ञापिती;
सुधा तृषित तेंवि, ती सकळ वीर आज्ञा पिती. ।
प्रतापदहनीं महें, करिति वैरिहोमा, रणीं.
निज क्षत न पाहती सुभट, बाइ हो! मारणीं. ॥ १२०
असंख्य युद्धीं जरि लोळवीले, स्वर्गासि बाई! बहु बोळवीले. ।
मायाबळें दाखवि मत्त, मातें, मारूनि मोही प्रभुसत्तमातें. ॥ १२१
जो अरि लक्ष्मणजींनीं साधुबिभीषणमतें रणीं वधिला; ।
सखि! काढिला शरकरें, हेरिच्या कांटाचि काळजामधिला. ॥ १२२
बसता अग्निभवरथीं, होता अरि अमरकाय; होमरता ।
विघ्न न करिते जरि, तरि करितां चिर समर; काय हो! मरता? ॥ १२३
वैरश्रीमत्त, न म्हणे जो सामा, अनघा, 'बरें'।
त्या पाप्याचें, पुत्रशोकें जाहलें, मन घाबरें. ॥ १२४
भावी न स्वकुमतितें, मातेंचि, अनर्थमूळ, तो पापी, ।
ये, खड्गासि म्हणाया मत्कंठरुधिर, धरूनि कोपा, पी. ॥ १२५
हो म्हणे अघ असा वध मातें त्या कुबुद्धिस असा वध मातें ।
प्राप्त होय, परि मज्जनकाचें पुण्य, बोलति न, सज्जन, काचें. ॥ १२६
स्वर्गासि ज्याहीं नत पाठवीले, ते म्यां मनांत प्रभु आठवीले. ।
वारी अरातीस, सुपार्श्वनामा त्याचा प्रधानोत्तम शुद्धधामा. ॥ १२७

---

१. बिभीषण. २. कोलिताला. ३. श्रुतकीर्ति. ४. वानरांच्या. ५. वर आणि श्री यांहीं मत्त. ६. मजप्रतीच. ७. मला. ८. इंद्रवज्रा. ९. शत्रूला, रावणाला.

पाठवी मग तो शताधिक कोटि सैन्य, वदे, 'वधा
मर्त्य वानर, खाचि, तेहि कुधी उरोत न देव धा.' ।
त्या बळा बुडवी [2]प्रभूत्तमबाणवार, समुद्रसा
होय, [3]तत्क्षतजें भिजोनि निवोनि फार [4]समुद्रसा. ॥ १२८
प्रभूंनीं रणीं दाविलें रुद्रसत्व, स्ववीरारसातें दिलें [5]उद्रसत्व. ।
पुरीं न स्त्रियांचा महा '[6]हाय!' माये नवा [7]घस्र, धाया, [8]महा हा यमा ये.॥ १२९
मारावे अरि सर्व आपण रणीं, किंवा मरावें, असा
चित्तामाजि करूनि निश्चय, निघे तो दुष्ट, कांपे रसा. ।
क्रुद्ध व्याघ्रचि रावण क्षण रणीं, कीशौघ भासे ससा;
पाडी लक्ष्मणजींस शक्ति अरिची, जी स्पष्ट काळस्वसा. ॥ १३०
भंगूनि शत्रुतें, स्वामी शक्ति काढुनि, मोडिती. ।
वदोनि, बंधुशोकें 'हा!' दीर्घ उच्छ्वास सोडिती. ॥ १३१
हा साधु वत्स आणी, औषधिशृंगासमेत पुनरपि त्या. ।
निववी स्वयशें, प्रभुसह सज्जननिकरासि, जेंवि सुनर पित्या. ॥ १३२
युद्धीं भूमिवरि प्रभूंसि, सुरथीं दिक्कंधरा पाहिलें;
शक्राच्या, सखिहो! न तें अनुचित, स्वांतें, तदा साहिलें; ।
प्रेमें मातलिनें शतक्रतुरथीं, प्रार्थूनियां, [9]वाहिलें
तेव्हां राक्षससैन्यरक्त विपुल क्षोणीतळीं वाहिलें. ॥ १३३
होय द्वैरथयुद्ध रावणशर स्वामींसही लागले.
स्वामीचे शर दिङ्मुखासहि, न हे दोघे सये! भागले; ।
सप्ताहर्निश निर्निमेष अतुळीं त्या [10]अध्वरीं जागले,
तेव्हां वात न, बाणरुद्धगगनीं, सूर्यांशुही, वागले. ॥ १३४
खंडिलीं शत शिरें; पर तो न प्रेत होय; उठलीं परतोन; ।
म्लानि लेशहि शिवे नच काया लाविनाच हृदया वचकाया. ॥ १३५
कुंभजमामाजींनीं केला मंत्रोपदेश समरांत. ।
उर भेदुनि, अरि वधितां, 'जय! जय!' हा शब्द होय अमरांत. ॥ १३६

---

१. विबुधप्रियावृत्त. २. रामचंद्राचा बाणसमुदाय. ३. तत्+क्षतज=त्या सैन्याच्या रक्तें. ४. समुत्+रसा=आनंदयुक्त पृथ्वी. ५. उत्+रसत्व=उत्कृष्टरसपणा. ६. शोक. ७. दिवस अथवा यमपिता सूर्य. ८. उत्सवा. ९. चढविलें. १०. युद्धरूपी यज्ञांत.

झाली प्रभूत्तमशिरीं वरपुष्पवृष्टि;
सर्वाघनाद भरि तत्क्षण सर्व सृष्टि. ।
देवांगना करिति हर्षितबुद्धि नृत्यें,
गंधर्व गाति मधुरस्वर पुण्यकृत्यें. ॥ १३७
देव मुनि स्तविती; पवमान सुमंद सुगंध सुशीतळ वाहे;
प्रेरुनि साधु बिभीषण शत्रुहि उद्धरिला; पुर शोक न राहे. ।
त्या दशकंठपदीं सरमापति बैसवितां, कपि वर्णिति या हे,
बाइ! दया इतरत्र दिसे; प्रभुहृत्कमळीं परि संतत आहे. ॥ १३८
स्वामींनीं पाठविला मारुति, मच्चित्ततापं पळवाया, ।
कळवाया प्रिय, बाई! कीं करि देहा वियोग पळवा[1] या. ॥ १३९
प्राशुनि विभुविजयकथा, ज्या सन्नलिनीस सेविती सदली, ।
'पदलीना या बा! तुज योग्य नसे देयें,[2] हे[3] असें वदली. ॥ १४०
प्रार्थी मारुति, गांजिलें तुज जिहीं, त्या या महापापिणी
दासी दुर्मति राक्षसी, वधिन मी, पक्षींद्रसा सापिणी.' ।
'मेला योजक; अस्वतंत्र जन हा; बापा! न दीनावरी
क्षोभावें', वदल्यें 'असें अघ करीं; आपा नदी नावरी. ॥ १४१
हें ऐकुनि मज, बाई! सुविचक्षण आंजनेय कर[4] जोडी. ।
बोले जेंवि स्वामी पुण्ययशाची, अशीच कर, जोडी. ॥ १४२
निरोप म्यां पाठविला, 'दावा चरणसारसें. ।
वियोगतापें गमलें मना मरण सारसें. ॥ १४३
आज्ञा होय, बिभीषण आले, घेऊनि नव्यशिबिकेला. ।
नेउनि दाखविले ते[5], यत्स्मरणें प्राप्तभव्य[6] शिबि केला. ॥ १४४
तों स्वामी वदले हरी सुरुचिरा[7] कारागुणें[8] या तुतें
तद्गेहीं वसलीस तूं चिर, न दुःशीलें उणें यातु तें. ।
केला तद्वध, कीर्तिशुद्धिकरितां, वंशप्रभावा, रण;
त्वत्स्वीकार करील पूर्वजयशश्चंद्रप्रभावारण. ॥ १४५
स्वामी सर्वज्ञचि, परि जपती निंदकयशा विटाळाया. ।
म्यां दिव्य म्हणुनि केलें, प्राकृत जनसें यशा पिटाळाया. ॥ १४६

१. कांकीं, या देहाला बियोग हा पळवा (वाळविलेली पालेभाजी) करी; देहाला अति शुष्क करी. २. तुला द्यायाला योग्य देणगीच नाहीं. ३. मी सीता. ४. हात. ५. स्वामी रामचंद्र. ६. ऐश्वर्य. ७. अतिसुंदरा. ८. बंदिशाळा.

दहनीं मुहूर्त होती, हे स्पष्ट गमे ऱ्हदींच तनु गांगीं, ।
प्रभुनामें न मदंगीं साधूंच्या जेंवि ताप अनुगांगीं[1]. ॥
होत्यें मी अग्निकुंडीं, प्रमुदितहृदया, जेंवि पाटीरपंकीं[2].
स्वामीच्या, मूर्तिधारी दहन मज सये! स्थापिता होय, अंकीं; ।
राहे नाथप्रसादें असुख न, निधिनें जेंवि रंकत्व रंकीं.
तेव्हां माझ्या, नमावे महभर सखि हो! मानसीं, त्यक्तशंकीं. ॥
तों मामाजी विमानीं बसुनि तरणिसे शक्रसे पातले, खं[3]
व्यापूनि स्वप्रकाशें; स्तविति बहु तयां जोडिती हात लेख[4]. ।
त्यांहीं स्वाराज्य[5], आम्हां निपट गमविलें[6], वंदितां पाय, सानें.
कीं द्यावें प्राशितां जें सुख अमृतरसें, काय तें पायसानें? ॥
संसारीं असतात साधु, कुळज, स्नेहाढ्य, कैं[7] सासरे;
मामाजी परि एक, यांसह दुजा साम्यास कैसा सरे? ।
पोटासीं धरिलें सये! मज शिरीं हुंगोनियां दाटले,
प्रेमें तातचि वाटले, नयनिंचे नाहीं झरे आटले. ॥
अस्मददर्शनशोकें[9], तृणसें सर्वस्व जीवित त्यजुनी, ।
स्वर्गीहि खिन्न होते; प्रीति नव्हे सन्मनांत सत्य जुनी. ॥
मातें ते वदले, 'तुवां उपवनें, तैसींच वत्से! वनें
केलीं; जें पतिभक्तिसद्व्रत, सती सर्वस्व, तत्सेवनें ।
भर्ता तारुनि संकटीं कविसभा श्रीसंपदे वारिला.
विश्वोपद्रव जाहला तव तपें या कंप देवारिला. ॥
त्वां सूर्यवंश सुयशें सति! धन्य केला;
वैदेह धन्य, तुज पावुनि कन्यकेला; ।
प्रेमें असा मज दिला बहु मान, लज्जा
सांगे मदीय नयनांसि पदींच मज्जा[10]. ॥
स्वामीनीं, 'कैकेयीसासूबाईवरि प्रसाद करा,' ।
मामाजीपासुनि वर वरिला, गमला तयासि फार बरा. ॥
दशमुखवधप्रसन्नें शक्रें वर मागवूनि बहु हर्षें ।
रणमृत ऋक्ष, कपि, यथापूर्व सकल उठविले अमृतवर्षें. ॥

---

१. अनुग+अंग=सेवकाच्या आंगीं. २. चंदनाच्या चिखलीं. ३. आकाश. ४. देव. ५. इंद्राचें राज्य. ६. वाटेसें केलें. ७. लहान. ८. कैं. ९. अस्मत्+अदर्शन+शोक=आमच्या दृष्टीस न पडल्यामुळें जो शोक त्याणें. १०. मज्जन करा.

प्रार्थी साधु बिभीषण स्तवुनि, कीं 'लंकेंत या, चाकरा
 द्या हें, पूजुनि ध्या, मनोरथ विभो! हा पूर्ण याचा करा.' ।
मत्स्वामी वदले, 'नकोचि भरतावांचूनि; माजाचि तो,
 जो सत्कार कपींस; तच्छ्रम मला आप्तोत्तमा जाचितो. ॥ १५६
टळतां अवधि ज्वलनीं न चुकेलचि तो स्वकाय होमाया. ।
नश्वरवपुची, अवितथसंधा[1] सुज्ञास, काय हो! माया? ॥ १५७
पुर दूर, मार्ग दुर्गम, अवधि दिवस एक राहिला आहे. ।
साहे भरत न संधा लंघन चिंता सुदुस्तरा बाहे.' ॥ १५८
 बिभीषण म्हणे, 'प्रभो! प्रणत कार्य जें साधितें,
 प्रसन्न तुमचें असो हृदय, बा! नसो साधि तें. ।
 पहा भरत पुष्पकीं बसुनि; सत्व रक्षाल न
 स्वे[2] कां नतविपत्तिचें करुनि सत्वर क्षालन?' ॥ १५९
 पूजी बिभीषण न हें सुगळा ससेना
 ज्ञाल्यास, इष्ट यश वित्त असें असेना. ।
 स्वामीस बद्धकर पुष्पक हें बसाया,
 त्या कीशपाहि म्हणति प्रभु हे, 'बसा, या.' ॥ १६०
 विमानीं बैसले स्वामी, मज सादर बाहिलें. ।
 वाहिलें बाइ! अंकीं; हें प्रेम कोठें न पाहिलें. ॥ १६१
 रणक्ष्मा[3] दावूनि, प्रभु मज कथा आयकविती.
 तसी अन्य ज्ञाते, कथितिल, मुखें काय कवि, ती? ।
 सुमार्गे या पावे, हृदयहर हासे तुज पती.
 भवीं जैसे साधु त्रिपुरहर हा सेतु जपती. ॥ १६२
कांहीं स्वामी, कांहीं लक्ष्मणजी, सांगती कथा; सारा ।
साराया, क्षिप्र पथ, स्वामींचा विरहतापही सारा[4]. ॥ १६३
मत्स्वामीचा, माझा, अभिलाष जसा, तसी विमानगती, ।
नग, तीर्थाश्रम, गहनें, जगती, दावी; रुचे न का मग ती? ॥ १६४
सुग्रीवराजधानी किष्किंधा, ती स्वयेंचि जाणविली. ।
म्यां स्वामीतें प्रार्थुनि, ताराबाई क्षणांत आणविली. ॥ १६५

---

१. सत्य प्रतिज्ञा ज्याची त्या. २. स्वसत्व. ३. युद्धभूमि. ४. सगळा.

वर्षाकाळीं यांसि झाला जो भूभृत्[1] साधु आसरा. ।
सासरा न कसा केला ? तवशा जेंवि आ सरा. ॥ १६६

पंपाख्या सरसी[2], स्वयें मग मला मत्स्वामिनीं दाविली;
माझी दे स्मृति यांत ती प्रियसखी मद्बुद्धिनें भाविली. ।
जी शिष्या शबरी मतंगमुनिची, तीची कथा लाविली;
तीतें म्यां म्हणतां सुधा, स्वरसना हे बाइ हो! चाविली. ॥ १६७

गोदावरी नदी जी, जें तत्तट, होय माय माहेर. ।
यत्पवन म्हणे जीवा, 'पद नियमा[3] हो यमा[4],' यमा[5] हेर. ॥ १६८

अश्रु तिघांसहि आले, मामंजींच्या[6] विलोकितांचि वटा; ।
शुचि गुणमय तद्भव परभव यां अंतर, जसें पटा चिंवटा[7]. ॥ १६९

घटजादि सत्तपोनिधि विधिसम समयज्ञ यज्ञपर महित. ।
परम हित तदाश्रमपद शत दावित येति नाथ मजसहित. ॥ १७०

अत्र्याश्रमपद, बाई! सत्यपदाहुनि उणें नसे तिळ तें. ।
म्यां ओळखिलें, नमिलें, ज्यांत बहु शिव प्रवेशतां मिळतें. ॥ १७१

वदल्यें, 'सति अनुसूये! लाजेल तुझ्या सुधा सदाशीतें[8]; ।
बहु निववविलें तव यशें, सर्वा विबुधा बुधा, सदा शीतें; ॥ १७२

जो यशोधवळ, मान्य नंदिला, चित्रकूट नग, तोहि वंदिला. ।
तीर्थराज हृदयांत राहिला श्रीप्रयाग बहु भव्य पाहिला. ॥ १७३

देखिली सूर्यकन्या; कां यमुना नेमुना[9] मग ? ।
गंगा नेती पदा, पानें, जिष्णुच्या विष्णुच्या जग. ॥ १७४

ताराया जग, जे प्रयाग दुसरे मूर्त स्वयें राहिले,
पुण्याचे निधि, तीर्थतीर्थचि, भरद्वाजर्षिनें पाहिले, ।
आम्हीं मस्तक तत्पदांवरि महाभाग्यें सये! वाहिले,
ज्यांच्या दुःसह कष्ट दारुण तसे आशीर्बळें साहिले. ॥ १७५

यत्पदाब्ज विजया नवसावें, तत्प्रियास्तव कसें न वसावें ? ।
अर्पिलें अभय जें भरता तें नाथ देति दुसरें भरतातें. ॥ १७६

गुह[10], पण भरताचा मानसीं आठवीला.;
त्वरित पवनपुत्र स्वामिनीं पाठवीला. ।

---

१. राजा, सुग्रीव. २. सरोवर. ३. व्रताला, इंद्रियनिग्रहाला. ४. शरीरमात्रेंकरून साध्य व नित्य जें कर्म त्याला. ५. यमधर्माला. ६. जटायूच्या. ७. सुताच्या गुंडाळ्यास. ८. सत्+आशि= उत्तम आशीर्वादातें. ९. नमस्कारूना. १०. शृंगवेरपुरीचा किराताधिपति; दशरथाचा परममित्र.

पळहि न निजले, त्या सांगतां सत्समाजा,
म्हणति, 'दिसति केव्हां दृष्टिला, वत्स, माझ्या ?' ॥ १७७
[1]तीर्थ, क्षेत्र, तपोवनें, मुनिजन प्रेमार्द्रधी पाहुनी,
स्वामी या विषया पुरा विसरते, पुण्याश्रमीं राहुनी; ।
स्वप्नीं न त्यजिते विरक्ति; असती चित्तें सखी हो ढिले,
आले, गाय तसेचि, वत्सभरतस्नेहेंचि हे ओढिले. ॥ १७८
भक्तप्रेमवश प्रभु, प्रिय नसे याला दुजें ? काय ती
जातीनें शबरी, बरी गति जिला, भव्या दिली आयती. ।
बाई हो! गुह हा सखा भरतसा जो गृध्र तो तातसा
या न प्राप्त असे दयाळु नसतां सत्कार होता तसा. ॥ १७९
[2]त्रैलोक्यहृदयकंटक दशमुख त्याच्या समूळ [3]उद्धरणें ।
मुलि हो! प्रसन्न झाले मामाजी अत्युदार शुद्धरणें. ॥ १८०
[4]बोलिले, 'रघुपते! वर माग', ब्राह्मणेंद्र गमले [5]परमाग. ।
मागती वर [6]फळर्द्धि असा हे, कीं 'श्रितार्ति तिळमात्र न साहे'. ॥ १८१
वाटले मुदितधी कपि नाकीं, काम हा वरद ते न [7]पिनाकी. ।
देतिल द्रवुनि कां न निरोप म्लान हें रत काननिं रोप. ॥ १८२
[8]अभीष्ट बहुतें दिलें फळ गुहा तदा नवसल्या [9]महाचळगुहा ।
सये! प्रभुसखे खरे भरतसे परत्र न [10]मुंदश्रुचे भर तसे. ॥ १८३
[11]मागें शत्रुघ्न आले कवि भरत महाभाग मेघांसमोर,
प्रेमें जें प्रेक्षिति क्षुद्विकळ कवळिती हा गमे घांस मोर; ।
श्रीकंठीं बाष्प दाटे न विजय मिळतां ही असा हर्ष वाटे,
जाणों ग्रीष्मीं तृषार्ता विपुलतर मिळे तें सुधावर्ष वाटे. ॥ १८४
[12]भगिनीहो! या सासूबाईचें पुण्य तों अगाधरणीं ।
आला जय शत्रु भयें कांपुनि हे कांपवी अगाधरणी, ॥ १८५
सांबचि अरुंधतीपति केलें अस्मद्धिता सुतप याही ।
यांची दया यशांहीं पोषी माता जसी सुत पयांहीं. ॥ १८६
श्री सीता भगिनी तें अर्पी सांगोनि असि कथा [13]रतितें. ।
प्रभुचें पुण्य यशोमृत ईत सकळ ज्यांत रसिक [14]थारति तें. ॥ १८७

---

१. शार्दूलविक्रीडित वृत्त. २. गीतिवृत्त. ३. उपटून काढण्यानें. ४. स्वागतावृत्त. ५. कल्पवृक्ष. ६. फळ+ऋद्धि=फळांची विपुलता. ७. शिव. ८. जलोद्धतगति. ९. मोठ्या पर्वतांच्या गुहा. १०. आनंदाश्रूचे. ११. स्रग्धरावृत्त. १२. गीतिवृत्त. १३. सुखातें. १४. स्थिर होतात.

(उपसंहार.)

'सीतारामायण'[1] प्रेमें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणीं भावें अर्पिलें कृतवंदनें. ॥

---

## ७१. श्रीगुरुरामायण.[2]

(अनेकवृत्तें.)

[3]श्रीरामासि पहावया जनक ये स्नेहें विशोका पुरा,
भेटे, फार निवे, म्हणे, 'न गुण हा चंद्रीं शिशो! कापुरा.' ।
त्या सुग्रीवबिभीषणादि नमिती, सेवा करी रामही,
वित्ता लुब्धमती तसी बहु जपे ज्याच्या शरीरा मही. ॥ १

[4]प्रधानादि गेले तया आडवे [5]शें, वसिष्ठें समालिंगिला [6]वाडवेशें, ।
सुधी [7]याज्ञवल्क्यप्रियच्छात्र वर्षे [8]प्रमोदाश्रु, भेटे [9]शतानंद हर्षे. ॥ २
गमे भूप रामासि तो तात साच, प्रिय [10]प्रेमळ श्रेष्ठ होता तसाच, ।
नमस्कारिला पूजिला कन्यकांहीं, जया त्यांविना नावडे अन्य कांहीं. ॥ ३

[11]कौसल्या कैकेयी सुमति सुमित्रा तिहीं [12]अनव्याहीं, ।
नात्या [13]नव्यत्व दिलें, गौरविला फार सज्जन व्याही. ॥ ४

[14]ब्रह्मज्ञवर्य परि तो जनक स्वकन्या, सीता विलोकुनि रडे बहु तोहि धन्या ।
श्रीरामचंद्रहि म्हणे, 'चिर [15]सासु राहो, हा मत्पिताचि भरता! तव सासुरा हो.॥' ५

[16]जीवयांसि बहु दे मणि वस्त्रें स्यंदन [17]द्विप [18]तुरंगम शस्त्रें, ।
तो पुसे कुशळ वृत्त कथाया, श्रीवसिष्ठ कथि सर्व कथा या. ॥ ६

[19]श्रीराम प्रभु तों वदे, "गुरुकृपा पीयूष[20]पाथोनिधी'
ज्ञाते सर्व तुम्हीं [21]प्रजासमवनीं तैसेचि जैसा विधी, ।

१. अनुष्टुप्. सीतेनें सांगितलेलें रामायण. २. गुरूनां ह्मणजे वशिष्ठ व जनकानां सांगितलेलें रामायण असा 'गुरुरामायण'शब्दाचा अर्थ दिसतो. 'गुरु'शब्द येथें द्व्यर्थी म्हणजे 'कुलगुरु अथवा आचार्य' आणि 'वडील मनुष्य' या अर्थी योजिला आहे. उ०—श्लो० ७ मध्यें 'गुरुकृपा', २६ मध्यें 'गुरुजि,' ३६ मध्यें 'वशिष्ठ जनक', ४६ मध्यें 'गुरुजी,' ५७ मध्यें 'गुरुहो' आणि ६८ मध्यें 'वशिष्ठ जनक'. ३. शार्दूलविक्रीडित वृत्त. ४. भुजंगप्रयात वृत्त. ५. शंभर. ६. वाडव+ ईशें=ब्राह्मणश्रेष्ठें. ७. जनक. ८. आनंदाश्रु. ९. जनकाचा पुरोहित. १०. प्रेमयुक्त. ११. गीतिवृत्त. १२. नवीन नव्हे अशाहीं. १३. नूतनत्व. १४. वसंततिलका वृत्त. १५. सप्राण, जीवंत. १६. स्वागतावृत्त. १७. गज. १८. अश्व. १९. शार्दूलविक्रीडित वृत्त. २०. पाथोनिधि=समुद्र. २१. लोकरक्षणीं.

या आचार्यवसिष्ठगाधिजभरद्वाजात्र्यगस्त्यानुगा,
राजर्षे! कुशळ, प्रसन्न गहनीं होता जरी हा उगा. ॥ ७
[1]प्रयागीं भरद्वाज दे फार हर्ष, प्रभो! तो मला चातका होय वर्ष[2], ।
मुनी चित्रकूटीं तसें देखिले हो! स्वयें ग्यां चकोरें शशी[3] लेखिले हो.॥ ८
[4]अत्रि स्नेहें भेटला, यत्पदासी प्रेमें सिद्धी सेविती जेंवि दासी; ।
[5]आशी देती दंडकारण्यवासी या, मोक्षश्री ज्यापुढें तोंड वांसी[6]. ॥ ९
[7]शरभंग सुतीक्ष्ण पाहिले, कवि जे भूमिहितार्थ राहिले, ।
घटजें जनकें तसी कृपा बहु केली, वदवे न ती नृपा! ॥ १०
[8]मातें विलोकूनि जटायुतातें केली कृपा फार जटायुतातें, ।
गोदावरी दे सुख मायसी ते, म्हणे, 'वदावें नच हाय सीते!' ॥ ११
[9]अध्यात्मविद्या तुज जेंवि बापा! तैसी मला पंचवटीहि तापा ।
स्पर्शो नदे, श्री शिव कीर्ति पापा, कीं जेंवि [10]आस्तीकवरोक्ति सापा. ॥ १२
[11]लक्ष्मणें निर्मिली पर्णशाळा ती जेंवि सत्सभा, ।
पोषी हर्षकला तैसी सुरभी जेंवि वत्सभा[12]. ॥ १३
[13]खोटी शूर्पणखा दशास्यभगिनी या लक्ष्मणें दंडिली,
खड्गें तत्क्षण कर्णयुग्मसहिता नासा तिची खंडिली; ।
तीचा माउसबंधु ये खर, मरे, तें रावणाला कळे,
तो मायामृग पाठवी महिसुताधी त्याविना नाकळे. ॥ १४
[14]मंद्बाण लागतां त्या यातु[15]मृगानें वनांत मोठ्यानें ।
'हा सीते! हा लक्ष्मण!' असि मारिलि एक हाक खोट्यानें. ॥ १५
[16]मार्गे येतां अनुज मज हा भेटला, साश्रु सीता
क्रोधें बोले कटु, मदवना पाठवी यासि भीता, ।
गेलों राया! त्वरित उटजा शून्य पाहोनि बापा,
क्ष्मापा[17]! झालों अतिपतितसा दुःसहा पात्र तापा. ॥ १६

---

१. भुजंगप्रयात वृत्त. २. उदकवृष्टी. ३. चंद्र. ४. शालिनी वृत्त. ५. आशीर्वाद. ६. पसरी. . वियोगिनी वृत्त. ८. उपजातिवृत्त. ९. इंद्रवज्रावृत्त. १०. आस्तिक हा सर्पांचा भाचा. जनमे-य राजानें सर्पसत्र आरंभिलें, तेव्हां सर्पांनीं आस्तिकाची प्रार्थना केली. त्यावरून त्यानें राजाच्या डपांत जाऊन सर्वांस भाषणानें प्रसन्न करून 'हें सर्पसत्र आतां बंद करावें' असा वर राजापासून ागून घेतला—या कथेकडे येथें लक्ष्य आहे. ११. अनुष्टुप् वृत्त. १२. वत्साची कांति. १३. शार्दूलविक्रीडित वृत्त. १४. गीतिवृत्त. १५. यातु=राक्षस. १६. मंदाक्रांतावृत्त. १७. राजा जनका!

नि[1]जाश्रम पुनःपुन्हा हुडकितां, न गोदावरी-
तटस्थवन शोधितांहि नयन प्रमोदा वरी; ।
क्षताकुळ विलोकिला तंव जटायु तात क्षण,
प्रभो! हृदय पावलें मज गमे सुता त[2]क्षण. ॥ १७
[3]अधर्में रावणें नेली सीता तोडुनि पै[4]क्षती ।
सांगे सोडी प्राण त्याची दशा दे दुःख लक्ष ती." ॥ १८
दाटे कंठ प्रभुचा लक्ष्मण कथि, "अंत्य कार्य देहातें ।
संस्कारुनि, [5]भरत तसा, साश्रु सतिळ तोय आर्य दे हातें. ॥ १९
श[6]त्रूंसि साधूंसि म्हणे वि[7]रां र्धा[8], वधूनि हा आर्य जसा वि[9]राधा; ।
तसा धरी दारुण जो क[10]बंध, मा[11]झा तयाचा हरि शोक बंध. ॥ २०
वि[12]मानीं बैसे तो द[13]नु, हित कथी त्याचि अ[14]यनें.
निवाली बा! पुण्याश्रम निरखितां आर्यनयनें. ।
मतंगर्षिच्छात्रा वरि पुजुनि रामा यश बरी,
शुचिस्नेहाढ्या ती नि[15]मिकुळवरा! माय श[16]बरी. ॥ २१
[17]गेलों तत्प्रोक्तमार्गें निरखिलि स[18]रसी ती, जिचें नाम पंपा,
संपाया धैर्य दे यां[19] [20]उपगतजनतासानुकंपाहि कंपा. ।
सांगों दुःख प्रभो मी निमिकुलतिलका! काय बा! [21]आपवातें,
आर्या! मंदें सुगंधें परम सुख हिमें होय जो ताप वातें." ॥ २२
[22]वंदे राम, "स्वामी! सुमति धृति दे हा[23], सं[24]वन
प्रभो! नित्य प्रेमें करि, गमवि गेहासम वन. ।
न सौमित्री भ्राता, सकळगुरुसुस्नेह सजला,
प्रवासीं रक्षाया द्रवुनि मजला स्पष्ट भजला. ॥ २३

१. पृथ्वीवृत्त. २. तासणें. ३. अनुष्टुप्वृत्त. ४. पंखाचीं मुळें. ५. भरतानें जसें दशरथास दिलें तसें राम जटायूस दे—असा भावार्थ. ६. उपजाति वृत्त. ७. विरघळा. ८. तृप्त व्हा. ९ शापानें राक्षसयोनी पावलेला तुंबुरुनामक गंधर्व. १०. विराधाप्रमाणेंच राक्षस झालेला विश्वावसु गंधर्व. इंद्राच्या वज्रप्रहारानें याचें मुख उदरांत गेलें होतें म्हणून यास कबंध नांव पडलें. ११. माझा शोक, तयाचा (शापरूपी) बंध हरी—असा अन्वय. १२. शिखरिणी वृत्त. १३. कबंधाचेंच दनुकबंध असें दुसरें नांव होतें. १४. मार्गें. १५. निमिकुलोत्पन्न जनक. १६. पंपासरोवराच्या तीरीं राहाणाऱ्या मतंगऋषीची शिष्या. १७. स्रग्धरावृत्त. १८. सरोवर. १९. रामाला. २०. प्राप्त झालेल्या जनसमूहाच्या ठायीं दयालु अशालाहि. २१. वसिष्ठातें. २२. शिखरिणी वृत्त. २३. लक्ष्मण. २४. रक्षण.

रीया! जों म्यां ऋष्यमूकास जावें, या सुग्रीवा सूर्यपुत्रा भजावें. ।
जेणें विश्वीं अंजना भासमाना; हो या धाडी कंजनाभा समाना. ॥ २४
हीं सुगळ पवनपुत्रें मजला प्रेमेंकरूनि भेटविला, ।
झाला प्राणसखा, या वातें उत्साहदहन पेटविला.” ॥ २५
तों सौमित्रि म्हणे, “अहो गुरुजि! जो वाळी बळें माजला,
माराया सुगळा सदैव जपला, नाहीं मनीं लाजला. ।
आर्य स्थापुनि तत्पदीं प्रियसखा या सद्यशें साजला,
सर्वत्र प्रभुसाधुवाद सुजनस्तोमाननें गाजला. ॥ २६
प्रेषिलीं मग शोधाया सुग्रीवें जानकी शतें; ।
करी हा हनुमान्, लक्ष क्षमले ज्या न कीश तें. ॥ २७
धैर्य पाहुनि न लेश तगावें, हा पयोनिधि उडे शतगावें. ।
यासि पांघुरविती सुर सेलों, कीर्तिचा ठकवितां सुरसेला. ॥ २८
त्या सिंहिकेसि मारी, जी छायेतें धरूनि आकर्षी; ।
याच्या पराक्रमातें कां मानवला नसेल नाकर्षी. ॥ २९
आर्येतें आर्य मुद्रा परम कुशळ हा गुप्त भेटोन अर्पी,
स्वामीच्या भव्यवृत्तें अमृतसमधिकें फार देवीस तर्पी; ।
भंगी दिव्यद्रुलक्षा, दशमुखतनयाक्षाहि भी तोहि दर्पी,
ज्याच्या तेजासि लंका कनकपुर करी स्वप्रतापाग्नि सर्पी. ॥ ३०
आर्येचा, प्रभुला पदें नमुनियां दे वीर, चूडामणी,
या आलिंगुनि हा निवे बहु जसा सचंदनाला फणी; ।

---

१. शालिनीवृत्त. २. हा (सुग्रीव) या (मारुतीस) धाडी. ३. विष्णु. ४. गीतिवृत्त. ५. उत्साहरूपी अग्नि. ६. शार्दूलविक्रीडित. ७. साधुसमूहाच्या मुखानें. ८. अनुष्टुप्. ९. शेंकडों वानरें. १०. लक्ष वानर. ११. स्वागतावृत्त. १२. टिकावे. १३. शेला, सन्मानाचें वस्त्र. १४. सुरसानामक राक्षसी मारुतीच्या बलाची व चातुर्याची परीक्षा पाहण्याकरितां देवांनीं पाठविली होती; ती समुद्रोलंघनानंतर मारुतीच्या वाटेंत बसून ‘माझ्या तोंडांतून जा’ असें म्हणूं लागली. तेव्हां प्रथम फार मोठा होऊन व मग एकदम लहान होऊन तिच्या तोंडांत जाऊन व बाहेर पडून मारुतीनें तिला फसविलें—अशी कथा आहे. १५. गीतिवृत्त. १६. मारुतीस अडथळा करणारी दुसरी राक्षसी; हिचा मारुतीनें वध केला. १७. ओढी. १८. नारद. १९. स्रग्धरावृत्त. २०. सीतेतें. २१. मारुति. २२. उत्तम वृक्षांच्या लक्षा. २३. तूप. २४. शार्दूलविक्रीडित वृत्त. २५. डोकींत घालण्याचा रत्नालंकार. २६. सर्प.

घे माथां उपकार मेरुहुनही भारी स्वचित्तीं गणी,
याचा होय हरी प्रवीरनिकरीं बंदी रघूंचा धणी." ॥ ३१

[1]रघुपति म्हणे, "याचा साचा ऋणीच सदा' [2]असें
हृदय कळवी शांता दाता [3]स्वसाधुसदा [4]असें. ।
[5]हरि वरि न तो पाहे साहेचिना स्तवभार हा,
कवि म्हणति, 'या लोकीं शोकीं न मज्जुनि बा! रहा.' ॥ ३२

[6]बहुलक्षकोटिकपिवीरयुत स्तुतसद्गुणप्रभुसि [7]सूर्यसुत ।
द्रुत ने, पयोनिधिस घाबरवी, वरवि प्रमोद धृति दे बरवी.' ॥ ३३

[8]अजितें[9] कथि, "भियालों दुस्तरा सागरा मी,
बहुतचि विधिचा या कां असा राग रामीं; ।
निजमनिं वदलों हें नित्य निःशंक रातों,
भजनिं म्हणुनि चिंतू लागलों शंकरा तों. ॥ ३४

तेथें [10]बिभीषण महामति भेट दे, हें चिंतार्णवांत वरिलें पृथु बेट देहें ।
बा बंधु हा चुकवि संकटमज्जनातें! सर्वांहि रक्षि भरतासह [11]मज्जनातें.'॥ ३५

[12]वसिष्ठ जनकाप्रति प्रभुसि वंदुनि प्रीतिनें
बिभीषण म्हणे, "अजी भुलविलोंचि या रीतिनें, ।
असा प्रणतवत्सल त्रिभुवनीं नसे मानद,
प्रणाम करिती दुजे अमृतसागरा या नद. ॥ ३६

[13]राजारामचि दीनबंधु करुणासिंधु स्वयें सत्य [14]जी!
भ्राता अग्रज, धर्मनीति कथितां, भक्तानुजास त्यजी; ।
स्वीकारी मज वंदितांचि विजयश्रीचा स्वलंकार हा,
वात्सल्यें वदला प्रभूत्तम सुखी रक्ष स्वलंका रहा." ॥ ३७

---

१. हरिणीवृत्त. २. आहे. ३. स्वकीय साधुसभेला. ४. याप्रकारें. ५. वानर (मारुती.) ६. प्रमिताक्षरावृत्त. या वृत्ताच्या प्रत्येक चरणांत १२ अक्षरें असतात. वृत्तदर्पणकारांनीं दिलेलें लक्षण असें आहे:—'प्रमिताक्षरा म्हणति तीस कवी पदिं साजसास गण हे वदवी। पदिं अक्षरें रविमितें असती पतिवांचुनी सुखगणी नसती.॥' ७. सुग्रीव. ८. मालिनीवृत्त. ९. श्रीराम. १०. वसंततिलकावृत्त. ११. मत्+जनातें. १२. पृथ्वीवृत्त. १३. शार्दूलविक्रीडितवृत्त. १४. अजी, अहो.

तों सुग्रीव वदे वसिष्ठ मिथिलेशातें असें, "आर्य हो!
श्रीराम प्रभु हा म्हणे मज सख्या आधीं तुझें कार्य हो; ।
दोषावांचुनि गांजिलें बहु मला ज्या अग्रजें उद्धतें,
त्या दंडी प्रभु या मिळे यश न जें शक्रासही शुद्ध तें. ॥ ३८
दंडावें नगरेश्वरें न चुकला त्या नागरा कां पहा
वाळी काय अहो, जगत्पति शरें दे सागरा कांप हा, ।
तत्काळ प्रभु बांधवी नळकरें या सेतुरूपें गुणें,
हें आश्चर्य यशांत दंडितजनाच्याही पडेना उणें." ॥ ३९
[1]सांगे सौमित्रि, "आर्या! प्रभुसह चढलों जों [2]सुवेळाग्रभागीं,
लंकाप्राकारशृंगस्थितदशवदनीं [3]दूरगी [4]पोतकागीं; ।
जातां दृष्टि [5]प्लवंगक्षितिप उडुनि हा जेंवि [6]हर्यक्ष [7]नागीं,
क्रोधावेशें पडे हो! न पुसुनि सहसा कीं जसा [8]तार्क्ष्य नागीं. ॥ ४०
[9]प्रभु म्हणे, 'नकरीं मन घाबरें, तुज न साहस हें अनघा बरें,' ।
म्हणति ऐकुनि यासि नयज्ञ [10]हां, [11]झटिति [12]एकलसाध्य न यज्ञ हा.' ॥ ४१
[13]अंगद दूत प्रेषिला, कथुनि बरा संदेश ।
साम न करी मारा म्हणे, तो दशमुख मंदेश. ॥ ४२
[14]मगें [15]जलदरवाच्या मांडिलें युद्ध तातें,
परिभवहि न वारी त्या महाउद्धतातें; ।
अगणितरुधिराच्या मग्न [16]देवारि पूरीं,
[17]प्लवंगनगहि झाले भग्न [18]देवा! [19]रिपूरीं.' ॥ ४३
[20]वदे सुगळ, 'आर्य हो कपटि मेघनादें खळें,
बळें मथुनि हे प्रभू [21]भुजगबद्ध केले छळें ।

१. स्त्रग्धरा. २. सुवेळ नामक लंकेंतील पर्वत. ३. दूरवर पोंचणारी. हें दृष्टीचें विशेषण. [illegible] पातकाचा अग म्हणजे पर्वत-[illegible] रावण त्यावर. ५. वानरांचा राजा सुग्रीव. ६. हरि+अक्ष=[illegible]हाचा डोळा. ७. गर्जी. ८. गरुड. ९. द्रुतविलंबित. १०. हाय. ११. शीघ्र. १२. एकट्यानें [illegible]धावयाचा. १३. दोहा. १४. मालिनीवृत्त. १५. इंद्रजिताच्या. १६. रावण. १७. प्लवगनग [illegible]नरांनीं फेकलेले पर्वत) हि रिपूरीं भग्न झाले-असा अन्वय. १८. देवा (जनका)! १९. रिपु+[illegible]=शत्रूच्या वक्षःस्थळीं. २० पृथ्वीवृत्त. २१. अभिमंत्रित बाणांचे नाग होऊन त्यांनीं राम लक्ष्मणांस [illegible] केलें तेव्हां प्रत्यक्ष गरुडानें येऊन त्या नागपाशांतून त्यांना मुक्त केलें-अशी कथा आहे.

जळें न नयनोद्भवें तुटति दुःख तें आगळें,
गळेंचि धृतिला म्हणे कपिचमू विवेका पळे. ॥ ४४

[1]ये संकटीं धावुनि राजपक्षी[2], तो त्या अहीतें जरिही न लक्षी, ।
तत्तेज तत्पक्षज नाद भक्षी, हे आमुचे मूर्तिधरासु रक्षी.' ॥ ४५

[3]बोले सौमित्रि, 'कष्टें उठवुनि गुरुजी ! प्रेषिला कुंभकर्ण,
क्रव्यादेशें[4] महोग्र प्रबळतम महाकाळसा काळवर्ण; ।
अस्मत्प्राणा सुकंठा धरि, बळ उडवी तो जसा वात पर्ण,
क्रूरा त्यातें तसें कीं सकळ जळधिचें वाडवा[5] जेंवि अर्ण[6]. ॥ ४६

[7]फिरे ते पुरी तो महावीर यातें तुळा तों न याच्या पहावी रयातें[8] ।
सुटे मोह जातां हरी कान नाक प्रहर्षें म्हणे साधु या कां न नाक[9]. ॥ ४७

[10]पुन्हा आला क्रोधें प्रलयसमयीं सिंधु फुटला,
गमे कीं युद्धांत प्लवग सगळे खात सुटला. ।
जसा बोधें मोह प्रभुवरशरें तो खपविला,
दिला या सद्वीतें परम विजयें तोखें[11] पेविला[12].' ॥ ४८

[13]कीशाधीश कथी वसिष्ठजनकस्वांतांसि हर्षावया,
तन्नेत्रांतुनि उष्ण शीतलतर प्राज्याश्रु[14] वर्षावया, ।
'ब्रह्मास्त्रें बळ इंद्रजित् खळ खळी, पावोनि संताप हा
सारेही वदलोंचि, कश्मल म्हणे सर्वाहि संता पहा. ॥ ४९

[15]अस्मत्प्राण बहिश्चर प्रभु रणीं दोघेहि हे ताडिले,
निश्चेष्ट क्षणदाचरेश्वरसुतें[16] निर्जीवसे पाडिले ।
होता सावध हा बिभीषण दुजा हा मारुती माहितें,
शल्यातें सकळें बळें जड म्हणे देवर्षि जो तो हितें. ॥ ५०

रात्री उल्मुकहस्त[17] हे[18] हुडकितां युद्धांगणीं, भागले
दैवें या परमाधिसागरतटा ऋक्षेश्वरा[19] लागले ।

---

१. इंद्रवज्रावृत्त. २. गरुड. ३. स्रग्धरावृत्त. ४. क्रव्याद म्हणजे राक्षस त्यांचा स्वामी रावण त्यानें. ५. वडवाग्निला. ६. उदक. ७. भुजंगप्रयातवृत्त. ८. वेगातें. ९. स्वर्ग. १०. शिखरिणी वृत्त. ११. संतोष. १२. वज्राला. १३. शार्दूलविक्रीडित. १४. प्राज्य=पुष्कळ. १५. शार्दूलविक्रीडित. १६. इंद्रजितानें. क्षणदा=निशा. १७. पेटलेलें काष्ट. १८. बिभीषण व मारुति. १९. जांबुवंताला.

हा सांगे सदुपाय पाय धरितां शल्यार्तही ओषधी,
[1]'क्ष्माभृच्छृंग मरुज ! आण,' विभुची पावे महातोष धी. ॥ ९१
[2]विशल्य झालें [3]कटक श्रीरामासह सर्व तें, ।
शिवें आशीर्वच दिलें सत्य शृंग (?) नग पर्वतें. ॥ ९२
प्रसवे पुत्र विश्वाच्या वाराया अंजना भया, ।
देऊ सदग्रगण्यत्वख्याति श्रीकंजनाभ या. ॥ ९३
[4]वंदे राम, 'हा मारुती प्राणदाता निवारी स्वलीलालवें सर्वघाता.' ।
कुळाचार्य त्यातें म्हणे 'सत्य ताता !' स्तवी साश्रु होऊनि वैदेह वाता. ॥९४
[5]शत्रुघ्न भरत वदले, 'याचे आम्हीं खरे ऋणी आर्या !' ।
सचिव म्हणति, 'फेडावें ऋण याच्या करुनि कोणत्या कार्या ?' ॥ ९५
[6]ज्ञाते सर्वहि जांबवान् सहनुमान् गावा सदा स्थापि ती,
हा सिद्धांत चरित्र तें धरुनियां चित्तीं सदास्था पिती. ।
बोले अंगद, 'मेघनाद गमतो मायामयी जी वधी,
ती देवीच गमे, भ्रमे अमरधी, कां न भ्रमे जीवधी ? ॥ ९६
[7]हो तात बिभीषण ! दे आम्हां सर्वांसि धीर, हे माया ।
ऐसें सांगे गुरु हो हा न म्हणों देचि धीर हेमा या. ॥ ९७
[8]जन्मो साश्व [9]शतांग होम करितां निर्विघ्न बा ! त्यावर
व्हावें बैसुनि म्यां रणीं अमर हा मागोनि धात्या वर ।
घे शक्राप्रति सोडितां [10]घनरव, श्रीरामचंद्रा कथी
हें त्याचाचि [11]पितृव्य, लक्ष्मण तया होमीं अपूर्णी [12]मंथी. ॥ ९८
मायावी घननाद तो अरि अहोरात्रत्रयें मारिला,
शक्रत्रास समूळ आर्यवर हो ! सौमित्रिनें वारिला; ।
दावी भेदुनि शक्तिनें उर दशग्रीव प्रतापा रणीं,
दर्पीची सकळांचिया [13]पवनभू फेडी पुन्हा पारणीं.' ॥ ९९
[14]बिभीषणें म्हणे, 'करी वरुनि शक्ति मद्रक्षण,
त्यजी स्वतनुभान हा सदय रामभद्र क्षण ।

---

१. हिमालयपर्वताचें ऋषभनामक शिखर. २. अनुष्टुभ्वृत्त. विशल्य=व्याधिरहित. ३. सैन्य. ४. भुजंगप्रयात. ५. गीतिवृत्त. ६. शार्दूलविक्रीडित वृत्त. ७. गीतिवृत्त. ८. शार्दूलविक्रीडित वृत्त. ९. लढाईच्या उपयोगाचा रथ. १०. इंद्रजित्. ११. चुलता बिभीषण. १२. नाश करी. १३. मारुति. १४. पृथ्वीवृत्त.

न बंधुपण पाहिलें परिशिलेंहि अन्यत्र या,
असें बहु जगांचिया म्हणवि हेंचि धन्य त्रया.' ॥ ६०
वंदे[1] **राम** प्रेमें द्रवुनि शिव दे **वा**ततनया,
परा भक्ता पश्चात् प्रथम **शि**वदेवा ततनया ।
नगावा हा सुज्ञें कळुनि हित कां जी वद नतें,
न जें गाय, त्यागू अमृत, पिउ कांजी वदन तें. ॥ ६१
[2]म्हणे **ज**नक, 'मारिला मग कसा कुधी, दूर सा[3]
न जो अरि करि, स्तवी, न विषया त्यजी दूरसा?' ।
**व**सिष्ठहि वदे, 'यशोमृत कवींस तर्पू, रहा
म्हणो परयशा उगे, म्हणत जेंवि कर्पूर हा.' ॥ ६२
सु[4]गळ म्हणे, 'अहो न रण निस्तुळ तो कथवे,
निरखिति चित्रसे करुनि निर्जरलोक थवे ।
मृतकपिराक्षसप्रवररक्तनदी शतशा,
स्मरति न देव वृद्ध मुनि तेहि तदीश तशा. ॥ ६३
[5]खोटा **द**शास्य रण मोठाच वाढवि न तो टाकि आग्रह अरी,
तोटा नघे सुजन कोटास याहि पण लोटावया दृढ धरी; ।
झाडी मदांधमद, ना[6]डी सुरारि बहु, धाडी असा रथ ह[7]री,
ताडी तयावरुनि पाडी शिरें **र**घुप फाडी उर व्यसु करी. ॥ ६४
[8]सप्ताहोरात्रकाळ प्रखर रण करी **रा**वण क्रूरकर्मा,
तन्नाशें विश्व पावे यतिपतिमतिही **शं**भु **धा**ताहि शर्मा; ।
झाली सत्पुष्पवृष्टि प्रभुवरि गगनीं गर्जलीं दिव्य वाद्यें,
केली **श्री**नारदेंहि स्तुति, समुनिजनें **क**श्यपें, **वा**सवाद्यें. ॥ ६५
हर्षे [9]**गं**धर्वराज स्वजनसह करी रम्य आलाप, हा या
श्रीरामा गाय, नाचे, सुरयुवतिगण क्षिप्र आला पहाया; ।
**वे**धा[10] **श्री**कंठ[11] **गौ**रीयुत सजुनि **वृ**षाधीश्वरा शुद्धवर्णा,
आज्ञा ऐसी करी कीं सुकुशळ कवि हो! सर्व हें युद्ध वर्णा. ॥ ६६

---

१. शिखरिणी. २. पृथ्वी. ३. षड्रिपु जो सा अरि दूर न करी—असा अन्वय. ४. नर्दटकवृत्त. गण—न ज भ ज ज ल ग. लक्षण—'यदि भवतो न जौ भजजला गुरु नर्दटकम्.' ५ अश्वधाटीवृत्त. ६. 'नाडणें, नाश करणें' या क्रियापदाचें रूप. ७. इंद्र. ८. स्रग्धरावृत्त. ९. चित्ररथ. १०. ब्रह्मदेव. ११. शिव.

[1]बिभीषणकरें राम द्रेष्टयांची करवि क्रिया ।
द्रवे, वधूनि न धरी हा कृपाकर वि[2]क्रिया.' ॥ ६७

[3]पुसति वसिष्ठ जनक, 'बा वत्सा ! सीता सतीव्रता पाहे ।
केव्हां प्रियचरणातें? योग्या तैशा न तीव्रतापा हे.' ॥ ६८

[4]बोले [5]अक्षारि, 'शोकाकुल हतरिपुचे [6]दार जे आर्य! होते
श्रीरामें सांत्विले कीं सुगुण शुचि शचीशाहि सत्कार्य हो ते; ।
केला सौमित्रिहस्तें वरपदगत [7]हा साधुधी, नि[8]ष्कलंका
पावे ती कीर्ति मानी निजहृदयीं [9]कलापोषका निष्कलंका. ॥ ६९

[10]देवीस सन्मुखें या प्रभुनें निजविजयसिद्धि जाणविली, ।
या [11]लंकेशानुमतें मग नगरींतूनि निकट आणविली. ॥ ७०

[12]देवी दिव्य करी, बहु द्युति धरी, दृग्दोष सारे हरी,
कामाचाहि अरी स्तुति प्रभुपरी प्रेमें स्वयें आदरी; ।
सावित्रीश हरी मुनिव्रज वरी बंदीपणातें खरी,
हे सत्कीर्ति [13]तरी भवांत दुसरी पावे न ईची सरी. ॥ ७१

[14]उठवी सात्विकभावा अघशमना दिव्य थापटुनि रसिकीं, ।
शंका निंदाचि न तें सकळ अनादि व्यथा पटु निरसि कीं. ॥ ७२

[15]वसुनि वरविमानीं ये महाराज तो या,
प्रभुसि तृषित हस्ती जेंवि घर्मार्त तोया ।
प्रियतनुजयुगातें भेटला आर्य हो तें,
अमृतहि न जसें हें तन्मनीं कार्य होतें.' ॥ ७३

[16]प्रेमें आपण भक्तवत्सल वदे, 'शोकाग्नि जो पेटला
होता, त्या शमवावया गुरुकृपामेघ स्वयें भेटला ।

---

१. अनुष्टुभ्वृत्त. २. क्रोध. ३. गीतिवृत्त. ४. स्रग्धरावृत्त. ५. मारुती. अक्ष नांवाच्या ...णपुत्राला मारुतीनें अशोकवनिकेंत मारिलें होतें. ६. बायका. 'दारा' हा शब्द संस्कृतांत ...लिंगी अनेकवचनी असतो तसाच तो येथें योजिला आहे. ७. बिभीषण. ८. सुवर्णाची ...का. ९. बिभीषणा. कलानामक बिभीषणाची ज्येष्ठकन्या होती, ती रामाकडील कुशलवृत्त ...शोकवनिकेंत वारंवार जाऊन सीतेला सांगत असे. १०. गीतिवृत्त. ११. बिभीषण आतां ...केश झाला होता. १२. शार्दूलविक्रीडित. १३. नौका. १४. गीतिवृत्त. १५. मालिनीवृत्त. ...६. शार्दूलविक्रीडित.

गाढालिंगन जें शिरीं करि अवघ्राण स्रवे अश्रु तें,
ने तापा तद्दर्शनें[1] असुख या विप्रा जसें अश्रुतें.[2]' ॥ ७४

लक्ष्मण[3] सांगे, 'वदला आर्येतें तात हें असें सरलें।
संकट वत्से! त्वद्व्रततेजें मत्कुळ निमज्जतां तरलें; ॥ ७५

महेंद्र[4] बोले, 'रघुसत्तमा! रणें प्रसन्न झालों बहु मत्तमारणें।
जरि श्रितांचा परमागसा, रतूं[5] यशीं जगा बा! वर माग सार तूं. ॥ ७६

श्रीराम[6] हा मानद देवराया मागे, उठावे कपि दे वरा या।
केले सुधा वर्षुनि वीर होते तैसेचि शक्रें अजि धीर हो! ते. ॥ ७७

जोडी[7] हस्त, म्हणे, 'बिभीषण न घे म्यां प्रार्थितां पूजना,
या आचार्य वसिष्ठ तूं मत जसा देव स्वयंभू जना।
माता आर्य पिताचि हा परि भवत्स्नेहें न आकर्षिला,
जैसा या भरतें प्रभूत्तम, रुचे हें फार नाकर्षिला.' ॥ ७८

राम म्हणे, 'त्वां रक्षिलि जरिहि असुतरा तरि प्रतिज्ञा ते,।
बा! तरिच जपति सेविति बहु सत्संगतितरिप्रति ज्ञाते. ॥ ७९

कैसा[8] येतों सुदूर त्वरित जरि न मी पावतों या विमाना,
माझ्या[9] वाक्या न येतां भरतकृतपणा सत्यता यावि, माना।
हें साचें आर्य हो! हा प्रिय परम सदा प्राणसा कायसा हो!
कौसल्यासूनुही हा मग विरह अशा साधुचा काय साहो? ॥ ८०

ऋक्षाधीश[10] सुषेण अंगद नळ स्नेही भले भागले,
हे सुग्रीव बिभीषण प्रियकर भ्राते खरे मांगले[11]।
हा वातात्मज हे गजादि सकळ प्रज्ञाबळें आगळे,
देणारे जय यांपुढें परबळ त्रासें करी आ, गळे. ॥ ८१

यींहीं[12] दिला विजय साधुनि आर्य हो या,
हे हेतु सिद्ध अति दुर्घट कार्य होया[13]।
हा दाससा सतत लक्ष्मण वत्स माज्या,
देहा जपे बहुजसा शिव सत्सभाजा.' ॥ ८२

---

१. तत्+अदर्शनें. २. न शिकलेल्या मनुष्यामुळें. ३. गीतिवृत्त. ४. वंशस्थवृत्त. ५. स्वयशीं विश्व रत व्हाया. ६. इंद्रवज्रा. ७. शार्दूलविक्रीडित. ८. स्रग्धरा. ९. माझ्या वाक्या सत्यता न येतां (ती) भरतकृतपणा यावि–असा अन्वय. १०. शार्दूलविक्रीडित. ११. पूर्व-जन्माचे. १२. वसंततिलका. १३. व्हावया.

[1]सौमित्रि म्हणे, 'आर्या ! गुर्वाशीर्वाद सतत तुज जपला ।
निष्फळ होइल कैसें सानुज ससचिवहि भरत जें तपला'. ॥ ८३
[2]दाखवि प्रभुहि लोकरीतितें मान्य सद्गुरुहि तो करी तितें ।
याज्ञवल्क्यमुनिशिष्य मानवे गाति तीच कवि उत्तमा नवे. ॥ ८४

[3]प्रेमें श्रीरघुवंशसद्गुरु वदे, 'बा राघवा मानदा !
देवब्राह्मणधर्मनीतिनिरता ! रामा ! सुधेच्या नदा ! ।
वंशीं त्वत्सम तूंचि या [4]द्युमणिच्या वत्सा जगा तारिता,
लोकामाजि पडो तुझ्या सुचिरता भावें न [5]गाता रिता.' ॥ ८५
[6]वदे जनक, 'साधुहो चिर सुखें प्रजा नांदवा,
भवद्यश जगत्रयाउपरि हो सदा चांदवा ।
जशा म्हणति [7]वाढल्या शिव असो नद्या [8]वासवा,
प्रजा म्हणुत या तुम्हां सुबहुमान द्यावा सवा.' ॥ ८६

उपसंहार.

'[9]श्रीगुरुरामायण' हें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतनंदनें. ॥ १

# ७२. [10]रम्यमंत्ररामायण.

## बालकांड.

(शार्दूलविक्रीडितवृत्त.)

श्री सीतापति[11]पादपद्म नमुनि प्रेमें तयाच्या यशा,
गातों वंदुनि पाय [12]आदिकविचे जे [13]व्याघ्र मोहा [14]शशा; ।

---

१. गीतिवृत्त. २. रथोद्धता वृत्त. ३. शार्दूलविक्रीडित. ४. सूर्याच्या. ५. गाणारा. ६. पृथ्वी.
ा. ७. पावसाच्या पाण्यानें फुगलेल्या. ८. इंद्राला. ९. अनुष्टुप्. या रामायणाच्या आरंभीं
ःरामायण म्हणजे गुरु (कुलगुरु अथवा वडील मनुष्य) वसिष्ठ व दशरथ यांना सांगितलेलें
रामायण अशा अर्थाची टीप दिली आहे तिलाच पद्यें ७४ मधील 'गुरुकृपामेघ,' ८३
ील 'गुर्वाशीर्वाद,' ८४ मधील 'सद्गुरु' व शेवटच्या म्हणजे ८५ आणि ८६ मधील वसिष्ठ व
नक यांणीं अनुक्रमें दिलेले आशीर्वाद यांनीं पुष्टी येते. १०. हें आपल्या नांवाप्रमाणें खरोखरच
नोहर आहे. ११. पद्कमल. १२. वाल्मीकि. १३. वाघ. १४. शश=ससा.

[1]श्रीदेवर्षि वसिष्ठ [2]गाधिज भरद्वाजात्रि [3]कुंभोद्भव,
यांतें प्रार्थुनि मागतों वर सरो या चिंतनें [4]मद्भव. ॥ १
**रा** जा [5]पंक्तिरथाख्य [6]भास्करकुळीं धर्मी सदा सादर,
होतां सद्गुरुची दया पळ शिवों दे ज्या न दासा [7]दर, ।
झाला वृद्ध [8]सुभार्य आर्य सकळ [9]श्री तो [10]कळा [11]भाविना,
वाहे [12]आधि म्हणे वृथा उपजलों मीं [13]तोकलाभा विना. ॥ २
**म**[14] न्युश्रेष्ठ [15]तुरंगमेध करितां पुत्राप्ति हें जाणुनी,
स्वाप्तप्रोक्त सनत्कुमारवच तो [16]शांतापती आणुनी, ।
आरंभी यजना, विधिप्रमुख जे घ्याया स्वयें भाग ते,
आले, प्रार्थिति विष्णुचे चरण कीं हे [17]स्वावनीं जागते. ॥ ३
'**ज**[18] न्या [19]अक्षम देव, [20]दाशरथि तूं हो देवदेवा नर,
[21]नाकी सर्व सहाय रावणवधीं होतील हे वानर,' ।
[22]श्रीवैकुंठ बरें म्हणे, मुनि करी पुत्रेष्टि, दे [23]पायसा
अग्नि, प्राशिति [24]राजदार, भव भी, राजाधि तो कायसा. ॥ ४
**य**[25] ज्ञेश प्रकटे सुखें सुसमयीं सत्पुत्र तो राम हा,
कौसल्यात्मज दे खळांसचि भया साधूंसि थोरा [26]महा, ।
कैकेयीसुत केशवांश भरत श्रीमान् सुमित्रासुत,
नामें लक्ष्मण भव्यलक्षण दुजा शत्रुघ्न विश्वस्तुत. ॥ ५
**रा**[27] केशानन ते कुमार चवघे संस्कारिले, [28]आपवा
आचार्या भजले, तयां गुरु म्हणे तेजें [29]परां तापवा; ।
भूपें त्यावरि रामलक्ष्मण दिले यज्ञावना गाधिजा,
ते मारीचसुबाहु विघ्न करिति क्रौर्यें सदा आधि ज्यां. ॥ ६
**म** र्यादापरिपालनें हरि मुनि[30]स्वांतासि विश्वंभर,
विद्या तो हि बळा दुजी अतिबळा अस्त्रेंहि दे शंभर. ।

---

१. नारद. २. विश्वामित्र. ३. अगस्त्य. ४. माझा संसार. ५. दशरथ नांवाचा. ६. भास्कर=सूर्य. ७. भीति. ८. सुंदर आहेत स्त्रिया ज्याच्या असा. ९. संपत्ति. १०. किंचित् अंश. ११. मानीना. १२. मनोव्यथा. १३. पुत्र. १४. उत्तम यज्ञ. १५. अश्वयज्ञ. १६. शांतेचा नवरा. (ऋष्यशृंग.) १७. रक्षण. १८. युद्धाला. १९. असमर्थ. २०. दशरथाचा पुत्र. २१. स्वर्गवासी देव. २२. विष्णु. २३. खीर. २४. राजस्त्री. २५. विष्णु. २६. आनंद. २७. चंद्रमुख. २८. वसिष्ठाप्रत. २९. शत्रूंना. ३०. स्वांत=मन.

मार्गीं मारुनि ताटिकेसि सुभुजा सिद्धाश्रमीं पाडुनी,
मारीचा प्रभुबाण दूर उडवी [1]पुंखानिळें ताडुनी. ॥ ७
**ज** न्हु [2]स्वर्गनदीपिता नृप तसा जो साधु सीतापिता,
तो बाहे [3]स्वमखोत्सवार्थ मुनितें ब्रह्मीं मन स्थापिता; ।
राम [4]त्र्यंबकचाप दाखिव असें प्रार्थी, स्वयें त्यासि घे,
विश्वामित्र म्हणे फिरा खगमृगां सांत्वूनि भक्तां निघे. ॥ ८
**यं** [5]ज्वा गाधिज [6]निर्मृगाश्रमपदीं रामा अहल्याकथा
सांगे, लाववि पादरेणु हरवी तत्पापशापव्यथा; ।
पूजी गौतम दिव्यदारसहित प्रेमें तया [7]वाडवा,
त्या श्रीशा मग भूप घेउनि [8]शतानंदासि ये आडवा. ॥ ९
**ज** न्म प्राप्तफळ स्व मानि जनक स्नेहें [9]सपर्या करी,
भंगी त्र्यंबकचाप राघव तया सप्रेम सीता वरी; ।
सामात्या सपुरोहिता दशरथा आणूनि दे ऊर्मिळा,
भावें पूजुनि लक्ष्मणासि विधिनें [10]शक्राहि जी दुर्मिळा. ॥ १०
**यं** क्षाधीश्वरसा सभाग्य जनक भ्रात्यासि सांगे, सुता
द्याया तो भरता कुशध्वज सुधी जी मांडवी श्रीयुता, ।
शत्रुघ्ना श्रुतकीर्ति दे बहु धनें सर्वांसि ते पूजुनी,
प्रेमें बोळविती दिली न बहुधा ती जांवयां भू जुनी. ॥ ११
**रा** गेंजे [11]भृगुराम [12]भर्गधनुच्या भंगें, तयाच्या हरी
तेजातें प्रभु विष्णु, शांतिहनु तो जातां तपातें धरी; ।
केला सावध वृद्ध भूपति मनीं मानी पुनर्जन्म हें,
[13]साकेतांत करि प्रवेश [14]नमुचिघ्नाचा सखा [15]सन्महें. ॥ १२
**मं** [16]त्र्येश श्वशुरालयासि भरता प्रेषी [17]रिपुघ्ना सह,
प्रेमें [18]मातुळ ने तयासि समरीं जो शत्रुला दुःसह, ।
[19]छंदें सत्प्रिय बालकांड लिहिला शार्दूलविक्रीडितें,
श्रीमद्रामयशोब्जें परयशें केलीं बहु [20]व्रीडितें. ॥ १३

---

१. बाणाच्या पिसाऱ्याचा वारा. २. गंगा. ३. यज्ञ. ४. शिवाचें धनुष्य. ५. यज्ञकर्ता- ... ज्यांतून मृग निघून गेले आहेत असें आश्रमस्थान. ७. ब्राह्मण. ८. गौतमाचा पुत्र व जन... ...चा पुरोहित. ९. पूजा. १०. कुबेराप्रमाणें. ११. परशुराम. १२. भर्ग=शिव. १३. अयोध्या. ...४. इंद्र. १५. उत्तम आनंद. १६. राजा दशरथ. १७. शत्रुघ्न. १८. मामा. १९. वृत्त. २०. लज्जित.

## अयोध्याकांड.

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

तो **श्री** मान्नृप यौवराज्य वडिला द्यावें सुता हें वदे,
ती गुर्वादिजना सुगी[1] तशि जशी शांती सुधा[2] खेवें[3] दे, ।
कैकेयी अभिषेक राहवि बळें तो मंथरेच्या मतें,
मानीना तिळमात्र जें दशरथ प्रार्थी करी साम तें. ॥ १

दे **रा** ज्य स्वसुता चतुर्दश समा[4] रामा वनीं वास ती
झाली मागुनि दोन दुर्वर[5] असे हे राक्षसी भासती, ।
मातेचें प्रिय मान्य तो प्रभु करी तें तातसत्यावना[6],
सीतालक्ष्मणयुक्त तत्क्षण निघे जोडी यशा पावना[7]. ॥ २

धा **म** [8] त्यागुनि वल्कली[9] प्रभु पित्या मातांसि वंदी पुसे,
कैकेयीवरि भूपतीवरि पुरी जी तीवरि श्री रुसे; ।
राजाज्ञप्त सुमंत्र सारथि तिघां ने तो रथीं वाहुनी,
प्राणी सर्व हि 'हाय! हाय!' वदले जातां पथीं पाहुनी. ॥ ३

ला **ज** क्षोणिपतीस[10] होय सदन[11] त्यागी तिचें त्या क्षणीं,
कौसल्यानिलयास्सि[12] जाय न धरी धी[13] प्राणसंरक्षणीं; ।
पौरांतें निजल्या स्थळीं त्यजुनि तो गेला प्रभु स्यंदनें[14],
तत्पादाब्जरजें[15] निवे गुह सखा, जैसा फणी[16] चंदनें. ॥ ४

श्रे[17] **य** स्कामहिता प्रभूत्तम भजे देवापगेच्या[18] तटा,
तेथें सानुज वन्यवृत्ति वळवी दुग्धें[19] वटाच्या जटा, ।
ताताच्या सचिवा पुसोनि उतरे पारीं भरद्वाज या,
आज्ञा पूजुनि दे द्रवोनि परमा आशी हि देती जया. ॥ ५

धी[20] **रा** राध्यपदांबुज प्रभु भजे श्रीचित्रकूटा नगा[21],
सांगे साश्रु सुमंत तें परिसतां भूप त्यजी या जगा; ।

---

१. उत्तम वाणी. २. अमृत. ३. सुख, आलिंगन. ४. वर्षे. ५. दुष्ट वर. ६. बापाचें सत्य राखण्याकरितां. ७. पवित्र. ८. घर. ९. झाडाच्या साली नेसलेला. १०. राजा. ११. राम. १२. घर. १३. बुद्धि. १४. रथ. १५. कमल. १६. साप. १७. आपलें कल्याण व्हावें अशी ज्याची इच्छा आहे त्याला हितकर अशा. १८. देवनदी गंगा. १९. चीक. २०. शहाण्यांनीं आराधन करण्यास योग्य आहे पदकमल ज्याचें असा. २१. पर्वत.

आचार्यें द्रुत आणिला **भ**रत तो मातेसि गांजी, वदे,
'पापे! मारुनि नाथ तूं न म्हणसी मातें हि कां जीव दे?' ॥ ६
हें **म**त्कृत्य नव्हे असें सशपथ प्रार्थी, रडे तो भला,
कौसल्याहि रडे, तया मग म्हणे, 'वत्सा! विधि[1] क्षोभला, ।
तैलांतूनि शरीर काढुनि करीं विध्युक्त तातक्रिया,
संपादीं गुरुच्या वचा न वरुनि क्ष्मा, न प्रसूच्या[2] प्रिया.' ॥ ७
ते **ज**स्वी **भ**रत **प्र**भुप्रति पुरा आणावयाला निघे,
सर्वामात्य, **व**सिष्ठ, पौर, जननी आत्मप्रसूतें हि घे, ।
त्यां नौका न दिल्या, **गु**हें प्रभुसखें अक्षौहिणी[3] रोधिली[4],
तेव्हां ती शपथातरें[5] उतरिली जैं धी बरी शोधिली. ॥ ८
गे[6]**य** ज्ञानमहार्णवें मग **भ**रद्वाजें **प्र**यागीं बरा,
सत्कारूनि परीक्षिला **भ**रत कीं त्या दुर्यशें[7] घाबरा; ।
पावे सत्वर **चित्रकूट**गिरितें **रा**मांघ्रिपद्मीं जडे,
ताताच्या विरहें तयासि रडवी त्याच्या स्वयेंही रडे. ॥ ९
री **ज**न्यप्रवरा[8] पित्यासि भगवान् श्री**रा**म दे पिंड तो,
यन्नामें गति देत **ना**रद जडां लोकत्रयीं हिंडतो; ।
यत्पादाब्जपरागमिश्रित **म**हानद्याख्य जें वारि तें,
स्नान स्पर्श हि एकदा हि घडतां उग्रें अघें वारितें. ॥ १०
'मा **य** प्राकृतबुद्धि कृत्य न इचें चित्तीं धरीं, बा! पुरा[9]
चाल, स्वालय शोभवीं, यश तुझें हांसो पया कापुरा,' ।
ऐसें पुष्कळ तो वदे **भ**रत तों, स्वामी म्हणे, 'हा बरा
नोहे आग्रह, सत्यधर्म गुरुचा रक्षीं, न हो घाबरा.' ॥ ११
'ते **रा** आणिक एक अब्द सरतां येतों पुरा जा रहा,
घ्यावा म्यां वनवास राज्य करणें तों त्वांहि बा! भार हा.' ।
ऐसें ऐकुनि तो म्हणे, 'विनवितों हें सत्य हो मी, नया
धर्मा दे पदपादुका, विसरतां देहास होमीन या!' ॥ १२

---

१. नशीब. २. आई. ३. सेना. ४. हें सैन्य रामनाशार्थ चाललें असावें असें वाटून रोधिली म्हणजे अडविली. ५. शपथरूपी तरी म्हणजे नदी उतरून नेण्याचें भाडें. रामाच्या नाशाकरितां नव्हे. तर रामाला भेटण्याकरितां आपण जात आहों अशी गुहाची खात्री करून. ६. वर्णन करण्यास योग्य आहे ज्ञानरूपी सागर ज्याचा असा. ७. आपण रामाला वनास पाठविण्यास कारण झालों हें दुर्यश. ८. क्षत्रियश्रेष्ठ. ९. अयोध्येस.

का **म** [1]स्वामरवृक्ष पूरवुनि, दे सांत्वूनि आज्ञा तया,
[2]नंदिग्राम वरी विराम म्हणवी [3]साकेत हा ज्ञातया; ।
श्रीस श्रीपद अत्रिदारकर ते कल्पद्रुसे शोभले,
श्रीरामप्रियभक्त या दुसरिया कांडासि जे लोभले. ॥ १३

---

## अरण्यकांड.

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

पुण्य **श्री** पद भव्य दंडकवनीं श्रीराम मुन्याश्रम
पाहे, ज्यांत विलोकितां [4]खगमृगां राहे न कांहीं श्रम. ।
भूकन्येसि विराध राक्षस महारण्यांत जातां हरी,
त्यातें मारिति वीर दाशरथि ते जैसे करीतें [5]हरी. ॥ १

जो था **रा** [6]शरभंगशांतिस सुखी भेटोनि त्यातें करी,
[7]भृंगापद्युत त्या सुतीक्ष्णमुनिच्या श्रीराम चित्ता हरी; ।
अर्पी [8]कुंभज देवराजनिहतें चापादि दिव्यायुधें,
नातें मी पितृमित्र हें कळविलें त्या गृध्रराजें बुधें. ॥ २

जीचे **म** त्स्य महेंद्रपूजित तया गोदावरीच्या तटीं,
राहे पंचवटींत तेंवि [9]उटजीं तो दीप जैसा घटीं, ।
क्षोभे शूर्पणखा विरूपकरणें, पावे खराख्य क्षया,
श्रीरामा [10]चवदा हजार किति ते [11]मुंगे तसे लक्ष या. ॥ ३

ती ला **ज** त्यजुनि [12]स्वबंधुसि कथी, 'स्त्रीरत्न साधावया
गेल्यें, तत्पति तो मला तुजहि बा! भ्याला न बाधावया; ।
माझ्या आजि अशा विरूपकरणें हानि प्रतापा यशा,
केली त्या मनुजें तुझ्या हि पर जे त्यांच्या कथा कायशा.' ॥ ४

हा हा **य**! [13]क्षणदाचरेश्वर वदे, मायाप्रवीणा बळें
मारीचा शिकवी कुबुद्धि मरणा [14]स्वर्णैणतेच्या [15]छळें, ।

---

१. उत्तम कल्पवृक्ष. २. अयोध्येपासून एक कोसावर पूर्वी एक गांव होता. राम वनवासांत असतां भरत येथें चौदा वर्षें राहिला होता. ३. अयोध्या. ४. पक्षी. ५. सिंह. ६. दंडकारण्यांतील रामदर्शनाविषयीं उत्सुक असा एक महर्षि. ७. भृंग्यांच्या राजासारखी कांती आहे ज्याची असा म्ह. नीलवर्ण हें श्रीरामाचें विशेषण. ८. अगस्त्य. ९. पर्णशाळा. १०. खरराक्षसाचें सैन्य. ११. मुंगा म्हणजे मोठी अगर नरमुंगी. १२. रावणास. १३. राक्षसराजा. १४. स्वर्ण+एण=सोन्याचा हरिण. १५. मिषानें.

मोहीं, द्या चं म्हणे धरूनि दयिता, मागें दया[1]शेवधी,
लागे, राक्षस फार दूर पळतां सोडूनि आशे वधी. ॥ ५
मारी **रा** क्षस हाक, 'हा प्रियतमे ! हा **ल**क्ष्मणा !' यापरी,
**सी**ता निंदुनि [2]देवेरासि दवडी, तों तीस वैरी हरी; ।
दुष्टा भंगुनि सून सोडवुनियां सत्य प्रतिज्ञा करी,
तो गृध्रेश **ज**टायु कीर्ति गति ही युद्धीं वरी जी बरी. ॥ ६
[3]खड्गें **म** र्म जटायुचें **द**शमुख च्छेदूनि **लं**केप्रती
नेतां, वानर पांच पाहुनि [4]नगां टाकी; मग [5]क्षिप्रे ती ।
रक्षस्त्रींत **अ**शोकनामकवनीं श्री**जा**नकी ठेविली,
[6]देवेशप्रहितान्नलेश दिवशीं तें एकदा जेविली. ॥ ७
'बा! आ **ज** **क्षि**तिजा वनांत [7]उटजीं कां एकली सोडिली ?
त्वां माझी बहु जी मता सतत ती आज्ञा कशी मोडिली?' ।
सांगे **ल**क्ष्मण तद्रुक्त, [8]निलया धांवोनि ये **रा**म हा,
घोकी **श्री**विरहीं चकोरचि गमे मानी न [9]येरां [10]महां. ॥ ८
'हा [11]रा' **य** प्रवरात्मजे!' म्हणत जों सर्वत्र शोधी वनीं,
[12]तात व्याकुळ देखतां धडकला, शोकाग्नि त्याच्या मनीं; ।
सांगे तो पुसतां, **ज**टायु खग, 'म्यां केलें जरी धांवणें,
**सी**ता नेलिच हाय! मद्गति अशी केली खळें **रा**वणें.' ॥ ९
ऐसें [13]**ज** न्मलयौपमर्दिचरणा सांगोनि होय [14]व्यसु,
त्याचें उत्तरकार्य तो करि, म्हणे श्रीसत्सभा ज्या [15]वसु. ।
त्या देवीस पुन्हा हि **दा**शरथि तो शोधी वनीं हा वदे,
संताप **स्म**रतां क्षणक्षण तिचा तन्मानसा हाव दे. ॥ १०
जी स्वा **य** त्त करावया [16]**स्म**रवशा **रा**मानुजातें धरी
संभोगार्थ [17]अयोमुखी, बहु तिची ही दुर्दशा तो करी. ।
नासा कर्ण कुच क्षणांत [18]असिनें खंडी खळांचा अरी,
**क्रौं**चारण्य अतिप्रसन्न गमलें झालें तदा त्यावरी. ॥ ११

---

१. ठेवा. २. दिराला. ३. तरवारीनें. ४. अलंकार. ५. सत्वर. ६. इंद्रानें पाठविलेलें. ७. पर्णशाला. ८. घर. ९. इतर. १०. सुख. ११. रायप्रवर म्ह० राजश्रेष्ठ जो जनक त्याची कन्या. १२. बापासारखा. (जटायु.) १३. जन्म मृत्यु नाहींसे करणारे म्ह० मोक्ष देणारे चरण आहेत ज्या रामाचे त्याला. १४. मृत. १५. धन. १६. कामार्ता. १७. लोखंडासारखें काळें तोंड आहे जिचें ती. १८. तरवार.

आहा **रा** र्थ [1]**क**बंध योजनभुज क्रूर स्वभावें धरी,
बाहु च्छेदुनि सानुज प्रभु तया शापाकुळा उद्धरी;।
तो सांगे हित तें मनीं धरुनियां प्रेमें **म**तंगाश्रमीं,
भेटे श्रीशबरीस सत्कृति तिची घे तोष दे ती **श्र**मी. ॥ १२

[2]**पं**पा [3]**म** न्मथपावकास [4]धमनी झाली प्रभूच्या तदा,
त्यातें लक्ष्मण मेघ होय अथवा सद्वैद्य जैसा [5]गदा, ।
**श्रीरा**मेंचि **अ**रण्यकांड तिसरा थोड्यांत हा आणिला,
लीलेनेंचि भवप्रचंडवि[6]टपी ज्याच्या यशें खाणिला. ॥ १३

---

## किष्किंधाकांड.

(स्रग्धरावृत्त.)

तेथूनी **श्री** श जातां अनुज सह [7]नगा [8]ऋष्यमूकासि पाहे,
[9]त्रासे **सु**ग्रीव, धाडी स्व[10]सचिव **ह**नुमान् तेज त्याचें न साहे, ।
तो भेटे विप्रवेषें पुसुनि सकळ तद्वृत्त दोघांसि वाहे,
पृष्ठीं ने, भेटवी त्या, प्रभु करि कपिशीं सख्य संतोष लाहे. ॥ १

[11]**भूषा** दा **रा** त्यजी, त्या **प्र**भुसि [12]**सु**गळ तो दाखवी, बंधु बाहे,
नेणें कांहीं म्हणे, जें [13]नतिपरिचित हें [14]नूपुर स्पष्ट आहे. ।
**रा**म स्नेहें उरीं ते नग धरि भिजवी अश्रुंनीं, त्यासि बोधी
**सु**ग्रीव, 'त्वप्रियेतें हुडकुनि करितों भेटि मी स्वस्थ हो धी.' ॥ २

अत्युद्दा **म** प्रताप **प्र**भु कपिस म्हणे, 'जें तुझें इष्ट कार्य,
तें आधीं मी करीन, [15]प्रमुदित सखया ! सर्व होऊत आर्य. ।
**वै**राचा मुख्य हेतु प्रथम मज कथीं.' तो वदे, 'ऐक **रा**मा!
**मा**यावी नाम आला असुर धरुनि मद्बंधुच्या घात[16]कामा. ॥ ३

आम्ही ही **जँ** न्यकाम त्वरित उसळलों त्या वधाया [illegible]ाला,
भ्याला दोघांसि एक, त्यजुनि [17]समरधी **रा**घवा! तो पळाला. ।

---

१. श्रीगुरुरामायण—पृ० ३४० यांतील १० वी टीप पहा. २. सरोवरविशेष. ३. कामाग्नि. ४. फुंकणी. ५. रोग. ६ वृक्ष. ७. पर्वत. ८. पर्वतविशेष. ९. भिई. १०. प्रधान. ११. अलंकार. १२. सुग्रीव. १३. नमस्कार. १४. पैंजण. १५. आनंदित. १६. इच्छा. १७. युद्ध. १८. युद्ध.

लागे पाठीस वाळी द्रुत असुर बिळीं, जाय ठेवूनि दारीं
मातें, कीशेंद्र मागें खवळुनि शिरला बा! घनीं अंधकारीं. ॥ ४
सांगों का य प्रभो! तें निरुपम विवरीं लोटला एक अब्द,
रक्ताचा पूर आला अरिबळरव हि स्वाग्रजाचा न शब्द. ।
मी किष्किंधेसि शोकें रडत बिळमुखीं अद्रि ठेवोनि आलों,
मंत्र्याच्या आग्रहानें प्लवगपतिपदीं सिक्त आरूढ झालों. ॥ ५
वाळी वी रा प्रणी त्या निर्वटुनि सबळा स्वाहिता हर्ष लाहे,
येतां बाहेर रामा! न मज, बिळमुखीं ठेविला अद्रि पाहे, ।
क्षोभे फोडी नगातें अशनिशतदृढस्पर्शमुष्टिप्रहारें,
देखोनि स्वासनीं बा! अरि गणुनि मला हा त्यजि प्रेम सारें. ॥ ६
लागे सा म र्ष मागें, वध करिन म्हणे, धांवलों लोक सारा,
बा! म्यां केली क्षमा कीं प्रथमज नग हा तद्दुराधर्ष थारा, ।
वाळी मारूनि दुंदुभ्यसुर उडवि तैं या मतंगार्षि शापी,
'दूषी पुण्याश्रमा तो प्लवग खळ मरो येथ येतांच पापी.' ॥ ७
वैरा वी ज प्रभो हें, बळहि बहु असे, दों मुहूर्तांत संध्या
सर्वांभोधींत ज्याची, चिरसमय अशी हे प्रतिज्ञा न वंध्या. ।
लीलेनें झेलितो हा गुरु गिरिशिखरें या कसा मारिशील
नेणें मातें कसा तूं म्हणसि परि विपत्सागरीं तारिशील.' ॥ ८
जेणें जा य प्लवंगभ्रम विभु करि तें, सप्त शालद्रु भेदी,
वाळीशीं गांठि घाली प्रभु परि न वधी होय सुग्रीव खेदी; ।
कंठीं बांधूनि वल्ली पुनरपि समरा त्या सुकंठासि धाडी
ताडी राहोनि गुप्त प्रखरतर शरें कीशपा यासि पाडी. ॥ ९
निंदी सौ ज न्यसिंधुप्रति मग विनवी दे स्वपुत्रासि हातीं,
वाळी जाणे दया जी रघुकुळतिलकीं सर्वदा ती न तातीं. ।

१. सत्वर. २. वानरस्वामी वाली. ३. पर्वत. ४. वानर. ५. अभिषिक्त. ६. मारून. ७. वज्र. ८. सक्रोध. ९. दुंदुभीला मारून त्याचें शिर वालीनें फेंकिलें, तें मतंगऋषीच्या आश्रमांत पडलें. त्यावरून ऋषीनें शाप दिला कीं इतःपर वाली या आश्रमांत आल्यास तत्काल मृत्यु पावेल. याच आश्रमाचें स्थान ऋष्यमूक पर्वत. म्हणून तो वालीस दुराधर्ष होता. १०. वालीकडून मेलेला राक्षस. ११. सागर. १२. पर्वत. १३. वृक्ष. १४. सागर.

**कि**ष्किधाराज्य **ता**रा **प्र**भुवर **सु**गळा देउनि क्लेश वारी,
**सी**ताशोधार्थ धाडी बहु कपिपति तो[1] मेळवी सैन्य भारी. ॥१०
जे **तारे**[2] **य**, **स्व**[3]यंभूसुत, **प**[4]वनसुत प्रेषिले ते यमाशा[5]
शोधीं लंघूनि मासा धृतभय वरिति प्राण सोडूनि आशा ।
तों **सं**पाती तयांतें निरखित, दशना काळसा तोंड वासी,
**स्ने**हें शोची **ज**टायु व्यसु परिसुनि हें तो **म**हेंद्राद्रिवासी ॥११
सांगे, "**सू**[6]**रा** तितेजें अनुजसमवनीं[7] कीश हो! जो जळालों
तो येथें **श्री**निशाकृत्समभिधमुनिच्या आश्रमीं मीं गळालों ।
आज्ञा, दाहव्यथेतें हरि, करि 'वस तों या नगीं **रा**मभार्या
जी तच्छोध प्लवंगां कथ, फुटतिल हे पक्ष या साध कार्या.' ॥ १२
**सीता श्री म**त्प्रिया ती दिसति मज दिसे गृध्रदृक्[9] दूर पाहे,
जातां **लं**केसि मार्गीं कठिन नवति[10] दिग्योजनें[11] सिंधु आहे." ।
ऐसें सांगोनि गेला उडुनि, **प**वनभू **ऋ**[12]क्षपें सिद्ध केला;
**कि**ष्किधाकांड **रा**में लिहवुनि चवथा सर्व सिद्धीस नेला. ॥१३

---

## सुंदरकांड.

(शिखरिणीवृत्त.)

उडे वेगें **श्री**मान् **प**वनसुत दिग्योजनतनू,
गमे धन्वी[13] स्वामी, कपि शर, **म**हेंद्राचळ धनू; ।
शिरे[14] तुंडीं, व्योमीं[15] भरुनि, **सु**रसेचें मन हरी,
करी दृष्टि[16] स्पर्शे न बसुनि हि **मै**नाक शिखरीं. ॥
समुद्रीं घो **रा**[17] जी बसुनि उडतां सावलि धरी,
बळें ओढी ग्रासी **प**वनसुत तीचे असु[18] हरी. ।

१. सुग्रीव. २. अंगद. ३. ब्रह्मपुत्र. (वानरविशेष.) ४. मारुती. ५ दक्षिणदिशा. ६. सूर्य. ७. समवन=संरक्षण. संपाति हा आपल्या कनिष्ठ बंधूला (जटायूला) आपल्या पंखांच्या सांवलींत घेऊन सूर्यमंडलापर्यंत उडत गेला असतां त्याचे पंख जळून तो महेंद्रपर्वतावर पडला. तेथें चंद्रमा मुनीची गांठ पडून त्यानें पंख पुनः येण्याची पुढील युक्ति सांगितली. ८. चंद्र. ९. दृष्टि. १०. नव्वद. ११. दहा. १२. आस्वलांचा स्वामी. १३. धनुर्धारी. १४. सुरसा नामक राक्षसीच्या तोंडांत शिरला. मार्गे गुरुरामायण-पृ० ३४१ टीप १४ पहा. १५. आकाशांत. १६. मैनाकपर्वताला. १७. सिंहिकानामक राक्षसी. १८. प्राण.

सुखें पावे पारा, रजनिवदनीं[1] तों केलि[2] करी,
पथीं लंकादेवी, परि झटुनि ती भंगचि[3] वरी. ॥ २

शिरे लंके मध्यें दुडकि लघु होवोनि भवनीं,
अशेषीं पाहे श्रीप्रति मग अशोकाभिध वनीं, ।
तितें रात्रीं प्रार्थी दशवदन, ती धिक्कृति करी,
म्हणे[4] वृक्षीं, 'साध्वी प्रभुसि उचिता हे बहु बरी.' ॥ ३

स्तवी त्या राजश्रीप्रति, तिस सुविश्वासद वदे,
नमस्कारी जातां रजनिचर[5], मुद्रा[6] प्लवग दे, ।
कथी एकांतीं तो कुशल मग संदेश[7], मणि घे,
करूनि श्रीरामागमनविषयीं निश्चय निघे. ॥ ४

द्रुमध्वंसी यत्नें खचर[8]पतिसंपादित बळें
वधी युद्धीं अक्षा[9] दशवदनपुत्रास हि पळें, ।
धरूं दे ब्रह्मास्त्रें करुनि घननादा[10] मग बळें,
वदे भावी सर्व क्षय, वदवितां दापुनि खळें. ॥ ५

प्रदीप्त, क्रूरात्मा हंसुनि, करवी पुंच्छ[11]; सहसा
उडे, जाळी लंका, कपिवर करी भूसि सहसा[12]. ।
पुन्हा श्रीसीतेतें पुसुनि अचळीं[13] वेंघुनि उडे,
तळीं भूच्या भारें दडपुनि, जरी[13] तो गुरु, बुडे. ॥ ६

महाहर्षी मग्न प्लवग करि, भेटोनि कळवी,
खळांचीं तोंडें जें करुनि तरुभंगादि मळवी, ।
समुत्साहें ध्याले मधु[14] मधुवनीं भक्षुनि फळें,
वनाध्यक्षा त्या ही बहु दधिमुखा ताडुनि बळें. ॥ ७

पुढें ठाके, जल्पे[15] दधिमुख सुकंठा जवळि, तें
कपींचें सैन्य त्वन्मधु मधुवनींचें कवळितें. ।

---

१. निशामुख (सायंकाळ). २. भांडण. ३. पराभव. ४. 'पवनसुत' हा कर्ता. ५. राक्षस. ६. अंगठी. ७. निरोप. ८. पक्षी. ९. रावणपुत्रविशेष. १०. इंद्रजित्. ११. पुच्छ प्रदीप्त करवी—असा संबंध. १२. हास्ययुक्त. १३. अरिष्टाख्यलंकेतील पर्वत. सीताशुद्धि करून परत जातानां मारुतीनें या पर्वतावरून उड्डाण केलें तेव्हां तो भूमींत गेला तो गेलाच. १४. मद्य. १५. भाषण करी.

न कोपे, सांत्वी त्या, स्वभटकृतकृत्यत्व[1] कळलें,
म्हणे जा, येऊं दे, स्वबळ मज वाटे न मळलें. ॥ ८

महेशध्ये य श्रीचरण हृदयामाजि धरुनी,
त्वरेनें आले ते कपिभट महत्कार्य करुनी; ।
सुकंठा श्रीरामा अनुजसहिता वंदुनि उभे
पुढें ठेले ज्यांची स्मृतिसुरभि[2] सर्वेप्सित[3] दुभे. ॥ ९

प्रभूच्या कं ज श्रीहरपदयुगीं तो कपि कवी,
मणि स्थापी, हा तें परम सुख जें तोक पिकवी. ।
तया आलिंगी श्रीरमण, करि लोभा जनकसा,
नव्हे प्रेमें दास्या जपुनि सुयशोभाजन[4] कसा. ॥ १०

म्हणे, 'मीं का य त्वत्कृतसदृश देऊं तुज कपे!
ऋणी झालों आम्हीं दिनमणि[5]पुढें कोण न लपे!' ।
असें वर्णि प्रेमें प्रभु, बहुत लाजे सुकवि तो,
मरुत्पुत्र[6] ज्ञाता निजनुतिस यत्नें चुकवितो. ॥ ११

कथी विश्वा रा ध्या पवनसुत तो जोडुनि कर,
प्रियेच्या संदेशा, विनवुनि शशी सोडुनिकर[7]. ।
यशा लाजो तूतें विनविति पहा या सह सती,
पुसोनि प्रेमानें शिव तुज सहायास हसती. ॥ १२

निघावें त्या म त्ता वधुनि जिववाया स्वदयिता,
यशा रक्षीं, दुःखा द्रुत हरुनि नित्यातिशयिता. ।
स्वयें रामें कांड स्वगुणमय हा सुंदर महा,
सुखें केला पूर्ण प्रणतवरदें पंचम महा. ॥ १३

---

## युद्धकांड.

(शिखरिणी वृत्त.)

पुसे त्या वीरा श्री रघुपति, 'कसें वर्त्म[10] अरिचें,
कसें सैन्य, स्थान, प्रकृति[11]मत, साहित्य वरिचें, ।

---

१. धन्यता. सुग्रीवाच्या मधुवनांतच वानरांनीं वरील चैन केली होती. २. कामधेनु. ३. ईप्सित=इष्ट. ४. पात्र. ५. सूर्य. ६. मारुती. ७. नक्षत्रसमूहासह. ८. कुशल. ९. प्रिया (स्त्री). १०. मार्ग. ११. प्रजा, प्रधान.

कथीं सारें अन्या कठिन तुज तें सर्व सुगम,
जयश्रीच्या बा ! तूं रणनिपुण आहेसि उगम !' ॥ १
सुलग्नीं त्या वी रा रथ करि बसे अंगदरथीं,
सुमित्रेचा पुत्र, प्लवगबळ गर्जे बहु पथीं; ।
ससुग्रीव श्रीमान् जलधितट पावोन उतरे,
म्हणे त्या सिंधूतें प्रभुकटक गर्वे न उंत रे. ॥ २
न मानी जो सा म त्यजुनि नयधर्म स्मरवश,
तशा मत्ता त्यागी तदनुज, तया दे पद यश, ।
समुद्रातें त्रासी प्रभुवर महास्त्रें स्थळकरें,
तदुक्तें सेतूतें करवि शत गांवें नळकरें. ॥ ३
स्वयें रक्षोरा ज प्लवगबळ पाहे उतरलें,
हतौजा केला तो प्रथमचि सुकंठें सुंतरलें, ।
न मानी कांहीं तें परम हित जें अंगद वदे
तया श्रीमान्, जैसा वनगजकुळा भंग दैव दे. ॥ ४
प्रवीरांचा हो य क्षय, जरि पुन्हां ही पुर जळे,
तरी सीता द्याया परतुनि न तो दुर्मति वळे; ।
प्रभू दोघे बांधी घनरव, महीजाधृति गळे,
फणाभृत्पाशाप्रेव्यसन खगराजेक्षित टळे. ॥ ५
सुमित्रापुत्रो रा करुनि अरिशक्ति क्षत पळें,
वरी मूर्छेतें तो रघुतिलक धैर्या सह गळे, ।
खळातें लीलेनें विरथ करि, दे मार्ग, निघ रे !
म्हणे मागें जाय, द्रुत परिभवें शत्रु विघरे. ॥ ६
स्ववक्त्रीं जो हो म प्लवगकटकाचा करि धरी
कपीशा तो नासा श्रुतियुग जयाचें लघु हरी ।
फिरे क्रोधें त्यातें स्वयश विभु गाया चिर वधी,
सुख स्वर्गी झालें, असुख दशतुंडीं निरवधी. ॥ ७
घनध्वान स्वौ ज प्रकटि, विशिखांहीं बळ खिळी,
तदस्तब्रह्मास्त्र प्रभुसुगळतेजस्मृति गिळी; ।

१. सागर. २. माजूं नको. ३. रावण. ४. योजनें. ५. वानरविशेष. ६. निस्तेजक. ७. चंचल. ८. वणवा. ९. धैर्य. १०. सर्पपाश. ११. गरुड. १२. सैन्य. १३. कर्णद्वय. १४. अतिशय. १५. मेघनाद (इंद्रजित्). १६. आपलें तेज. १७. बाण. १८. त्यानें सोडलेलें.

महात्मा ऋक्षेश स्तुत वर यशें सर्व निववी,
मरुत्पुत्र स्वौषध्य[1]गशिखर आणूनि जिववी. ॥ ८
वधाभासें हा य प्रभुसि जलदध्वान वदवी,
रणीं दावी त्याला अनुज विभुचा मृत्युपदवी. ।
महीजा माराया कुमति सुतशोकें धरि [2]असी,
[3]सुपार्श्वे त्या केली फिरवुनि परें कीर्ति न असी. ॥ ९
पुन्हा रक्षोरा ज प्रहितखरशक्तिक्षत बरा
वि[4]भुभ्राता केला, पवनतनयें आणुनि घरा, ।
शिरश्छेदें भागे प्रभु बसुनि ही [5]वासवरथीं;
मथी त्या जैं सांगे मुनि [6]मनु म्हणे भास्कर मथीं. ॥ १०
दश[7]आस्याचा का य प्रभुतिलक संस्कारवि बळें,
पदीं त्याच्या भ्राल्या बसवि अभिषेचून सुजळें, ।
करी देवी दि[8]व्य त्रि[9]दशपितृवाक्यें मग तितें
भजे, मेल्यां [10]कीशां उठवुनि वरी कामगतितें. ॥ ११
सखे ते घे ता रा मुख कपिव[11]धू ही शुभरता,
भरद्वाजा भेटे, निववुनि गुहा, [12]आशु भरता, ।
सुलग्नीं स्वीकारी पितृपद, करी राज्य बरवें,
प्रजा मोही गातां कुशळ, हरिणां तेंवि न [13]रवें. ॥ १२
नवांभोदश्या म स्मरशतसहस्राधिक[14]रुची,
स्वनामें सर्वार्थप्रद करि, यशें जो जग शुची, ।
तया रामें कांड श्रवणहित युद्धाख्य [15]रुचिर
स्वयें केला पूर्ण, प्रणत सुखवायास सुचिर. ॥ १३

---

१. अग=पर्वत. २. तरवार. ३. पाठविलेली, सोडलेली. ४. रावणाच्या सचिवांतील एक. ५. इंद्र. ६. मंत्र. ७. मुख. ८ अग्निप्रवेशरूप दिव्य. ९. देव व बाप यांचे सांगण्यावरून. १०. वानर. ११. स्त्रिया. १२. सत्वर. १३. शब्द. १४. कांति. १५. सुंदर.

## उत्तरकांड.

(स्रग्धरा वृत्त.)

सांगे **रामा** कथा **श्री घ**टज सुत **पु**लस्त्यर्षिचा **वि**श्रवा, या
आद्या **वि**त्ते[2]शमाता विमळमति **भर**द्वाजपुत्री सुजाया, ।
राजा झाले **द**शास्यप्रमुख सुत तिघे त्या दुजा **के**कसीतें,
उग्रत्व **ब्रह्म**दत्तें **द**शवदनिं वरें होय जें ऐकसी तें. ॥ १

आधीं **लं**कापहा **रा** करुनि, [3]गुरुसि दे ताप जिंकूनि पापी,
त्याच्या घे [4]**पु**ष्पकातें, [5]**द्र**विणपति तसा तोहि [6]**नं**दीश शापी. ।
बाहू **कै**लासमूळीं रगडि, विनवितां [7]**आ**शुतोषेश सोडी,
पावे तैं **राव**णाख्या **द**शमुख, न वधी त्यासि जो हात जोडी. २

जीतें झोंबे सका **म** त्यजुनि विनय तो केवळ क्रूर पापी,
जन्मेन त्वद्वधा मीं [9]गुरुतनयसुता ती असें त्यासि शापी,
आत्मा वन्हींत होमी; तदुपरि खिजवी त्या **म**रुत्ता हि राजा,
त्यातें [10]**सं**वर्त्तवारी, वधि [11]मखमिलिता सन्मुनीच्या समाजा. ३

मद्वंशोत्पन्नते **ज** स्विवर**द**शरथापत्य**रा**मप्रतापें,
युद्धीं होशील भस्म स्वजन सह महादुर्मदा तूं स्वपापें, ।
ऐसें शापी महात्मा नरपति [12]**अ**नरण्याख्य, [13]**दि**क्कंठ पाडी
ज्यातें पाणिप्रहारें, न गणुनि हृदयीं वाक्शरांनींहि ताडी. ॥ ४

घाता **काळ** स्वकी **य** [14]**प्र**हरणवर घे, त्यासि [15]वारी [16]**वि**धाता,
जिंकी **स**र्पेश्वराचें पुरं, **म**णिपुर जें होय त्यातें हि जाता; ।

---

१. अगस्त्य. २. कुबेराची माता म्हणजे विश्रवस्याची ज्येष्ठ पत्नी देववरवर्णिनी. ३. वैश्रवण अथवा कुबेर नामक वडील सापत्न भ्राता. ४. विमानविशेष. ५. कुबेर, ६. शिव. ७. लवकर प्रसन्न होणारा शिव. ८. नांव. शंकरांनीं लीलेनें दाबल्यामुळें पर्वताखालीं सांपडल्याकारणानें दशमुखानें अतिभयंकर शब्द केला म्हणून त्यास शिवानेंच 'रावण' असें नांव दिलें. ९. बृहस्पति-पुत्र-कन्या. वेदवती ही नारायण नवरा मिळावा म्हणून तप करीत असतां रावणानें कामातुर होऊन तिला स्पर्श करितांच तिनें अग्निप्रवेश केला व रावणवधार्थ सीता झाली. १०. मरुत्त राजाचा यज्ञ चालविणारा ब्रह्मर्षि. ११. यज्ञाकरितां जमलेल्या महर्षींस वधी. १२. सूर्यवंशीय राजा. १३. दशमुख. १४. आयुध. १५. यमाचें व रावणाचें बराच वेळ युद्ध झाल्यावर यम अखेरीस आपल्या अमोघ अशा कालदंडानें रावणास मारणार तों ब्रह्मदेवानें मध्यें येऊन आपला वर व्यर्थ होऊं नये म्हणून यमास दंड परत घेण्यास लाविलें व

ब्रह्मा सांगे निवातोत्तर[1] कवच बळी सख्य यांशीं कराया,
आरंभी काळकेयां[2] सह रण भगिनीप्राणनाथा[3] मराया. ॥ ५
ऐके सत्यस्थ नी रा धिप वरुण असें, तत्सुतांतेंचि[4] मोडी,
जीच्या दुग्धाब्धि दुग्धें, निरखुनि सुरभी[5] तो[6] तितें हात जोडी, ।
पाहे ज्या रम्यरूपा दशमुख हरि त्या देवराजर्षिकन्या,
त्यां तैं हो स्त्रीनिमित्तें तव वध म्हणति क्रोध पावोनि धन्या.[7] ॥६
ऐके लंकेंत धा म प्रचुर मिळविलें मेघनादें तपोनी,
ब्रह्मादीशांसि भावें भजुन बहु महा यज्ञकर्मी जपोनी; ।
बाळा[8] कुंभीनसी ही उडविलि मधुनें स्वस्वसा, हें हि कोपें,
संगें अक्षौहिणी[9] घे खयुगशतमिता लोक ज्या सर्व सोपे. ॥७
दैवें आश्चर्य ओ[10] ज स्वि मधु सह घडे सख्य, रंभा बळानें
भोगी, भ्रातृव्य[11] शापी बळेरति[12] करितां या मरावें खळानें[13] ।
देवांशीं युद्ध होतां घनरव धरि ने शक्र लंकेसि, गोडी
ब्रह्मा त्याशीं करी, दे वर मखज रथा मृत्यु तेव्हांचि सोडी. ॥८
त्या हीं बांधोनि हा य व्यसु[14] वर म्हणवी अर्जुन[15] क्षोणिपाळ,[16]
रोधी कक्षेंत वाळी प्लवगपति हि जों अंबुधिस्नानकाळ. ।
सेवी श्रीमारुतीचें चरित, शिशु उडे जो फळ ब्रघ्न[17] मानी,
पाडी वज्री[18] हि कोपे पवन चुकवि ती आत्मभूप्राणहानी. ॥९

---

दोघेही अंतर्धान पावले. तेव्हां आपला जय झाला अशी कल्पना करून रावण परतला. १६. ब्रह्मा. १७. वासुकी नागराजाची भोगवती नगरी.

१. निवातकवच नामक मणिपुरांत राहणारा बलाढ्य दैत्य. २. अश्माख्य नगरीचा कालेय नामक अधिपति. ३. बहिणीचा नवरा विद्युज्जिव्ह. ४. वरुणपुत्रांचा पराभव करी. ५. कामधेनु. ६. रावण. ७. त्या (देवराजर्षिकन्या) धन्या क्रोध पावोनि स्त्रीनिमित्तें तव वध हो (असें) तैं म्हणति. ८. रावणाची मावसबहीण. ९. अक्षौहिणी=२१८७० रथ, २१८७० हत्ती, ६५६१० घोडे आणि १०९३५० शिपाई (पदाति) इतक्या समुदायाची सेना. खयुगशत=(ख=०, युग=२, शत=१००) दहाहजार. १०. तेजस्वी. ११. रावणाचा वडील सापत्न बंधु जो कुबेर त्याचा पुत्र व रंभेचा पति नलकूबर. १२. इच्छेविरुद्ध संभोग. १३. रावणानें. १४. मृत. १५. कार्तवीर्य. १६. भूपति. १७. सूर्य. १८. मारुती सूर्यबिंब धरण्यास गेला तेव्हां राहूही सूर्यबिंबाचा ग्रास करण्यास आला होता. त्यालाच मारुतीचा हात लागला, तेव्हां तो रागावून इंद्रास म्हणाला, 'यथाकालीं क्षुधा निवारणार्थ चंद्रार्करूप अन्न त्वां मला दिलें असून आज तें दुसऱ्यास कां दिलेंस?' तेव्हां इंद्रानें रागावून

प्रेषी पूजूनि [1]रा ज द्वय, पवनसुता सद्वर श्रीश अर्पी,
निंदा ऐकोनि सीता त्यजि, [2]लवणवधें सद्यशें विश्व तर्पी, ।
शूद्रा मारी, द्विजाचा मृत सुत उठवी, श्वेत सत्कीर्ति सेवी,
[3]काव्यज्ञ स्वाश्वमेधीं कुश लव सुत दे, जाय भूमींत दे[4]वी. ॥ १०

आठां पुत्रांसि दा[5] य प्रभु सदयचि दे आठ राज्यें तदा ते,
काळें केले सुबंधु त्यजवुनि विरस श्रीश जाया पदातें, ।
[6]श्वोल्ढकन्यायकर्त्ता परम सदयधी आणवी भक्त सर्व,
प्रेमें सांत्वी प्रजांतें प्रिय करि नुरवी काम तो जेंवि शर्व. ॥ ११

सर्वा जीवांसि धी रा सुलभ सुगति दे, ने प्रजा गो[9]प्रतारीं,
तीर्थीं स्नातां विमानीं बसवि, वसवि सं[10]तानकीं लोकसारीं, ।
झाले दिव्यस्वरूप प्लवग कि[11]टि[12]खरश्वानमार्जारदेही,
त्या पर्वी पावले ती गति, खनि स[13]रयू, कीट जे धन्य ते ही. १२

जो ठेवी भक्तना म प्र[14]णतसमवना जाय वैकुंठलोका,
श्रीमद्वाल्मीकिगीत स्वयश हि सकळा संहरायासि शोका, ।
त्या रामें उत्तराख्य द्रवुनि लिहविला सातवा कांड हा कीं,
जे प्रेमें सेवितील स्तवितिल अमृत प्राशिते त्यांसि नाकीं. ॥

---

वज्रप्रहारानें मारुतीची हनुवटी भग्न केली व तो खालीं पर्वतावर पडला. हें वायूनें पाहून सर्व जगांतील प्राणवायूचा निरोध केला. त्यामुळें सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले व सगळेजण मिळून मारुती पडला होता तेथें गेले. ब्रह्मदेवानें मारुतीस पूर्ववत् केलें व पुढील जरूरी लक्षांत आणून अनेक वर दिले. १९. इंद्र. २०. पुत्र.

१. जनक आणि केकयपति युधाजित्नामक मातुळ. २. राक्षसविशेष. ३. वाल्मीकि. ४. सीता. ५. रामपुत्र लव व कुश यांची अनुक्रमें कोसल आणि उत्तरकोसल येथें स्थापना केली. लक्ष्मणपुत्र अंगद व चंद्रकेतु यांनीं कारुपथदेशांत अनुक्रमें अंगदीय व चंद्रकांत नगरींत स्थापिलें; भरतपुत्र तक्ष आणि पुष्कल यांची गंधर्व देशांतील तक्षशिला व पुष्कलावतनामक नगरींत योजना केली; आणि शत्रुघ्नपुत्र सुबाहु व शत्रुघाती यांना अनुक्रमें मधुरा व वैदिश नगरी दिल्या. ६. वांटा. ७. कुत्रा. ८. घुबड. ९. तीर्थविशेष. १०. संतानकरूप स्वर्गलोकीं. ११. डुकर. १२. गाढव. १३. त्याकाळीं जो जो प्राणी सरयूजलांत स्नान केला त्यानें त्यानें स्वर्गारोहण केलें. १४. रक्षण.

## उपसंहार.

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

जो अत्यद्भुत साधुगीत महिमा गंगाप्रवाहीं वसे,
प्रेमें स्वल्प कुपींत गांग[1] भरिलें जें त्यांत ही तो असे; ।
श्रीरामायणवर्तिसत्सुकृत या ग्रंथांत आहे तसें,
श्रीरामप्रियभक्त साधु रसिक स्वांतांत पाहे रसें. ॥ १
भावें वंदुनि रामचंद्रचरणीं म्यां ग्रंथ हा वाहिला,
कीं याचि प्रभुनें प्रपन्न[2] जन जो तो बंधुसा पाहिला, ।
उच्छिष्टें बदरें[3] महामखपुरोडाशाधिकें लक्षिलीं,
ताराया शबरीस, साधु म्हणती, अत्यादरें भक्षिलीं. ॥ २
श्रीरामायण सर्व साधुमतिस स्त्रीधीस माहेरसें,
कीं हो प्राकृत संस्कृत प्रियचि तें पाहोनि पाहे रसें, ।
जो ऐसा प्रभु त्या जना न विचकूं दे दांत, बाहे, रहा
वैकुंठींच म्हणे, प्रसन्नचि सदा ही आंत बाहेर हा. ॥ ३

(स्रग्धरा वृत्त.)

स्तन्य[4] स्वस्थ प्रसूचें सकळहि करितांना च आ बाळ लाहे,
वार्ता कोणी न मानी कुशळ सुरभिचा वत्स आबाळला हे, ।
प्रेमें पाळी कधीं ही निज गुण न म्हणे माय गा ! बाळकाला,
व्हावाचि श्रीधरास प्रिय बहु जरि हा ग्रंथ गाबाळ काला. ॥ ४

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

मानील प्रभु रामभद्र हृदयीं या तोक विप्रा कृत,
ग्रंथा वानिल, तो म्हणेल न वृथा गातो कवि प्राकृतें,[5] ।
ऐसा नित्य अति प्रसन्न दुसरा दाता न दीनावरी. ।
ज्याची पादभवा[6] हि इष्टवरदा[7] हाता नदी नावरी[8]. ॥ ५

(शिखरिणी वृत्त.)

जशी देवा सेवा स्तुति बहु रुचे, साधु वदती,
नसे अन्या धन्या, मिळवुनि न दे क्षिप्र पद ती, ।

---

१. गंगेचें पाणी. २. पीडित. ३. बोरें. ४. स्तनांतलें दूध. ५. गुणाकडे न पाहतां केवळ प्राकृत म्हणून नाक मुरडण्याची मूढ जनरीति कालिदासाच्या वेळेपासून तों मोरोपंतापर्यंत सारखीच दिसते. 'पुराणमित्येव न साधु सर्वम्' इत्यादि कालिदासोक्ति सुप्रसिद्धच आहे. ६. पायापासून उत्पन्न झालेली. ७. हें नदीचें विशेषण. ८. हाता न आंवरी=देण्यासाठीं हात पुढें करी.

सदा नव्यें [1]भव्यें प्रभुयशचि दे, देति [2]सेव ते
फळें [3]आमें, नामें प्रभुचि न असे यज्ञ [4][5]सेवते. ॥ ६
सदां गावें सीतारमणयश हा योग बरवा,
रवा या साधी जो जन धरि पराची न परवा; ।
रवा नामाच्या भी भव, कलिकथा काय? गमला
मला न श्रेष्ठा ही गुरु म्हणुनि [6]देवर्षि रमला. ॥ ७

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

'गावें रामचरित्र सादर सदा [7]म्यां' हा वराया वर
श्रीरामप्रियभक्त हो! विनवितों प्रेमा करा यावर; ।
जैसा [8]वारिद चातका परि [9]सुधेचा त्या [10]खगा [11]आकर
युष्मत्सद्गुण ही तसा म्हणतसे [12]रामात्मजा [13]आ कर. ॥ ८
नामातें प्रभुच्या मयूर विनवी, चित्ता भरीं या भरीं,
**'श्रीरामायण'** गाइलें तरि पुन्हा गावेंचि ऐसें करीं, ।
पापाचा परिहार फार बरवा व्यापार हा साधुनी,
गावायासि सदैव या [14]मम मुखीं [15]बापा! रहा साधुनी. ॥ ९

---

## ७३. [16]ओवीरामायण.

[17]आर्या ओवींत दिसे, ओवी आर्येंत पाहतां नीट, ।
'हरिहरगुणसे सद्रस हे रसिका सेवितां नये वीट. ॥ १

---

१. कल्याणें. २. यश. ३, कच्चें, अपक्व. ४. वेगळे. ५. रामनाम शब्दाला ६. नारद. ७. मोरोपंतानें. ८. मेघ. ९. अमृत. १०. पक्षी. ११. खाण. १२. रामचंद्रपुत्र मोरोपंत. १३. तोंड पसर. १४. मोरोपंताच्या. १५. हे बापा नामा. १६. पुढील (२–१६) पद्यांत पंतांनीं आर्या व ओवी हे दोन्ही छंद साधले आहेत. ओवीच्या प्रत्येक चरणास समजण्यासाठीं । हें चिन्ह केलें आहे त्यावरून ओवी समजावी. संस्कृतांत जसा अनुष्टुप् छंद सुलभ आहे तसाच प्राकृतांत ओवीछंद फार सुलभ आहे. ओवीच्या तीन चरणांस यमकें असतात पण चौथ्यास तें नसतें. ओवींत पहिल्या तीन चरणांत आठ आठ अक्षरें असावीं व चौथ्यांत सात अक्षरें असावीं असा मुख्य नियम आहे; परंतु शब्दार्थांच्या अनुरोधानें कवि अधिक उणीं अक्षरें घालतात. १७. आर्या हा शब्द आर्येच्या सर्व प्रकारास सामान्यत्वानें लावितात, तथापि वास्तविक हा मात्रागणवृत्तापैकीं गीतिच्छंद आहे. गीतीचें लक्षण—पहिल्या व तिसऱ्या चरणांत बारा बारा मात्रा आणि दुसऱ्या व चवथ्या

वाणी[1] देवी चित्तीं भावें । ध्यावी सदैव वानावी ।
नांवें । अघ हरि[2], ईचें गावें । यश हेचि माय मानावी. ॥ २
वंदुनि सरस्वतीला ध्याती । कुलदेवतेस कवि सर्व ।
गाती । निजपूर्वक गुरुमूर्ति । हरि गुरु[3] तथैव कवि[4] शर्व[5]. ॥ ३
कैलासीं नगतनया[6] निज- । पतिची[7] प्रार्थना करुनि बोले ।
गुज । कांहीं सांगा जी मज । ऐसें ऐकतांचि हर डोले. ॥ ४
सीताकांता[8]! मेघश्यामा! । हा दीन दास लक्षावा ।
रामा! । अनुदिनिं वदनीं नामा । वसवोनि नित्य रक्षावा. ॥ ५
हरिली त्वां गाधिजमखपीडा[9] । रामा! दिली खल जनातें ।
व्रीडां[10] । सन्मुनिमानसखगनीडा[11] । सुख दिलें सुरमनांतें. ॥ ६
उद्धरिली ती गौतमभार्या । छळिली तपस्विवक्रानें[12] ।
जी आर्या । सर्वसतीजनसत्कार्या[13] । जपोनि[14] शक्रानें. ॥ ७
हरिलें खंडुनि ईश्वरचाप[15] । श्रीजनकनंदिनीचित्त[16] ।
ताप । हरुनि जग केलें निष्पाप । सुहृष्ट सत्तपोवित्त[17]. ॥ ८
क्षोभे भृगुराम[18] महाशूर । सदोद्दाम[19] अस्त्रशस्त्रबळें ।
क्रूर । तयाचा केला त्वां दूर । क्रोधेंसह[20] अधर्म पळें. ॥ ९

---

चरणांत अठरा अठरा मात्रा असतात. १८. हरिहर म्हणजे विष्णु आणि शिव या दोघांच्या गुणांप्रमाणें. येथें हरिहर हा शब्द घालून पंतांनीं वरील आर्या व ओवी यांचें मिश्रण ध्वनित केलें आहे. 'शिवस्य हृदयं विष्णुः विष्णोश्च हृदयं शिवः,' तसेंच 'अर्धं दानववैरिणा गिरिजयाप्यर्धं शिवस्याहृतम्' या चरणानेंही हरिहरांचें ऐक्य स्पष्ट आहेच.

१. सरस्वती ही देवता. २. विष्णु. ३. बृहस्पति. ४. शुक्राचार्य. ५. महादेव. ६. पार्वती. ७. महादेवाची. ८. हें कवीचें म्हणणें आहे. ९. विश्वामित्राच्या यज्ञाची पीडा (राक्षसांनीं दिलेली). १०. लाज. ११. श्रेष्ठमुनींच्या मानसरूप पक्ष्याचें कोटेंच (जसें कांहीं) अशा. (हें संबोधन आहे.) १२. तपश्चर्या करणारांविषयीं कुटिलपणा धरणाऱ्यानें. हें 'शक्रानें' याचें विशेषण. प्राकृतांत विशेष्य सविभक्तिक झालें असतां विशेषणाचें सामान्यरूप करण्याचा नियम आहे. परंतु कोठें कोठें संस्कृत पद्धतीस अनुसरून कवि विशेष्यविशेषणांची एकच विभक्ति ठेवितात. येथें 'तपस्विवक्रा शक्रानें याच्या ऐवजीं 'तपस्विवक्रानें शक्रानें' असा प्रयोग केला आहे. १३. सर्व पतिव्रता स्त्रीजनांनीं सत्कार करण्यास योग्य अशी (अहल्या). १४. गौतम घरीं नाहीं अशी संधी साधून. १५. महादेवाचें धनुष्य. १६. सीतेचें चित्त. १७. चांगली तपश्चर्या हेंच आहे वित्त ज्यांचें ते (ऋषी). १८. परशुराम हा ब्राह्मण असून क्षात्रकर्म करी हाच अधर्म. आतां परशुरामाची रामाशीं गांठ पडल्यानंतर तो तपश्चर्येस गेला. १९. सदा+उद्दाम. २०. क्रोधसह अधर्म त्वां पळें दूर केला—असा अन्वय.

ताताचा सत्यव्रत[1] धर्म । त्वां रक्षिला त्यजुनि राज्य ।
शर्म[2] । सुदुष्कर केलें कर्म[3] । स्वीकारुनि श्रम प्राज्य[4]. ॥ १०
पाखंडजनें[5] जैसी गीता । रात्रिचरेश्वरें हरितां ।
सीता, । तव[6] मतिनें, हे ज्वरभीता । जनविडंबनाकरितां[7], ॥ ११
त्या सख्य माकडासीं[8] केलें, । सिद्धीस जडहि[9] तत्कार्य[10] ।
नेलें, । सुयश दिगंतीं जें गेलें । तें त्रिलोकसत्कार्य[11]. ॥ १२
रचिला सेतु समुद्रीं मोठा । संहार[12] करुनि बळसहित ।
पोटा[13] । काळाच्या अतितर खोटा । ओपिला तुवां अहित[14]. ॥ १३
दिधली बिभीषणाला लंका । मग दिव्य[15] करुनि ती देवी ।
अंका[16] । क्षाळुनि, निरसुनि शंका[17] । लोकांत शुद्ध यश ठेवी. ॥ १४
भक्त भरत हर्षविला, राज्य । करुनियां दिलें प्रजांसि सुख ।
प्राज्य । यशा[18] या कविचें, सौज्य[19]-। सिता पायसाहि[20] घे न मुख. ॥ १५

---

१. सत्यरूप पुण्यसाधनधर्म. २. राज्य आणि शर्म (सुख) हीं 'त्यज' धातूचीं कर्में. ३. राक्षसवधादि सुदुष्कर कर्म. ४. पुष्कळ. ५. वेदविहित धर्म लोकांचें रक्षण करतो म्हणून त्याचें नांव 'पा'; 'पा'चें खंडन म्हणजे उच्छेदन करणारा असा जन तो पाखंड जन, त्यानें.—वेन राजाचा मुलगा वैन्य म्हणजे पृथु याचा १०० वा यज्ञ चालू असतां इंद्रानें निरनिराळीं कपटरूपें धारण करून त्याचा यज्ञाचा घोडा हरण्याचा यत्न केला. त्या प्रकरणांतील पुढील पद्यें विचार करण्यासारखीं आहेत.—'यानि रूपाणि जगृहे इंद्रो हयजिहीर्षया । तानि पापस्य खंडानि लिंगं खंडमिहोच्यते ॥ २३ ॥ एवमिंद्रे हरत्यश्वं वैन्ययज्ञजिघांसया । तद्गृहीतविसृष्टेषु पाखंडेषु मतिर्नृणाम् ॥' (भागवत–चतुर्थ स्कं० अ० १९). तसाच एतद्विषयक आणखी एक श्लोक आहे तो असा.—'पालनाच्च त्रयीधर्मः पाशब्देन निगद्यते । खंडयंति तु तं यस्मात् पाखंडास्तेन कीर्तिताः ॥'. ६. हे ज्वरभीता (संतापानें भ्यालेली) सीता रात्रिचरेश्वरें (रावणानें) हरितां, तव मतिनें जनविडंबनाकरितां त्या माकडासी सख्य केलें—इत्यादि अन्वय. येथें ११ व १२ या गीतींचा अन्वय परस्परसंबद्ध असल्यामुळें हें युग्म आहे. ७. लोकरीतीचें अनुकरण करण्यासाठीं. ८. सुग्रीवाबरोबर. ९. दुष्कर. १०. त्याचें वालिवधरूप कार्य. ११. त्रैलोक्यांतील लोकांनीं सत्कार करण्यास योग्य. १२. 'संग्राम' असा अन्य पाठ आहे. १३. काळाच्या पोटा ओपिला, म्ह० मृत्यूला खावयास दिला. १४. शत्रु (रावण). १५. सीतेचें अग्निशुद्धिरूप दिव्य. १६. कलंकास. १७. लोकांचा सीतेच्या पातिव्रत्याविषयींचा संशय. १८. कविचें मुख या यशा घे, साज्यसिता पायसाहि न (घे)–असा अन्वय. १९. स+आज्य+सिता=तूप आणि साखर यांनीं युक्त अशा. २०. खिरीस.

नेली[1] प्रजा निजोत्तमलोका, । रामा ! हरोनि मोक्षभवा ।
शोका । तूं जपसि नता तोका[2] । जसि माय करुनि लोभ, नवा. ॥१६

'ओवीरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें ।
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ॥ १

## ७४. घनाक्षरीरामायण[3].

(घनाक्षरीवृत्त.)

श्रीरामाच्या नामें पाप । नाशे, भंगे सारा ताप, ।
ऐसा अन्याचा प्रताप । कोणाहि मंत्रीं नसे. ॥
घेतां श्रीरामाचें नाम, । लाभे श्रीवैकुंठीं धाम[4], ।
होती सिद्ध ध्यातां काम[5], । इच्छा न स्वल्पा वसे. ॥
सिद्धी[6] सर्वा दासी स्पष्ट, । विघ्नस्वांतीं[7] मोठे कष्ट, ।
षड्वैरी[8] ते स्थानभ्रष्ट, । धाकें वांचावे कसे ? ॥
नामीं निष्ठा होतां मात्र, । व्हावें स्वःसत्कारा[9] पात्र, ।
शक्रादि स्वर्गस्थ छांत्र[10], । जैसे आचार्या[11] तसे. ॥
श्रीसूर्याच्या वंशीं भूप । दशरथ सिंधु[12] धर्मरूप, ।
तदन्य कासारादि[13] कूप[14] । तैसे राजे वाटती. ॥

---

१. रामा! शोका हरोनि, मोक्षभवा (मोक्षानें मिळणाऱ्या) निजोत्तम लोका (वैकुंठास) प्रजा नेली; माय नवा तोका (नवीन मुलाला) लोभ करुनि जपे (तसा तूं जपसी.) २. मुलाला. ३. हें काव्य घनाक्षरी नामक छंदांत रचिलें आहे म्हणून यास 'घनाक्षरीरामायण' असें नांव दिलें आहे. घनाक्षरी हा छंद ओंवीप्रमाणेंच आहे, परंतु यास सोळा चरण असतात; चार चरण मिळून एक पाद होतो. तीन चरणांस यमकें असतात व चारी पादांस यमकें असतात. यांत पहिल्या तीन चरणांत आठ आठ अक्षरें व चौथ्या चरणांत सात अक्षरें असतात. पहिल्या तीन चरणांत बारा मात्रा व चौथ्या चरणांत अकरा मात्रा असाव्या असा सामान्य नियम आहे. ४. घर, ठिकाण. ५. मनोरथ. ६. अणिमा, महिमा, गरिमा इ० आठ सिद्धि. ७. विघ्नांच्या मनांत. एथें विघ्नांच्या ठिकाणीं चेतनगुणारोप (Personification) केला आहे. ८. सहा शत्रु—काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर. ९. स्वर्गींतील मानास. इंद्रादि देव बृहस्पतीला शिष्यत्वानें जो मान देतात त्यास हा पात्र होतो. १०. शिष्य. ११. गुरूला. १२. समुद्र. १३. कासार+आदि=सरोवर इत्यादि. १४. विहीर. एथें दोन चरणांत, दशरथ

तो श्रीवसिष्ठाचा [1]याज्य । अयोध्येंत करी राज्य, ।
प्रजांसि दे सुख [2]प्राज्य, । शत्रु उरीं फाटती. ॥
शौर्यौदार्यादि उदार । ज्याचे श्रेष्ठ गुण फार, ।
सुधारसाहुनि सार, । त्रैलोक्यांत दाटती. ॥
ज्याच्या यशें साधु तुष्ट । [3]तेजें [4]नम्रग्रीव दुष्ट, ।
[5]अर्थी नाहीं झाले रुष्ट । कीं कामना आटती. ॥ २
[6]प्रजावनीं जाय काळ, । वृद्ध होय धरापाळ, ।
[7]संतानचिंताग्निज्वाळ । तप्त करी त्या सदा. ॥
सुमंत्र सचीव युक्त । [8]सनत्कुमाराचें [9]उक्त, ।
सांगे होय आधिमुक्त । [10]रघुराज तो तदा. ॥
यथाविधि [11]हयमख । करी [12]शतक्रतुसख, ।
उरों दे पहायास [13]ख । न विमानसंपदा. ॥
अग्नि दे पायसपात्र, । भूप रोमांचितगात्र, ।
[14]पाहे योग्य नतिमात्र । [15]ऋष्यशृंगाच्या पदा. ॥ ३

---

हाच सिंधु, हा रूपकालंकार आहे. जेथें उपमान आणि उपमेय यांचा अभेद वर्णिला असतो तेथें रूपकालंकार होतो. तसेंच इतर राजे यांस कासार व कूप यांची उपमा देऊन आणि वर्ण्य जो दशरथ त्यास सिंधूची उपमा देऊन त्यांच्यापेक्षां याचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. म्हणून पथें व्यतिरेकालंकारही आहे.

१. यजमान. २. पुष्कळ. ३. पराक्रमानें. ४. खालीं मान वांकविलेले, शरण आलेले. ५. याचक. ६. प्रजा+अवन=प्रजांचें रक्षण करण्यांत. ७. अपत्यचिंतारूप अग्नीची ज्वाळा. ८. सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र असून ब्रह्मवेत्ते होते. ९. वचन. सूर्यवंशांत उत्पन्न झालेल्या दशरथराजानें लोमपाद नांवाच्या राजाकडून त्याचा जांवई ऋष्यशृंग यास बोलावून आणून पुत्रकामेष्टि केली म्हणजे त्यास चार पुत्र होतील, असें सनत्कुमाराचें वचन आहे. (वाल्मीकिरामायण–बालकांड–सर्ग११). १०. दशरथ. 'रघुराज' हा कर्मधारय समास आहे. रघु म्हणजे लक्षणेनें रघुकुलोत्पन्न असा राजा. ११. अश्वमेध–ज्यांत घोडा हा मुख्य पशु असतो असा यज्ञ. १२. शत+क्रतु+सखा=इंद्राचा मित्र, दशरथ. १३. आकाश, अवकाश. विमानसंपदा (अगणित विमानें) पहायास ख न उरों दे–असा अन्वय. १४. ऋष्यशृंगाच्या योग्य पदा नतिमात्र (नमस्कार करीत असतां) पाहे–असा अन्वय. १५. ऋ-ष्यशृंग हा, दशरथाची शांता या नांवाची मुलगी होती, ती लोमपाद राजास दत्तक दिली होती, तिचा नवरा. हा एक ऋषि होता.

पायसीं प्रवेशे अज[1], । जेणें उद्धरिला गज[2], ।
ज्याचें पादपद्मरज । दुर्लभ विधातया[3]. ॥
दिव्यान्नाचे तो विभाग । तिघींस दे महाभाग[4], ।
ज्याच्याठायीं सानुराग[5] । त्या जोडिती हात या. ॥
गर्भवती होतां काय[6] । पाहे सुप्रभ, न माय ।
हर्ष विश्रांत, न राय । लावी पातें पातया. ॥
झाले तयांचे दोहद[7] । शक्रसखासि मोहद, ।
वाटे आपण लोहद[8] । त्या सुवर्णदातया. ॥ ४
कौसल्येसि झाला बाळ । विष्णु त्रिभुवनपाळ. ।
तैं शुभ मध्यान्हकाळ । पुनर्वसू नवमी. ॥
होय हर्ष अतितम[9], । जाय हृदयींचें तम[10], ।
उत्सव उत्तम सम[11], । अवमीं[12] अनवमीं[13], ॥
लंकेंत उत्पातशत, । राक्षस वदले, 'बत[14]!' ।
रावणचि चित्तगत । जाड्यविष[15] न वमी. ॥
मोठा आनंद पुरांत[16], । बहु त्याहुनी सुरांत[17], ।
वदों किती भिदुरांत[18], । तो काय मानव मी[19]. ॥ ६
राजा होय पूर्णकाम[20], । कौसल्यापुत्रासि, राम ।
ऐसें गुरुमतें नाम । ठेवी, करी बारसें. ॥

---

१. विष्णु. २. हत्ती. इंद्रद्युम्न या नांवाचा राजा होता त्याकडे एकदां अगस्त्य ऋषि गेले, राजा ध्यानस्थ म्हणून त्याजकडून त्या ऋषीचा आदर सत्कार झाला नाहीं म्हणून त्यांनीं त्यास, 'तूं हत्ती हो' असा शाप दिला, परंतु त्यानें प्रार्थना केल्यावरून, 'एक हजार वर्षांनीं एका सरोवरांत नक्र तुझा पाय धरील तेव्हां तूं विष्णूचा धांवा केला असतां तो येऊन तुला सोडवील व तुझा उद्धार होईल' असा त्यांनीं उःशाप दिला—अशी कथा आहे. (भागवत—अष्टमस्कंध—अध्याय २—४). ३. ब्रह्मदेवास. ४. मोठा दैववान्. ५. सह+अनुराग=प्रीतिविशिष्ट. ६. शरीर. ७. डोहाळे. ८. लोखंड देणारा. (दशरथ.) ९. अतिशय. १०. दुःख, अज्ञान. ११. सारखा. १२. कनिष्ठ प्रतीच्या लोकांत. १३. अन्+अवम=श्रेष्ठ लोकांत. १४. खेदार्थक अव्यय—अरेरे! १५. बुद्धीचा मंदपणा हेंच विष. १६. अयोध्येंत. १७. देवांत, स्वर्गलोकांत. १८. भिदुर म्ह० वज्र अथवा वीज; ती राहते त्या ठिकाणीं म्हणजे अंतरिक्षांत—असा लाक्षणिक अर्थ. या अर्थानें भूलोक, स्वर्ग आणि अंतरिक्ष हे तिन्ही लोक सुखी झाल्याचें सुचविलें आहे. १९. कवी. २०. पूर्ण झाले आहेत काम म्ह० मनोरथ ज्याचे असा.

दुजा कैकेयीचा सुत, । तो भरत साधुस्तुत[1], ।
तद्रूपशीलें[2] अद्भुत, । त्या निवाला बा[3] रैसें. ॥
सुमित्रेचे दोघे वीर, । लक्ष्मण शत्रुघ्न धीर; ।
यद्यशें नवाटे क्षीर, । अमृतहि सारसें. ॥
तोकचतुष्टयें[6] जाय । आधि ताप, बहु धाय ।
तत्स्पर्शें चुंबनें राय, । जैसा भृंग सारसें. ॥ ६
वसिष्ठ पढवी वेद, । ज्यांहीं लया जाय भेदें, ।
स्वप्नींही न राहे खेद । मग सांगे [11]पांचवा. ॥
म्हणे, 'करा विश्व वश, । तुम्हीं [11]हरी अरी शश, ।
[12]शंभुवर्णसख यश । शुद्ध नित्य सांचवा. ॥

१. सज्जनांनीं स्तविलेला. २. स्वभाव, सद्वृत्त. ३. बाप, दशरथ. ४. उदकानें किंवा पुत्रविषयक प्रीतीनें. ५. सारभूत असें. ६. मुलांच्या चौकडीनें, चार मुलांनीं. ७. तृप्त झाला. अपत्यस्नेहसूचक असे पुढें दिलेले चार श्लोक या प्रसंगास अनुरूप आहेत.— पहिलीं दोन पद्यें रघुवंश—सर्ग यांतील व तिसरें शाकुंतल ३ अंक ७ यांतील व चवथें भारतचंपू—स्तबक १ यांतील आहे.—उवाच धात्र्या प्रथमोदितं वचो ययौ तदीयामवलम्ब्य चाङ्गुलिम् । अभूच्च नम्रः प्रणिपातशिक्षया पितुर्मुदं तेन ततान सोऽर्भकः ॥ ॥ २५ ॥ तमङ्कमारोप्य शरीरयोगजैः सुखैर्निषिञ्चन्तमिवामृतं त्वचि ॥ उपान्तसंमीलितलोचनो नृपश्चिरात्सुतस्पर्शरसज्ञतां ययौ ॥ २६ ॥, आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासैरव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् । अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति ॥ १७ ॥, अहं किमम्बा किमभीष्टता पदे तवेति मातुर्धुरि तातपृच्छया । प्रलोभतुल्यं प्रवदन्तमर्भकं मुदा हसन् जिघ्रति मूर्ध्नि पुण्यभाक् ॥३५॥, वरील चारी पद्यांचा क्रमानें अर्थः—तो बालक (रघु) उपमातेनें प्रथम उच्चारलेलें वचन बोलला; तिचें बोट धरून पावलें टाकूं लागला, आणि नमस्कार करावयास सांगतांच त्यानें डोकें वांकविलें त्यामुळें त्यानें आपल्या बापाचा (दिलीपाचा) आनंद फारच वाढविला. ॥ २५ ॥ आपल्या शरीराच्या संलग्नतेपासून उत्पन्न होणाऱ्या सुखांनीं त्वचेवर जसें कांहीं अमृतच शिंपडीत आहे अशा आपल्या मुलास मांडीवर घेऊन तो दिलीप राजा, ज्याचे डोळे अर्धवट मिटले आहेत असा पुष्कळ वेळपर्यंत पुत्रस्पर्शरसाचें सुख पावला. ॥ २६ ॥, 'अकारण अशा हसण्यांत किंचित् दिसत आहेत दंतकलिका ज्यांच्या, अस्पष्ट उच्चारलेल्या अक्षरांनीं रमणीय असे आहेत वाग्व्यापार ज्यांचे; आणि जे मांडीवर बसण्यासाठीं आवडीनें उत्सुक झाले आहेत; अशा पुत्रांस घेऊन त्यांच्या अंगास लागलेल्या धुळीनें जे मलिन होतात ते पुरुष धन्य होत. ॥ १७ ॥' ही दुष्यंताची उक्ति आहे. 'मुला, तुला मी आवडतों कीं तुझी आई आवडते, असा प्रश्न तिच्यासमोर बापानें केला असतां, आपल्या मर्जीप्रमाणें उत्तर देणाऱ्या अपत्याच्या मस्तकाचें आनंदानें हांसून अवघ्राण करितो तो पुरुष धन्य होय.' हें बोलणें पांडुराजाचें आहे. ८. क्रमानें. ९. द्वैतभाव. १०. धनुर्वेद. ११. सिंह. १२. महादेवाच्या कांतीचा मित्र म्ह० गौर, शुभ्र.

नमीतील जे चरण, । त्रासें येतील शरण, ।
करा तत्तापहरण, । सर्वथैव वांचवा. ॥
पुरवा भक्तांचें कोड, । रक्षा[1] दीन जैसे फोड ।
प्रकटुनि गुण गोड, । रसिकांस लांचवा.[2]' ॥ ७
विश्वामित्र तपोधन, । त्याचें तोषवाया मन, ।
तृषितें तृषिता वैन । पीतां[4] द्यावें ज्यापरी. ॥
गुरूक्तें दशस्यंदन[5] । राम लक्ष्मण नंदन ।
अर्पी करूनि वंदन; । चित्तीं म्हणे 'हा![6]' परी. ॥
बळातिबळाख्या[7] दोन । विद्या दे, गुण वदोन, ।
प्रवास राज्यपदोन[8] । नवाटे त्याउपरी. ॥
प्रेमें अस्त्रशतदान । दे रामास बहुमान, ।
गाधिज[9] सत्कथापान । करवी परोपरी. ॥ ८
मुनी गुरु म्हणे हाण[10], । तोंचि सोडूनि सुबाण ।
ताटकेचे[11] हरी प्राण, । राम लावी न क्षण. ॥
सिद्धाश्रमनिशाचर[12] । सुबाहु प्रमुख खर[13] ।
संहारी हाणूनि शर, । करी यज्ञरक्षण. ॥

१. तळहातावरील फोडाप्रमाणें रक्षण करा. २. लुब्ध करा. ३. उदक. ४. दशरथास वृद्धापकाळीं पुत्रप्राप्ति होऊन पुत्रसुख फारच थोडावेळ अनुभवल्यामुळें तो अतृप्त होता, तशांतही दुष्ट राक्षसाकडून पीडा पावलेल्या विश्वामित्रास सुखी करण्याकरितां राजानें आपले पुत्र त्यास मोठ्या कष्टानें दिले—हें तात्पर्य. ५. दशरथ एथें मूळशब्दांतील 'दश' शब्द कायम ठेवून कवीनें 'रथ' शब्दाच्या जागीं त्याच अर्थाचा 'स्यंदन' शब्द घातला आहे. अशीं पुष्कळ उदाहरणें आहेत. जसें—कुंभकर्ण याचे बद्दल घटकर्ण, घटश्रुति; इंद्रजित् याचेबद्दल शक्रजित्, सुग्रीव याचेबद्दल सुकंठ, सुगल इ० रूपें योजितात. ६. हाय हाय. ७ बळा+अतिबळा+आख्या=बळा आणि अतिबळा हीं आहेत नांवें ज्यांचीं अशा—या दोन विद्यांच्या पठणानें श्रम, संताप, दुःख, पराजय, समयच्युति इत्यादि गोष्टी कधींही पढणारास व्हावयाच्या नाहींत. (वा० रा० बा० कां० सर्ग २२). ८. राज्यपद+ऊन=राज्यपदापेक्षां उणा. ९. गाधीचा मुलगा—विश्वामित्र. १०. मार. ११. ताटका ही सुकेतु नांवाच्या यक्षास ब्रह्मदेवाच्या वरदानानें झालेली मुलगी; ती जंभनांवाच्या राक्षसाचा मुलगा जो सुंद त्याची बायको. हिला हजार हत्तींचें बल होतें. १२. विश्वामित्र ऋषीच्या आश्रमांतील राक्षस. कण्व, वसिष्ठ, विश्वामित्र इ० ब्रह्मनिष्ठ ऋषींच्या आश्रमास सिद्धाश्रम ही संज्ञा दिलेली आढळते. जसें 'सिद्धाश्रमांत नव्हता तात तुला म्यांच पूजिलें वन्यें । जागें काय करावें निपट कपट निद्रिता जना अन्यें ॥' ही शकुंतलेची दुष्यंतास उक्ति आहे. पंतांचें शकुंतलाख्यान पद्य. १३. तीव्र, दुष्ट.

पुंखवातें[1] महाशूर । मारीचा[2] उडवी दूर, ।
दैवें झाला नाहीं चूर । तो कीं, तें विलक्षण;॰।।
विश्वामित्र सभाजन[3] । करी, स्तुतीस भाजन[4], ।
सर्वऋषि सभाजन[5] । झाले तेंव्हां सक्षण[6]. ।। ९
अहल्येचा[7] ग्रावभाव[8] । करी पादरजें वाव[9], ।
पापशापदवदाव[10] । राम विश्वतारक. ।।
गौतमासि गृहधर्म[11] । प्रवर्तवूनि दे शर्म[12], ।
म्हणति तयासि चर्म-[13]। चक्षु नरदारक[14]. ।।
उद्धरिले[15] मुनिदार[16], । वंदले[17] तूंचि उदार, ।
उघडिलें मुक्तिद्वार, । चुकविला नारक[18]. ।।
पोटीं अपराध लक्ष । घालिसी सदय दक्ष, ।
षडरींपासूनि रक्ष । रामा हेचि मारक. ।। १०
सेवीत त्या भूसुरास[19] । गेला जनकपुरास, ।
घाया शत्रूच्या उरास । कंप, जय जोडुनी. ।।
करी प्रकट प्रताप, । हरी महेंद्राचा[20] तोप[21], ।
वरी जानकीस चाप[22] । ईश्वराचा मोडुनी. ।।
उर्मिळादिकन्यात्रय[23] । लक्ष्मणादिकां[24] दे नये-[25]।

---

१. पुंख म्ह० बाणाचा मूल प्रदेश त्याच्या वाऱ्यानें. हा पिसाऱ्याचा केलेला असतो. २. मारीच नांवाच्या राक्षसास. हा ताटकेचा मुलगा. ३. पूजन. ४. पात्र. ५. सभ्यलोक. ६. आनंदयुक्त. ७. अहल्या ही गौतम ऋषीची बायको तिचा. ८. पाषाणत्व. इंद्रानें गौतमऋषि आश्रमांत नसतां तिच्या पातिव्रत्याचा भंग केला हें समजल्यावर गौतमानें इंद्राला व तिला शाप दिला आणि अहल्येला 'तूं रामावतारीं रामाची गांठ पडेपर्यंत अशाच गुप्त स्थितींत राहशील, मग तुझा उद्धार होईल' असा उःशाप दिला—अशी कथा आहे. (वा० रा० बा० कां० सर्ग ४८.) ९. व्यर्थ, नष्ट. १०. दुष्ट असा शाप हेंच कोणी एक वन त्याचा वणवा. ११. संसारकृत्य, गृहस्थाश्रम. १२. सुख १३. सामान्यजन. १४. मानवपुत्र. १५. याचा कर्ता 'तूंचि'. १६. गौतमपत्नी. येथें 'दार' शब्दाचा संस्कृताप्रमाणें पुल्लिंगी अनेकवचनीं उपयोग केला आहे. १७. याचा कर्ता 'पूर्वोक्त सर्व ऋषी' अध्याहृत. १८. नरकलोक. १९. ब्राह्मणास (विश्वामित्रास). आचरणानें ब्राह्मण देवासारखे पवित्र असत म्हणून त्यांस भूसुर असें म्हटलें आहे. २०. इंद्राचा. २१. धनुष्य भंग करून. सीतास्वयंवराचे वेळीं बलिष्ठ जो रावण तो सीताहरण करील कीं काय ही इंद्राची काळजी. २२. प्राकृतांत 'चाप' हा शब्द नपुंसकलिंगीं योजितात, तथापि संस्कृतांत हा पुल्लिंगीही असल्यामुळें कवीनें येथें तो पुल्लिंगीं योजिला आहे. २३. उर्मिळा आदिकरून जें त्रय— उर्मिळा, मांडवी आणि श्रुतकीर्ति. २४. लक्ष्मण, भरत, आणि शत्रुघ्न यांस. २५. नीति व धर्म हीं जाणणारा.

धर्मज्ञ मैथिल,[1] भय । संसाराचें सोडुनी. ॥
मिळाला जामाता राम । योगिजनांचा विश्राम, ।
नता देतो[2] मोक्षधाम । बंधलेख[3] खोडुनी. ॥ ११
रुद्रशिष्य भृगुराम[4] । रोधी मार्ग महोद्दाम,[5] ।
रघुरामें त्याचें धाम[6] । लीलेनेंचि हरिलें. ॥
मग रक्षोवधकार्य[7] । करावें सुरसत्कार्य, ।
निववावे सर्व आर्य । ऐसें मनीं धरिलें, ॥
कैकेयीचें व्हाया इष्ट । ताताचेंही सत्यादिष्ट[8] ।
सफळ करावया शिष्ट । मुनिव्रत[9] वरिलें. ॥
अग्नीनें सोडावें आज्य, । तैसें, ज्यांत सुख प्राज्य, ।
त्यजिलें समृद्ध राज्य, । यशें विश्व भरिलें. ॥ १२
सीतालक्ष्मणासहित । वना जाय सन्महित,[10] ।
करी मुनिजन्महित । तप सिद्धि नेउनी, ॥
चित्रकूटीं[11] नगीं वास । आदरी लक्ष्मीनिवास,[12] ।
वल्कल अजिनवास[13] । आंगावरि घेउनी. ॥
स्वजनसह स्मरत । तेथें साश्रु ये भरत, ।
म्हणे, 'श्रीरामा! परत.' । पायीं शिर ठेवुनी. ॥
तातासि दे तिळतोय,[14] । मग सुप्रसन्न होय, ।
राखे सद्बंधुची सोय । त्या पादुका देउनी. ॥ १३
अत्रि अनुसूया तात । माय मानी, जोडी हात, ।
विराधराक्षसघात[15] । करी काननीं मग. ॥

१. मिथिल देशाचा राजा (जनक.) २. देणारा. ३. पूर्वीच्या दुष्कृतामुळें केलेले ब्रह्मलिखितबंधनाचे लेख. ४. भृगुकुलोत्पन्न तो भृगु आणि भृगु असा जो राम तो भृगुराम, भार्गवराम, परशुराम. ५. महा+उद्दाम=मोठा उद्धट, दांडगा. ६. तेज. ७. राक्षसांना मारण्याचें काम. ८. सत्य+आदिष्ट=खरें सांगितलेलें. ९. जटावल्कलें धारण करणें इ० मुनीचें व्रत. १०. साधूंना पूज्य. ११. चित्रकूट पर्वतावर. १२. लक्ष्मीचें वसतिस्थान. (रामचंद्र.) १३. चर्मरूप वस्त्र १४. तिलमिश्र उदक, तिलांजली. १५. विराध या नांवाचा राक्षस दंडकारण्यामध्यें होता. त्याच्या बापाचें नांव जव आणि आईचें नांव शतह्रदा असें होतें. हा मूळचा स्वर्गलोकींचा तुंबरु नांवाचा गंधर्व. तो कुबेराच्या शापानें राक्षस झाला होता. त्यास मारून रामानें सद्गति दिली. (वा० रा० अ० सर्ग २–४).

महामुनि शरभंग । भेटे तयास श्रीरंग, ।
सुतीक्ष्णासी[1] पुण्यसंग । साधी स्वामरनग[2]. ॥
घटजाश्रमीं[3] रमून, । काळ सद्वृंदीं[4] क्रमून, ।
वैष्णवास्त्रें[5] घे नमून । यशें भराया जग. ॥
धरी पंचवटीपथ । विश्वगीत पुण्यकथ, ।
सुखी करी दशरथ-। सख जटायू[6] खग[7]. ॥ १४
तेथें शूर्पणखा[8] रांड, । म्हणे, 'रामा! सीता सांड, ।
मजसीं विलास मांड, । बळें गळां पडली. ॥
बोले[9], 'लक्ष्मणा! जा वर'. । ऐसें; योगिज्ञानिवर[10] ।
तोही न बधे; त्यावर । सीताघाता अडली[11]. ॥
दंडी[12] सौमित्रि सुज्ञान, । खंडी खड्गें नाक कान, ।
चंडी[13] ती त्या जनस्थान-। नाथापुढें[14] रडली. ॥
श्रीरामें ससैन्य खर । संहारितां निशाचर-[15] ।
पतिस सांगे, 'हे नर-। हस्तें गति घडली. ॥ १५
आहे मनुष्यस्त्रीरत्न । तयापुढें तुच्छ प्रत्न[16], ।
त्वदर्थ करितां यत्न, । ऐसें केलें मानवें. ॥
लंघिलासि[17] नरें आज, । त्याची कांहीं धरीं लाज, ।
साधिलें त्वां जें तें काज, । न देवें न दानवें. ॥

---

१. अगस्त्याचा शिष्य सुतीक्ष्ण त्यासीं. २. स्व+अमर+नग=स्वजनांचा कल्पवृक्ष जो राम. ३. अगस्त्याचा आश्रम. उर्वशीला पाहून मित्रावरुणांचें रेत कांहीं कुंभामध्यें आणि कांहीं बाहेर जमिनीवर स्खलन पावलें. पैकीं पहिल्यापासून मुहूर्तानें अगस्त्य ऋषि झाला. म्हणून त्यास 'घटज' म्हणतात. दुसऱ्यापासून वसिष्ठ झाला. यामुळें अगस्त्य आणि वसिष्ठ हे बंधु होत. (ऋक्संहिता—अष्टक ५, अध्याय ३, वर्ग २४. सायणभाष्य). ४. सत्+वृंद=साधूंच्या समुदायांत. ५. ज्या अस्त्रांची देवता विष्णु आहे ती. ६. गरुड, अरुण, संपाति, जटायु हे चौघे बंधू, यांचा बाप कश्यप व आई विनता. ७. पक्षी. ८. ही रावणाची बहीण. ९. याचा कर्ता 'राम'. '(तूं शूर्पणखा) जा, लक्ष्मणा वर, ऐसें बोले.'—असा अन्वय. १०. ध्याननिष्ठ व ज्ञानसंपन्न यांत श्रेष्ठ असा. ११. मनांत हट्ट धरून बसली. येथें 'शूर्पणखा' हा कर्ता. १२. शिक्षा करिता झाला. १३. अत्यंत रागीट व भयंकर अशी स्त्री. १४. जनस्थानाचा अधिपति खरराक्षस. हा रावणाचा सावत्र भाऊ होय. १५. रावणास. १६. प्रयत्न. १७. अवमानिलासि, अतिक्रमिला आहेस.

सोड वज्राधिक शर । मार रणांत ते नर, ।
हो त्या स्त्रीरत्नाचा वर[1], । यश जोडीं बा ! नवें. ॥
ऊठ, बैसलासि काय ? । लावि त्या म्हणाया 'हाय !' ।
शूरा तेजचि सहाय, । द्विजा जेंवि जानवें.' ॥ १६
करी[2] मारीचा सहाय[3], । मायावी राक्षसराय, ।
पंचवटीप्रति जाय, । राहे नभीं दडून. ॥
हेम[4]मृग होय खेळ[5] । सीता[6]मनोमीना गळ, ।
ठाके एकत्र न पळ । देवी[7] मागे[8] अडून. ॥
सांगे लक्ष्मणा अवन, । सोडी उटज[9]भवन, ।
धांवे श्रीराम जवन । शरें ताडी जडून[10]. ॥
रामापरि फोडी हाक, । हंसस्वर करी काक, ।
घाली भूजा[11]मनीं धाक । पृथ्वीपृष्ठीं पडून. ॥ १७
जानकी वदे, 'हा तात ! । झाला सर्वस्वाचा[12] घात, ।
धांव, जोडूं काय हात, । जा लक्ष्मणा ! नीघ रे !' ॥
तेव्हां तीस तीचा दीर । सांगे तत्त्व[13], धाया[14] धीर, ।
'माते ! ढेंकुळसा हीर[15] । जळीं काय वीघरे ?' ॥
सौमित्रिच्या पडी[16], कोप । करुनी विवेकलोप, ।
हाणुनि कुशब्द[17]रोप, । हृदयास ती घरे. ॥
करी सीतेसि नमन, । साश्रु तेथुनि गमन, ।
म्हणे त्या तपास मन । राम[18]ह्रदीं रीघ रे ! ॥ १८
सौमित्रि जातांचि, पाप । मेघ[19]नादाचा ये बाप, ।
गरुडाच्या गृहीं साप, । तैसा शिरे दांडगा. ॥
सीतेतें गोद्विजकाळ । हरी राक्षसभूपाळ, ।
जेंवि कुळ[20]भ्रष्टबाळ । हरिणीतें लांडगा. ॥

---

१. नवरा. २. याचा कर्ता 'राक्षसराय' (रावण). ३. मदतनीस. ४. सोन्याचा हरिण. ५. मारीच. ६. सीतेच्या मनरूपी माशाला. ७. सीता. ८. याचें 'हेममृग' हें कर्म. ९. उट= पान किंवा गवत, त्यापासून झालेलें असें भवन=घर, पर्णशाला. १०. पाठलाग करून. ११. पृथ्वीपासून झालेली सीता तिच्या मनांत. १२. रामरूपी सर्वस्व त्याचा. १३. खरी गोष्ट म्हणजे हें राक्षसाचें कपट आहे असें. १४. धरण्यास. १५. हिरा. १६. याचें कर्म 'घरे.' १७. दुःशब्दरूप बाण. १८. रामरूप डोहांत. १९. इंद्रजिताचा. २०. आपल्या कळपांतून चुकलेल्या लहान हरिणीला.

**जटायु** सोडवी सून, । न गमे **वि**भावसून[1], ।
चूर्ण करी गीवसून[2] । रथ, जसा सांडगा. ॥
**रावण** कपटदक्ष । तोडी खड्गें त्याचे पक्ष, ।
म्हणे, 'ये, वधूसि[3] रक्ष, । ऊठ, पुन्हा भांड गा!' ॥ १९
स्कंधीं वाहोनि ने मग, । ऋष्यमूक लागे नग[4], ।
पांचां वानरांत नग[5] । सोडी सोत्तरीय[6] ती, ॥
बळें **सीते**सि हरून, । मृत्युभय न धरून, ।
पावे **लंके**सि वरून[7], । तो खळ वायुगती[8]. ॥
तेथें अशोकवनांत[9], । तेणें रक्षस्त्रीजनांत, ।
तप्त करूनि मनांत । ऐसी ठेविली सती. ॥
येरीकडे **राम**राय । लक्ष्मणें वंदूनि पाय ।
स्ववृत्त सांगतां, 'हाय!' । म्हणे व्याकुळमती. ॥ २०
लंघुनियां बहु कोस । उटज देखतां ओस ।
लागे दयितेचा सोस[10], । **राम** हुडकी वनें. ॥
पुसे साश्रु तो अगांस[11], । मृगभुजगखगांस, ।
उच्चशिखरां नगांस[12], । अतिव्याकुळमनें. ॥
'नाहीं मत्संगीं धालीस[13], । प्रेमें प्रवासा आलीस, ।
न स्मरलीस आलीस[14], । मोहिलीस न धनें. ॥
हा **सीते**! कां आला राग? । सोडिला कां अनुराग[15]? ।
हा देवी! हा प्रिये! आग[16] । काय केलें या जनें?' ॥ २१
ऐसे विलाप करीत, । धैर्य सोडित धरीत, ।
वृक्ष वल्ली उद्धरीत, । आलिंगुनी जो दवीं[17]. ॥
देखिला मूर्छित तात[18], । म्हणे, 'घातीं महाघात,' ।
घालूनि वल्कलें वात, । सिंची जळाच्या लवीं. ॥

---

१. विभावसु+ऊन=अग्नीहून उणा. २. धरून. ३. सुनेला. (सीतेला.) ४. न गच्छतीति नगः. (पर्वत.) ५. दागिने. ६. सह+उत्तरीय=पांघरलेल्या वस्त्रासह. ७. आकाशमार्गानें. ८. वायूसारखी आहे गती ज्याची असा, अथवा वायुगतीनें. कवितेंत शब्दाचें सामान्यरूप बहुधा सर्व विभक्तींच्या अर्थी योजितात. ९. या नांवाच्या लंकेंतील उपवनांत. १०. उत्कट इच्छा. ११. वृक्षांस. १२. पर्वतांस. १३. तृप्त झालीस. १४. सखीला. १५. प्रीति. १६. अपराध. १७. वनांत. १८. बापासारखा (जटायु).

सांगे वृत्त, व्यसु[1] होय, । संस्कारूनी त्या दे तोय, ।
पोषितां[2] रसदा कोय[3], । तसी कथा हे भवीं[4]. ॥
पुन्हा धुंडाळीतां वन, । अयोमुखीनासास्तन[5] ।
कापी, लक्ष्मण स्तवन[7] । हास्यें[8] वाढवी नवीं. ॥ २२
जो योजनभुज अंध, । धरी वनांत कबंध[9] ।
त्याचा वारी शापबंध, । अर्पी उत्तमा गती. ॥
तपःश्रीच्या[10] कबरीस[11], । भेटे मग शबरीस, ।
राम तें दे त्या बरीस । जें सद्भक्त मागती. ॥
पंपाश्रीनें वाढे ताप, । प्रियावियुक्त ईलाप[12], ।
करी स्त्रैणसा[13] विलाप, । बंधु बोधी मागुती. ॥
प्रभूचा पेटतां शोक, । म्हणे[14], ‘अयशासि ओकं[15] ।
झाल्यें, निंदितील लोक.’ । मानी[16] परमा[17] गती. ॥ २३
भेटे मारुति पंडित[18] । व्हाया कीर्तीनें मंडित, ।
सुग्रीवासीं अखंडित । सख्य होय तें करी. ॥

१. वि+असु=गतप्राण. २. लावून वाढविली असतां. ३. अंब्याची कोय. हा ‘होय’ या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ४. संसारांत. ५. लोहासारखें आहे वदन जिचें, काळतोंडी, अशा शूर्पणखेचें नाक आणि स्तन. ७. स्तुति, लक्ष्मणाच्या कृत्याबद्दल. ८. शूर्पणखेच्या कुकृत्यामुळें झालेल्या वैरूप्याबद्दल. ९. या नांवाचा राक्षस. ज्यास मस्तक नाहीं असें चलन वलन करणारें शरीर ह्यास ‘कबंध’ म्हणतात. याला काखेंत तोंड होतें. याचे पाय इंद्राच्या वज्रानें निरुपयोगी झाले. हा मुळचा दनु या नांवाच्या राक्षसाचा मुलगा. हा प्रथम फार सुरूप होता पण तो अरण्यांत ऋषीस फार पीडा देत होता म्हणून ‘तूं विरूप होशील’ असा स्थूलशिरा नांवाच्या ऋषीनें त्यास शाप दिला होता. याचे हात योजनभर लांब होते. (वा० रा० अर० कां० स०. ६९-७१.) १०. तपःश्रीची (जसी कांहीं) वेणीच म्हणजे तिला भूषणभूत अशा शबरीस. येथें गम्योत्प्रेक्षा आहे कारण कीं एथें, वाटे, जाणों, जसें कांहीं इ० उत्प्रेक्षाद्योतक शब्दांपैकीं एकाद्या शब्दाचा प्रयोग केला नाहीं. जेथें उपमेयावर उपमानाचा आरोप केला असतो म्हणजे त्याचा उत्कटकोटिक संशय दाखविला असतो तेथें उत्प्रेक्षालंकार होतो. येथें रूपकालंकारही होईल. ११. वेणीस. १२. पृथ्वीपति.(राम.) १३. स्त्रीलंपटासारखा. १४. ‘पंपाश्री’ हा कर्ता. १५. स्थान. १६. याचा कर्ता ‘पंपाश्री’. १७. अत्यंत कष्टमय. १८. बुद्धिमान्. मारुतीची व रामाची प्रथम गांठ पडली त्यावेळीं दोघांचें पुष्कळ भाषण झालें, त्यांत मारुतीची व्याकरणदृष्ट्या एकही चूक झाली नाहीं यावरून रामानें लक्ष्मणास म्हटलें कीं, ‘नानृग्वेदविनीतस्य नायजुर्वेदधारिणः । ना सामवेदविदुषः शक्यमेवं विभाषितुम् ॥ २८ ॥ नूनं व्याकरणं कृत्स्नमनेन बहुधा श्रुतम् । बहुव्याहरतानेन न किंचिदपशब्दितम् ॥२९॥’ (वा० रा० किं० कांड—सर्ग ३.)

नग[१] कीश[२]महीवर । दावी, ये त्या[३] गहींवर, ।
ज्याच्या[४] नामें वहीवर । यम खडी विखरी. ।।
मूर्त गौ[५]तमसत्यय । सुगळासि दे प्रत्यय[६], ।
कांड[७] वा[८]ळीचा अ[९]त्यय । करुनी, यशें भरी. ।।
सु[१०]कंठ राज्य लाहून । किष्किंधेमाजि राहून, ।
सेना आणवी बाहून[११] । बहु कोटी लौकरी. ।। २४
सीतेचा कराया शोध, । करूनी दिग्देशबोध[१२], ।
धाडी ऋक्ष[१३] कीशें[१४] योध । त्यांत दक्षिणेकडे. ।।
जां[१५]बवदादि जे वीर । गेले हुडकीत धीर, ।
पावले सागरतीर । लंघुनी वनें कडे. ।।
लोटला अ[१६]वधिमास । सुग्रीवाचा दंड त्रास[१७], ।
झाले [१८]जीवनीं उदास, । प्रा[१९]योपवेश घडे. ।।
म[२०]हेंद्रीं संपातीनाम । जटायूचा तेजोधाम[२१] ।
अ[२२]ग्रज, तयासी रा[२३]म । म्हणतां गांठी पडे. ।। २५
शोध सांगे द्रष्टा दक्ष, । आले त्याचे दग्ध[२४] पक्ष, ।
स्त[२५]वें वाढे, श[२६]त्रुकक्ष- । वन्हि मारुती उडे, ।।

---

१. दागिने. २. वानरांचा राजा, सुग्रीव. ३. रामाला. ४. ज्याच्या (रामाच्या) नांवें (नांव घेतलें असतां) यम वहीवर (प्रत्येक प्राण्याच्या पापपुण्याचा हिशेब लिहिण्याच्या वहीवर) खडी विखरी (वाळू टाकून बंद करी). ५. गौतम+सती+अय=अहल्येचें मूर्त (मूर्तिमंत) शुभ दैवच असा जो राम. ६. एका बाणानें सप्ततालांचा भेद करून व दुंदुभीकलेवर उडवून रामानें स्वबळाचा प्रत्यय (खात्री) आणून दिला होता. ७. ब्रम्हांड. ८. गौतमसत्यय वाळीचा अत्यय करुनी, कांड यशें भरी असा अन्वय. ९. नाश. १०. सुग्रीव. ११. बोलावून. १२. दिक्+देश+बोध=अमुक दिशेला अमुक देश आहेत अशी माहिती. १३. अस्वल. १४. वानर. १५. जांबवान् इत्यादि. १६. शोध लावून परत येण्याच्या मुदतीचा महिना. १७. येथें 'होईल' याचा अध्याहार. १८. वांचण्याविषयीं. १९. अन्नपाणी वर्ज्य करून मरण्याच्या इच्छेनें निश्चय करून आसनावर बसणें. २०. महेंद्रपर्वतावर. २१. तेजाचें स्थान. २२. वडील भाऊ. २३. जांबवान् इत्यादिकांच्या तोंडून रामनाम ऐकतांच संपातीनें त्यांची गांठ घेतली. २४. जळालेले पंख. एकदां संपाति आणि त्याचा भाऊ जटायु हे दोघे आपल्या बळानें उद्दाम होऊन वेगानें उडत उडत सूर्यमंडळाजवळ गेले. तेव्हां संपातीचे पक्ष जळाले. जटायु संपातीच्या आड राहिल्यामुळें त्याचे पंख जळाले नाहींत. निशाकर नांवाच्या ऋषीची गांठ पडून त्यापासून, 'रामकार्यार्थ मारुती वगैरे वानर पुढें येथें येतील त्यांस तूं सीतेची हकीकत सांगून मदत केल्यावर तुझे पंख पूर्ववत् होतील', असें समजलें होतें, तदनुरूप त्यास पंख

अत्याश्चर्यांत तैं नाक[1] । सुरसासह[2] मैनाक[3] ।
सिंहिका[4] देऊनि हाक, । काळाच्या मुखीं बुडे. ॥
शतयोजनाब्धिपार । पावे, लंका कांपे फार, ।
मुद्रा[5] देवीस दे, सार[6] । सांगे, वाखाणी चुडे[7]. ॥
धैर्य सीतेसि देऊन, । तच्चूडामणि[8] घेऊन, ।
संदेशामृत[9] सेवून, । पाडी प्रासादहुडे[10]. ॥ २६
मोडी वृक्ष बहुलक्ष, । मारी शत्रुपुत्र अक्ष[11], ।
जाय रावणा समक्ष, । बांधोनी घे तो बळें; ॥
[12]करीत तेजांचा[13] लोप, । हाणी उरीं शब्दरोप[14], ।
आणी निंदूनीयां कोप, । म्हणे, 'वांचा यावेळे. ॥

फुटले. (वा० रा० कि० कां०, स० ६०–६२.) २५. जांबवानानें त्याच्या पराक्रमाची तारीफ करून त्यास स्वपराक्रमाची आठवण करून दिल्यानें. २६. शत्रुरूप गवताचा अग्नीच असा मारुती. एथें रूपकालंकार आहे. पुढील पराक्रमाचे आधींच ध्वनित करणारें हें विशेषण आहे. यास इंग्रजींत Anticipative epithet म्हणतात.

१. स्वर्गलोक. २. सुरसा नांवाच्या नागमातेसहवर्तमान. सुरसा ही नागमाता होती. मारुती समुद्रोल्लंघन करून सीताशुद्धीकरितां उडून जात असतां त्याच्या बळाची व चातुर्याची परीक्षा करण्याकरितां देवांनीं सांगितल्यावरून ती मध्येंच आडवी आली व तिनें आपलें तोंड एकदम वाढविलें. अशीं दोघांचीं शरीरें वाढतां वाढतां मारुतीनें एकाएकीं आपलें रूप अंगुष्ठ-प्रमाण केलें आणि तिच्या भयंकर मुखांतून सुटका करून घेतली. ३. हा पर्वत होता. हा हिमालयाचा मुलगा. इंद्रानें पूर्वीं पर्वतांचे पक्ष छेदून टाकण्यास आरंभ केला, तेव्हां भयानें मैनाक समुद्रांत जाऊन बुडून राहिला. मारुती लंकेस जात असतां, आपणावर उपकार करणारा सूर्यवंशांतील सगर राजा त्याचे उपकार फेडावे या बुद्धीनें, 'रामकार्यार्थ जाणाऱ्या मारुतीस मदत कर' असें सांगून समुद्रानें मैनाकास मध्यें आणिलें, पण मारुतीला पुढें जाण्याची त्वरा असल्यामुळें त्यानें त्यावर विश्रांती घेतली नाहीं; नुसता कृतज्ञतेनें हातानें स्पर्श करून तो पुढें चालता झाला. मारुतीची युक्ति व पराक्रम पाहून सुरसा व मैनाक यांस अत्यंत आश्चर्य वाटलें. ४. सिंहिका–ही एक भयंकर राक्षसी होती. ती मारुतीस छायेनें पकडून त्यास गिळून टाकणार तों त्यानें आपल्या नखांनीं तिचें तोंड फाडून तिला मारून टाकिलें आणि पुढें गमन केलें. या तिन्ही कथा वा० रा०, सुं० कां०, स० १, यांत आहेत. ५. मुद्रिका, आंगठी. ६. संक्षिप्त हकीकत. ७. चुडे (कांकणें) व कुंकू यांचा लक्षणेनें सौभाग्यार्थीं उपयोग करण्याची चाल प्रसिद्ध आहे. उ०–मला चुडेदान द्या, तुझें कुंकू बळकट आहे. ८. तत्+चूडामणि=त्या सीतेचें शिरोभूषण. ९. संदेश+अमृत=निरोप हेंच अमृत. १०. राजवाड्याचीं शिखरें. ११. रावणाचा मुलगा. १२. याचा कर्ता 'मारुती' (अध्याहृत). १३. रावणाच्या तेजाचा. १४. शब्द हेच बाण.

कल्पद्रुमपुष्पगुच्छ[1] । तो मानूनी कपि तुच्छ, ।
पेटविलें भव्य पुच्छ । वस्त्रीं वेष्टूनी खळें. ॥
बिभीषणाचें न घर । जाळी राक्षसनगर, ।
स्वर्गीं भीजवी सगर[2] । पुष्कळप्रेमजळें. ॥ २७
पुरीं अग्नीसा पेटोन, । पुनः सितेसी भेटोन, ।
उडे न गमे खेटोन[3] । लंघी सागरा जवें[4]. ॥
हृष्ट अंगदादि कीश[5] । करी, मग जानकीश[6], ।
तेव्हां वदले नाकी[7] 'र्श- । मस्तु ते,[8]' हें गौरवें. ॥
चूडामणि देतां, राम । भेटोनि पुरवी काम[9], ।
अत्यद्भुत दान साम[10] । मिळे सभाग्या[11] नवें. ॥
देवर्षि तद्यश गात । नाचे, शक्र जोडी हात, ।
झाला धन्य तात वात[12], । पूजिला स्तवें भवें[13]. ॥ २८
भाट करावया वैन्य[14] । निघे द्याया खळा दैन्य ।
सिंधुतीरासि ने सैन्य । तेजें राखे राखवी ॥
बिभीषण ये शरण, । वारी[15] तज्जन्ममरण, ।
लंकाराज्य दे, चरण[16]- । नतिफळ दाखवी. ॥
रुंद दश लांब शत[17]- । गावें सेतु अब्धिमत[18], ।
करवी अद्भुत तत[19], । यशोमृत चाखवी. ॥

१. कल्पवृक्षाच्या फुलांचा झुबका. (मारुती.) २. रामचंद्राचे पूर्वज राजे. ३. खे+अट+ऊन=आकाशांत फिरणाऱ्या पक्षाहून कमी. ४. वेगानें. ५. वानर. ६. जानकी+ईश=सीतेचा नवरा. (राम.) ७. देव. ८. शम्-अस्तु-ते=तुझें कल्याण असो. ९. मारुतीची इच्छा. १०. साम म्ह० श्रमपरिहारक भाषण हेंच दान (देणगी) ११. रामकृपेमुळें सभाग्य. (मारुती.) १२. वायु. १३. शंकरानें. १४. वेनाचा पुत्र–पृथुराजा. हा फार पराक्रमी होता. त्यालाही पराक्रमाधिक्यानें भाट (स्तुतिपाठक) करावयाकरितां. १५. दूर करी. १६. पायां पडल्याचें फळ. १७. शंभर योजनें. 'दशयोजनविस्तीर्णं शतयोजनमायतम् । ददृशुर्देवगंधर्वा नलसेतुं सुदुष्करम् ॥' (वा० रा०, यु० कां०, सर्ग २२, श्लो० ७२.) तसेंच ६४–६८ या श्लोकांत 'योजन' शब्द अनेकवार योजिला आहे. या श्लोकांच्या आधारानें लिहिलेली मोरोपंताची आर्या पुढें लिहिल्याप्रमाणें आहे—'तो सेतू प्रथम दिनीं चौदा गांवें दिनांतरें वीस । मग एकवीस बाविस पंचम दिवशीं समाप्त तेवीस ॥' यावरून 'गांव' म्हणजे 'योजन' हा अर्थ स्पष्ट होतो. योजन म्हणजे १८ किंवा १९ मैल. १८. समुद्राला मान्य. हें सेतूचें

ज्याचा धरुनी आधार, । माया [1]अंडाचा विस्तार ।
करी, निष्य चमत्कार । नवे नवे लाख [2]वी. ॥ २९
नसतां उत्साहहीन, । कोणी मंद, बाळ, [3]जीन, ।
तरी [4]अहोरात्रें तीन, । उतराया लागलीं. ॥
सैन्यें रामा रक्षायास । न गणुनि [5]लक्षायास, ।
फल [6]दल भक्षायास । न गुंतोनि जागलीं. ॥
[7]अगानगांतें वाहून, । तळीं नभींही राहून, ।
क्षुधा तृषाही साहून, । कांहींच न मागलीं. ॥
[8]वीरजनपदेशांत । शिरोनि शत्रुदेशांत, ।
सुग्रीवाच्या [9]निदेशांत, । एकमतें वागलीं. ॥ ३०
[10]सुवेळावरी चढून, । क्रोधें मनांत कढून, ।
शत, धिक्कार [11]पढून । सुग्रीवानें ताडिला. ॥
बळें [12]दोर्युद्ध करून, । [13]लंकाप्राकारावरून ।
मुकुटसह हरून । तेज, तळीं पाडिला. ॥
विलासियासि [14]अंगद, । तैसा प्रिय जो अंगद, ।
शत्रुशतासि [15]भंगद । तो दूतत्वें धाडिला. ॥
रामें वैद्यें जसा [16]गद, । कीं मारुतें शुष्क [17]छंद, ।
[18]संदेशें रावणमद, । लीलेनेंचि झाडिला. ॥ ३१
[19]प्लवंग राक्षस क्रुद्ध । झाले आरंभिते युद्ध, ।
धर्मन्याया [20]अप्रबुद्ध । दशमुख न वळे. ॥
मरती तेजस्वी [21]भट, । काळें फार केले गट, ।
तों तो मोठा खोटा धट, । अधिकचि खवळे. ॥

---

विशेषण. समुद्रानें प्रथम वाट दिली नाहीं म्हणून रामानें बाण मारावयास काढिला. त्यामुळें समुद्र सभय होऊन त्यानें स्तुतिपूर्वक रामास सेतू बांधावयास सांगितलें-अशी कथा आहे. १९. विस्तृत.

१. ब्रह्मांडाचा. २. उत्पन्न करिते. ३. म्हातारा. ४. रात्र आणि दिवस. ५. लक्ष+आयास=लाख आयास. ६. पान. ७. वृक्ष आणि पर्वत यांस. ८. वीर+जनपद+ईश=वीर लोकांच्या देशांमध्यें श्रेष्ठ (असा तो शत्रुदेश). ९. आज्ञेत. १०. सुवेळ नांवाच्या पर्वतावर. ११. उच्चारून. १२. बाहुयुद्ध. १३. लंकेच्या तटावरून. १४. बाहुभूषण. १५. मारणारा. १६. रोग. १७. पान. १८. निरोपानें. १९. वानर. २०. अजाण. २१. योद्धे.

[1]मेरुकंदराग । सिंह [2]त्रासीं [3]मंदराग ।
[4]कैरी, भासे [5]मंदराग, । सेनासिंधु [6]ढवळे. ॥ ,
रामें देतां पराभव, । वाटेना त्या [7]खरा [8]भव ।
खोटा, [9]हर्ष बरा [10]भव, । [11]यशें विश्व धवळे. ॥ ३२
इंद्रजितें व्हाया नाश, । [12]दाशरथी नागपाश ।
बद्ध केले, [13]अजयास । सुग्रीवादि रडले. ॥
खळ नेववी सतीस, । द्याया शोक त्रास तीस, ।
शोची ती त्यांच्या गतीस, । कीं निश्चेष्ट पडले. ॥
[14]त्रिजटा म्हणे न [15]बंध । मोहा, नाहीं झाला वध, ।
आतां होतील सावध, । मूर्छेस सांपडले. ॥
धांवोनी ये [16]पक्षिपाळ, । सर्वसर्पकुळकाळ, ।
धाकें पळाले जे [17]व्याळ, । अंगा होते जडले. ॥ ३३
मुख्य [18]सेनानी [19]प्रहस्त । होतां सेनेसह [20]ध्वस्त, ।
ज्याचें कर्म अप्रशस्त, । [21]तो स्वयें करी रण. ॥
[22]लक्ष्मणोरीं ब्रह्मदत्त । शक्ति हाणी महामत्त, ।
त्या भंगी होउनी [23]यत्त । राम, न होतां क्षण. ॥
[24]म्हणे [25]त्यां, 'झालासि भग्न, । प्राणसंकटांत मग्न, ।
उद्यां ये साधूनि लग्न । रावणा! बरें म्हण. ॥
जाय पुरीं लाजे [26]पाप, । चित्तीं स्मरे प्राप्तशाप, ।
पावे मोठा अनुताप, । खोडी सोडीना पण. ॥ ३४

१. मेरु+कंदरा+ग=मेरुपर्वताच्या गुहेंत राहणारा. हें सिंहाचें विशेषण. २. भीतीनें. . मंद+राग=मंदोत्साह. ४. याचा कर्ता 'रावण'. हा रावणाच्या नादाचा (शब्दाचा) प्रभाव . मंदर+अग=मंदराचल. ६. (रामाची सेना) क्षुब्ध झाली. येथें सेनेवर सिंधुत्वाचा व राव- ावर मंदराचलाचा आरोप केल्यानें एक फार सुंदर **परंपरित रूपक** झालें आहे. ७. गाढ- ास. ८. संसार. ९. हर्ष (आणि) भव बरा (वाटे). असा अन्वय. १०. जन्म. ११. (रा- ाच्या) यशानें. १२. रामलक्ष्मण. १३. पराभवामुळें. १४. एक राक्षसी. बिभीषणाची मुलगी. ५. मोहा न बध=मोहवश होऊं नको. १६. गरुड. १७. सर्प. १८. सेनापति. १९. प्रहस्त । नांवाचा. २०. नष्ट. २१. इंद्रजित्. २२. लक्ष्मण+उर=लक्ष्मणाच्या वक्षस्थलावर. ३. सज्ज. २४. याचा कर्ता 'राम'. २५. रावणास. २६. दुष्ट जो रावण.

करवी दुर्गाचें[1] त्राण,[2] । उठवूनि महाप्राण[3] ।
कुंभकर्ण धाडी, बाण । तसा वेगें तो निघे. ॥
लंघी प्राकार[4] पळांत, । और्व[5] सिंधूच्या जळांत, ।
तैसा त्या कीशबळांत,[6] । वनीं वन्हीसा रिघे. ॥
पांहे,[7] भंगे, जयलेश । न बळीं धरी बलेश,[8] ।
किमर्थ मिळतां देश । घ्यावे चौवर बिघे.[9] ॥
शत्रुसर्पाचा सुपर्ण[10] । जाय पुरीं घटकर्ण, ।
सुकंठ च्छेदुनि कर्ण । दोनी, तन्नासाहि[11] घे. ॥
क्षोभे, वाटे मूर्त काळ, । त्याचे राम विश्वपाळ ।
बाहुपादकंठनाळ । तोडी बाणांनीं रणीं. ॥
'बिभीषणाचे ते बोल । मिथ्या म्यां मानिले फोल, ।
मेला ज्या न लोकीं मोल, । तो वीरशिरोमणी. ॥
सिद्धीस न नेतां काज । गेला, झाली मोठी लाज, ।
हाय! काय करूं काज?' । म्हणे लंकेचा धणी. ॥
बोले मत्त अतिकाय,[12] । 'ताता! मर्त्यभय[13] काय, ।
सर्वा म्हणवीतों हाय, । मी पक्षींद्र[14] ते फणी[15]'. ॥
अतिकायादिक शूर । पुत्र तेणें[16] महाक्रूर ।
अमर्त्यव्याळांचे धूर[17] । महाबळ धाडिले. ॥
लक्ष्मणादिकांहीं पैर,[18] । ते जऱ्ही अत्यंत खैर,[19] ।
रणांगणीं नक्तंचर[20] । केले व्यसु, नाडिले. ॥
मेघनादें पुन्हा वीर । ब्रह्मास्त्रें ते महाधीर ।
दाशरथी योधहीर[21] । सर्व मर्मीं ताडिले. ॥
बिभीषण, वातजात[22] । दोघे न पावले पात,[23] ।
अन्य ऋक्ष[24] कपिव्रात[25] । ते मूर्छित पाडिले. ॥

---

१. किल्ल्याचें. २. रक्षण. ३. बलाढ्य. ४. तटबंदी. ५. वडवानळ. ६. वानरसैन्यांत. ७. 'पांहे,' 'भंगे' व 'धरी' यांचा कर्ता 'कुंभकर्ण.' ८. (स्व)बळीं बलेश (कुंभकर्ण) जयलेश न धरी. ९. एकशेवीस बिघे क्षेत्र. मोठा लाभ प्राप्त असतां लहानाचा स्वीकार कोण करील, असा या पंक्तीचा सरळ अर्थ होतो, परंतु प्रकृतस्थळीं याचा संबंध काय? १०. गरुड. ११. कुंभकर्णाचें नाकसुद्धां. १२. धान्यमालिनी स्त्रीपासून झालेला रावणपुत्र. १३. मनुष्याचें भय. १४. पक्षी+इंद्र=गरुड. १५. सर्प. १६. रावणानें. १७. धूर=भार (समूह). १८. शत्रु. १९. दुष्ट. २०. रात्रीच्या ठायीं फिरणारे (राक्षस.) २१. वीरश्रेष्ठ. २२. वायूपासून झालेला मारुती. २३. पतन. २४. आस्वल. २५. वानरांचे समुदाय.

ऋक्षेश[1] सांगे उपाय, । **मा**रुति वीरांचा राय ।
औषध्यद्रि[2]प्रति जाय, । आणी त्याचें शिखर. ॥
तदर्धें विशल्य[3] योध । झाले स्वस्थ[4], लब्धबोध[5]; ।
शमे क्षणें अनिरोध[6] । ताप; तसाहि[7] खर[8].॥
शृंग[9] पांवूनी[10] ये तूर्ण, । करी स्वजनाधि[11] चूर्ण, ।
**रा**म म्हणे यशें पूर्ण । हो, हे विश्वीं विखर[13]. ॥
**कुं**भकर्णपुत्र **कुं**भ, । ससैन्य दुजा **नि**कुंभ, ।
आले ते **शुं**भ **नि**शुंभ । तसे युद्धासि खर. ॥ ३८
**सु**ग्रीव **वा**तकुमार । त्यांचा करीती संहार, ।
मेळविती यश सार, । जें न प्राप्त वासवा[14]. ॥
म[15]कराक्ष **ख**रजात, । त्याचा प्रभुबाणें घात, ।
पाहोनी देवर्षि गात । होते त्या महासवा[16]. ॥
माया**सी**ताशिर च्छिन्न । **रा**माचें हृदय भिन्न ।
**सु**ग्रीवादि सर्व खिन्न । करूनी, शोकासवा[17] ॥
पाजी **श**क्रारि **ह**रीस, । देव भ्याले त्या अरीस, ।
कीं तो कल्पांतापरीस । वर्तला अवासवा[18]. ॥ ३९
**बि**भीषण हरी खेद, । सांगे मायातत्वभेद[19], ।
मग त्याचा शिरश्छेद । वीर **ल**क्ष्मण करी. ॥
पुत्रशोकें **पं**क्तितुंड[20] । तापे, जैसें वन्हिकुंड, ।
**सी**ता माराया तो पुंड । चंड[21] नग्नासि[22] धरी. ॥
**स्मरे जा**नकी श्री**रा**म- । चरण, स्ववधकाम, ।
अतिनिर्दय उद्दाम, । देखतां पुढें अरी. ॥

१. जांबवान्. २. ओषधि+अद्रि=द्रोणाचल. ३. प्रहारवेदनारहित. ४. शांत. ५. मूर्छारहित. ६. अनिवार. ७. त्या प्रकारचा. ८. तीव्र (ताप). ९. शिखर. १०. परत पोंचवून. ११. स्वजन+आधि=स्वजनाची मनोव्यथा. १२. यश. १३. पसर. १४. इंद्रास. १५. खरराक्षसाचा पुत्र. १६. महा+सव=मोठ्या रणरूप यज्ञास, किंवा यज्ञरूप रामचंद्रास. १७. शोक+आसव=शोकरूप मद्यास. शक्रारि हरीस (इंद्रास) शोकासवा पाजी—असा अन्वय. १८. मनास वाटेल तसा. १९. कपटतत्वाचा (सीतेचें शिर खरें नव्हे, मायावी आहे हा) स्फोट. २०. दशमुख. (रावण.) २१. भयंकर. २२. नग्न+असि=नागवी तरवार.

सुपार्श्व अमात्य त्यास[1] । स्त्रीहत्या नरकवास ।
देती, ऐसी उक्ति त्रास- । हेतु ऐकवी बरी. ॥ ४०
प्रेषी रावण कटक[2] । चतुरंग तें चटक,[3] ।
श्येनसे[4] विश्वघटक- । रामबाण भासले. ॥
बहुकोटी बहुलक्ष । महाबळ युद्धदक्ष ।
भिन्न होतां शिर वक्ष[5] । पडले ते पासले. ॥
उठले कबंध[6] फार, । रडले राक्षसदार,[7] ।
झाले देव प्रिय गार, । सर्व ताप नासले. ॥
मरतां राक्षस लोक, । दशास्याच्या तो अस्तोक[8] ।
हृदयांत भंग शोक, । लोहकीलसा[9] सले. ॥ ४१
शोकक्रोधपराधीन । दशास्य विचारहीन ।
निघे, म्हणे मी वधीन । दाशरथी या रणीं. ॥
करिता विरथ, रक्षं[10] । ईश्वरशक्तिनें वक्ष[11] ।
लक्ष्मणाचें भेदी, दक्ष[12] । तो न शके वारणीं. ॥
मोडी शक्तीनें काढून । राम त्या भंगी ताडून, ।
देवदृष्टीचीं, झाडून । मद, फेडी पारणीं. ॥
ओषध्यगशृंग[13] पळ- । मात्रें आणि महाबळ, ।
उठोनि सजे तो खळ । रक्षोराज मारणीं[14]. ॥ ४२
भंगाचा न धरी वीट, । पुन्हा युद्धास ये धीट, ।
तो उन्मत्त मानी [15]कीट । नरकीशवर ते. ॥
राम प्रभु महीवर, । दिव्यरथीं रात्रिंचर, ।
देखती समहेश्वर । सर्व देव वरते. ॥
प्रेषी महेंद्र स्वरथ, । तयावरी पुण्यकथ ।
चढे, करी त्यां[16] सव्यथ; । झाले रक्त [18]क्षरते. ॥

---

१. रावणास. २. सैन्य. ३. चिमणी. येथें रूपकालंकार आहे. ४. ससाण्याप्रमाणें. येथें उपमालंकार आहे. ५. वक्षस्थल. ६. मस्तकरहित शरीरें. ७. राक्षसांच्या बायका. 'दार' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे, म्हणून 'रडले' असें पुल्लिंगी रूप योजिलें आहे. ८. मोठा. ९. लोखंडी खिळ्यासारखा. १०. राक्षस. ११. वक्षस्थळ. १२. चतुर जो लक्ष्मण तो. १३. ओषधि+अग+शृंग=द्रोणाचलाचें शिखर. १४. (रामाचा) नाश करण्यास. १५. किडे. १६. रावणास. १७. राम आणि रावण. 'दोघेही' हा कर्ता. १८. स्रवणारे.

दोघेही परम क्रुद्ध, । अस्त्रज्ञ मांडीति युद्ध; ।
[१]अन्योन्यास्त्रतेजोरुद्ध । कोणी न उपरते. ॥ ४३
रघूत्तमें मग खळ । केला व्याकुळ निखळ, ।
क्षतांतूनि खळखळ । रक्त त्याच्या वाहिलें. ॥
[२]भ्रमे मंत्रें जसा भूत, । स्यंदन [३]काढी [४]प्रभूत, ।
क्रोधें [५]तेणें सुज्ञसूत- । कृत्य तें न साहिलें. ॥
सारथि [६]धर्मस्मरण । दे, [७]त्या [८]तो [९]हस्ताभरण, ।
न गणूनियां मरण । [१०]आरंभीं जें राहिलें. ॥
सक्रोधें सिंहें करीस, । जैसें [११]शरभें [१२]हरीस, ।
तैसें [१३]दशास्या अरीस । रघुवीरें पाहिलें. ॥ ४४
[१४]कुंभज मंत्र रामास । सांगे, वाढवी [१५]धामास, ।
मूर्त रवीहि कामास । पुरवाया दे वर. ॥
सप्तअहोरात्रें रण, । ज्यांत [१६]विश्राम न क्षण, ।
खळा धिक्कारुनी, पण । करी [१७]शचीदेवर. ॥
जें खंडी तें उठे शिर, । पळ न लावी उशीर, ।
'शतदां भ्रमांत शीर' । [१८]म्हणे; थकले [१९]वरें ॥
देव. 'रामा ! बाण सोड, । हुं, पुन्हा मस्तक तोड', ।
म्हणतां; होऊनी खोड । पडे न कलेवर. ॥ ४५
[२०]मातलि म्हणे, 'बा ! जाण, । जो ब्रह्मनिर्मित बाण, ।
तो याचे नाशील प्राण, । त्वदाज्ञा न मोडितां. ॥
श्रीरामा देतां स्मरण, । शत्रु पावाया मरण, ।
न करी काळहरण, । ब्रह्मास्त्रासीं जोडितां. ॥
झालें ब्रह्मांड सकंप, । [२१]तेजोजितशतशंप ।
उसळे म्हणत संप । नादें खळा सोडितां. ॥

---

१. अन्योन्य+अस्त्र+तेजस्+रुद्ध=परस्परांच्या अस्त्रतेजानें कोंडलेले. २. याचा 'सूत' (सारथि) हा अध्याहृत कर्ता. ३. येथें 'रावण' हा कर्ता. ४. मोठा. ५. रावणानें. ६. रथी मूर्च्छित झाला असतां त्यास एका बाजूस नेऊन सारथ्यानें त्याचें रक्षण करणें जरूर आहे. हाच सारथ्याचा धर्म. ७. सारथ्यास. ८. रावण. ९. हस्त+आभरण. १०. पूर्वींच यावयाचें तें. ११. शरभ-नांवाच्या पक्ष्यानें. १२. सिंहास. १३. दश+आस्य=रावण. १४. अगस्त्यऋषि. १५. तेजास. १६. विसांवा. १७. इंद्राणीचा दीर=उपेंद्र (राम). १८. याचा कर्ता 'शिर.' १९. आकाशांत. २०. इंद्राचा सारथि. २१. तेजानें जिंकल्या आहेत शंभर विद्युल्लता ज्यानें असें (ब्रह्मास्त्र) सोडितां खळा संप म्हणत उसळे–असा पुढील पंक्तिसह अन्वय.

होय शब्द कडडड, । दिगंतांत गडडड, ।
दशकंठ धडडड, । पडे ऊर फोडितां. ॥ ४६
पडतां दशकंधर, । हतशेष[1] निशाचर, ।
पळों लागले पामर, । ते कपींनीं[2] मारिले. ॥
मत्त मद्यमांसपुष्ट, । देवद्विजांवरी रुष्ट[3], ।
ऋक्षप्लवंगांहीं दुष्ट । सर्व शत्रु सारिले. ॥
श्रीरामें मारुनी पाप, । दशास्य राक्षसक्ष्माप[4], ।
देवब्राह्मणसंताप, । ऐसे सारे वारिले. ॥
केले चक्षुःशस्त्रपूत[5], । न स्पर्शले यमदूत, ।
झाले पूज्य पुरुहूत-[6] । लोकीं, भवीं[7] तारिले. ॥ ४७
झाली दिव्यपुष्पवृष्टी, । देवांची निवाली दृष्टी, ।
आनंदें कोंदली सृष्टी, । दिव्यें वाद्यें वाजलीं. ॥
पावलीं सद्वृंदें[8] मेह[9], । नागखगमृगांसह, ।
तेजें सनक्षत्र ग्रह- । मंडलें तीं साजलीं. ॥
जयजयकार शत- । कोटी प्रतिनाद ततं[10] ।
त्यांहीं सत्यलोकगत[11], । गेहोदरें[12] गाजलीं. ॥
लाजले विघ्न सकळ, । दोष जाहले विकळ, ।
पडे दुःखांसि न कळ[13], । रामोत्कर्षें [14]भोंजलीं. ॥ ४८
हर्षल्या चुकतां जाच । अप्सरा, करीती नाच, ।
चारणांनीं[15] स्तोत्र साच, । रामापुढें मांडिलें. ॥
गंधर्वश्रेष्ठांचें गान, । संतर्पी सर्वांचे कान, ।
रामयशपानें भान । मुनींद्रांनीं सांडिलें. ॥
करुनी राक्षसक्षय, । संपादिला महाजय, ।
रामें नामें भवभय-[16] । मूळाज्ञान खंडिलें. ॥
जैसें पृथ्वीचें वसन[17], । तैसें दुस्तर व्यसन[18], ।
गोष्पदसें तें सहन, । करुनी ओलांडिलें. ॥ ४९

---

१. मरून बाकी शिलक राहिलेले. २. वानरांनीं. ३. रागावलेले. ४. राक्षसांचा राजा. ५. नेत्र आणि शस्त्र यांनीं पवित्र. ६. इंद्रलोकीं. ७. संसारांत. ८. साधुसमूह. ९. आनंद. १०. विस्तृत. ११. ब्रह्मलोकांत असलेलीं. १२. गेह+उदर=गृहाचे मध्यभाग. १३. कळणें, समज. १४. 'दुःखें' हा कर्ता. १५. स्वर्गांतील भाट, देवयोनीविशेष. १६. संसारभयास मूलभूत असें अज्ञान. १७. वस्त्र. (समुद्र.) १८. शत्रूरूप संकट.

**मं**दोदरीसह [1]काय । न गणुनी, मृदु [2]पाय ।
तरी धांवल्याचि, 'हाय!' । वदत त्या बायका. ॥
म्हणती, 'तूं सिंह, शश । देव, प्रख्यात हें वंश, ।
झाली गति ऐसी, [3]वश । होतां [4]पुष्पसायका. ॥
कोण तें संकट खोल, । स्नेहाचें उडालें [5]ओलें, ।
काय अपराध बोल, । राक्षसांच्या नायका'. ॥
[6]श्रोतृचित्त [7]सव्यथ न । हो, [8]साहो शोकप्रथन, ।
साधुरीतीचें कथन, । प्रभूच्याचि आयका. ॥ ९०

**बि**भीषणा दयाघन । म्हणे, 'तापे माझें मन, ।
करीं विलापशमन, । समजावीं या सती. ॥
माळा तापल्या [9]गचीस, । तशा शोकाच्या [10]कंचीस, ।
सांपडल्या; ज्या [11]शचीस । मान्या, दीना भासती. ॥
[12]क्रिया प्रिया साधायास, । योग्या पापा [13]बाधायास, ।
जी गती ते लाधायास, । व्हावी प्राप्त यास ती. ॥
'[14]ममाप्येष यथा तव,' । ऐसें वदे [15]**सी**ताधव, ।
ज्याच्या नामें यशें, [16]भव- । ताप सर्व नासती. ॥ ९१

**बि**भीषण [17]श्रीमदुक्त । प्रेतत्वापासुनी मुक्त, ।
जें करी तें कार्य युक्त । साधी; जैसा [18]नंदन. ॥
पूजिला **मा**तली, पाय । वंदूनी घेऊनि जाय, ।
जेथें **त्रि**[19]दशांचा [20]राय, । तेथें दिव्य [21]स्यंदन. ॥

**रा**वणाचा साधुवर । बंधु, [22]श्री**जान**कीवर- ।
प्रिय जो [23]संतापहर- । गुण जैसा चंदन, ॥

---

१. शरीर. २. यापुढें 'होते' हें अध्याहृत. ३. स्वाधीन. ४. पुष्प हाच आहे सायक म्हणजे बाण ज्याचा त्यास. (मदनास.) ५. ओलावा. ६. ऐकणाराचें अंतःकरण. ७. व्यथायुक्त. ८. सहन करो. ९. चुन्याच्या गचीवर. १०. कैची, अडचण. ११. इंद्राणीस. १२. प्रिया (इष्ट) साधायास, पापा बाधायास योग्या जी गती ते (ती). १३. नाहींसे करण्यास. १४. मम+अपि+एषः+यथा+तव=हा जसा तुझा तसाच माझाही. १५. सीतापति. (राम.) १६. संसारांतील दुःख. १७. श्रीमत्+उक्त=श्रीमान् असा राम त्यानें सांगितलेलें. जें प्रेतत्वापासुनी मुक्त करी तें श्रीमदुक्त युक्त कार्य बिभीषण साधी. १८. मुलगा. १९. देवांचा. २०. राजा. (इंद्र.) २१. रथ. २२. रामाचा आवडता बिभीषण. २३. संताप दूर करणारे आहेत गुण ज्याचे. हें 'चंदन' व 'बंधु' या दोन्हींचें विशेषण.

लक्ष्मणाभिषिक्त[1] पद । पावे[2], ज्यांत नाहीं गद[3], ।
करूनि श्रीरामपद- । पद्मा भावें वंदन. ॥ ९२
राम म्हणे मारुतीस, । 'बिभीषणानुमतीस[4] ।
घेऊनि जा, भेट [5]तीस, । अवसर[6] पाहुनी.॥
सुग्रीव, मी, मंदनुज[7] । हा लक्ष्मण महाभुज ।
आहों कुशल [8]नीरुज, । युद्धायास[9] साहुनी. ॥
भस्म झालें [10]रक्षोबळ, । मेला दशकंठ खळ, ।
त्याला दिलें तिळजळ, । बिभीषण बाहुनीं[11]. ॥
ऐसें सांगुनि, तदुक्त[12] । ऐकोनी ये त्वरायुक्त, ।
जैसा हंस लब्धमुक्त[13], । मानसांत राहुनी. ॥ ९३
राम[14]विश्लेषभीतेस, । पाहे मारुती सीतेस, ।
जैसा मुमुक्षु गीतेस, । गुरूपदेशा[15] वरी. ॥
सांगे प्रभुचा निरोप, । होऊं न दे वर्णलोप, ।
जैसें कल्पद्रुचें रोप, । बहु जतन करी. ॥
संदेश [16]श्रीराममुख । देवीस दे महासुख, ।
निर्धन देवाचा रुख[17] । भेटतां जयापरी. ॥
त्या [18]संदेशामृतें धाय[19], । म्हणे त्रैलोक्याची माय, ।
'योग्य[20] नाहीं, द्यावें काय ?' । होय प्रसन्ना बरी. ॥ ९४
मारुती म्हणे त्यावर, । 'मज आवडे हा वर, ।
देतां न हात आवर, । ज्यांहीं तुज जाचिलें, ॥

---

१. लक्ष्मण+अभिषिक्त=लक्ष्मणानें ज्यास राज्याभिषेक केला आहे असा. २.याचा कर्ता 'बंधु.' ३. रोग. ४. बिभीषणाच्या अनुमतास (घेऊन). ५. सीतेस. ६. समय. ७. मत्+अनुज=माझा भाऊ. ८. निर्+रुज=निरोगी. रेफापुढें रेफ आला असतां त्याचा लोप होतो आणि पूर्वींच्या अ, इ, उ यांचा दीर्घ होतो. या नियमानें 'नीरुज' या शब्दांत रेफाचा लोप होऊन त्याच्या पूर्वींचा 'इ' स्वर दीर्घ झाला. ९. युद्धाचे आयास म्ह० कष्ट. १०. राक्षससैन्य. ११.बोलावून. अथवा 'बिभीषण-बाहुनीं' असें संयुक्त पद घेतलें तर 'बिभीषणाच्या हातांनीं' असा अर्थ होईल. १२. सीतेचें भाषण. १३. मिळालें आहे मोतीं ज्याला. हें हंसाचें विशेषण. १४. रामवियोगानें भ्यालेलीस. २५. गुरु+उपदेश=गुरूच्या उपदेशास. १६. श्रीराम आहे आरंभीं ज्याच्या. १७. देवाचा रुख (वृक्ष) म्ह० कल्पवृक्ष. १८. निरोपरूप अमृतानें. १९. तृप्त झाली. याचा कर्ता 'माय'. २०. (देण्या) योग्य (वस्तु).

त्या या राक्षसी मारीन, । दुःख चित्तींचें सारीन, ।
राहिलें पाप वारीन, । म्यां हें प्रिय याचिलें'.[1]॥
सीता म्हणे, 'राम ! राम ! । यांहीं केलें उक्त[2] काम, ।
जैसें अन्न मांस आम[3] । याचकातें याचिलें. ॥
दासींकडे काय दोष? । यांवरी न करीं रोष, ।
ज्यांत दया तेंचि तोष । व्हाया कर्म वांचिलें.[4]' ॥ ९५
सदुक्त ऐकोनि, वात- । पुत्र वंदी, जोडी हात, ।
म्हणे, 'धन्य तुझी मात, । श्रुतीसींच[5] तोलती[6]. ॥
युक्ता रामाची तूं धर्म- । पत्नी त्वत्सद्यशवर्म[7], ।
विश्वाचें पावोनि शर्म[8], । शीलें साधु डोलती. ॥
सांग निरोप पतीस,' । ऐसें प्रार्थी तो सतीस, ।
जीच्या गुणाच्या ततीस[9]. । नाहीं कांहीं मोल ती. ॥
'मन्मुळें ज्या महायास, । वांछित्यें त्या पहायास, ।
पायांपाशीं रहायास,' । ऐसें झाली बोलती. ॥ ९६
कपि सीतोक्त रामास । अर्पी तो भक्तिधामास, ।
कथुनी 'तिच्या कामास । पुरवाया आणावी.' ॥
बिभीषण सरमेस[10] । सांगे सत्यच रमेस, ।
अळंकार परमेस[11] । द्याया आधीं न्हाणवीं. ॥
शिबिकेंत ती वाहून, । स्वयें जवळ राहून, ।
ये त्या प्रभूतें पाहून । पाय, आली[12] जाणवी. ॥
तीकरवीं अग्निस्नान । करवूनी, शुद्धज्ञान[13]. ।
मूर्ति, [14]जीचें लोक स्थान, । त्या शंकेतें खाणवी. ॥ ९७

---

१. धन्यानें म्हणजे रावणानें सांगितलेलें. २. (याचकानें) अन्न याचिलें (आणि धन्याच्या हुकुमावरून चाकरानें त्या याचकास) आममांस (वाढलें). येथें त्या राक्षसी रावणाच्या आज्ञेनें वागल्या त्याचा दोष त्यांच्याकडे नाहीं असा सीतेच्या बोलण्याचा भावार्थ दिसतो. ३. हिरवें. ४. असें साधुवचन वाचलेलें आहे (?) ५. वेदाशींच. ६. तोलते, बरोबरी करते. ७. तुझें उत्तम यशोरूप कवच. ८. कल्याण. ९. विस्तारास. १०. सरमेला. ही बिभीषणाची पत्नी. ११. श्रेष्ठ अशा सीतेस. सीता हा रमेचा म्ह० लक्ष्मीचा अवतारच होता. १२. (सीता) आली (असें रामाला) जाणवी. १३. निर्मल ज्ञानरूप आहे मूर्ति ज्याची. (रामचंद्र). १४. ज्या शंकेचें.

**ब्र**ह्मादि देव, गंधर्व, । योगी, ज्ञानसिंधु शर्व[१], ।
शुद्धत्व वर्णिती सर्व । देव व्योमीं[२] राहुनी. ॥
**अ**ग्नी स्वयें आणी तीस, । स्थापी रामांकीं[३] सतीस, ।
शोभे शोभवी पतीस, । दिव्य प्रभा लाहुनी. ॥
पुत्रातें सबहुमान । तात[४] सोडूनी विमान, ।
आशीर्वाद शतमान[५] । दे, आलिंगी बाहुनीं. ॥
'**सी**तेचें पवित्रपण, । एणें जयप्रद रण, ।
पावला सिद्धीस पण, । आनंदलों पाहुनी'. ॥ ९८
**श्रीरा**मातें म्हणे शक्र, । 'उद्धरिला हस्ती[६] चक्र- ।
धरें त्वां वधूनी नक्र[७] । जैसा, तैसा हा जन. ॥
गर्वविषाच्या रुखास[८], । मारुनी दशमुखास, ।
देवराज[९] श्रीसुखास । केला भव्य भाजन[१०]. ॥
**रा**घवा! तूं सानुराग । सभाग्यांत महाभाग, ।
कांहींतरी वर माग, । घडों दे संभाजन[११]. ॥
सागर तूं, अन्य कूप, । तत्किरीट[१२] दीपरूप, ।
त्यांहीं त्वत्पदाचें भूप । करूत नीराजन[१३]. ॥ ९९
'**ऋ**क्ष कीश झाले प्रेत, । तेणें माझें खिन्न चेत, ।
ते उठीव मृतशेत[१४] । जैसा ऊठवी घन'. ॥
ऊठवीले जैसे सुप्त, । सद्गुण न होतां लुप्त, ।
होते प्रभुप्रेमगुप्त[१५] । ते, जेंवि लुब्धधन[१६]. ॥
वंदिती प्रभुचरण । ज्यांहीं वरिलें मरण, ।
पावे करितां स्मरण, । विस्मया त्यांचें मन. ॥
होऊनी आनंदवश । गाजवीती दिशा दश, ।
म्हणती श्रीरामें यश । दिलें भक्त जे जन. ॥ ६०
**वि**भीषण म्हणे, 'पाव, । माझा त्वत्सत्कारीं भाव, ।
भक्तवत्सल हें नाव । प्रभो! तुला साजतें. ॥

---

१. महादेव. २. आकाशांत. ३. राम+अंक=रामाच्या मांडीवर. ४. दशरथ. ५. शत (वर्षें) आहे मान (आयु:प्रमाण) ज्याचें. हें आशीर्वादाचें विशेषण. ६. गजेंद्र. ७. नक्र. हा हूहू नांवाचा गंधर्व देवलऋषीच्या शापानें नक्र झाला होता. (भा० स्कं० ८, अ० २–४). ८. वृक्षास. ९. इंद्र. १०. पात्र. ११. पूजन. १२. त्या राजेलोकांचे जे प्रभायुक्त किरीट ते तुझ्या पायां पडतानां आरतीसारखे होवोत. १३. आरती, ओंवाळणें. १४. मेलेलें शेत. १५. रक्षिलेले. १६ लोभ्याचें धन.

श्रीरामा ! त्वां बलहीन । बंधुत्यक्त जैसा जीन[1] ।
तारिला व्यसनीं दीन, । यश विश्वीं गाजतें. ॥
राम म्हणे, 'मद्वियोग । वत्सा भरता हृद्रोग, ।
त्यावीण भोगाया भोग । बापा! मन लाजतें. ॥
मना[2] तुझें हरी शील । केलें, फार करीशील ।
जें त्वच्चित्तीं वरिशील । इष्ट राहो आज तें. ॥ ६१
सैकीश[3] सुग्रीव पूज, । यांत मत्पूजन तूज, ।
सख्या ! सांगितलें गूज, । न शकें रहावया. ॥
आतां मला न होकर[4], । बापा ! उपाय तो कर, ।
जेणें पावेन लौकर, । भरता पहावया'. ॥
करी तसेंच तो धीर[5], । पूजी सुग्रीवादि वीर, ।
कीं भक्ताच्या[6] नसे धीर, । वियोगा सहावया. ॥
यश मेळवी धवळ, । जेंवी सुधेचा कवळ, ।
शीघ्र आणवी जवळ । पुष्पका वहावया. ॥ ६२
रक्षःकपीशांचा[7] हेत । जाणुनि तयांचें चेत[8] ।
हर्षवी सैन्यासमेत । त्या सख्यांतें घेउनी. ॥
सदार सानुज राम । पुष्पकीं विश्वाभिराम, ।
भक्तकल्पद्रुमाराम[9] । बैसे, स्तुती सेवुनी. ॥
निजविजयाचा हेतु[10], । महापापधूमकेतु[11], ।
सीतेतें दावूनि सेतु, । अत्याश्चर्य देउनी. ॥
युद्धवियोगचरित- । सुधा कर्णांत भरित, ।
जाय गुहेतें[12] त्वरित, । भान लया नेउनी. ॥ ६३

---

१. म्हातारा. २. तुझें शील (माझ्या) मना हरी—असा अन्वय. ३. वानरांसहवर्तमान. ४. बोलाव. होकारणें म्हणजे बोलावणें. या न होकर म्ह० बोलावूं नको. 'होकारणें' या शब्दाचा याच अर्थीं पंतानीं उपयोग केलेला अन्यत्रही आढळतो—'भोजन करा म्हणे शठ, देव म्हणे मज कशास होकरितां । जेवा तुम्हींच, दाटुनि आदर आग्रह कशास हो करितां ॥' (उद्योगपर्व-कृष्णशिष्टाई.) ५. ज्ञानी. ६. भरताच्या वियोगा सहावया. ७. राक्षस आणि वानरश्रेष्ठ त्यांचा. ८. मन. ९. भक्त+कल्पद्रुम+आराम्=भक्तांचा कल्पद्रुमांचा बाग. १०. कारण. आपल्याला विजय प्राप्त होण्याचें साधन (सेतु). महापाप जो रावण त्याचा धूमकेतू (अशुभ चिन्ह). १२. ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव ज्या गुहेंत रहात होता तिकडे. वालीनें दुंदुभि नांवाचा दैत्य मारला. तेव्हां त्याचें रक्त उडालें तें पाहून तेथील वनांत असणाऱ्या मतंगऋषीनें त्या पर्वतावर न येण्याबद्दल वालीस शाप दिल्यामुळें त्यानें ती जागा वर्ज केली होती, म्हणून सुग्रीव ऋष्यमूक पर्वतांतील गुहेंत निर्भयपणें रहात असे. (वा० रा० किष्किंधा कां० स० ११.)

श्रीचा पुरवाया काम । तारेतें आणवी राम, ।
मुख्यस्त्रियांसह [1]धाम । सोडून ती पातली. ॥
वेदाचें मानिती उक्त । सर्व ज्ञाते व्हाया मुक्त, ।
मानूनी प्रभूचें युक्त, । [2]देवेरासीं रातली. ॥
साध्वींच्या पंक्तींत ठाव । पावलें, जयेचें नाव, ।
रामीं शुद्धप्रेमें भाव, । भाग्यें नाहीं मातली. ॥
[3]श्रीमत्प्रियेनें ती फार । आदरूनीयां [4]उदार-।
गणा सहपरिवार, । पुष्पकांत घातली. ॥ ६४
श्रीतें सांगे [5]शत्रुघूक- । सूर्य, 'तो हा ऋष्यमूक, ।
जेथें वियोगाची [6]हूक । सुग्रीव[7]मंत्रें शमे. ॥
हे पंपा [8]सरसी जाण । येथें तापले मत्प्राण, ।
[9]त्वद्विश्लेषीं काम बाण । हाणी, काळसा गमे. ॥
स्वच्छ [10]त्वच्छीलसें [11]अर्ण, । [12]पद्म [13]त्वदाननवर्ण, ।
[14]पिक तापवाया कर्ण । [15]पंचम [16]विष वमे. ॥
कांते! हा [17]मतंगाश्रम, । येथें गेला माझा श्रम, ।
शबरी उडवी [18]भ्रम, । चित्तींचा, मनोरमे! ॥ ६५

---

१.घर. २. दिराशीं (सुग्रीवाशीं). सुग्रीव हा वालीचा भाऊ म्हणून हा तारेचा दीर होता. तारा ही वालीची बायको. हिनें रामाच्या सांगण्यावरून सुग्रीवाचा पतित्वानें स्वीकार केला. रातली=रत झाली. ३. श्रीमान् जो राम त्याच्या प्रियेनें म्हणजे सीतेनें. ४. उदार आहेत गुण जीचे अशी तारा. येथें 'गण' शब्दानें निर्वाह होत नाहीं. त्या ऐवजीं 'गुण' शब्द असावा असें वाटतें. ५. शत्रुरूपी घूका (घुबडा) चा सूर्य असा राम. ६. वेदना, आरोळी. या शब्दाचा मूळ अर्थ 'कोल्ह्याचा शब्द' असा आहे. ७. मसलतीनें. ८. सरोवर. ९. तुझ्या वियोगामुळें. १०. तुझ्या स्वभावासारखें किं० सद्वर्तनासारखें. ११. उदक. १२. कमळ. १३. त्वत्+आनन+वर्ण=तुझ्या मुखाच्या कांतीसारखी आहे कांति ज्याची असे. १४. कोकिळ. १५. कोकिळाचा स्वर.—निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत, व पंचम, हे सात स्वर होत. गजाचा शब्द तो निषाद, गाईचा शब्द ऋषभ, शेळ्या वगैरेंचा गांधार, मोरांचा श षड्ज, क्रौंचपक्ष्यांचा मध्यम, घोड्यांचा धैवत, कोकिलांचा पंचम. १६. विरही लोकांस कोकिळांचा स्वर अत्यंत दुःसह होतो म्हणून त्यास विष म्हटलें आहे. १७. मतंग+आश्रम. १८. रामाच्या मनास आपलें येथून पुढें कसें काय होईल याविषयींची चंचलता आली होती, ती शबरीनें तें सर्व पवित्र वन दाखविल्यानंतर सर्व नाहींशी होऊन रामाचें मन प्रसन्न होऊन संशय दूर झाला. (वा० रा० अर० कां० स० ७४.)

चार कोस ज्याचे हात, । हा त्या कबंधाचा घात, ।
करी तुझा [1]दीर, वात । जैसा तरूचा [2]सये !. ॥
तो हा वट, येथें तात । जटायू पावला [3]पात, ।
नाकीं तद्यश गातात, । जयाचा वीट नये. ॥
या गोदेतें प्रणिपात । करीं, [4]तीर्थ [5]तीर्थव्रात, ।
[6]इच्या [7]पोटीं [8]म्हणे [9]मात- । रव त्वं, [10]महादये ! ॥
जीचें [11]अमृतावदात । तोय सर्वदा [12]अयात- ।
याम पंचवटी [13]शांत- । खनी हे [14]शुभा यशें. ॥ ६६
[15]कुंभजाचा मनोरम, । शरभंगाचा आश्रम, ।
[16]हा [17]अत्रीचा, जेथें श्रम । आमुचा न राहिला. ॥
तो हा [18]चित्रकूटगोत्र, । ज्याचें पुण्यप्रद [19]स्तोत्र, ।
साधूनीं जो [20]अग्निहोत्र । तैसा प्रेमें पाहिला. ॥
[21]कालिंदीतें हस्त जोड, । [22]श्रांता इचें नाम [23]लोड, ।
इणें करूनियां रोड । [24]महामोह दाहिला. ॥
ज्याचे देवमान्य दास । भरद्वाजाचा [25]आवास, ।
हा दे [26]दोषां जैसा त्रास । पक्षींद्र महाहिला. ॥ ६७
गंगेतें डोळे भरून । पहा नमन करून, ।
[27]संकटाब्धीतें तरून । आलीस इच्या बळें. ॥

---

१. लक्ष्मण. २. हे सखी. ३. पतन. ४. पवित्र. ५. तीर्थांचा समुदाय. ६. गोदेच्या. ७. उदरांत. एथें 'असे' हें क्रियापद अध्याहृत आहे. ८. याचा कर्ता 'राम.' ९. मातः+अव+त्वम्=आई! रक्षण कर तूं. १०. मोठी आहे दया जीला अशा गोदे. ११. अमृत+अवदात=अमृतासारखें शुद्ध. १२. ताजें. यात आहे याम (प्रहर, पुष्कळवेळ ज्याचा तें) यातयाम म्ह० शिळें. तसें नव्हे तें अयातयाम. १३. सुखाची खाण. १४. यशानें शोभणारी. (मंगल.) १५. अगस्त्याचा. १६. पुढें दिसतो आहे तो आश्रम. १७. अत्रिऋषीचा. हा सप्तर्षींपैकीं एक होय. कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ हे सप्तऋषि होत. १८. चित्रकूटपर्वत. १९. स्तुति. २०. समंत्रअग्निस्थापनपूर्वक होमादि करणें, त्या कर्मासारखा पवित्र. २१. कलिंदपर्वतांतून निघालेली म्हणून हीस कालिंदी (यमुना) असें म्हणतात, तिला. २२. थकलेल्यास. २३. लोडासारखे विश्रांतिप्रद. २४. मोठी भ्रांति. २५. राहण्याची जागा. २६. पातकांस. २७. संकट+अब्धि=संकटसमुद्राला.

सीते! [1]करीती [2]हे धन्य, । भक्ता असें तीर्थ अन्य, ।
नाहीं, तारि [3]भवजन्य । सर्व वारिती पळें. ॥
उद्धरीती नित्य लक्ष । जीव, न म्हणतां रक्ष, ।
लाजविले [4]गुप्तिदक्ष । [5]पीयूष इच्या बळें. ॥
[6]देती पीतां [7]मुक्तिपद, । गंगास्तवें [8]मोहगद, ।
केला तेजें [9]ध्वस्तमद, । जैसा तो [10]कळी [11]नळें. ॥ ६८

हें [12]गुहाचें [13]शृंगवेर, । सीते ! तें [14]साकेत [15]हेर, ।
नमस्कारीं वाटे येर । पूर यापुढें दुजें. ॥
याचे [16]शक्राधिकरूप । [17]त्राते सिंधु, अन्य कूप, ।
लोभें झाले [18]भग्न भूप । फार करूनी [19]झुंजें. ॥
बहु मान्य हें [20]हरीस, । नाकींच्या [21]पुरापरीस, ।
वाटे वृत्राच्या [22]अरीस । पद आपुलें खुजें. ॥
[23]देवि! शरयूंत स्नान । करीशील [24]सुधापान, ।
देसील [25]अर्थीष्ट दान । प्रिय पुरेल तुझें.' ॥ ६९
कपी पाहती उडून, । ते न भासती [26]उडून, ।
आनंदाब्धींत बुडून । [27]आत्मे देव वानिती. ॥

१. धन्य करीती (करिते). २. हे (ही गंगा). ३. संसारापासून उत्पन्न होणारा. ४. संरक्षणाविषयीं निपुण. ५. अमृत. ६. (गंगा) देती (देते). ७. मोक्षस्थान. ८. मोहरूप रोग. ९. नष्ट आहे गर्व ज्याचा असा. १०. कलिपुरुष. कृत, त्रेता, द्वापर आणि कलि या चार युगांपैकीं चौथ्या युगाचा अधिपति. ११. नळराजानें. कलि एकदां नळराजाच्या शरीरांत शिरून त्यानें त्यास फार त्रास दिला तरी आपला धैर्यभंग होऊं न देतां नळानें त्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं—अशी कथा आहे. १२. या नांवाच्या कोळ्यांच्या अधिपतीचें. १३. गांवाचें नांव. १४. अयोध्या. १५. पहा. १६. इंद्राहून अधिक आहे रूप ज्यांचें म्ह० इंद्रापेक्षां अधिक तेजस्वी व सुंदर असे पूर्वींचे अयोध्याधिपति. याचे (साकेताचे) त्राते शक्राधिकरूप (सूर्यवंशीय राजे हे) सिंधु, अन्य (भूप) कूप (ते) लोभें भग्न झाले—असा अन्वय. १७. रक्षण करणारे. १८. पराजित. १९. युद्धें. २०. इंद्रास. २१. अमरावतीपेक्षां. २२. वृत्रासुराचा शत्रु इंद्र त्यास. २३. हे सीते. २४. अमृतप्राशन. २५. अर्थि+इष्ट=याचकांची इच्छा तदनुरूप दान. २६. उडु+ऊन=नक्षत्रांहून कमी. २७. आत्मे देव (त्या कपीस) वानिती. वानर हे देवांशसंभव होते, म्हणून जो जो वानर ज्या ज्या देवाचा अंश होता तो तो देव त्याचा त्याचा आत्मा होय.

सुग्रीव राक्षसवर[1] । नभीं गेले दूरवर, ।
मिळाला दुर्लभ वैर[2] । ऐसें मनीं मानिती. ॥
श्रीरामाची सेवाजोड[3] । पुरवीती सवें[4] कोडें[5], ।
शक्राची संपत्ति गोड । नव्हे , मोटी हानि ती[6]. ॥
म्हणती[7] हर्षोनि जय । कीर्ति महा लाभे; नय[8]- ।
धर्मज्ञेश प्रभुरय[9]- । मेवं भाग्य वानिती. ॥ ७०
श्रीभरद्वाजाचे पाय । वंदी प्रेमें रामराय. ।
तो म्हणे, 'मी करूं काय? । प्रिय सांग वासरा[11]! ॥
श्रांततृषितांहीं[12] पान । करितां, त्या तृप्तिदान[13], ।
देतां मानूनीयां हान[14], । वीट न यावा सरा[15]. ॥
केलें[16] देवद्विजकार्य[17], । सुखी सानुज सभार्य ।
आलासी, निवाले आर्य[18]. । जोडी[19] या न वासरा[20]. ॥
भरता[21] शत्रुघ्नासह । पावा[22], या स्वाश्रिता महं[23], ।
करा दिनीं अनुग्रह, । भीतांस व्हा आसरा'. ॥ ७१
कल्पद्रुमाधिकसेव[24] । नतां[25] मुक्तिसुख सेव[26] , ।
म्हणणारा, राम देव । सद्बंधूतें[27] आठवी. ॥
जेंवी शंकर गुहास[28], । तेंवी सुसखा[29] गुहास[30] ।
सुखें कराया सुहास[31] । मारुतीतें पाठवी. ॥

---

१. बिभीषण. २. रावणास मारिल्यावर बिभीषणास लंकेच्या राज्याचा अभिषेक करून रामचंद्र अयोध्येस यावयास निघाले असतां बिभीषण सुग्रीव इत्यादिकांनीं आम्हीहि आपणांबरोबर अयोध्या पाहाण्यास येतों अशी विनंती केली व ती त्यानें मान्य केली होती, हाच वर म्ह० देणगी. ३. सेवा हाच जोडलेला पदार्थ. ४. तत्काळ. ५. इच्छा. ६. संपत्ती. ७. 'सुग्रीव' आणि 'राक्षसवर' हा याचा कर्ता. ८. नीति आणि धर्मही जाणणाऱ्यांत श्रेष्ठ असा राम. ९. प्रभुः+अयम्+एवम्=प्रभु हा असें. १०. भरद्वाज. ११. हे वत्सा रामा. १२. दमलेल्या अशा तान्हेल्यांनीं. १३. तृप्तीचें दान. १४. हानि. १५. सरोवराला. १६. 'केलें' ह्या क्रियापदाचा कर्ता 'तूं' अध्याहृत. १७. देव आणि ब्राह्मण यांचें कार्य. राक्षसाच्या वधानें यज्ञादि धर्मसंवर्धक केलेलें कार्य. १८. श्रेष्ठ. १९. बरोबरीचा (दिवस). २०. दिवसास. २१. शत्रुघ्नासह भरता पावा–इ० अन्वय. २२. प्राप्त व्हा, पोंचा. २३. आनंद. २४. कल्पद्रुमापेक्षां अधिक (फलदायक) आहे सेवा ज्याची. २५. भक्तांस. २६. सेवन कर. २७. आपला चांगला बंधू जो भरत त्यास. २८. कार्तिकस्वामी. २९. सन्मित्र असा राम. ३०. गुह नांवाच्या कोळ्यास. ३१. सुंदर हास्य.

रामसेवालाभरत[1] । निषाद[2], तोही भरत ।
सात्विकभाव[3] स्मरत । दयाघना[4] आठवी[5]. ॥
असता[6] तरी पाहून, । वेगें हर्षातें लाहून, ।
रोमांच देहीं वाहून, । तो[7] स्पर्शता; पाठवी. ॥ ७२
पायीं मस्तक ठेवून, । चित्ता आनंद देवून, ।
आज्ञा मुनीची[8] घेवून, । हृष्ट कराया, बोलें[9], ॥
फळसमृद्धि[10] हा वर । मागोनि, तो क्ष्मावर[11], ।
चढे व्योमयानावर[12], । भेटे गुहातें पळें. ॥
तयासह[13] निघे मग, । तोयद[14] चातकखग[15]-।
सह जैसा सर्व जग । तर्पाया प्राज्यें जळें. ॥
पादुका शिरीं[16], स्मरत । सगुरुजन[17] भरत, ।
आला प्रेमाश्रु क्षरत[18] । बाष्पनिरुद्धगळें[19]. ॥ ७३
उतरे[20] यानावरून[21], । पायीं पादुका वरून, ।
भेटे उरासीं धरून । त्या सानुजा[22] तापसा[23]. ॥
नाहीं हर्षविला चीर[24] । वाहून चरणीं शीर ।
म्हणतां[25] बा! मागें फीर; । ऐसें[26] करी तापसा. ॥
त्याचा हरी सर्व खेद, । बोले प्रिय जैसा वेद, ।
नुरवी तिळही भेद, । बहु द्रवे बापसा. ॥

---

१. रामाच्या सेवेच्या लाभाविषयीं आसक्त. २. कोळी (गुह). ३. सत्वगुणयुक्त भाव म्ह० वृत्ति आहे ज्याची. हें भरताचें विशेषण. ४. दयेचा मेघ. (राम.) ५. याचा कर्ता 'भरत.' ६. (भरत जवळ) असता तरी (तर). ७. राम (भरताला) स्पर्शता. (परंतु जवळ नसल्यामुळें मारुतिला) पाठवी. ८. भरद्वाजाची. ९. ऋषींच्या आग्रहास्तव. १०. आपल्या राष्ट्रांत फळांची समृद्धि. ११. पृथ्वीपति. (राम.) १२. विमानावर. १३. गुहासहवर्तमान. १४. तोय म्ह० पाणी तें देणारा. (मेघ. १५). चातकपक्ष्यासहवर्तमान. १६. यापुढें 'घेऊन, रामाला' या दोन शब्दांचा अध्याहार आहे. १७. वडीलें माणसांसह. १८. स्रवत. १९. बाष्पानें भरून आलेल्या गळ्यानें (उपलक्षित). २०. याचाकर्ता राम अध्याहृत. २१. यान म्ह० विमान त्यावरून. यान म्ह० जाण्याचें साधन. २२. सह+अनुज=शत्रुघ्नासहवर्तमान. २३. तपश्चर्या करून राहणाऱ्या भरतास. २४. चिर म्ह० पुष्कळ वेळपर्यंत. २५. बा! मागें फीर म्हणतां (म्हटल्यामुळें), चरणीं शीर वाहून (भरत) चीर हर्षविला नाहीं—असा अन्वय. २६. पुढें सांगितल्याप्रमाणें.

जोडी गुरुजना हस्त, । पौर तोषवी समस्त ।
ज्याच्या नामें होती ध्वस्त । वैरी [1]महापाप [2]सा. ॥ ७४
[3]नंदिग्रामीं तो श्रीरंग । भरतादिक अभ्यंग, ।
[4]सर्वलोकशोकभंग । करावया, [5]करवी. ॥
[6]स्वसखांचे युद्धक्लेश । नाशी, [7]स्वसमानवेश ।
[8]रम्यरूप [9]मानवेश । रामचंद्र धरवी. ॥
[10]कपिराक्षसभटांस, । [11]संगररंगनटांस, ।
[12]जयमंगलघटांस । आणी शोभा बरवी. ॥
[13]सुश्रीसुधांबुवृष्टीस । करी [14]मातांच्या दृष्टीस, ।
राम, [15]समस्त सृष्टीस । पुरीं जातां भरवी. ॥ ७५
शिरे साकेतीं गेहांत । दीप, कीं प्राण देहांत, ।
लेश न्यूनत्व [16]स्नेहांत । न प्रवासें दाविलें. ॥
करूनीयां बहुमान, । प्रार्थूनी देवासमान, ।
[17]वित्तेशांकडे विमान । [18]रामभद्रें लाविलें. ॥
[19]सामें कैकेयीचें मन । निववी तो दयाघन, ।
[20]मंथरादुर्मतवन- । वन्हिनें जें ताविलें. ॥
अभिषेचितां [21]स्वयाज्य, । देतां श्रीवसिष्ठें राज्य, ।
विश्वें आपुलेंचि प्राज्य । [22]भव्य भाग्य भाविलें. ॥ ७६

---

१. मोठे दुष्ट. २. सहा—काम, क्रोध इ०. ३. या नांवाच्या अयोध्येजवळील गांवांत. ४. सर्व लोकांच्या दुःखाचा परिहार. ५. ह्या क्रियेचें वरचे ओळींतील 'अभ्यंग' हें कर्म. ६. आपल्या मित्रांचे म्ह० बिभीषण, सुग्रीव इ० चे. ७. आपल्यासारखा पोषाख. ८. सुंदर. ९. मानव+ईश=मानवांचा अधिपति. १०. सुग्रीव इ० वानरवीर व बिभीषण इ० राक्षसवीर यांस. ११. युद्धरूप रंगभूमीवरील नटांस. १२. जय मिळवून देणारे असे केवळ मंगलघटच त्यांस. १३. रम्य शोभारूप अमृत हेंच पाणी त्याच्या वृष्टीस. १४. कौसल्या वगैरे आयांच्या. रामास पाहून त्यांना परम आनंद झाला—हें तात्पर्य. १५. सर्व लोकांस. १६. प्रीतींत. प्रवासानें स्नेह कमी होतो असें म्हणतात परंतु रामाविषयीं तसें झालें नाहीं. १७. वित्त+ईश=कुबेर. १८. श्रेष्ठ किंवा मंगलप्रद अशा रामानें. १९. सांत्वनानें. २०. मंथरेचा दुष्ट अभिप्राय हाच अरण्यांतील अग्नि म्ह० वणवा, त्यानें. मंथरा ही कैकेयीची दासी होती. हिची बुद्धि दुष्ट असे. रामास राज्याभिषेक होतो ही गोष्ट तिला समजल्यावर तिनें कैकेयीस मसलत सांगितली कीं, 'तुला दशरथापाशीं दोन वर मागावयाचे आहेत, त्यांपैकीं एकानें रामानें चौदावर्षें वनांत जावें व दुसऱ्या वरानें भरतास राज्य द्यावें असें माग.' (वा० रा०, अयो० कां०, स० ७-९.) २१. आपला यजमान. (रामचंद्र.) २२. मोठें, शुभ.

[1]युवराज तो भरत । केला जो न [2]लोभरत ।
ज्याचें हृदय भरत । जाय भक्तिच्या रसें. ॥
करूनी [3]तेजोविस्तार । हरूनी [4]शोकाधिभार ।
चित्तें हृष्टें केलीं फार, । सूर्यें जैसीं [5]सारसें. ॥
रामें प्रजा [6]प्रजासम । पाळिल्या, न त्रासी [7]यम, ।
मानिति पावुनि [8]शम, । न [9]कैवल्य [10]सारसें. ॥
ज्याच्या गेहांत, [11]यदुक्त । वेद, ज्यातें ध्याती मुक्त, ।
[12]तत्सुसंनिधानयुक्त । [13]लग्न मुंज बारसें. ॥ १२७
विश्वगीत रामराज्य, । ज्यांत [14]पुरुषार्थ प्राज्य, ।
जैसें [15]सुरभीचें आज्य, । पूज्य सर्व [16]सर्पितें. ॥
अमृताचें यश काय । सेवील्या म्हणवी 'हाय!' ।
करूनी [17]अजर काय । देवांतेंचि तर्पितें. ॥
[18]पंक्तिभेद करी [19]खळ, । च्छेदवी राहुचा गळ, ।
[20]विषयसेवना बळ । मत्तपण अर्पितें. ॥

---

१. राजाच्या हाताखालीं काम करणारा राजपुत्र. युवराज कोणास करावें व तो कसा असावा ह्याविषयीं कामंदकाचें वचन आहे तें असें:—'विनयोपग्रहान्भूत्यै कुर्वीत नृपतिः सुतान् । अविनीतकुमारं हि कुलमाशु विशीर्यते । विनीतमौरसं पुत्रं यौवराज्येऽभिषेचयेत् ॥.' रामास अद्याप पुत्र नव्हते व भरतावर पुत्रवत् प्रेम होतें म्हणून त्यालाच युवराज केलें. २. लोभांत आसक्त. ३. पराक्रमाचा व कांतीचा विस्तार. ४. दुःखाचें ओझें. ५. कमळें. ६. अपत्यतुल्य. ७. अंतक. (मृत्यूची देवता.) हा त्रास देत नव्हता म्ह० कोणाला अकालीं मरण येत नसे. ८. शांति. ९. मोक्ष. १०. श्रेष्ठसें. ११. यत्+उक्त=ज्या रामानें सांगितलेले. वेद हे ईश्वरप्रणीत आहेत. १२. त्या रामाच्या सुंदर संनिध्यानें युक्त. १३. लग्न, मुंज, बारसें हे समारंभ राजवाड्यांत होत असत. तात्पर्य कीं, त्रैलोक्याधीश्वर राम याप्रमाणें सांसारिक समारंभांत निमग्न होता. १४. पुरुष+अर्थ=धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ. १५. कामधेनूचें. १६. सर्व घृतांस. १७. नाहीं म्हातारपण ज्यास असें. १८. अमृतप्राशनाला देवमंडळी बसली असतां त्यांत मुकाट्यानें राहु येऊन अमृतपानास बसला. हें विष्णूस समजतांच त्यानें आपल्या चक्रानें राहूचा शिरच्छेद केला—अशी कथा आहे. १९. रामराज्याशीं अमृताची तुलना करितां तें पुढील कारणामुळें खळ म्ह० दुष्टच आहे—असा कवीचा अभिप्राय. २०. विषयोपभोग करण्यास.

नाहीं दया जया लेश, । [1]मेल्या दावीतें [2]स्वदेश, ।
देतें अर्थिजना क्लेश, । [3]साध्वमान्य [4]दर्पि [5]तें. ॥• ७८
ऋषि भेटले रामास, । [6]जयश्रीक्रीडाधामास, ।
प्रेमें त्या पूर्णकामास । [7]कुंभसंभव [8]स्तवी. ॥
'देवगोब्राह्मणकाळ । मारीला [9]राक्षसपाळ, ।
केला विश्वाचा सांभाळ, । कीर्ति गातील कवी. ॥
[10]बुधां तुझी कथामाय, । सुधा इच्यापुढें काय, ।
इतें आयके, जो [11]गाय, । त्या [12]हे सर्वदा [13]नवी. ॥
धाक काळा [14]भैरवास । तुझा, आम्हीं [15]स्वैरवास ।
करूं, [16]जगा कैरवास । तूं प्रभो! [17]शीतच्छवी. ॥ ७९
उग्र रावणापरीस । मेघनाद जो [18]हरीस, ।
जैसा शरभ [19]हरीस । धरी संगरीं बळी. ॥
[20]श्रीरामा! मीनाचा [21]दाश । लीलेनें करितो नाश, ।
शत्रुकंठीं [22]काळपाश । [23]तो तैसा [24]पाडि, [25]छळी. ॥
करूनीयां सत्ता, [26]पदें । [27]घेतां [28]शक्रदत्तापद, ।
हा [29]दुःसहसत्तापद, । जेंवी [30]स्वयुगीं [31]कळी. ॥

---

१. मरून स्वर्गीं गेलेल्यास. लोक आपलें पुण्यफळ भोगण्यास मरणानंतर स्वर्गलोकास जातात आणि पुण्य संपल्यावर ते पुन्हा पृथ्वीवर जन्मास येतात. 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति' या वचनास अनुसरून हें लिहिलें आहे. २. मृत्युलोक. आपण जेथून स्वर्गांत आले तो देश. ३. सज्जनांस न आवडणारे. ४. मादक. ५. अमृत. या घनाक्षरींत कवीनें रामराज्याची अमृताशीं तुलना केली आहे व अमृत हें अनेक गोष्टींनीं त्याज्य आहे असें दाखवून रामराज्य श्रेष्ठ असें वाचकांस सुचविलें आहे. एथें उपमेय 'रामराज्य' व उपमान 'अमृत' होय. उपमानापेक्षां उपमेयाचें आधिक्य वर्णिल्यामुळें एथें **व्यतिरेकालंकार** आहे. ६. जयलक्ष्मीचें क्रीडामंदिरच अशास. ७. अगस्त्य ऋषि. ८. रामाचें स्तवन करिता झाला. ९. राक्षसांचा अधिपति. (रावण.) १०. ज्ञात्यास. ११. गातो. १२. ही कथा. १३. कंटाळा न आणणारी. १४. भयंकर अशा काळा म्ह० मृत्यूस. १५. स्वच्छंद, निर्भयपणानें. १६. सर्व जग हेंच चंद्रविकासी कमल त्यास. १७. शीत=थंड आहे छवि म्ह० कांति ज्याची तो शीतच्छवी. (चंद्र.) हा **रूपकालंकार** आहे. १८. इंद्रास. १९. सिंहास. २०. हें संबोधन आहे. २१. कोळी, मासे धरणारा. २२. मृत्यु-दायक पाश. २३. इंद्रजित. २४. या क्रियेचा कर्ता 'तो,' व कर्म 'काळपाश.' २५. याचा कर्ता 'तो' (इंद्रजित). २६. इंद्रपद. २७. घेणारा. २८. शक्र+दत्त+आपद=इंद्राला दिली आहे विपत्ति ज्यानें. २९. दुःसह+सत्+तापद=सोसण्यास कठिण असा साधूला त्रास देणारा. ३०. आपल्या युगांत म्ह० कलियुगांत. ३१. कलिपुरुष.

त्याचा सुदुर्घट अंत, । करें काळाहीचा[१] दंत ।
उन्मूळीला[२], झाले संत । या यशोंबुजीं[३] अळी[४]'. ॥ ८०
श्रवणीं धरूनी काम । पुसे रक्षःकथा राम, ।
सांगे सत्तपःश्रीधाम[५] । कुंभभू[६] महामती. ॥
'ब्रह्मजपुलस्त्यसुत[७] । तो विश्रवा साधुनुत[८] ।
वैराग्यादिगुणयुत[९] । ज्याची स्वधर्मी रती. ॥
त्या दे कन्या भरद्वाज, । सुमालीही[१०] रक्षोराज[११] ।
ती कैकसी[१२]; मुनिजाज[१३] । यक्षगुह्यकपती[१४]. ॥
त्याचें नाम वैश्रवण; । दुजीचे[१५] पुत्र रावण, ।
कुंभकर्ण, बिभीषण; । तीसरा भला अती. ॥ ८१
दशानन[१६] निशाचर[१७] । तपें होमी शिरें[१८] खर, ।
ब्रह्म्यापासूनी घे वर, । कपी नर न[१९] गणी. ॥
शत्रुसर्पाचा सुपर्ण[२०] । निद्रा मागे घटकर्ण[२१], ।
बेगड घे त्यजी स्वर्ण[२२], । भ्रमवीला[२३] त्यांक्षणीं[२४]. ॥
बिभीषण वैरी[२५] धर्म, । पावे चतुर्मुख शर्म, ।
त्या पाहोनी शुद्ध कर्म । अमरत्व दे धणी[२६]. ॥
कुंभकर्णानुजा[२७] नाम । जीचें शूर्पनखा, धाम[२८] ।
महाबळाचें, जीं काम[२९]-। रूपा होय देखणी. ॥ ८२

---

१. कृष्णसर्पाचा. २. उपटून टाकिला. ३. यशस्+अंबुज=कीर्तिरूप कमलावर. ४. भ्रमर. ५. चांगल्या तपःसंपत्तीचें स्थान असा. ६. अगस्त्य. ७. ब्रह्मदेवापासून झालेला पुलस्त्य त्याचा पुत्र. ८. साधूंनीं स्तुत. ९. विरक्तता वगैरे गुणांनीं युक्त. १०. भरद्वाजकन्या देववरवर्णिनी व सुमालीची कैकसी अशा विश्रव्याच्या दोन बायका होत्या. ११. रक्षस्+राज=राक्षसांचा राजा. १२. ही सुमालीची कन्या व विश्रव्याची बायको. १३. मुनिजा+ज=ऋषिकन्येपासून झालेला. १४. यक्ष आणि गुह्यक जे देवयोनिविशेष त्यांचा राजा. त्याचें नांव वैश्रवण–कुबेर. १५. दुसरीचे. (कैकसीचे.) १६. दश+आनन=दशमुख. १७. रात्रिंचर, राक्षस. १८. रावणानें आपल्या नऊ शिरांचा होम केला–अशी कथा आहे. १९. ब्रह्मदेवापासून रावणानें आपणास देवदानवादिकांपासून मृत्यु नसावा असा वर मागून घेतला होता, पण मनुष्य व वानर हे तृणतुल्य आहेत असें समजून त्यांची गणना केली नाहीं, यासाठीं विष्णूनें रामावतारीं मनुष्यरूपानें रावणास मारिलें. २०. गरुड. २१. कुंभकर्ण. २२. सोनें. २३. देवांनीं सरस्वतीकडून त्याच्या बुद्धीला भ्रम पाडला. २४. वर मागतेवेळीं. २५. बिभीषणानें वर मागितला कीं, 'मला धर्म पाहिजे.' २६. स्वामी. (ब्रह्मदेव.) २७. कुंभकर्ण+अनुजा=कुंभकर्णाची धाकटी बहीण. २८. मोठ्या शक्तीचें स्थल. २९. इच्छेप्रमाणें सुंदर रूप धारण करणारी.

[१]अग्रजाचें [२]तातदत्त । लंकापद [३]हरी, [४]तत्त- ।
दसत्कर्म करी, मत्त । होय वरांच्या बळें. ॥
[५]विश्वकर्म्याचा [६]सपत्न । [७]मय, त्याचें [८]कन्यारत्न ।
केलें [९]स्वकलत्र [१०]यत्न-। परें दशास्यें खळें. ॥
[११]कालकेय जो [१२]दानव । [१३]विद्युज्जिव्हाख्य, तो [१४]धव ।
शूर्पणखा वरी, [१५]सव । भंगावे जेणें [१६]छळें. ॥
[१७]वैरोचनकन्या नांव । तिचें [१८]वज्रज्वाळा, [१९]भाव ।
कुंभकर्णी धरी, [२०]वाव । मानी ती [२१]अन्य स्थळें. ॥ ८३

शैलूष [२२]गंधर्वेश्वर, । तत्कन्या [२३]सरमा, वर ।
तीचा बिभीषण, हर । [२४]शैलपुत्रीचा तसा. ॥
वंदूनि [२५]गुरूचे पाद । पुत्राचें [२६]अविसंवाद ।
नाम ठेवी मेघनाद, । कीं त्याचा तैसा [२७]घसा. ॥
माजे राक्षसांचा राय, । लागे कराया अन्याय, ।
ऐके [२८]श्रीद, म्हणे 'हाय!' । बोधी [२९]दूतास्यें असा. ॥
'धर्मे माझा सखा [३०]शर्व । झाला बा! न धरीं गर्व, ।
अधर्मे बुडतें सर्व, । नव्हे आपली [३१]रसा. ॥ ८४

[३२]संदेशें कोप [३३]प्रभूत । पात्रे, मारी श्रीददूत, ।
नावरे क्रोधाचा ऊत, । जाय अग्रजावरी. ॥

---

१. वडिल भावाचें. (कुबेराचें.) २. बापानें दिलेलें, विश्रव्यानें दिलेलें. ३. याचा कर्ता 'रावण.' ४. तत्+तत्=तें तें म्ह० सीताहरणादि पापकर्म. ५. हा देवांचा शिल्पी. यास 'त्वष्टा' असेंहि नांव आहे. ६. शत्रु. ७. मयासुर. हा राक्षसांचा शिल्पी. ८. मंदोदरी. ९. आपली बायको. १०. उद्योगांत तत्पर अशा रावणानें. ११. कश्यपऋषीची स्त्री काला. तिचे पुत्र व त्यांचे वंशज यांना 'कालकेय' ही संज्ञा आहे. १२. कश्यपऋषीच्या दनु नांवाच्या बायकोपासून झालेले ते दानव. परंतु या ठिकाणीं 'दानव'शब्दाचा उपयोग केवळ 'राक्षस' या अर्थीं केला आहे. १३. विद्युत्+जिव्ह+आख्या=विद्युज्जिव्ह आहे नांव ज्याचें. हा कालकेयांपैकीं एक. १४. नवरा. १५. यज्ञ. १६. छळ करून, कपटानें. १७. विरोचनाचा मुलगा बळी त्याची कन्या. १८. कुंभकर्णाची बायको. १९. चित्ताभिप्राय. २०. व्यर्थ. २१. कुंभाकर्णावांचून इतर स्थलें–हें तात्पर्य. २२. गंधर्व+ईश्वर=शैलूष नांवाचा श्रेष्ठ गंधर्व. २३. बिभीषणाची बायको. २४. पार्वतीचा. २५. शुक्राचार्यांचे. २६. प्रतिबंधरहित. मेघनाद हें नांव अन्वर्थक होतें, म्हणून तें ठेवण्यास हरकत नव्हती. २७. गळा, कंठ. लक्षणेनें शब्द. २८. कुबेर. २९. दूत+आस्यें=दूताच्या तोंडानें. ३०. महादेव. ३१. पृथ्वी. ३२. निरोपानें. 'उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय न शांतये । पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम् ॥' ही उक्ति सुप्रसिद्धच आहे. ३३. पुष्कळ.

शस्त्राग्नींत[1] यक्षहोम । करूनी, यक्षेश[2] सोम[3], ।
राहु तो[4], पुष्पक व्योम-[5] । यान तयाचें हरी. ॥
झालें तें विमान रुद्ध[6], । हास्यें[7] नंदीश्वर[8] क्रुद्ध ।
होय, शापी, कीं न शुद्ध- । बोधातें मनीं धरी. ॥
विश्ववंद्य जो कैलास, । तशा उन्मूळी शैलास[9], ।
रुद्धबाहु[10] त्या बैलास[11] । चिरें[12] महेश करी. ॥ ८९
भेटे, स्तवें[13] सोडी रोष, । अर्पी खड्ग[14] आशुतोष[15], ।
ज्याच्या नामें महादोष । भस्म होती तो वळे[16]. ॥
रावण[17] हें ठेवी नाम, । शापानाश्य[18] आयु वाम-[19] ।
देव दे; असे[20] न काम-[21] । प्रद अन्य कोंवळे[22]. ॥
वेदवती[23] सती शाप । दे, जळे[24] दावि प्रताप, ।
कीं करी स्पर्शोनी पाप[25] । अवयव ओंवळे[26]. ॥

---

१. शस्त्ररूप अग्नींत. २. कुबेर. ३. चंद्र. ४. रावण. ५. आकाशमार्गानें जाणारें यान म्ह० वहन; विमान. ६. थांबिवलेलें. कैलासावर शरवणनामक एक वन होतें, त्यांत जो कोणी जाईल तो स्त्री होईल असा शिवाचा शाप होता, म्हणून रावणानें शरवणाच्या बाहेरच विमान थांबविलें होतें. ७. हंसण्यानें. ८. नंदी+ईश्वर=शंकराचें वाहन नंदिकेश्वर. एकदां पुष्पक विमानांत बसून रावण कैलासपर्वतास गेला. तेथें त्यानें नंदीस पाहिलें. त्याचें वानरासारखें मुख व ऱ्हस्व भुज पाहून रावण उपहासपूर्वक त्यास हांसला. त्यावरून नंदीनें त्यास शाप दिला कीं, 'तुझा नाश वानरच करतील.' ९. पर्वताला. १०. कुंठित केले आहेत (दाबलेले आहेत) बाहु ज्याचे अशा." नंदिकेश्वरानें रावणास शाप दिल्यावर तो त्वेषानें कैलासाचें उन्मूलन करण्याचा प्रयत्न करूं लागला, तेव्हां शंकरानें तो पर्वत खालीं दाबला असतां रावणाचे हात त्याखालीं सांपडून तो मोठ्यानें ओरडूं लागला. ११. त्या मूर्ख रावणास. १२. पुष्कळ काळपर्यंत. १३. स्तुतीनें. १४. चंद्रहास नांवाची तलवार. १५. लौकर संतोष पावणारा. (शिव.) १६. वळला. कृपा करी. १७. दशमुखाचे हात कैलासाखालीं सांपडल्यावर त्यानें मोठ्या आक्रोशानें दिशा नादित केल्या. त्यामुळें महादेवानें त्याचें नांव 'रावण' असें ठेविलें. रावण म्ह० शब्द करणारा. १८. शाप+अनाश्य= शापानें नाश न पावणारे असे. १९. शंकर. २०. शंकरासारखे. २१. मनोरथ पुरविणार. २२. कोमळ मनाचे असे दुसरे देव. २३. इच्या बापाचें नांव कुशध्वज आणि आईचें नांव मालावती. ही कन्या जन्मतांच तिनें वेदध्वनि केला होता म्हणून तिला 'वेदवती' नांव होतें. कुशध्वजानें ही विष्णूस द्यावी असें मनांत आणून जो कोणी मागावयास येई त्यास तो नाहीं म्हणून सांगे. एकदां शंभु नांवाचा कोणी दैत्य तिला मागत असतां कुशध्वजानें त्यास ती दिली नाहीं, तेव्हां तो दैत्य त्यास मारून पळाला. त्याबरोबर तिची आई सती गेली. पुढें वेदवतीनें पु-

[1]ती श्रीसीता, [2]तूंही विष्णु । विश्वत्राता [3]प्रभविष्णु, ।
त्वद्दास सदेव [4]जिष्णु । त्वद्गुणचि [5]सोंवळे. ॥ ८६
[6]दीक्षित [7]मरुत्त युद्ध । न करी; [8]होउनी क्रुद्ध, ।
[9]संवर्ताज्ञा मानी [10]शुद्ध- । यशा [11]भूप; तो [12]अरी ॥
म्हणे, 'म्यां जिंकिला भूप; । [13]मी सिंधु, [14]हा तुच्छ [15]कूप.' ।
भक्षी ऋषी [16]कालरूप, । मोठा अनर्थ करी. ॥
गाधिज, सुरथ, दुष्कंत, । गय, पुरूरवा संत, ।
[17]म्हणती [18]भंगलों, [19]अंत । त्यांचा न चित्तीं धरी. ॥
[20]अनरण्य हांसे पाप । रावण, त्या तो दे शाप; ।
केली दाऊनि प्रताप । वाणी त्याची [21]त्वां खरी. ॥ ८७

---

ष्करतीर्थी मोठी तपश्चर्या केली. तेव्हां आकाशवाणी झाली कीं, 'तूं विष्णूस पुढील जन्मीं पावशील.' मग ती गंधमादन पर्वतावर जाऊन राहिली. तेथें एकदां रावण तिला भेटला आणि 'तूं मला वर' असें तिला म्हणाला. तेव्हां रावणानें बळेंच तिला स्पर्श केला असतां तिनें त्यास शाप दिला कीं, 'माझ्याच हरणानें तूं कुळासह नष्ट होशील.' वेदवती ही लक्ष्मीचा अंश होती. हीच दुसऱ्या जन्मीं सीता होऊन रामाची बायको झाली. पुढें रावण इच्या हरणानें कुळासह नष्ट झाला. (वा० रा० उ० कां० स० १७.) २४. रावणानें वाईट बुद्धीनें स्पर्श केल्यामुळें वेदवतीनें योगाग्नीनें आपला देह दग्ध केला होता—अशी कथा आहे. २५. रावण. २६. अशुद्ध, अमंगळ.

१. वेदवती. २. राम. ३. मोठा सामर्थ्यवान्. ४. इंद्र. ५. शुद्ध. ६. यज्ञ करणारा यजमान. ७. हा अवीक्षित राजाचा पुत्र, हा मोठा पराक्रमी व यज्ञकर्ता असा होता. यास 'आवीक्षित' असेंही म्हणत. याच्या यज्ञांत विघ्न उत्पन्न करावें म्हणून रावण तेथें गेला; परंतु यानें यज्ञदीक्षा घेतली होती म्हणून यास मध्येंच उठतां आलें नाहीं. तेव्हां रावण आपण यास जिंकिलें आहे असें बोलून आपणच परत गेला. (वा० रा० उत्तरकां० स० १८.) ८. मरुत्त हा क्रुद्ध झाला होता तरी. ९. संवर्त+आज्ञा=मरुत्ताचा यज्ञांतील पुरोहित. हा अंगिराऋषीचा मुलगा. मरुत्त राजानें यास नारदाच्या सांगण्यावरून आपल्या मोठ्या यज्ञांत पुरोहित केलें होतें. १०. निर्मळ कीर्तीचा. ११. मरुत्त राजा. १२. शत्रु. (रावण.) १३. रावण. १४. मरुत्त. १५. विहीर. १६. मृत्युस्वरूप. रावण ऋषी भक्षी—हा अन्वय. १७. याचा कर्ता 'गाधिज सुरथ इ० पांच राजे.' १८. आम्ही पराजय पावलों. १९. त्यांचा अंत चित्तीं न धरी म्ह० त्यांना मारिलें नाहीं. २०. इक्ष्वाकुवंशांत जन्मलेल्या त्रसदस्यु नांवाच्या राजाचा अनरण्य हा पुत्र होय. हा अयोध्येंत राज्य करीत असतां रावण दिग्विजय करीत अयोध्येस आला. उभयतांचें घोर युद्ध झालें त्यांत अनरण्य पडला व प्राण सोडण्याच्या पूर्वीं त्याणें रावणास शाप दिला कीं, माझा वंशज तुझा कुळासकट नाश करील. (वा० रा० उ० कां० स० १९). २१. रामानें.

नारद [1]रक्षःपाळास । म्हणे, जिंकावें [2]काळास, ।
बळी सोडूनी बाळास । [3]मानी वीर न च्छळी. ॥
भंगी तो यमभटास, । जैसा [4]मुद्गर घटास ।
कीं सिंह [5]करिघटांस, । करी काळासीं [6]कळी. ॥
पाडी [7]नरकातें ओस, । ब्रह्मा सांगे, '[8]बा! हें सोस, ।
माझें वाक्य न हो [9]फोसें, । राहो [10]दंड, हा बळी.' ॥
[11]काळ गुप्त होय, राय । राक्षसांचा म्हणे, 'काय ।
माझ्यापुढें अन्य?' जाय । अन्यत्र जैसा [12]अली. ॥ ८८
गर्व दे आत्ममतीस । जिंकूनि [13]भोगवतीस, ।
दुर्बळ [14]सर्पपतीस । मानी रावण मनीं. ॥
[15]निवातकवच योध, । करी तत्पुरीचा रोध, ।
पेटे तदा [16]त्यांचा क्रोध । जैसा दावाग्नी वनीं. ॥
[17]ब्रह्मवाक्यें तयांसह, । सख्य सोडूनि आग्रह, ।
[18]साधी, [19]मायांचा [20]संग्रह, । मान्यता दैत्यजनीं. ॥
[21]कालकेयाचाही मोडें[20] । रणीं, [22]जयाचीही जोड[20], ।
[23]शूर्पणखाभर्त्या दोडें[24] । मारी संगरीं [25]घनीं. ॥ ८९
[26]वरुणाच्या पुरा जाय, । तत्पुत्रांचा समुदाय ।
भंगी, तेथें वंदी गाय । [27]सुरभी, जीच्या [28]पयें ॥
झाला विशाल [29]क्षीरोद, । त्यांत [30]श्रीसह प्रमोद ।
युक्त करीसी विनोद, । रामा! विष्णु तूं स्वयें. ॥

---

१. रावणास. २. यमाला. ३. अभिमानी. ४. घण. ५. हत्तीच्या समुदायांस. ६. कलह. ७. नरकलोकास. पातकीलोकांस आपल्या पापानुरूप यातना भोगण्याचें ठिकाण. यमच गुप्त झाला तेव्हां तेथें मृतजीवास आणतो कोण, म्हणून तें ठिकाण ओस पडलें—हें तात्पर्य. ८. हे यमा. ९. खोटें, फोल. १०. यास शिक्षा करण्याचा प्रयत्न करूं नकोस, हा बळवान् आहे. ११. मृत्यु, अंतक. १२. भ्रमर. १३. पाताळांतील नागांची नगरी तीस. १४. वासुकीस. १५. निवातकवच या नांवाचे महाबलाढ्य असुर समुद्रतीरीं राहत असत. १६. निवातकवचांचा. १७. ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून. निवातकवच हे महाबलाढ्य आहेत, हे तुझ्यानें जिंकवले जाणार नाहींत इ० गोष्टी ब्रह्मदेवानें त्यास सांगितल्या. १८. याचा कर्ता 'रावण.' १९. कपटविद्यांचा. २०. हें 'साधी' याचें कर्म. २१. या नांवाच्या राक्षसाचा. २२. विजयाची अ० यशाची जोड साधी. २३. विद्युज्जिव्हास. २४. द्वाड. २५. दारुण अशा, निकराच्या. २६. वरुणदेवाच्या. २७. कामधेनु. २८. दुधानें. २९. क्षीरसागर. 'क्षरंतीं च पयस्तत्र सुरभिं गामवस्थिताम् । यस्याः पयोभिनिष्यंदात्क्षीरोदो नाम सागरः' ॥ (वा० रा०, उ० कां०, स० २३.) ३०. लक्ष्मीसह.

ब्रह्म्याच्या लोकीं वरुण । ऐके हें[१] तो निष्करुण ।
नेत्रें जयाचीं अरुण[२]-। वर्णें, मत[३] जो जयें, ॥
देवर्षिराजर्षिनाग-। कन्या हरी[४], जोडी आग[५], ।
शापीती[६], करिती राग, । न[७] कांपे शापभयें. ॥ ९०
जोडोनी विजय थोर, । जाय लंकेंत तो घोर; ।
शूर्पणखा ताडी स्वोर[८], । रडे वदे फार हा. ॥
भ्राता म्हणे, 'वीरलोक[९] । झाला, त्याचा सोडीं शोक, ।
तुला शोकद हें ओकं[१०], । खरा[११]पाशीं जा रहा.' ॥
जन[१२]स्थानातें ती जाय, । मावसी[१३] खराची माय, ।
कांहीं[१४] काळीजाचा घाय[१५] । पावे परीहार[१६] हा. ॥
ऐसें दशास्याचें कर्म, । वाटे ज्या अधर्म धर्म, ।
धाता[१७] वैर[१८]वज्रवर्म । दे, त्या तोही मार[१९]हा. ॥ ९१

---

१. रावण आपल्या पुरीस येऊन गेला हें वर्तमान. २. लाल. ३. येथें 'मत्त' शब्द असावा असें वाटतें. ४. याचा कर्ता 'तो' (रावण). ५. अपराध. ६. देवर्षि. 'कन्या' हा कर्ता. ७. 'रावण' हा कर्ता. ८. स्व+उर=आपलें वक्षस्थल. ९. (त्याला) वीरलोक (प्राप्त) झाला. मरण पावल्यानें वीरांस जी गति मिळते ती त्यास प्राप्त झाली–हें तात्पर्य. १०. ठिकाण. ११. रावणाचा सावत्रभाऊ. १२. पंचवटीला. १३. खरराक्षसाची आई राका ती शूर्पणखेची मावशी होती. माल्यवान आणि सुमाली हे दोन राक्षस भाऊ भाऊ होते. सुमालीची कन्या कैकसी आणि माल्यवानाची कन्या राका या चुलत बहिणी होत. या दोघी विश्रवा ऋषीस दिल्या होत्या. त्यांत कैकसीची मुलगी शूर्पणखा व राकेचा मुलगा खर. म्हणून खराची माय राका. ही शूर्पनखेची मावशी होय. १४.थोडासा. १५. (शूर्पणखेच्या काळजावरील पतिमरणदुःखरूप) घाव. १६. हा परिहार म्ह० दुःखदूरीकरणरूप. शूर्पणखेच्या नवऱ्यास रावणानें मारिलें होतें, त्यामुळें तिच्या अंतःकरणास दुःख झालें. म्हणून रावणानें तिला जनस्थानाचें अधिपत्य देऊन, तें चालविण्यास १४००० राक्षसांसह खराची योजना केली. यामुळें तिचें दुःख कांहीं कमी झालें. १७. ब्रह्मदेव. १८. वररूप वज्रासारखें दृढ कवच. रावणाची आई कैकसी, तिनें सांगितल्यावरून त्यानें कुबेरासारखें ऐश्वर्य मिळविण्यासाठीं गोकर्ण येथें मोठी तपश्चर्या केली. तींत अखेरीस ब्रह्मदेव प्रसन्न झाले. त्यांनीं 'वर माग' असें म्हणतांच तो म्हणाला, 'तुम्ही अमरत्व तर कोणास देत नाहींच, तरी मनुष्याशिवाय इतर कोणाही देवगंधर्वादिकांपासून मला मृत्यु नसावा, एवढें द्या; मनुष्याचें भय मला मुळींच वाटत नाहीं.' ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणाले व त्यास हवें तें रूप धारण करतां येण्याचाही वर दिला. १९. शिव. (मदनांतक).

[1]श्रीशुक्रमुखें [2]जेपून । [3]मेघनादानें खपून ।
सिद्धि साधिली तपून । हें ऐकिलें रावणें. ॥
म्हणे [4]तो, '[5]योगेंचि [6]विख्यात । व्हावें, [7]तपमहावित्त, ।
कठिण निश्चळ चित्त । योगमार्गीं लावणें. ॥
कैसें सोसलें [8]भूतल्प, । या फळा लागावा [9]कल्प, ।
[10]वत्साला घडलें अल्प- । काळें कसें [11]पावणें.' ॥
जाणोनी मोठा उत्कर्ष, । पावोनी अत्यंत हर्ष, ।
प्रेमाश्रु सोडिले [12]वर्ष, । भारी जसें [13]श्रावणें. ॥ ९२
बिभीषण सांगे त्यास, । 'बा! म्यां केला जळीं [14]वास, ।
कुंभकर्ण तो [15]आवास । निद्रेचाचि हा सदा. ॥
योगीं [16]यागीं नित्य मग्न । मेघनाद ध्यानलग्न, ।
तों झालें महत्व भग्न, । जें न भंगलें कदा. ॥
[17]माल्यवंताची जी नात, । या [17]घनध्वानाची आत ।
नेली [18]मधूनें, या लात । हाणिली तुझ्या [19]पदा. ॥
[20]परस्त्रीहरण च्छळ, । त्याचें झालें प्राप्त फळ, ।
[21]भंगा [22]पापकर्मा स्थळ, । शून्य वन श्वापदा.' ॥ ९३

---

१. शुक्राचार्य हा दैत्यांचा गुरु होय त्याच्या तोंडानें. २. जप करवून. ३. इंद्रजितानें. ४. रावण. ५. परमेश्वरचिंतनरूप योगसाधनानें. ६. प्रख्यात. ७. तपश्चर्या हेंच मोठें धन (होय). ८. जमीन हेंच अंथरूण. ९. ब्रह्मदेवाचा एक दिवस. ४३२०००००० वर्षें इतका काळ. १०. इंद्रजिताला. ११. त्या फळास पोंचणें. १२. वृष्टि. १३. श्रावण महिन्यानें. १४. बिभीषण तपःसंपादनार्थ पाण्यांत रहात होता. १५. स्थान. १६. यज्ञकर्मांत. यानें सात मोठाले यज्ञ केले होते. १७. माल्यवान् राक्षसास अनला म्हणून मुलगी होती, तिची कन्या कुंभीनसी. ती या घनध्वनाची म्ह० इंद्रजिताची आत. कुंभीनसीची आई अनला आणि कैकसी या दोघी चुलत बहिणी. म्हणून अनलेची मुलगी कुंभीनसी ही रावणाची बहीण. तेव्हां अर्थातच ती इंद्रजिताची आत आहे. १८. मधु नांवाच्या दैत्यानें. यानें रावणाच्या आईच्या बहिणीची कन्या कुंभीनसी हरण करून आणून तिशीं आपला विवाह केला होता. या मधूचा मुलगा लवणासुर म्हणून होता. १९. अधिकारास, योग्यतेस. २०. देवदानवराक्षसांच्या, रावणानें जबरीनें आणिलेल्या स्त्रियांच्या छळाचें फळ कुंभीनसीहरण होय—असा बिभीषणाचा आशय. २१. पराजयास. २२. पाप करणारा पुरुष. शून्य वनामध्यें जसीं श्वापदें राहतात तसा पापी पुरुष पराजयास पात्र होतो. येथें उपमा दर्शकपद 'असें तसें' नसल्यानें हीं लुप्तोपमा होय.

हें ऐकतां कोपे फार, । तो घे अक्षौहिणी चार ।
सहस्र, निघे, विचार । दुजा चित्तीं न धरी. ॥
मधुवनाप्रति जाय । कुंभीनसी धरी पाय, ।
द्रवे राक्षसांचा[1] राय, । तीच्या त्रासातें[2] हरी. ॥
तीणें भेटवीला कांत,[3] । झाला दशानन शांत, ।
पावोनी कैलास प्रांत, । उतरे त्या भूवरी. ॥
नळकूबर[4] दे शाप, । कीं न कांहीं गणी पाप, ।
रंभेवरी यातुक्ष्माप[5] । तो बळात्कार करी. ॥ ९४
गेला अमरावतीस । जिंकाया शचीपतीस, ।
प्रार्थी विश्वाच्या गतीस,[6] । तेव्हां वृत्राचा[7] अरी.[8] ॥
विष्णु म्हणे, 'त्रास सांड, । जा त्या रावणासीं भांड, ।
काळीं संहारीन, मांड[9] । त्याचा सारा मी हरी.[10]' ॥
ऐके वैकुंठाचें उक्त, । होऊनी स्वसेनायुक्त ।
होय भंगशंकामुक्त, । महायुद्धातें करी. ॥
धराया[11] राक्षसपाळ । झटे पाकजंभकाळ,[12] ।
मेघनाद, भेकां[13] व्योळ,[14] । तैसा देवेंद्रा धरी. ॥ ९५
केला राक्षसांचा क्षय, । झाला दिक्तुंडाचा[15] जय, ।
पावे फार स्वर्ग भय, । नेला लंकेला धणी.[16] ॥

---

१. रावण २. भयाला. नवऱ्याला पीडा होईल या भयास. ३. नवरा. (मधु.) ४. रंभा ही नलकूबराकडे जात होती. तिच्याशीं रावणानें आगळीक केल्यावरून नलकूबरास राग येऊन त्यानें रावणास असा शाप दिला कीं, 'आपणाविषयीं सकाम नसणाऱ्या स्त्रीची आगळीक करशील तर तुझ्या मस्तकाचीं सात शकलें होतील—अशी कथा आहे. ५. यातु म्ह० राक्षस त्यांचा राजा. (रावण.) ६. विश्वाचा आधार जो विष्णु त्यास. ७. वृत्रासुराचा. त्वष्टा नांवाच्या प्रजापतीचा पुत्र विश्वरूप म्हणून होता त्यास इंद्रानें मारिलें. म्हणून त्वष्ट्यानें त्याच्या नाशाकरितां अग्नीमध्यें हवन करून यास उत्पन्न केलें, व इंद्रास नंतर त्याला मारण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें [illegible] इंद्राशीं युद्ध करूं लागला असतां त्यांत इंद्राचा पराजय झाला. पुढें विष्णूच्या सांगण्यावरून, दधीच ऋषीची प्रार्थना करून इंद्रानें त्याच्या अस्थी मिळविल्या आणि त्यांचें विश्वकर्म्याकडून वज्र तयार केलें. शेवटीं त्या वज्रानें वृत्रासुर इंद्राच्या हातून मरण पावला. (भा० वन०, अ० १०१.) ८. शत्रु.(इंद्र).९.मांडणी, सिद्धता. १०. विष्णूचें. ११. हें 'धराया' याचें कर्म. १२. पाक आणि जंभ या नांवाच्या असुरांचा अंतक. (इंद्र.) १३. बेडकास.१४.सर्प. १५. दशमुखाचा. येथें 'दिक्'शब्दानें दिशा दहा आहेत म्हणून दश संख्या घ्यावयाची. १६. इंद्र.

मोटे जंभ, वृत्र, पाक, । त्यांचा ऐसा नाहीं धाक, ।
भ्याला मेघनादा [1]नाक, । जैसा पक्षींद्रा [2]फणी. ॥
नावडे भोजन [3]शेजें, । पडलें काळीजा [4]वेजें, ।
देवौ[5]घनागांचें तेज । जाय, नेतां तो [6]मणी. ॥
ब्रह्मा म्हणे, 'शक्र सोड, । [7]वत्सा! इष्ट वर जोड'. ।
[8]मागे अमरत्व गोड । '[9]हें दे, पुरीव [10]धणी'. ॥ ९६
धाता म्हणे, 'तूं [11]सत्तोक, । इंद्रजित् तुजला लोक ।
म्हणोत, न द्यावा शोक, । मेघनादा बा ! [12]वळे. ॥
अमरत्व न [13]भूवर, । देतों मी [14]आत्मभू वर, ।
बरें योजूनीयां [15]वरें, । [16]ऐसेंचि ज्याचें फळ. ॥
मागे, 'अग्नींत [17]शतांग । जन्मो, होतां होम [18]सांग, ।
त्यावरी बैसतां [19]गांग । धवळ जैसें जळ, ॥
तैसें मिळो यश रण-। रंगीं, न घडो मरण, ।
शत्रूचें प्राणहरण । घडो मोठें दे बळ'. ॥ ९७
'[20]तथास्तु' म्हणे [21]लोकेशं, । शक्राचा बंधनक्लेश ।
वारी भंगदुःख लेश-। मात्र बोधें उडवी. ॥
[22]अहल्याधर्षणफळ । झालें, कर्मापुढें बळ ।
न चाले, न चूके पळ । [23]भोगें तेज बुडवी. ॥
[24]रक्षी [25]कन्यारत्नन्यास, । [26]दे पुन्हा, न धरी आस, ।
[27]म्यां प्रसन्नें दिली [28]त्यांस, । [29]तुला लोभ [30]जुंडवी. ॥

१. स्वर्गलोक. २. सर्प. ३. शय्या. ४. भोंक, छिद्र, घरा. ५. देवांचा समुदाय हेच सर्प त्यांचें. ६. इंद्र हाच मणी. येथें रूपकालंकार आहे. ७. इंद्रजिता. ८. याचा कर्ता 'इंद्रजित.' ९. अमरत्व. १०. तृप्ति. ११. सत्+तोक=चांगलें अपत्य. १२. मी सांगतों त्याप्रमाणें वाग. १३. पृथ्वीवर. १४. ब्रह्मदेव. १५. घे. १६. अमरत्वाप्रमाणें ज्याचें फळ आहे असें कांहीं माग—असा भावार्थ. १७. रथ. १८. (सह+अंग) संपूर्ण. १९. गंगेचें. २०. तसें असो. २१. ब्रह्मदेव. २२. अहल्येच्या बलात्काराचें फळ. इंद्रास इंद्रजितानें धरून नेलें हें. धर्षण म्ह० बलात्कार, पातिव्रत्यभंग. २३. विषयोपभोग. २४. रक्षण करिता झाला. याचा कर्ता 'गौतम' अध्याहृत. २५. कन्यारत्नाचा न्यास म्ह०. ठेवा. अहल्या ही ब्रह्मदेवाची कन्या होती. त्यानें गौतमाजवळ ती न्यास म्हणून ठेविली होती. ती त्यानें जशीच्या तशी ब्रह्मदेवास परत दिली.

काम[1] झाल्याही बल्लव[2] । करी, न हित तल्लव[3], ।
विवेक स्वर्द्रुपल्लव[4] । लोभहस्तें खुडवी[5]. ॥ ९८
पापें झाला पराभूत, । वैष्णवें[6] अध्वरें पूंत[7] ।
होऊनी, तो पुरुहूत[8] । पुन्हा स्वपदा वरी'. ॥
राम पुसे, 'जेव्हां क्रूर । रावण[9], तद्गर्वं[10] चूर ।
करी ऐसा काय शूर । नव्हताचि भूवरी?' ॥
कुंभज सांगे, 'अर्जून[11] । सहस्रबाहु[12], अर्जून[13] ।
जो प्रख्यात, तो अर्जून[14] । लीलेनेंची यां[15] धरी.' ॥
शक्र म्हणे, 'झालें युक्त, । पुलस्त्याचें[16] मानी[17] उक्त, ।
बंधनापासूनि मुक्त, । करूनि सोडी अरी[18]. ॥ ९९
दशास्यगर्वाची राख[19] । करी वाळीचीही[20] काख, ।
तो[21] त्यां[22] वंदी, म्हणे राख[23], । दे अभय, हो सखा. ॥
ऐसे पावोनि आयास, । प्रार्थी कीशांच्या रायास[24], ।
तो त्यां[25] आज्ञा दे जायास, । म्हणे कपींतें न खा. ॥
तोही[26] त्वां मारीला खळ, । रामा! रक्षीला सुगळ, ।
त्वद्बाणा सेवि[27], जें बळ। नारसिंहाच्या नखा. ॥

---

तेव्हां ब्रह्मदेवानें गौतमाच्या मतांच्या स्थैर्यानें व तपानें संतुष्ट होऊन तिचें त्याच्याशीं पाणिग्रहण करविलें–इत्यादि कथा आहे. (वा० रा० उत्तर० स० ३०.) २६. देता झाला. ह्याचा कर्ता 'गौतम.' २७. ब्रह्मदेवानें. २८. गौतमऋषीस. २९. इंद्राला. ३०. अहल्येशीं संयुक्त करी.

१. मदन. २. स्वैपाकी अथवा गवळी. म्ह० मूर्ख, अज्ञान–असें तात्पर्य. ३. तत्+लव=कामाचा लव म्ह० लेशमात्र कामवासना सुद्धां हित (हितकारक) न (नाहीं). ४. स्वर्गांतील वृक्षाचा म्ह० कल्पवृक्षाचा केवळ पल्लवच असा विवेक. ५. याचा कर्ता 'काम.' ६. विष्णु देवता ज्याची अशा यज्ञानें. ७. पवित्र. ८. इंद्र. ९. हा 'होता' या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. १०. त्या रावणाचा गर्व. ११. संपादून. १२. हजार हात ज्याचे. १३. कार्तवीर्य अर्जुन. १४. दटावून. १५. रावणास. १६. पुलस्त्यानें जाऊन कार्तवीर्य राजाची रावणाच्या सुटकेविषयीं विनंती केली. ती त्यानें मान्य केली. पुलस्त्य हा विश्रव्याचा बाप म्ह० रावणाचा आजा होय. १७. 'सहस्रार्जुन' हा कर्ता. १८. रावण. १९. राखरांगोळी, नाश. २०. हा वाळीलाही जिंकावयास गेला होता तेव्हां त्यानें त्याला काखेंत दाबलें होतें–अशी कथा आहे. २१. रावण. २२. वाळीस. २३. रक्षण कर. २४. वालीस. २५. रावणास. २६. असा पराक्रमी वाली देखील. २७. सेवितें.

[1]सुखें [2]कोंडीं न मातील, । प्रेमाश्रुभरें न्हातील, ।
चतुर्मुखादी गातील, । या [3]युद्धमहामखा.' ॥ १००
राम म्हणे, 'शत्रूभे[4]क- । सर्प, तप्तसुधासेक, ।
हनूमान् समर्थ एक, । याणें मातें तारिलें. ॥
याच्या प्रतापेंचि [5]खर्व । करूनी, हरूनी गर्व, ।
राक्षसांचें सैन्य सर्व । रणरंगीं मारिलें. ॥
न [6]दीलें अभयदान; । [7]शौर्य, स्वपक्षाभिमान ।
तरी सुग्रीवाचें कां न । [8]येणें दुःख सारिलें? ॥
वाटे स्वसामर्थ्यज्ञान । न्हवतें देहाचें भान, ।
व्हाया विश्वीं [9]यशोगान, । न [10]व्यसन वारिलें.' ॥ १०१
मुनी म्हणे, '[11]ऋषीशाप, । तेणें याचा या प्रताप, ।
न समजे, जैसा साप । नेणें मंत्रें भारिला; ॥
[12]शिशुत्वीं [13]हा महाबळ । उडे, सूर्या मानी फळ, ।
सांगे [14]राहु रुसे खळ, । शक्रें वज्र मारिला. ॥
पाडितां मूर्छित बाळ, । वायु क्षोभे जैसा काळ, ।
मोह [15]सत्यलोकपाळ-। हस्तस्पर्शें वारिला. ॥
देवांनीं [16]वज्रशरीर । केला, हा भास्करें [17]धीर, ।
[18]त्वत्प्रसादें यशें वीर । विश्वांत विस्तारिला. ॥ १०२

---

१. हा प्रथमान्त कर्ता. २. ब्रह्मांडांत. ३. या युद्धरूप मोठ्या यज्ञास. ४. बेडूक. शत्रू. हेच बेडूक त्यांस सर्प. ५. लहान. ६. याचा कर्ता 'मारुतीनें.' ७. शौर्य व स्वपक्षाभिमान हे 'होते' या अध्याहृत क्रियापदाचे कर्ते. ८. मारुतीनें. ९. यशाचें गायन. १०. सुग्रीवाचें संकट. ११. मारुती हा लहानपणीं हूड असतां भृगु इ० ऋषींच्या वंशजांस हा पीडा देत असे. तेव्हां त्यांनीं फार क्रोधायमान न होतां अल्पसा शाप दिला कीं, 'तुझ्या बलाचें तुला, दुसऱ्यानें केल्यावांचून, स्मरण होणार नाहीं.' १२. मूलपणीं. १३. मारुती. १४. मारुती सूर्याचा ग्रास करूं लागला त्यावेळेस ग्रहण होतें. तेव्हां आपला भाग हा हरण करतो हें पाहून राहूस राग आला. परंतु मारुतीपुढें त्याचें कांहीं चालेना. तेव्हां त्यानें तें गाऱ्हाणें इंद्राकडे नेलें. म्हणून इंद्रानें मारुतीस वज्रप्रहारानें मूर्च्छित पाडिलें. यामुळें वायूला राग येऊन त्यानें श्वासनिरोध केल्यामुळें सर्व देव घाबरून वायूजवळ जमले व ब्रह्मदेवानें, याच्या हातून पुढें मोठमोठीं कृत्यें व्हावयाचीं आहेत असें सांगितल्यावरून, सर्व देवांनीं मारुतीस निरनिराळे वर दिले—अशी कथा आहे. (वा० रा० उ० कां० स० ३६.) १५. ब्रह्मदेवाच्या हस्तस्पर्शानें. १६. वज्रासारख्या बळकट शरीराचा. १७. बुद्धिमान् व विद्वान्. १८. तुझ्या (रामाच्या) प्रसादानें.

शक्रादिक लोकपाळ[1] । ब्रह्मा, तोही कामकाळ[2], ।
वरांहीं[3] वायूचा बाळ । पूजिती, पूज्यास या. ॥
विश्वकर्मा वदे, 'अस्त्र । किंवा मन्निर्मित शस्त्र ।
याच्या देहीं पुष्प, वस्त्र । होऊ, न देऊ भया.' ॥
केलें अत्यद्भुत काज, । दीली वेगें मना लाज, ।
म्हणे, 'यशें ऐतें साज । शत्रु नेऊनी लया. ॥
ऋक्षवानरगणांत । ज्याचा भंग न पणांत, ।
झाला विजयी रणांत, । तुझी होतां वा! दया.' ॥ १०३
मुनी ऐशी[6] कथा फार । सांगे, करी कर्ण गार, ।
निघे त्यातें[7] नमस्कार । घाली जानकीपती. ॥
म्हणे, 'स्वामी! झालों धन्य, । या युष्मद्दर्शनें[8] अन्य ।
मज ऐसा न राजन्य[9] ! । मद्यशा नसे क्षती[10], ॥
या सर्व अश्वमेधास[11], । पुन्हा हर्षवा हा दास. ।
साधूंच्याचि सहवास[12], । सुखानें निवे मती.' ॥
ऐसें प्रार्थी रघुराय, । वारंवार वंदी पाय, ।
पूजूनी पावित[13] जाय[14], । ते[15] मागती ज्या[16] 'गती[17].' ॥ १०४
बहुमान्य सनकास । जो, त्या पूजी जनकास[18] ।
वश केलें मन, कास । घालूनी जेणें सदां. ॥
अर्ची मातुळातें[19] राम, । जयाचें युधाजिन्नाम, ।
राजे झाले पूर्णकाम, । गेले आपुल्या पदा. ॥

---

१. इंद्रादिक आठ लोकपाळ. इंद्र, अग्नि, यम, नैर्ऋत, वरुण, वायु, कुबेर आणि ईश हे क्रमानें आठ दिशांचे नायक होत. २. मदनांतक, शिव. ३. वरांच्या योगानें. ४. मनाच्या पेक्षां याचा वेग ज्यास्त होता–हें तात्पर्य. हा **व्यतिरेकालंकार**. ५. मला, रामाला. ६. पूर्वोक्त, वर सांगितलेल्या. ७. घरीं जाण्यास निघालेल्या अगस्त्य ऋषीला. ८. तुमच्या दर्शनानें. ९. क्षत्रिय. १०. नाश. ११. ज्या यज्ञांत घोडा मारिला जातो त्यास 'अश्वमेध' असें म्हणतात. १२. संगतीच्या सुखानें. १३. समाधान पावत. (तो राम.) १४. पोहोंचवीत गेला. १५. मोठमोठे तपस्वी. १६. रामास. १७. उत्तम लोक. १८. सीरध्वज नांवाच्या राजास. विदेहवंशांत उत्पन्न झालेल्या प्रत्येक राजास 'जनक' म्हणतात. १९. मामाला. युधाजित् हा कैकेयीचा भाऊ.

कपी कपिराजसह,[1] । राक्षस तन्नाथ[2] मह[3] ।
पावले, कीं सुखावह । यश, दे त्यांच्या सदां. ॥
लेववी सर्वातें[4] सार । सद्वस्त्रें रत्नालंकार, ।
कल्पवृक्ष जे उदार[5] । त्यांच्या लाजवी मदा. ॥ १०५
वातवाळीपुत्र[6] वीर । अंकीं[7] रणरंग धीर ।
घे प्रेमें करुणानीर-[8] । निधी वर्णूनी वैरें[9]. ॥
स्वमूर्तीवरील[10] मग । काढी भक्तकल्पनग,[11] ।
लेववी तयांसी नगें[12] । दिव्य आपुल्या करें. ॥
पूजिले गणेश स्कंद,[13] । जैसे जगल्लताकंद,[14] ।
रूपें स्वगुणांहीं छंदें[15] । उदन्वन्मुखें[16] हरें. ॥
आज्ञा जाया स्वस्थळास । बाष्पनिरुद्धगळास,[17] ।
दे कीशरक्षोबळास । आलिंगूनी आदरें. ॥ १०६
हनूमान् म्हणे, 'हा[18] वर, । देतां न चित्त आवर, ।
त्वद्दास दीन यावर । असावी कृपा सदां. ॥
तुझ्याठायीं असो स्नेह, । माझ्या भक्तीस हें गेह, ।
तवयश:पातीं[19] देह- । भान, नसावें कदा. ॥
जोंवरी त्वत्कथाकाय,[20] । तोंवरी असावा काय,[21] ।
सत्वें[22] म्हणवावें हाय । जन्म मृत्यु या गदां[23]. ॥
अप्सरांहीं गावें यश, । मनोमृगें[24] व्हावें वश, ।
या[25] सिंहा हो कामशश, । बा दयासुधानदा[26] !' ॥ १०७

१. सुग्रीवासहवर्तमान. २. त्यांचा स्वामी. (बिभीषण.) ३. उत्सव, आनंद. ४. या पदाचा संबंध बरोबर लागत नाहीं. येथें 'त्यातें' असें पद हवें होतें. ५. दाते. ६. वायु आणि वाली यांचे पुत्र मारुती व अंगद. ७. मांडीवर. ८. करुणेचा समुद्र. (राम.) ९. हें 'प्रेमें' याचें विशेषण. वर=श्रेष्ठ. १०. आपल्या देहावरचे. हें 'नग' याचें विशेषण. ११. भक्तांचा कल्पवृक्ष. १२. अलंकार. १३. कार्तिकस्वामी. १४. जगत्+लता+कंद=विश्वरूप लतेचें मूलकारण. १५. वेद. १६. उदन्वन्मुखें समुद्राकडे तोंड करून. या पदाचा संबंध 'हरें' या शब्दाकडे चांगलासा लागत नाहीं. तेव्हां त्याचा अर्थ (दक्षिण) समुद्राकडे असा करून पुढील 'जाया आज्ञा दे' यांकडे जोडिला तर बरें. कारण किष्किंधा व लंका हीं दोन्ही ठिकाणें अयोध्येच्या दक्षिणेसच आहेत. १७. बाष्पानें ज्याचा गळा भरून आला आहे अशा. १८. पुढें मागतों हा वर. १९. तुझें यश (कानावर) पडल्याबरोबर. २०. तुझी कथा हेंच मूलधन (भांडवल), किंवा कथांचा समुदाय. २१. शरीर. २२. धैर्यानें. २३. रोगास. २४. चित्तानें. २५. या भक्तरूपी सिंहाला म्ह० मारुतीला. येथें 'सिंह' शब्दाचा संबंध 'मनोमृग' आणि 'कामशश' या दोहोंकडे लागतो. २६. दयामृताच्या नदा. (हे रामा.)

तथास्तु म्हणे ऊदार, । आलिंगी, कंठींचा हार ।
घाली गळां, द्रवे फार । राम, जैसी माउली. ॥
ग्रीष्मीं मरूदेशीं[1] वाट । मध्यान्हीं क्रमितां, पाट[2] ।
जींत[3] शीतांबूचा,[4] दाट । न्यग्रोधाची[5] सांवली. ॥
अथवा अकस्मात् ताप । नाशाया, हराया पाप ।
अतिक्षम[6] जीचें आप,[7] । ती श्रीगंगा गांवली.[8] ॥
सोडितां तीतें जे कष्ट । झाले तदधिक[9] स्पष्ट, ।
त्यजिली सुरभी[10] नष्ट-[11] । भाग्यांहीं, जी पावली. ॥ १०८
पुष्पक[12] ये, कीं त्या देव[13] । म्हणे, 'आत्मजेत्या[14] सेव.' ।
राम म्हणे, 'माझी ठेव,[15] । तूं चिंतितां ये बरें.' ॥
गर्भिणी विश्वाची[16] माय[17] । होय, तीतें रघुराय ।
पुसे, 'प्रिये! इच्छा काय?। तर्पू[18] कोणत्या वरें?' ॥
ती म्हणे, 'तया वनास, । पाहावें वाटे मनास, ।
द्याया तेथील जनास । वस्त्रें रत्नें जीं 'वरें'.[19] ॥
निंदां[20] ऐकोनी सतीस । टाकी, तच्छुद्धमतीस[21] ।
वाटे प्रार्थिलें पतीस, । म्या जें, तें केलें खरें. ॥ १०९
झाले तीन चार मास, । तेव्हां पावाया श्रमास, ।
वाल्मीकीच्या आश्रमास, । ती लक्ष्मणें पाविली. ॥
मुनी तीचा वारी ताप, । स्नेह करी, जैसा बाप, ।
न क्षोभली, अभिशाप-[22] । दावें जरी ताविली. ॥
विप्राधीतें[23] वारायास, । लवणातें[24] मारायास ।
जातां, आर्ये[25] तारायास, । शत्रुघ्नातें दाविली.[26] ॥

---

१. निर्जल प्रदेशांत. (मारवाडांत.) २. पाण्याचा पाट. ३. ज्या वाटेंत. ४. शीत+अंबु=गार पाण्याचा. ५. वडाची. ६. अत्यंत समर्थ. ७. पाणी. ८. सांपडली, मिळाली. ९. त्या कष्टाहून अधिक (कष्ट). १०. कामधेनु. (राम.) ११. हतभाग्यांनीं. १२. राम अयोध्येस पोंचल्यावर पुष्पक विमानास कुबेराकडे पाठविलें होतें. (घनाक्षरी ७६ पहा.) परंतु कुबेरानें पुनः तें रामाकडे पाठविलें—अशी कथा आहे. १३. पुष्पकाचा स्वामी कुबेर. १४. आपणास जिंकणाऱ्या रामास. १५. कुबेराजवळ ठेवलेली जशी कांहीं ठेवच. १६. जगाची. १७. सीता. १८. तृप्त करूं. १९. हें 'वस्त्रें रत्नें' यांचें विशेषण. २०. रावणाच्या घरीं राहिलेली सीता पुन्हा रामानें घरांत घेतली हा अपवाद. २१. त्या सीतेच्या निर्मळ अंतःकरणास. २२. लोकापवादरूप वणव्यानें. २३. ब्राह्मणांच्या काळजीस. यमुनातीरीं मधुपुरींत लवणासुर राज्य करित होता. त्यानें ऋषींस

'तो [1]पुत्र[2]द्वय पाहून, । रात्रीं [3]आश्रमीं राहून, ।
निधे हृदयीं वाहून, । [4]प्रीतिलता लाविली. ॥ १११०
तो सोडूनी [5]बाणवर्ष, । [6]खेळ मारी, विप्रां हर्ष ।
दे, [7]रेंची मधुरा, वर्ष । तेरावें तों लागलें. ॥
[8]प्राचेतसाचा आश्रम । [9]पावे, तेथें जाय श्रम, ।
जेथें [10]त्यक्तवैरभ्रम । सर्व [11]सत्व वागले. ॥
[12]पीतां [13]कुशलवगीत । रामयश, झालें शीत ।
शत्रुघ्नहृदय, प्रीत[14] । तत्सैन्यही जागलें. ॥
[15]प्रभु [16]क्षिप्र पाहायास, । स्वीकारूनी [17]महायास, ।
[18]आलें दूर रहायास, । जरी होतें [19]भागलें. ॥ १११
रामाचे वंदूनि पाय, । पुन्हा मधुरेसि जाय, ।
शत्रुघ्न करील काय, । आज्ञा पाळणें पडे. ॥
[20]द्वारीं ठेवी मृत बाळ, । विप्र म्हणे, '[21]धरापाळ- ।
दोषें खाता प्रजा काळ', । शोकें [22]तपोनि रडे. ॥
श्रीनारद करी बोध, । '[23]राया! राष्ट्रीं स्वयें [24]शोध, ।
अधर्माच्या मार्गा रोध; । [25]शूद्रतपें हें घडे. ॥
स्मरतांचि ये [26]विमान, । बैसे [27]भास्करासमान, ।
शोधी लंघी [28]पवमान । तैसा अरण्यें कडे. ॥ ११२
पाहे वृक्षीं [29]लंबमान । [30]स्वर्गार्थ जो धूम्रपान, ।
करी शूद्र, त्याची मान । खंडी [31]निस्त्रिंशें खरें. ॥

फार त्रास दिल्यामुळें ते रामाकडे 'तूं आमचें रक्षण कर' म्हणून आले होते. तेच हे विप्र. २४. या नांवाच्या असुराला. २५. वाल्मीकीनें. २६. सुख देण्यास. २७. याचें कर्म 'सीता' (अध्याहृत).

१. शत्रुघ्न. २. लव आणि कुश या नांवाचे रामाचे पुत्र. ३. वाल्मीकिऋषीच्या. ४. कुशलवांविषयींची प्रेमलता. ५. बाणांची वृष्टि. ६. दुष्ट. (लवणासुर.) ७. मधुरापुरी बांधली व वसविली. या कामाला शत्रुघ्नाला बारा वर्षें लागलीं होतीं. ८. वाल्मीकिऋषीचा. ९. याचा कर्ता 'शत्रुघ्न' (अध्याहृत). १०. टाकिला आहे द्वेषभाव आणि भ्रांति ज्यांनीं असे. ११. प्राणी. १२. प्राशन करीत म्हणजे उत्सुकतेनें ऐकत असतां. १३. कुश आणि लव यांनीं गाइलेलें. १४. संतुष्ट. १५. राम. १६. लवकर. १७. मोठे श्रम. १८. याचा कर्ता 'सैन्य'. १९. दमलेलें. (सैन्य.) २०. रामाच्या दरवाज्यांत. २१. राजाच्या पापानें. २२. ताप पावून. २३. हे रामा! २४. शोधून पहा. २५. शूद्राच्या तपानें. २६. पुष्पक. २७. सूर्यासारखा. २८. वायु. २९. लोंबणारा. ३०. स्वर्गप्राप्तीसाठीं. ३१. खड्गानें.

होतां शंबूकाचा काळ, । उठे तत्काळ तो बाळ, ।
वर्षे पुष्पें नाकपाळ, । म्हणे, 'बा! केलें बरें.' ॥
कुंभोद्भवातें वंदन । करी श्रीरघुनंदन, ।
तो वदे पक्षिस्यंदन । तूं, हें मद्वाक्य खरें. ॥
त्वद्यश पावो न लय, । गुणचंदनमलय- ।
मूर्ते, हें दिव्य वलय । अलंकारावें करें. ॥ ११३
ब्रह्मलोकवासी श्वेतं । भक्षी नित्य निज प्रेतं, ।
त्याच्या उद्धारें साकेत- । पाळ विस्मया वरी. ॥
इक्ष्वाकूचा पुत्र दंड- । नामा; विरजेचें लंड ।
तो व्रतं बुडवी; दंड । तत्पिता शुक्र करी. ॥

१. शंबूक हें त्या शूद्राचें नांव. २. अंत. ३. ब्राह्मणपुत्र. ४. इंद्र. ५. कुंभ+उद्भव=अगस्त्यास. ६. गरुड ज्याचा रथ आहे असा. (विष्णु.) ७. गुणरूप चंदनांचा मलयाचलच केवळ अशी आहे मूर्ति ज्याची. ८. कडें. ९. ब्रह्मलोकांत राहणारा. १०. या नांवाचा राजा. ११. मृतशरीर. विदर्भदेशींचा श्वेत या नांवाचा राजा होता; त्यानें पुष्कळ दिवस राज्य करून नंतर आपल्या सावत्र भावास राज्यावर बसविलें व आपण वनांत जाऊन मोठें तप केलें. पुढें तो मृत्यु पावल्यावर ब्रह्मलोकास गेला, पण तेथें त्यास क्षुधा तृषा यांची बाधा सोडीना. याचें कारण त्यानें ब्रह्मदेवास विचारिलें. त्यानें सांगितलें कीं, 'तूं आपलें पोषण चांगलें केलें, पण कोणास कांहीं दान दिलें नाहीं. तेव्हां तूं पृथ्वीवर जाऊन आपलें मृत शरीर खात जा. कांहीं काळानें तुला अगस्त्यऋषीची भेट होईल, तेव्हां तूं मुक्त होशील.' त्याप्रमाणें अगस्त्याची व त्याची गांठ पडून त्यानें त्यास सोन्याचें कडें दिलें. तेणेंकरून तो मुक्त झाला—अशी कथा आहे. १२. अयोध्याधिपति. (राम.) १३. सूर्याचा मुलगा मनु, त्याचा मुलगा इक्ष्वाकु, त्याचा. १४. दंड अथवा दंडक या नांवाचा. हा जन्मापासूनच मूढ व उन्मत्त असे. हा विंध्याचल आणि शैवलपर्वत या दोन पर्वतांमधील प्रदेशांवर राज्य करीत होता. त्यानें, भृगुकुलोत्पन्न एका ऋषीस आपला पुरोहित केलें होतें. एकदां हा राजा आपल्या गुरूच्या आश्रमीं गेला असतां, त्याची कन्या विरजा म्हणून होती, तीस त्यानें पाहिलें, आणि कामांध होऊन तिला धरावयास धावला. तेव्हां ती म्हणाली, 'माझ्या बापाची अनुमति घेऊन मला वर.' परंतु या दुष्टानें तें ऐकिलें नाहीं व तिच्यावर बलात्कार केला व भयानें पळून गेला. ऋषि बाहेर गेला होता. तो येऊन पाहतो तों राजानें मोठा अन्याय केल्याचें समजलें. नंतर त्यानें त्यास क्रोधानें शाप दिला. तो असा कीं, 'दंडक हा आपलें बळ व कोश इत्यादिकांसहित आजपासून सात दिवसांत भस्म होईल.' त्याप्रमाणें तो भस्म होऊन याचा चारशेंकोस विस्ताराचा देश जळून त्यांत धुळीचा वर्षाव होऊन तो अरण्यप्राय झाला आणि त्या प्रदेशास 'दंडकारण्य' असें नांव पडलें. (वा० रा० उ० कां०, स० ७९–८१.) १५. विरजानामक शुक्रकन्या. १६. कपटी, उन्मत्त. १७. पुण्यकारक नियम. १८. विरजेचा बाप. (शुक्र.)

पांसुवर्षे[1] बुडे देश । मरे तो[2] जनपदेश, ।
[3]सत्व सर्व पावे क्लेश, । तेथें न धैर्य धरी. ॥
दंडकारण्य हें नाम । झालें, ऐसी कथा राम ।
ऐके, मग आत्मधाम[4] । पावे दुष्टांचा अरी. ॥ ११४
[5]बंधूंस पुसे विचार, । 'राजसूय[6] यज्ञ सार,[7] ।
वर्णिती ब्राह्मण फार, । मत तुमचें वदा.' ॥
भरत जोडूनि हात । म्हणे, 'यांत भूपघात,[8] ।
तूं या लोका जैसा तात । तैसा पाळिसी सदा. ॥
[9]श्वोल्लकांचा केला न्याय, । सांगावी त्वत्कृपा काय, ।
प्रजा न म्हणोत 'हाय!' । तुझ्या गावूत पदा. ॥

---

१. धुळीच्या वृष्टीनें. २. दंडकराजा. ३. त्या प्रांतांतले प्राणी. ४. आपलें घर. ५. भरत इत्यादिकांस. ६. राजेलोकांनीं करण्याचा यज्ञाचा प्रकार. ७. सारभूत असा. ८. राजांचा वध. ९. श्वा+उलूक=कुत्र्याचा आणि घुबडाचा. (१) राम राज्य करीत असतां, एके दिवशीं एक कुत्रा रामाकडे फिर्यादीस आला आणि राजद्वारीं मोठ्यानें ओरडूं लागला. रामानें त्यास लक्ष्मणाकडून सभेंत बोलाविलें. तेव्हां कुत्र्यानें सांगितलें कीं, 'सर्वार्थसिद्ध नांवाच्या ब्राह्मणानें मला लांकूड मारून माझें डोकें फोडिलें. याबद्दल चौकशी करून त्यास शासन व्हावें.' रामानें लागलेंच त्या ब्राह्मणास बोलावून आणिलें आणि कुत्र्यास लांकूड मारण्याचें कारण विचारिलें. तो म्हणाला, 'ऐन दुपार होती व भिक्षेची वेळ टळून गेली होती व मला भूक लागली होती. अशा संधीस हा कुत्रा एका बाजूस न जातां वारंवार मध्यें येई. तेव्हां मी क्रोधानें त्यास मारिलें. तरी पण हा माझा अपराध आहे.' त्याबद्दल रामानें सभासदांस विचारिलें. तेव्हां सभासदांनीं 'ब्राह्मणास शिक्षा करितां येत नाहीं' असें आपलें मत सांगितलें. तेव्हां कुत्र्यानें रामाची प्रार्थना केली कीं, 'तुम्ही यास ग्रामाधिपति करावें.' त्याप्रमाणें रामानें त्या ब्राह्मणास अधिकारपत्र करून दिलें. अपराध केला म्हणून शिक्षा व्हावयाची ती न होतां उलटा हत्तीवर बसून ब्राह्मण आपल्या अधिकाराच्या ठिकाणीं मिरवत गेला. याचें सभासदांस फार आश्चर्य वाटलें. तेव्हां राम म्हणाले, 'याचें तत्व कुत्र्यास माहीत आहे.' कुत्रा म्हणाला, 'पूर्वी मी ह्याच अधिकारावर होतों. तेथें माझ्या हातून पैसे खाणें वगैरे नाना प्रकारचे दोष घडले त्यामुळें हा अधम जन्म पावलों. तीच दशा या ब्राह्मणाची होईल.' (२) एका रानांत एका झाडावर एक गिधाड व एक घुबड अशीं दोघें राहत होतीं. घुबड म्हणाला, 'हें घर माझें, तूं येथून निघून जा.', गीध म्हणाला, 'हें घर माझें आहे. तूं निघून जा.' असा वाद लागून उभयतांची फिर्याद रामाकडे झाली. रामानें दोघांची तक्रार ऐकून घेऊन गृध्रास विचारिलें, 'तूं केव्हांपासून तेथें राहतोस?' त्यानें उत्तर केलें कीं, 'आमची वस्ती मनुष्यसृष्टी उत्पन्न झाली तेव्हांपासून आहे.' घुबडाला तोच प्रश्न केला असतां त्यानें सांगितलें कीं, 'परमेश्वरानें झाडें उत्पन्न केलीं तेव्हांपासून आमची वस्ती या ठिकाणीं आहे.' तेव्हां

अश्वमेधही [1]तसाच, । [2]त्याहूनी हा हित साच, ।
यांत तैसा नाहीं जाच, । बा दयासुधानदा !'. ॥ ११५
लक्ष्मण म्हणे '[3]प्रताप । अश्वमेधीं भारी, [4]पाप ।
वृत्रवधें घडे, ताप । शक्रा जो त्या [5]हो हरी.' ॥
राम वदे, 'वत्सा! साच, । याचा महिमा असाच. ।
स्त्रीत्वदोषांतूनी हाच । [6]इला राजा उद्धरी.' ॥
गुर्वाज्ञा घे रघुवीर, । [7]नैमिषीं गोमतीतीर, ।
तेथें [8]यज्ञवाट [9]धीर- । मतें भरत करी. ॥
सौमित्री फिरवी [10]हय, । संपादी सर्वत्र जय, ।
कोणालाही न दे भय, । झाले सखे जे अरी. ॥ ११६
सर्वत्र धाडिले दूत, । आले [11]आहूत नाहूत, ।
रक्षःकीशपति [12]पूतें । व्हाया शीघ्र पातले. ॥
धांवला शत्रुघ्न तूर्ण, । विप्र राजे झाले [13]पूर्ण, ।
केले दो[14]षनग चूर्ण । रामें सुखीं घातले. ॥
गोमतीच्या [15]तटीं [16]वाट । वाल्मीकीचा; [17]जेणें [18]वाट ।
केली, तीणें [19]आटोकाट । सन्मुक्तीसीं [20]रातले. ॥

---

या गोष्टीचा निकाल असा झाला कीं, 'सृष्टिक्रमावरून पाहतां पृथ्वी निर्माण केल्यावर मनुष्य-सृष्टि होण्यापूर्वी झाडें निर्मिलीं. तेव्हां तें ठिकाण घुबडाचें आहे, गृध्राचें नव्हे.' असा न्याय झाला. (वा० रा०. प्रक्षिप्त सर्ग ५९-६१.)

१, राजसूययज्ञासारखा. २. राजसूयापेक्षां. ३. तेज. ४. ब्रह्महत्येचें पाप. ५.अश्वमेध. ६. इल हा सूर्यवंशांतील राजा. वैवस्वत मनूस बराच काळपर्यंत पुत्र नव्हता म्हणून त्यानें पुत्रकामेष्टि करविली; तेव्हां त्याच्या शुद्धा नांवाच्या स्त्रीनें होत्यास (यज्ञांत मंत्र म्हणून देवास आह्वान करणाऱ्यास) सांगितलें होतें कीं, 'मला कन्या होईल असें करा.' तेव्हां त्यानें त्या इष्टींत कन्या-प्रसवकारक मंत्र उच्चारून अग्नींत हवन केलें. तेव्हां त्यास कन्या झाली. तिचें नांव 'इला.' मनूनें वसिष्ठास असें होण्याचें कारण विचारिलें असतां त्यानें सांगितलें कीं, 'होत्यानें केलेला मंत्रोच्चार या वैपरीत्यास कारण आहे. आतां तुला पुत्रच पाहिजे असेल तर या कन्येस मी पुरुषत्व आणीन.' असें म्हणून वसिष्ठांनीं आदिपुरुषाची स्तुति केली. त्यावरून त्या कन्येस 'इल' असें नांव पुरुषत्व प्राप्त झालें असतां दिलें होतें. यास 'सुद्युम्न' असेंही म्हणत. ७. या नां-वाच्या अरण्यांत. ८. यज्ञस्थान. ९. पंडितांच्या विचारानें. १०. घोडा. (यज्ञाचा.) ११. बोलविलेले. १२. पवित्र. १३. संपूर्ण झाले म्ह० सर्व जमले. १४. पापाचे पर्वत. १५. तीरावर. १६. स्थान, आश्रम. १७. ज्या वाल्मीकीनें. १८ रामायणरूप मार्ग. १९. (सर्व लोक) आटोकाट (अत्यंत) रातले (सुखी झाले). २०. रममाण झाले. याचा कर्ता 'लोक' (अध्याहृत).

[1]तीवर्णाची कथा काय, । शूद्रांचेही समुदाय, ।
रामाचे पाहूनी पाय । अत्यानंदें मातले. ॥
अत्युदार गुणपात्र, । राममूर्तितुल्यगात्र, ।
रामायण गाया [2]छात्र । वाल्मीकीनें लाविले. ॥
ऐके स्वसभेंत राम । [3]आदिकाव्य पुण्यधाम, ।
[4]कर्त्यांचें, त्यांचेंही नाम । पुसे, पुत्र [5]भाविले. ॥
[6]प्राचेतसातें [7]स्वकाम । सांगे, प्रार्थी मेघश्याम, ।
[8]दिव्योत प्रकटी [9]धाम । [10]ती, कीं प्राण [11]ताविले. ॥
[12]सीता क्षमोदरीं जाय; । प्रभूनें म्हणोनी 'हाय !' ।
शोकक्रोधें, जेंवि काय । [13]भोग जना दाविले. ॥
समजावी [14]चतुरास्य, । चित्तीं आवरूनि हास्य, ।
कुशा लवा सांगे [15]दास्य । त्या शोकातें मालवी. ॥
[16]हेममयी सीता राम । [17]पार्श्वीं घे, [18]अन्यस्त्रीकाम ।
सोडी, पावाया विश्राम । नाना यज्ञ चालवी. ॥
ऐसे [19]अयुतवत्सर । करी [20]सन्मीनसत्सर, ।
जे लोभ मद मत्सर । ते दिगंतीं घालवी. ॥
यज्ञांत [21]अर्थिजनास, । अर्पाया इष्टधनास, ।
हृष्ट कराया मनास, । [22]यशोचळें [23]पाळवी. ॥
माता पावल्या [24]गतीस, । नाकीं भेटल्या [25]पतीस, ।
झाल्या शक्राच्या [26]सतीस । मान्या कीं त्या [27]सासवा. ॥

---

१. तीन वर्णांची—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. २. शिष्य. ३. वाल्मीकि रामायण. ४. म्हणणाऱ्या शिष्यांचें. ५. मानिले. ६. वाल्मीकीस. ७. सीतेनें दिव्य करावें ही इच्छा. ८. दिवि+ओत=ज्यानें आकाश भरून टाकिलें आहे असें. ९. तेज. १०. सीता. ११. तापविले. १२. क्षमा+उदर=पृथ्वीच्या पोटांत. सीतेनें आपल्या शुद्धतेविषयीं सर्व ऋषींसमोर शपथ घेतली, तेव्हां पृथ्वी दुभंग होऊन तेजस्वी अशा सिंहासनावर तिला बसवून घेऊन गेली. १३. दुःख आणि कोप यांच्या योगानें सामान्य मनुष्याप्रमाणें होणारे भोग. १४. चतुर्+आस्य=ब्रह्मदेव. १५. सेवा. १६. सुवर्णरूपा. पुढें जे अनेक यज्ञ केले त्याकरितां स्त्री पाहिजे होती म्हणून खऱ्या सीतेच्या पश्चात् ही सुवर्णमयी सीता केली होती. १७. शेजारीं. १८. सीतेहून दुसऱ्या स्त्रीची इच्छा. १९. दहा हजार वर्षें. २०. साधु हेच मत्स्य त्यांचें चांगलें सरोवर असा. (राम.) २१. याचक लोकांस. २२. कीर्तिरूप पदरानें. २३. वोलावी. २४. स्वर्गास गेल्या. २५. दशरथास. २६. शचीस. २७. विष्णु हा इंद्राचा भाऊ, व राम हा विष्णूचा अवतार, म्हणून या इंद्रपत्नीच्या सासवा होत—हा भाव.

वर्णूं तद्गती[1] मी काय, । ज्याचे मुक्तिप्रद पाय, ।
तो करी विश्वाचा राय[2] । उत्तरक्रिया सर्वा. ॥
देव सांगती स्त्रियांस,[3] । दशरथाच्या प्रियांस[4] ।
करूनियां सत्क्रियांस । आत्मा[5] दास भासवा. ॥
वाढवूनि बहु मान, । देणारा अभयदान, ।
यांच्या नंदनासमान[6] । नाहीं अन्य वासवा.[7] ॥ १२०
चवघांचे[8] पुत्र आठ, । शत्रूला न देते पाठ,[9] ।
त्यांला सर्व विद्या पांठ[10] । राज्यपदीं स्थापिले. ॥
भरतें रणीं गंधर्व । तीनकोटी महागर्व, ।
संवर्तास्त्रबळें[11] सर्व । लोक वैरी कापिले. ॥
तक्ष पुष्कळ कुमार । दोंपुरींत[12] सुकुमार ।
स्थापूनी, शत्रूंचे वार[13] । महातेजें दापिले.[14] ॥
जे अंगद चंद्रकेतु । रक्षिते मर्यादासेतु,[15] ।
त्यांहीं देश वृद्धिहेतु । पुरद्वयें[16] व्यापिले. ॥ १२१
बोले विप्ररूपी[17] काळ,[18] । 'मंत्र[19] तुजसीं[20] जोंबाळ,[21] ।
तों; जो प्रवेशेल बोळ[22] । तो मारावा;' यापरि ॥
लक्ष्मणातें सांगे राम, । विप्राचा कराया काम,[23] ।
वसे त्या रहस्यधाम-[24] । द्वारीं दुष्टांचा[25] अरी. ॥
'यावें वैकुंठलोकास' । ऐसें दयेच्या ओकास,[26] ।
प्रार्थी तो.[27] द्याया शोकास । दुर्वासा[28] म्हणे, 'जरी ॥

---

१. त्या आयांची गती. २. त्रैलोक्याचा अधिपति. (राम). ३. स्वस्त्रियांस. ४. बायकांस. ५. स्वतःचा देहे. ६. रामासमान. ७. इंद्राला. ८. रामाचे पुत्र–कुश आणि लव; भरताचे–तक्ष आणि पुष्कल; लक्ष्मणाचे–अंगद आणि चंद्रकेतु; व शत्रुघ्नाचे–सुबाहु आणि शत्रुघाती; असे आठजण पुत्र. ९. युद्धांत पराङ्मुख न होणारे. १०. अवगत (होत्या). ११ संवर्त नांवाचें अस्त्र त्याच्या बळानें. १२. तक्षशिला आणि पुष्कलावत या दोन नगरींत. १३. समुदाय. १४. रागानें निःसत्व केले. १५. नीतिरूप मर्यादा तिचा सेतु त्याचें रक्षण करणारे. १६. अंगदीया आणि चंद्रकांता या दोन नगरी. १७. ब्राह्मणाचें सोंग घेऊन आलेला. १८. मृत्यु. १९. मसलत. २०. यापुढें 'आहे' याचा अध्याहार. २१. संभाळ, सावध रहा. २२. मूल असेल तरी. २३. इच्छा. २४. गुप्त मसलत जेथें चालली होती त्या घराच्या दारांत. २५. लक्ष्मण. २६. स्थानास. (रामास.) २७. काळ. २८. हा अत्रि ऋषीचा पुत्र. याच्या आईचें नांव अनसूया. हा महातपस्वी असून उत्तम कोटींतील ब्रह्मवेत्ता होता. हा मोठा रागीट होता.

वारी[1]तोसि देतों शाप, । मत्ता[2] ! पहा मत्प्रताप[3], ।
पुढें धांवे तुझा बाप[4], । आज्ञा मस्तकीं धरी.' ॥ १२२

सौमित्रि त्रासे[5] शापास, । जैसा मंडूक[6] सापास, ।
सांगे श्रीरामक्ष्मापास[7], । 'श्रीदुर्वासा पातला'. ॥
काळा निरोप देऊन, । रामें धांवत येऊन, ।
पायीं मस्तक ठेवून, । प्रेमें जेवूं घातला. ॥
मुनी जेवूनियां जाय, । राम चित्तीं म्हणे, 'हाय !' ।
पण[8] त्याज्य[9] नव्हे, काय । वधूं, न हा मातला[10]. ॥
सुज्ञमतें वध त्याग सम[11], । संकटे न भाग,' ।
गुरु[12] सांगे, जाणे डाग । शोक मनांआंतला[13]. ॥ १२३

काळें घडवीलें आग[14], । सौमित्री न धरी राग, ।
करीतां श्रीरामें त्याग, । सरयूतीरीं बैसे[15]. ॥
रामभद्राच्या मनांत, । सर्वसाकेतजनांत, ।
जेंवि दावाग्नी वनांत, । शोक सारीखा धसे. ॥
पुढें सांजली[16] राहून । देव, प्रसाद[17] लाहून, ।
नेती विमानीं वाहून[18] । वर्णिती बंदी[19] तसे. ॥
राम म्हणे, 'मला राज्य, । ज्वरार्ताला[20] जसें आज्य[21], ।
जातों मीही; दुःख प्राज्य[22], । सुख साकेतीं नसे.' ॥ १२४

भरतातें म्हणे, 'दक्ष । आहेस, राज्यातें रक्ष.' ।
तो वदे,[23] 'हे पाय लक्ष[24]- । सत्सुखांचे आकर[25]. ॥

---

१. रामाचें काळाशीं बोलणें सुरू असतांना लक्ष्मण हा ठरल्याप्रमाणें द्वारांत बसला होता. इतक्यांत हा तेथें रामास भेटण्यास आला. पण लक्ष्मणानें थांबण्यास सांगितल्यावरून हा क्रुद्ध झाला. २. हें संबोधन आहे. ३. माझें सामर्थ्य. ४. दशरथ. ५. भ्याला. ६. बेडूक. ७. रामराजास. ८. पूर्वोक्त प्रतिज्ञा. ९. टाकण्यास (मोडण्यास) योग्य. १०. हा (लक्ष्मण) उन्मत्त झाला नव्हता म्हणून याचा वध करितां येत नाहीं. ११. सारखे. १२. वसिष्ठ. १३. रामाच्या मनांतील. १४. अपराध. १५. याचा कर्ता 'सौमित्रि'. लक्ष्मण प्रायोपवेशनानें" प्राणोत्क्रमणाची वाट पहात बसला. १६. स+अंजलि=हात जोडलेला असा. १७. संतुष्ट होऊन. १८. (लक्ष्मणाला) वाहून. १९. भाटासारखे. २०. ज्वर+आर्त=तापानें पीडिलेल्याला. २१. घृत. २२. निपुण. २३. तुझे पाय. २४. लाखों चांगल्या सुखांचे. २५. खाणी.

चातक सोडील काय । मेघांबु[1], देवांचा रा[2]य, ।
म्हणेल, 'न[3] म्हण हाय, । घे अमृत आ कर. ॥
मी तुझ्या[4] दास्येंचि धन्य, । नावडे राज्यादि अन्य, ।
सेवील सोडूनी स्तन्य[5] । कैसा बाळ साकर[6]. ॥
दे पादाब्जसंनिधान[7], । हेंचि माझें संनिधान[8], ।
तुझा[9] देतां इष्टदान । न घे आळसा करं[10].' ॥ १२५
अयोध्यापुरींचे लोक । पावले अत्यंत शोक, ।
सोडूनि स्वतोक[11] ओक[12] । सारे गळां पडले. ॥
दुःखें मोकलूनी[13] धाय[13], । हृदयीं धरूनी पाय, ।
अंगणीं म्हणोनि 'हाय!' । वृद्ध बाळ रडले. ॥
होणार[14] वियोग, माप[15] । ज्यांला नाहीं ऐसे पाप[16], ।
काळजा अत्युग्र साप । तैसे त्यांच्या जडले. ॥
राम अभय दे त्यांस, । तोडी संसाराचे फांस, ।
भरवी बोधांचे[17] घांस । ज्यांला क्लेश घडले. ॥ १२६
उत्तर कोशलदेश । तेथें राम मानवेश[18], ।
दोघां पुत्रांतें, न क्लेश । ज्यांत ऐसीं, दे पुरें[19]. ॥
अहोरात्रत्रयें[20] पूत[21] । शत्रुघ्ना भेटले दूत, ।
त्या वृत्तें अश्रु प्रभूत[22] । त्याच्या सेविलें उरें[23]. ॥
सुबाहु नंदन ज्येष्ठ, । शत्रुघाती नरश्रेष्ठ, ।
साधुनीतिकीर्तिप्रेष्ठ[24] । वर्णावे बुधें सुरें. ॥
[25]दोघांतें राज्यें देऊन, । एकस्यंदनें[26] येऊन, ।
रामाची भेटी घेऊन । म्हणे खेदातें 'नुरें.' ॥ १२७

---

१. मेघ+अंबु=मेघाचें उदक. २. इंद्र. ३. (तूं) हाय न म्हण; आ कर; अमृत घे (असें) म्हणेल—असा अन्वय. ४. रामाच्या. ५. दूध. ६. साखर. ७. चरणकमलांचें सांनिध्य. ८. उत्तम ठेवा. ९. तुझा (रामाचा) कर इष्टदान देतां आळसा न घे—हा अन्वय. १०. हात. ११. आपलीं मुलें. १२. घरें. १३. आक्रोश करून. १४. होणारे, भावी. १५. माप= मर्यादा. १६. दुष्ट. १७. ज्ञानाचे. १८. मानव+ईश=राजा. १९. उत्तर कोशलांत लवाला व कोशलांत कुशाला स्थापिलें. २०. तीन दिवसांनीं. २१. पवित्र. हें 'शत्रुघ्ना'चें विशेषण. शत्रुघ्न हा या वेळीं मथुरेस होता. २२. पुष्कळ. २३. वक्षःस्थलानें. २४. उत्तम राजनीति आणि कीर्ति हीं आहेत प्रेष्ठ म्ह० अत्यंतप्रिय ज्यांस. २५. सुबाहूला मधुरा व शत्रुघातीं यास वैदिश हीं नगरें दिलीं. २६. फक्त एकच रथ घेऊन; सड्या स्वारीनें.

आले ऋक्ष, कपीवीर, । सुग्रीवही महाधीर, ।
बिभीषणा प्रभु [1]हीर । म्हणे, 'तूं सुखें रहा.' ॥
मारुतीतें सांगे राम, । 'माझ्या कथांहीं विश्राम ।
पाव, ठेवीं मुखीं नाम । धैर्यें वियोगा सहा.' ॥
मैंदे[2] द्विविदे[2] ऋक्षेश[3] । तयांतें करी निदेशें[4], ।
'कल्पागम[5] तों अक्लेश[6] । देश सोडावा न हा.' ॥
निघे सर्वांसह साम-[7]। गानें पावाया स्वधाम[8], ।
पावे सरयूतें राम । द्याया देवातें महा[9]. ॥ १२८
आले ब्रह्मादि[10] विमान, । गंधर्व करीती गान, ।
झाले दिव्यवाद्यध्वान[11], । नाचती वराप्सरा[12]. ॥
करूनि सरयूस्नान । धरूनी श्रीरामध्यान, ।
शोभविती व्योमयान[13] । सर्व वरूनि त्वरा. ॥
सुप्रसन्न पद्मनाभ । जो तो सूर्य रात्रिपाभ[14], ।
झाला दिव्यरूपलाभ[15] । श्वाना शूकरा खरा. ॥
स्वीकारी स्वायुत्र वेशें[16] । श्रीराम देवदेवेश, ।
त्याकाळीं सात्त्विकावेश[17] । नारदा त्याही हरा. ॥ १२९
सरयूंत गोप्रतार[18] । तीर्थ अत्यंत उदार[19], ।
तत्स्पर्शें दिव्य[20] मार्जार, । आखु[21], सर्प, कावळे. ॥
झाले पिशाचही नीट, । श्वपचांचा[22] नाहीं वीट[23], ।
लाजले पाहून कीट । रम्य देव जोंवळे[24]. ॥

---

१. हिरा. २. हा वानर होता. ३. जांबवान्. ४. आज्ञा. ५. नवीन कल्प सुरू होईपर्यंत. ६. क्लेशरहित असा. ७. सामवेदांतील स्तोत्रांच्या गायनानें (युक्त). ८. निजधाम. ९. आनंदास. १०. ब्रह्मादिकांचीं विमानें. हा शब्द येथें पुल्लिंगीं योजिला आहे. हा संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ११. दिव्य वाद्यांचे शब्द. १२. श्रेष्ठ अशा अप्सरा. १३. व्योमयान=आकाशयान, विमान. १४. रात्रिप+आभा=रात्रिपति म्ह० चंद्र त्याच्या कांतीप्रमाणें आहे कांति ज्याची. १५. दिव्यस्वरूपाची प्राप्ति. रामाबरोबर अयोध्येंतील सर्व जीवजंतु स्वर्गलोकास गेले. १६. वेष. १७. सात्त्विक भावांचा म्ह० स्वेद, रोमांच, कंप, गळा भरून येणें, इत्यादिकांचा आविर्भाव. १८. या नांवाचें तीर्थ. १९. मोठें. २०. दिव्यस्वरूप असे. २१. उंदीर. २२. चांडालांचा. २३. त्या (तीर्थाला) श्वपचांचा वीट नाहीं. २४. देवांचे जोडीदार. अल्प स्वल्प प्राणी देखील रामकृपेनें देवरूप झाले, हें पाहून देव लाजले.

ऐसें विलोकितां चित्र[1] । भासे नाकीवृंद[2] चित्र,[3] ।
यशें त्या देवर्षिमित्र[4] । कवी केले बावळे.[5] ॥ ·
आलें अद्भुत[6] कानांत,। ज्याच्या राहिलें ध्यानांत, ।
साधु स्नानांत, पानांत । हेंचि स्वप्नीं चावळे.[7] ॥ १३०
रम्य संतानक लोकं[8] । नित्यानंदसंपदोक,[9] ।
ज्यांत कांहीं नाहीं शोक, । त्यांतें[10] स्थापी[11] ते जन, ॥
करूनी षट्शत्रु भग्न । कीर्तिसुधारसीं मग्न, ।
आत्मपदध्यानलग्न । करी[11] तयांचें मन. ॥
ठेवी,[12] देऊनि विश्राम । तारावया दास, नाम,[12] ।
सेवी श्रीवैकुंठ धाम । भक्तमयूरघन.[13] ॥
यश साधूंच्या मतीस । वाढवावया रतीस,[14] ।
जैसें शंभु दे सतीस[15] । कल्पवृक्षाचें वन. ॥ १३१
सागरांत जळकण । देतां काय? भावें[16] पण, ।
'**घनाक्षररामायण**' । रामभद्रा वाहिलें. ॥
तुलसीचें एकदल । वाहे वंदूनी दुर्बल, ।
रत्नपूजापुण्यफल । त्यां[17] हें ग्रंथीं पाहिलें.[18] ॥
यश विश्वातें सकल । शरणागतवत्सल, ।
पापिपावन निर्मल । हें व्यापुनी राहिलें. ॥
चित्तीं न धरिला राग । केले सर्व महाभाग,[19] ।
मोठें आत्मनिंदाआग,[20] । तेंही श्रीशें साहिलें. ॥ १३२
कोणी समर्पिती फल, । कोणी तुलसीचें दल, ।
कोणी गोड खारें जल, । कोणी पुष्पें चंदन. ॥

---

१. आश्चर्य. २. देवांचा समुदाय. ३. चित्रासारखा स्तब्ध. ४. नारदाचे सोबती म्ह० तन्मयतेनें नारदाप्रमाणें देहभान विसरणारे. ५. वेडे. ६. हें आश्चर्यकारक रामायणरूप काव्य. ७. उच्चारित होता. ८. या नांवाचे स्वर्गलोकांतील प्रदेश. ९. शाश्वत आनंदरूप संपत्तीचें स्थान असे. १०. त्या ठिकाणीं. ही अधिकरणार्थी चतुर्थी. ११. याचा कर्ता 'राम'. १२. आपलें नांव रामानें पृथ्वीवर ठेविलें. १३. भक्त हेच मयूर त्यांचा घन असा राम. एथें 'मयूर' या शब्दानें कवीनें आपलें नांव ध्वनित केलें आहे. १४. रामविषयक प्रीतीस; याचा दुसरा अर्थ क्रीडा (पार्वतीसंबंधानें). १५. पार्वतीस. १६. भक्तानें. १७. या पुढें 'प्राप्त होय' याचा अध्याहार. १८. असें ग्रंथांत लिहिलेलें मीं (मोरोपंतानें) पाहिलें आहे. १९. दैवशाली केलें म्ह० उद्धरिलें. २०. आत्मनिंदारूप अपराध.

कोणी विध्युक्त[1] पूजन । करूनी स्वन्नभाजन[2], ।
अर्पिती सभाग्य जन । वाजी, हस्ती, स्यंदन[3]. ॥
कोणी निर्मिती भवन[4], । कोणी करिती स्तवन, ।
कोणी साष्टांग, भव न । बाधावया, वंदन. ॥
सर्व हे सारखे दास[5], । नेतो उत्तम पदास, ।
वंद्य अन्य[6] वरदास । राम रघुनंदन. ॥ १३३

(उपसंहार.)

श्रीरामासि घनाक्षररामायणपद्म[7] अर्पिला भावें, ।
ज्याच्या चरितांत अमृत, जैसें दुग्धांत सर्पि[8] लाभावें. ॥ १
हातीं न चित्त वित्तहि, न घडे जप तपहि शुद्ध बुद्धि नसे, ।
परि हरिजन हो! प्रभुच्या हृदयीं तुमच्याहि वत्सलत्व वसे. ॥ २
ज्याच्या यशापुढें, कविवर म्हणति, सुधाब्धि[9] चालवो [10]वीची, ।
तो प्रभु नररीति धरी, तैसा हा ग्रंथ चाल [11]वोवीची. ॥ ३

---

१. विधि+उक्त=शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें. २. उत्तम अन्नयुक्त पात्र. ३. रथ. ४. देवालयें. ५. भक्त. ६. अन्य वर देणारास, इतर देवास. ७. 'पद्म' शब्द नेहमींचा नपुंसकलिंगी असतो, पण कवीनें एथें पुल्लिंगी योजिला आहे. असा क्वचित् आढळतो. ८. घृत. ९. अमृताचा समुद्र आपली लाट चालवो. रामयश गायल्यानें तत्काल अमृतसेवनाचा आनंद होतो—हें तात्पर्य. १०. लाट, लहरी. ११. ओवीछंदाची. राम हा त्रैलोक्याधीश असूनही जसी मानवदेह धरून त्यानें मनुष्यकृति स्वीकारली तशी या ग्रंथानें ओवी या सामान्य छंदाचा स्वीकार केला आहे.

# मोरोपंतकृत रामायणें–भाग ५ यांतील अधिक टीपांचें परिशिष्ट.[1]

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| २४ | माया। मानी विश्वें गाया=विश्वानें आपल्या लीला गाऊन तरावें म्हणून प्रभु इंद्रजिताच्या मायांस मान देता झाला. | ५ |
| १ | उपसंहारांतील श्लोकावरून कवीनें ह्या रामायणाचें नांव **कथासुधा** असें ठेविलें असावें असें वाटतें. | ७ |
| २ | तता=तता महा, विस्तृत (मोठ्या) आनंदाला देता झाला. | ८ |
| २५ | मध्यें=दरम्यान, मध्यंतरीं, चौदा वर्षांच्या अवधींत. | ११ |
| २८ | स्थानीं=बसल्या जागीं; कांहीं खटपट न करितां; घरच्या घरीं. | ११ |
| ५४ | स्वशाला शून्या देखता झाला–असा अन्वय. | १४ |
| २७ | द्विज अमृताधिक गोड वीक्षण पावे (आणि) क्षण (भर) सून सोडवी=जटायूवर अमृतापेक्षांही गोड अशी सीतेची दृष्टि पडली आणि (त्या योगानें उत्साह येऊन) त्यानें सीतेला रावणापासून क्षणभर सोडविलें. | २६ |
| २९ | त्या (प्रभूला) मनुष्यभाव शोक दे=प्रभूनें मनुष्यरूप धारण केलें होतें म्हणून त्याला शोक झाला. मनुष्यभाव हा 'दे' या क्रियेचा कर्ता. | २६ |
| २९ | 'ताप न, देविला पहा'=माझ्या तापाकडे लक्ष देऊं नकोस (तर) देवी (सीते) चा शोध कर. | २७ |
| ३१ | रणरंगमहानटायुतें=रणरूपी रंगभूमीवरील जे महानट त्यांच्या दशसहस्रानें. | २७ |
| ३८ | परते परतेज हारवी=परतला, परंतु आपलें श्रेष्ठ तेज त्यानें गमविलें. त्याचा पुरा पाणउतारा झाला. किंवा परते पर (परंतु) तेज हारवी असाही अर्थ होईल. | २९ |
| ४८ | चिर धी भेसि, न हात, पेंव दे=धी भेसि, हात न, चिर पेंव दे असा अन्वय करून, त्या रावणाच्या बुद्धीनें त्याच्या भेस म्ह० तेजास हात (उत्तेजन) दिला नाहीं तर चिर निरंतरचें पेंव (खळगा, अंधारकोठडी) दिलें; स्वतःच्याच बुद्धिभ्रंशानें तो पराक्रमहीन झाला–असा भाव. | ३२ |
| ५१ | पति=नद्यांचा पति सागर. रक्ताच्या नद्या एवढ्या प्रचंड झाल्या कीं जणूं काय त्या समुद्र रिक्त करून म्ह० पूर्ण शोषूनच इतक्या फुगल्या आहेत कीं काय असा भास होऊं लागला. | ३३ |

१. हें परिशिष्ट यावल येथील रा. सा. नागनाथ केशव गोडबोले आणि मुंबई येथील दोन सन्मान्य मित्र यांनीं तयार केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत. **काव्यसंग्रहकार.**

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ५३ | कथि शत्रूंत, सुकीर्ति हो! घसा.=सांगे कीं तुम्ही शत्रूंत (बेलाशक) घुसा; शत्रूवर बेधडक चाल करा. (तुमची) सुकीर्ति हो म्ह० तुम्हांला यश मिळो. | ३५ |
| ७३ | मधूंत कुसुमांहीं पलाश जें रूप धरिता होय तें धरी–असा अन्वय. | ४० |
| ८४ | 'चिर राज्य करून तें जगातें' । वर दे 'जें तव बाहुतेज गातें,' ॥ याचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं. | ४४ |
| ८८ | त्या कथि 'सुगलास पूज. जे सुकीर्तिभूजा (सु=चांगली आहे कीर्ति जीची अशी सीता) दिधली हे (तीच) मम पूजा (झाली). किंवा, यश आणि जानकी हीं तूं मला मिळवून दिलींस तीच माझी पूजा झाली. | ४५ |
| ९३ | ज्या दयाघना शें यति म्हणति, 'दुःसहकर्मदाव विझवा तारा'=ज्या दयाघन रामास शेंकडो यति 'दुःसहकर्मरूप वणवा विझवा, तारा' असें म्हणतात त्या इ०. | ४७ |
| ९७ | घटजादि महीसुराश्रमातें=अगस्त्यादि ब्रह्मर्षींच्या आश्रमांस राम दाखवी. | ४८ |
| १०१ | समाधानकारक लागत नाहीं. | ५० |
| १०४ | हा भव्य गुण कथि; सुर सदा सादास साद देती. निका महर्षि राम कीर्तिरूपा सुरसा दास सदा निकाम हर्षी करी–असा अन्वय करून अर्थ लावावा. | ५२ |
| १०५ | परमारामदया प्रभाव दावी=पर+मा+आराम=श्रेष्ठ असा जो लक्ष्मीचा आराम त्या (रामाची) दया (आपला) प्रभाव (त्या बिभीषणास) दावी. | ५३ |
| १०७ | तयांचिया विरागा पाहुनि मोह (आणि) तयांचिया रुचिरा देहा पाहुनि कामदेव बहु हा वदे=काम व मोह या दोघांसही रामप्रजेनें आपल्या सौंदर्यानें व वैराग्यानें हाय हाय म्हणावयास लाविलें. | ५३ |
| १०९ | 'सदयागायन' याबद्दल 'सदयागायम' अशीं अक्षरें पाहिजेत हें खालील यमकावरून स्पष्टच आहे. अर्थ, कवीचें सद प्रभुकीर्तन या यागा करी म्हणून त्यांना यम शयाला लावीना. कवींचीं सभा ईश्वराचे गुणानुवाद गाणें हाच यज्ञ करिते. म्हणून यम त्यांना स्पर्श करीत नाहीं. अथवा, कवीचें प्रभुकीर्तन सदया (शुभावह कर्माला) उत्पन्न करितें. या (त्या प्रभुकीर्तनाला) गा, म्हणजे यम इ०. किंवा, सदयागा=सत् (चांगल्या) अयाच्या (शुभकर्माच्या, पुण्याच्या) अगा (पर्वतास) असा अर्थ करून कवीचें (वाल्मिकीनें केलेलें प्रभुस्तवन) जो करी त्या सदयागा यम इ०. | ५५ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ४ | फळी=फळ देणारा, वर देणारा. | ५६ |
| ६ | ही=सीता. 'हा हरचाप लाजो' असें म्हणे. | ५७ |
| १८ | ज्यांचे बंदी (भाट) विधि (ब्रह्मदेव) व वेद तो देव (श्रीराम) भरद्वाजपदास वंदी. | ५९ |
| २२ | जी मातेपुढें प्रिय तोक ती रीति गुर्वादिकांसह तो (भरत) करी (रामापुढें). | ६० |
| ३० | दंडें (आपणास झालेल्या शिक्षेनें) ती रंडा (विधवा शूर्पणखा) नाक (स्वर्ग) प्रहृष्ट (आनंदित) करी. | ६१ |
| ३८ | रक्षींहि (राक्षसांच्या समुदायांत सुद्धां) साधुसहायशास्त्री (साधूंचें संरक्षण करण्यांत पंडित असा श्रीराम) रक्षीं (रक्षण कर) (हे !) महायशा ! स्त्री न रक्षीं (स्त्रीचे, या सीतेच्या रक्षणाची काळजी करूं नकोस). | ६४ |
| ४४ | जाणों परांनीं (शत्रूंनीं=काम व रावण या उभयतांनीं) खरा तापविला (असा) तो रानीं ताप विलाप दाखवी (बाह्यात्कारीं शोक करी). | ६५ |
| ४६ | रमेला । रक्षूनची, तो, न शरीर, मेला ॥=तो शरीर न (रक्षून) रमेला रक्षूनची मेला. शरीराची पर्वा न करितां सीतेचें रक्षण करण्यांतच बळी पडला 'चिंतून' हा पाठ चूक आहे. | ६६ |
| ६२ | मग ज्ञाता (त्या वालीला) कां न निंदू (कां) न शापू? | ६८ |
| ६८ | या (त्या मैनाकाला) स्पर्शुनि 'बा आश्रय पावला, हें वदे. | ६९ |
| ६९ | 'पी' ह्या क्रियापदाचा कर्ता 'मारुति' अध्याहृत. | ७० |
| ७१ | वन (आणि) द्वेषिबळ (शत्रुसैन्य) प्रभावें (पराक्रमानें) मोडी. | ७० |
| ७५ | पूत बिभीषण प्रांजळि (हात जोडून) भावा वारी इ०. | ७१ |
| ७६ | उडे जो तपनीं फलाश=जो फलाश (फलाची आशा करणारा मारुति) तपनीं (सूर्यावर) उडे (उड्डाण करी). बाळपणीं मारुतीनें सूर्यास फळ समजून तें घेण्याच्या इच्छेनें सूर्यमंडलापर्यंत उडी मारली होती ही कथा येथें लक्ष्य आहे. | ७१ |
| ७९ | मानी तया स्वासुप कारभारी=कारभारी (अंगद) तया (मारुतीला) स्वासुप (आपल्या प्राणांचें रक्षण करणारा असा) मानी (समजे) | ७१ |
| ८३ | परिपूर्वभूतें=परि आहे पूर्वी ज्याच्या अशीं भूतें म्हणजे पराभूतें. | ७२ |
| ८५ | नतिनिष्कलंका=नतीनें (रामास नमन केल्यानें) निष्कलंक झालेल्या बिभीषणास. | ७२ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ११० | (ते) कृती रक्तार्द्रही न शस्त्रें, न अस्त्रें भग्न (होती). ते कुशल योद्धे रक्तानें माखले होते तरीही परस्परांच्या शस्त्रास्त्रांनीं भग्न झाले नाहींत. | ७१ |
| १४ | ती अनघा (निष्पाप दशरथास) 'बरें' (होय) न बोलिली; नती घे (दशरथ पायां पडला तरी तिनें तें सहन केलें); (परी) मन न सांत्वि, न घाबरे. (तिनें आपला मनस्ताप शांत केला नाहीं, किंवा ती आपल्या हट्टाचा वाईट परिणाम होईल म्हणून घाबरलीही नाहीं. | ८२ |
| १८ | त्या सुशांतिस; भवा दटाविती=(रघुवीर) जटा रची (वळी) त्या सुशांतिस विती (त्या दर्शनानें शांति उत्पन्न करीत) व भवा (संसाराला) दटाविती (दाबांत ठेवीत). | ८२ |
| ३५ | जी सुरांसि कथि '(हे) धौत मीन यांसि स्वर्ग द्या' (ती) गौतमी नद्या जिणि. जी गोदावरीनदी देवांना सांगते कीं हे माझ्यांतील मासे माझ्या पवित्र जलानें धौत (स्नात) झाले आहेत, ह्यांना तुम्ही स्वर्ग द्या, ती अर्थात्च इतर नद्यांना जिंकिते. | ८५ |
| ३८ | (रावण) युवतिरत्न आयके (व) ज्या रत्नसानुप्रणत सानुजा त्यासही (आयके). रावण स्त्रीरत्न जी सीता तिचें वर्तमान ऐके; त्याचप्रमाणें मेरुपर्वत ज्याच्या पायीं नम्र होतो त्या रामाचें व लक्ष्मणाचेंही वर्तमान ऐके. | ८६ |
| ४१ | ईशशक्ति चरितार्थ तीही भी=ती ईशशक्ति (प्रत्यक्ष आदिमाया) चरितार्थ म्ह० चरित (लीला) व्हावें म्हणून भ्याली. | ८६ |
| ४४ | ती कटु वदे म्हणोनि हानि घे=ती सीता कडू बोलली म्हणून तिचा घात झाला. | ८७ |
| ४९ | पाप=पापी रावण. | ८७ |
| ६६ | दोन मास=दोन महिने. | ८९ |
| ६७ | वदो 'न मा' सखा=सखा (माझा प्रियराम) मा (नाहीं.) असें न म्हणो. 'मा' हें निषेधार्थी अव्यय आहे. हा सीतेचा निरोप आहे. | ८९ |
| ७१ | रणा ऐकुनीहि=जरी रावणानें मारुतीचा नुकत्याच झालेल्या युद्धांतील पराक्रम ऐकला होता तरी. | ९० |
| ७४ | क्रूरतेस्तव=दूतास क्रूरतेनें वागविण्याचा दोष येईल या भीतीनें (अशास अशासन म्ह० क्षमा न असो). | ९० |
| ७४ | पापबुद्धि=मारुति (हें रावणाचें भाषण आहे) त्याला बरा (घट्ट) धरा (जखडून बांधा). | ९० |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ७५ | स्थूलदीर्घगुणबद्धबाहु तो (मारुति) ती द्विट्पुरी शिखिमुखांत आहुती करी म्ह० ज्याचे बाहु मोठ्या जाड व लांब अशा दोऱ्यांनीं बांधलेले आहेत असा तो मारुति शत्रूच्या नगराची अग्निमुखांत आहुती करिता झाला. | ९० |
| ७८ | शेवटचा चरण नीट लागत नाहीं. | ९१ |
| ८० | हित तिचा न घात रे=नीतीचें उल्लंघन करणें हिताचें होत नाहीं. | ९१ |
| ८४ | स्वामिचें मानरक्षण (त्याचा बोज राखणें हें सेवकास) उचित आहे. | ९१ |
| ८५ | त्या म्हणे 'नमिं न मी नरा महाराज भक्ष्य मृग मीन राम हा.'=रावण बिभीषणाला म्हणतो 'मी महाराज नरा न नमिं; मृग मीन (तसा) हा राम भक्ष्य.' अर्थ—मी सार्वभौम राजा त्या माणसापुढें मान वांकविणार नाहीं; तो राम हरण व मासळी यांप्रमाणें माझा केवळ भक्ष्य आहे. उत्तरार्धः—या सकळ देव वेद ठाउके. (तशी) दया (ठाउकी) कीं यतिस हे न देववे. अर्थ. (आतां तूं नीति व देव यांबद्दल बोललास तर) या रावणाला सर्व वेद व देव ठाऊक आहेत तशीच दयाही ठाऊक आहे आणि त्या दयेमुळेंच ही सीता *माझ्यानें त्या* रानोरान भटकणाऱ्या यतीला देववत नाहीं. अथवा शेवटच्या चरणाचा अर्थ कीं यतिस दया देववे हें न ठाउकें असा अन्वय करून तपस्या करणारावर दया करणें हें मात्र मला ठाऊक नाहीं असाही अर्थ होऊं शकेल. | ९२ |
| ८८ | दुःख होय सुख जें निवेदिलें=जें निवेदिलें (तें) दुःख सुख होय. आपलें दुःख आपल्या कळकळीच्या माणसास सांगितलें असतां तें कमी होतें, किंचित् सुखकारकही होतें. 'स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति' हें शाकुंतलांतील वाक्य समानार्थक आहे. उत्तरार्ध.—भक्ति उशी देऊन म्हणे 'स्वस्थ रहा; हा राम उशीर न करी'=राम बिभीषणास भक्ति हीच उशी देऊन 'स्वस्थ रहा, मी उशीर लावणार नाहीं' असें म्हणाला. त्या ठिकाणीं भक्तीला उशीची उपमा देऊन भक्तीला उशीसारखेंच मृदुत्व व दुःखपरिहार करून स्वास्थ्य देण्याची शक्ति आहे हें कवीनें मोठ्या चातुर्यानें दाखविलें आहे. | ९२ |
| ९९ | घांस ओपित्या पित्या काय म्हणसि रे=तुला अन्न चारून वाढविणाऱ्या अशा आपल्या बापास काय सांगशील? (अर्थात् स्वर्गांत तुझी व त्याची भेट होऊन त्यानें जर तुला, आपला शत्रु जो राम त्याची, हे | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | पुत्रा! चाकरी करितांना तुला कांहींच लज्जा कशी वाटली नाहीं? असें विचारलें तर) 'म्हणति घांस ओपि त्या' असा पाठ घेतल्यास 'शत्रुला भजुनि (पुत्र) घांस ओपी त्या पित्या साश्रु हो (असें) म्हणति काय रे?— असा अन्वय करून अर्थ लावावा. | ९३ |
| १०० | लाजतास (तर) उलतासः—जर तुला लाज असती तर तुझें हृदय दुभंग झालें असतें. (त्याहि तत्प्रियसखाहि) यांतील 'त्या' व (तत्) हीं सर्वनामें कोणाचीं दर्शक तें बरोबर समजत नाहीं. 'किं त्वया जड ! तया हि तारया'=हे मूर्खा, तुझा आणि त्या तारेचा तरी काय बरें उपयोग? | ९४ |
| १०४ | रे सुबालिश वालिशतशासनक्षमा तशास क्षमा न सोडु. खेद पावुनि 'हा!' न बोल. सखे! ऱ्हींत शिरें; दहा शिरें न त्यजः—(अंगद म्हणतो) हे मूर्खा रावणा! शेंकडो वालींला शासन लावण्यास समर्थ अशा त्या (रामाला) क्षमा (दया) न सोडू (असें म्हणण्यांत अंगदानें, रावणास वालीनें काखेंत पकडून चतुःसमुद्रांवर हिंडविलें होतें. तेव्हां तसल्या शेंकडो वालींनाही पारिपत्य करण्यास समर्थ असा राम एका रावणाला रागावेल तर सहजच चिरडून टाकील असें सुचविलें आहे). अरे, दुःखानें 'हाय हाय' असें तूं बोलूं नकोस (पश्चात्तापानें 'हाय हाय' करीत बसण्याचा प्रसंग ओढवून घेऊं नकोस) कांहीं लाज धर आणि आपलीं दहा शिरें गमावूं नकोस. | ९४ |
| १०७ | असा छद्मगर्व मया न असे=कपटविद्येबद्दल (मायावीपणाबद्दल) या रावणासारखा मयासुरालाही गर्व नाहीं. | ९५ |
| १२० | यमक्षया=यमसदनास (क्षय=घर). | ९७ |
| १२४ | थोपले=थांबले, उभे राहिले. | ९७ |
| १२५ | कवी=आदिकवी वाल्मिकी. | ९७ |
| १२६ | महामहा=मोठें आहे तेज ज्याचें असा राम. | ९७ |
| १३३ | यशीं रची· तेंची शुद्ध करावया शुद्ध=श्रीराम सीतेस म्हणतात 'मला कीर्तीची चाड आहे म्हणून ती कीर्ति शुद्ध करण्याकरितां मीं शुद्ध केलें, तुझ्याकरितां केलें नाहीं. | ९८ |
| १३७ | तो जनकसा अग्नि वदला 'दिव्यकाळ विवाहसा (आहे) निवा, हसा.' असा अन्वय व जनकाप्रमाणें तो अग्नि म्हणाला, हा सीतेच्या दिव्य करण्याचा काळ म्हणजे तिचा विवाहच आहे. म्हणून तुम्ही शांत व्हा आणि आनंद करा. | ९९ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १४४ | कळा=कळा हें सरमेच्या मुलीचें नांवच होय. | १०० |
| १४६ | वरा वनी=सुंदर अशी वनी म्ह० मोठें अरण्य. हरिची वरावनी म्ह० नंदनवन. | १०० |
| १५१ | या तुझ्या हृतमनोगदे वरा=हे हृतमनोगदे या तुझ्या वरा (व) देवरा खावया कबंध धरी. कबंधानें राम व लक्ष्मण या दोघांसही खाण्याच्या उद्देशानें धरिलें होतें. | १०० |
| १५६ | बाहती खगरवें=पक्ष्यांच्या किलबिलाटानें जणुं बोलावतातच काय. | १०१ |
| १६० | यत्न करून (वेळेवर भरताची भेट घेण्यासाठीं) सानुजा (भरता) भेटला. | १०१ |
| १६२ | पर=देवपुर, अमरावती. | १०२ |
| ३ | 'श्रीवसिष्ठ हा गुरु स्वयें वदे दे' असा अन्वय. | १०३ |
| ९ | ज्याला भानु स्तवी त्या सानुजाला स्वसेच्या सुता युधाजित् स्वगेहा. सि ने म्हणजे ज्याची सूर्य स्तुति करी अशा आपल्या बहिणीच्या मुलास (भरतास) त्याचा अनुज जो शत्रुघ्न त्यासह युधाजित् (भरताचा मामा) आपल्या घरीं नेता झाला. | १०४ |
| १६ | प्रिये! जी शाला हिता न ती अशाला=प्रिये! जें घर सुखकर नाहीं तें घर नव्हे (अरण्य होय). शाला=घर. | १०५ |
| १८ | परा=शत्रूला. | १०६ |
| २७ | तनुत्राण=चिलखत, कवच. | १०७ |
| २९ | जी वीनभा भुजंगा दिसे ती विकारा न जाय=जें गरुडाचें तेज भुजंगांच्या दृष्टीला पडतें तें विकार पावत नाहीं (कायम राहतें). त्याचप्रमाणें रामानें विश्वास देऊन भरताचें परोपरीनें सांत्वन केलें होतें तरी त्याचें वैराग्य कायमच राहिलें होतें म्हणून तो कंदादिक भाजल्यावांचून म्हणजे कच्चेच खाऊन राहत असे. जी भा (भरताची) विकाराभुजंगा वीन दिसे ती न जाय म्ह० भरताचें जें तेज विकाररूपी भुजंगास गरुडासारखें दिसे तें नाहींसें झालें नाहीं. भरताच्या मनास चंचलता शिवली नाहीं (असाही अर्थ एकानें सुचविला आहे). या श्लोकाचा द्वितीय चरण 'न घे वल्कधारी, न तोखे दसोडी' असा असावासें वाटतें. | १०७ |
| ३७ | तया लंघितां—रामाची अमर्यादा केली म्हणून. | १०८ |
| ३८ | प्राण तावी—प्राणांस ताप देई, मला त्रास देई. | १०८ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ |
|---|---|---|
| ४१ | तेज=सामर्थ्य, पराक्रम. | १०९ |
| ४४ | जया सर्परूपा पुढें परा भेकलीला येतो इ० ज्या सर्पासारख्या रावणासमोर शत्रु भेकरूप होता म्हणजे सर्पापुढें जशी बेडकांची तशी रावणापुढें त्याच्या शत्रूंची दशा होत असे असा उग्र इ. | १०९ |
| ४५ | वीना=वि+इन म्ह० पक्षिश्रेष्ठ गरुडास (पुतण्या जटायूचें कर्म गोड वाटलें). | १०९ |
| ४६ | भग्न होऊन=पराजय पावून. | ११० |
| ५१ | कंपा जरी हे=कंपा जरी दे असा पाठ असावासें दिसतें. | ११० |
| ६१ | पुन्हा तत्काळ सिंधू लंघिता जाला=फिरून लगेच समुद्र (ओलांडूं लागला). | ११२ |
| ६२ | जें तोंड (पूर्वीं) हुंकार वदे तें तदा (मारुतीची थप्पड बसल्यावर 'हा' (दुःखोद्गार) वी (काढावयास लागलें). | ११२ |
| ६५ | तया महात्मा मान दे हें न जाणें=इंद्रजितानें, मारुतीनें केवळ त्या महात्म्याचा सन्मान करिण्याकरितां आपणांस बद्ध करून घेतलें आहे, असें जाणिलें नाहीं. | ११२ |
| ६८ | रमा=सीता. सर्व अलंकार माती झाला=लंकेच्या शोभेची धूळधाण झाली. | ११३ |
| ७१ | दामीं=दाव्यांनीं. बांधण्यास माळेपेक्षां दावेंच प्रशस्त होय. | ११३ |
| ७६ | तोही क्षिप्र तेज हरी (आणि) नाडी=तो अंगदही रावणाचें एका पळांत तेज हरी आणि त्याला नाडी. | ११४ |
| ७९ | जो रणीं वज्रप्रहारें (व) यमेंही न भागविला तो इ०. | ११४ |
| ८६ | सुधाबंधु (असा) तद्गंध शल्यार्ति खाणी=अमृताचा केवळ भाऊच असा त्या ओषधिशृंगाचा वास सैन्याला जखमांपासून होणाऱ्या वेदना समूळ नाहींशा करून टाकी. | ११५ |
| ८८ | रत्नहेमें (मेघनाद) घना (व) दभ्र अशी मायामहीजा करी (आणि) भ्रमाया वधी=इंद्रजितानें सोनें व रत्नें यांनीं मायावी सीता उत्पन्न करून रामलक्ष्मणांस मोह पाडण्यासाठीं तिचा वध केला. | ११६ |
| ९२ | चमू ढाल गळे=सैन्य हीच ढाल ती पडली. | ११६ |
| ९६ | जयाची प्रसू अंजना, ज्यातें भानु ज्ञान दे तो पुन्हा शृंग आणून कंजनाभानुजातें स्वस्थता दे=ज्याची आई अंजना व ज्याला सूर्यानें | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | ज्ञान सांगितलें तो मारुति पुन्हा द्रोणगिरीचें शिखर आणून लक्ष्मणाला स्वस्थता देता झाला. | ११७ |
| ९७ | जो रामीं संग सोडून द्विषद्बुद्धि तयाच्या इ०=जो रावण रामाशीं संग न करितां वैर धरीत होता त्या रावणाच्या इ०. | ११७ |
| ९९ | तया दे यश=मातलीला यश दे=मातलीच्या म्हणण्याप्रमाणें ब्रह्मास्त्र सोडून त्याला समयसूचकतेचें यश दिलें. | ११८ |
| १०४ | व्यथा हो यशा बुद्रपा अस्त वाहो–हा चरण बरोबर लागत नाहीं. | ११८ |
| १०५ | श्रीश तया पादानतातें पद दे=श्रीरामानें त्या शरण आलेल्या बिभीषणास लंकापद दिलें. | ११९ |
| १०७ | तो सदार पुष्पकीं बसे, प्लवंगांसि (पुष्पकांत) घाली, जो सदा प्रजांच्या रक्षणांत श्रमे तया वदावी तसी भेटी दे; देव मोठी दया दावी=श्रीराम सीतादेवीसह पुष्पक विमानांत बसले. त्यांत त्यांनीं इतर वानरांसही घेतलें आणि जो प्रजांच्या कल्याणार्थ सतत झटत असे त्या भरताला वर्णन करण्यासारखी (अगदीं वेळेवर व प्रेमानें) भेट दिली. ही प्रभूनें मोठी दयाच दाखविली–असा अर्थ. | ११९ |
| १०८ | मी वदों काय ? परी (इतकें वदतों कीं) नव्या ज्यातें सदा विप्र ध्याति (तो) प्रजातें भव्यास दावि=कवि म्हणतो श्रीरामानें राज्य केलें त्याचें मी काय वर्णन करूं ? तरी इतकेंच सांगतों कीं ज्या त्या नवीन अगर स्तुत्य रामराजाला ब्राह्मण नेहमीं ध्यात होते त्यानें प्रजांचें कल्याण केलें. | ११९ |
| ११० | तसी जीवा म्ह० बृहस्पतीलाही बुद्धि नाहीं. सेवासवास=सेवारूपी यज्ञास. | १२० |
| ६ | प्रभु मार्ग धरवी=श्रीरामानें परशुरामाला (महेंद्र पर्वताचा) मार्ग धरावयास लाविलें. | १२१ |
| ६ | महितव्रत भार्गवराम वरा दे, हित करी=प्रख्यात आहे व्रत ज्याचें अशा भार्गवरामानें रामास वर दिला आणि त्याचें कल्याण केलें. | १२१ |
| १८ | 'मृग पाठवि रावण हंसमय' ह्यांत 'हंसमय'च्या ठिकाणीं 'हेममय' असें असावेंसें वाटतें. | १२२ |
| २४ | हिमेंहि पवनें बहु ताप दिला=थंडगार वाराही प्रभूच्या अंगास उष्ण वाटूं लागला. | १२३ |
| ३३ | 'तयाप्रति मूठ वळी योग्य' असें कथि=रावणास मूठ आणि वळी | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | (बैलाच्या पाठीवरील खोगीर आणि त्याच्या पाठीस घासटूं नये म्हणून घालतात ती वळी) हींच योग्य आहेत असें अंगदानें रामास सांगितलें. रावण बैल आहे असें पर्यायानें दर्शविलें. | १२४ |
| ३५ | तोकपटें=मुलाच्या वस्त्रानें. | १२४ |
| ३८ | उत्तरार्ध नीट लागत नाहीं. | १२४ |
| ४० | कीर्ति गति=कीर्ति व गति (मोक्ष). | १२५ |
| ४१ | 'वनयाद' ह्मणे मिळण्या जन या=या मिळण्या (दशरथ व राम यांच्या भेटीला) जन 'वनयाद' म्हणे म्ह० उदक व मासा यांच्या भेटीप्रमाणें ही भेट झाली असें लोक म्हणाले. | १२५ |
| ४३ | प्रभु समया न विलंघुनि या भरता घनासम घना भेटि ओपि=श्रीरामानें संकेताची वेळ न चुकवितां भरताला मेघाप्रमाणें दृढभेट दिली. (मेघ जशी चातकादिकांस देतो त्याप्रमाणें.) | १२५ |
| ४५ | स्वगुणा बरवा वरवा (असा) तो प्रभु भर वारुनि 'शर्मभरवा' (असें) म्हणे=आपल्या गुणास आपणच एक आश्रयस्थान असा प्रभु रामचंद्र पृथ्वीचा भार नाहींसा करून 'जिकडे तिकडे कल्याण पसरा' असें (आपल्या त्या गुणांसच) म्हणाला. | १२५ |
| ४६ | जन शिक्षि 'हे वदना तूं 'ना' न वद'. निराशमना शमना न वचके (कारण) भवना भवना वनवृत्ति भजे=(प्रभूच्या राज्यांतील) लोक आपल्या मुखाला 'तूं कधींही (याचकांना) 'नाहीं' असें म्हणूं नकोस' असें शिकवीत असत. (यावरून त्यांचें औदार्य व्यक्त होतें.) त्याच्या राज्यांत निराश होऊन कोणीही यमाची भीति बाळगीत नसे, कारण घरोघरीं वनवृत्ति (म्हणजे तपस्व्यांची वृत्ति,) नांदत होती. | १२५ |
| ४७ | सुधासरसें=अमृताच्या सरोवरासारखें. | १२५ |
| ६ | परवीरहृत्तिमिरयोधरवी=शत्रुपक्षीय वीरांच्या हृदयस्थाच तिमिरांस जो योधरूप सूर्य. | १२६ |
| १० | त्यजि लक्ष्मण क्षितिसुताहि न ती प्रभु इ०=प्रभूनें लक्ष्मण व सीता यांस टाकिलें नाहीं. | १२७ |
| १५ | कथि साश्रु 'हा न तिस हें शिकवी'=भरत (कौसल्येस) डोळ्यांत पाणी आणून म्हणाला 'तिस (कैकेयीला) हें (रामास वनवासास पाठविणें) हा | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | (भरत, मी) न शिकवी (न सांगे). रामास वनवासास धाडण्याला मीं कैकेयीला सांगितलें नाहीं असें भरत कौसल्येस म्हणाला. | १२७ |
| १६ | घाट=नदीचा; डोंगराचा नव्हे. | १२८ |
| २९ | नंदनस्थ रुख=कल्पवृक्ष. | १२९ |
| ३३ | परपुरीभसितें=शत्रु (जो रावण) त्याच्या नगराच्या (लंकेच्या) भस्मानें. | १२९ |
| ३५ | गुरुसाचि दासहि समस्तविद्या=विश्वोत्पत्ति करणाऱ्या प्रभुला दासहि गुरुसाच झाला, वाटला. | १३० |
| ३६ | 'अरि असामकर ग्रसिता नसे परि असा मकर=(अंगद म्हणाला) शत्रु (रावण) संधि (तह) न करणारा आहे. परंतु ह्याच्यासारखा मकर (सुसर मगरही) ग्रसिता (खाणारा; भयंकर) नाहीं. मगराहूनही हा भयंकर आहे. | १३० |
| ४९ | न विलोकि आयुधनहालबला, न धरून आयुध न हा लवला=रावण आपल्या आयुष्याकडे, धनाकडे, होत असलेल्या हालांकडे व बलाकडे पाहीनासा झाला. तो शस्त्र खालीं ठेवून रामास शरण गेला नाहीं. | १३० |
| ५१ | जो अज जग सहज वीतसे या (त्या) रज याचिता अजया हरि (असें) गमे=जो सर्व विश्व सहज उत्पन्न करितो त्या विष्णूच्या (रामचंद्राच्या) पादरजाची याचना करणारा (मारुति) अजया म्ह० पराभवाला हरि (टाळी) असें वाटलें. | १३२ |
| ५६ | वसु=संपत्ति. रति देचि ना इ० चरण नीट लागत नाहीं. | १३२ |
| ६१ | मग तो प्रभु ससीत निघे. या जसि कीर्ति तसी भूमिचि तनया न—प्रभुराम सीतेसह निघाला. त्याला जशी कीर्ति (प्रिय) होती तशी सीता नव्हती. | १३३ |
| ६७ | अमृतें=उदकानें; (पक्षीं) मुक्तीनें. | १३३ |
| ९ | ओक=ओसाड, ओकें. | १३४ |
| १२ | हा=विराध..यास=रामास. | १३५ |
| २३ | श्रीपदें क्षालुनी तोय सेवुनियां-असा अन्वय. | १३६ |
| ३६ | पंगून=पंगूपेक्षांहि उणा. | १३७ |
| ४५ | जो धांवे आणि लवें नागपाशान्त करी त्याला नागपाशांत भारी काय (हो)? जो क्षणार्ध धावून आणि ज्यानें गजेंद्राचा (ताप) शांत केला त्याला (इंद्रजितानें घातलेल्या) नागपाशांचा अंत करणें अवघड होतें काय? | १३८ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ४५ | कुढें=सुंठीचें कुडें अथवा ज्याचा काय पर्वतातें 'कुढें' (मनांत खंती करीत बैस) (असें म्हणे)–असाही अन्वय होईल. | १३८ |
| ५७ | देखावया शंभु इ०=रामाचा जय पाहण्याकरितां शंकर व ज्ञानीही आपलीं ध्यानें सोडून आले. | १४० |
| ६० | द्विद्चमूलाहि काळाननीं घातिली=शत्रूची सेना हीच कोणी लाही (धान्याची) काळाच्या म्ह० मृत्यूच्या तोंडांत घातली. रामानें शत्रुसेना मृत्युमुखांत लाहीसारखी टाकिली. किंवा काळाननीं घातली द्विद्चमू (तें यश) लाही (मिळवी)–असाही अर्थ होईल. 'स्वर्द्विषद्रेकाळाहि' हें रामाचें विशेषण करावें. | १४० |
| ६१ | आत्मभूकक्षदावाग्निदृक्=मदनरूपी गवतास वणव्याप्रमाणें आहे दृष्टि ज्याची असा. | १४० |
| ६१ | स्वसत्पक्ष=स्वजनांचा पक्षपाती (मित्र). | १४० |
| ६५ | वीट=कंटाळा; तिरस्कार. | १४१ |
| ६५ | सभ्यास=बिभीषणास. | १४१ |
| ६८ | स्वीकारिली श्री=सीतेचा अंगीकार केला. श्री म्ह० सीता. | १४१ |
| ७५ | श्रीश=रामचंद्र. | १४२ |
| ७७ | दलागार=पर्णकुटिका. | १४२ |
| २ | भवें मही विभवें महीष्ठकरि=स्वभावतःच मही म्ह० विस्तृत असणारी पृथ्वी (रामानें) विभवें (आपल्या कीर्तीनें, वैभवानें) महीष्ठ (अत्यंत मोठी) केली. | १४३ |
| ४ | या सदया दया भूविभूति त्यजवी=सदय अशा रामाकडून दयेनें पृथ्वीच्या ऐश्वर्याचा (राज्याचा) त्याग करविला. | १४३ |
| ५ | या स्वभजनीं रता पया जनीं मनीं रघुप पय=स्वभजनांत रत असें जें भरतरूपी पय त्याला रघुप (राम) जनीं मनीं पय होई. भरताला राम स्वस्वरूप वाटला. | १४३ |
| ८ | तिलापरुचि=तिलाप्रमाणें अपरुचि(काळी कांति)आहे ज्याची असा(रावण). | १४४ |
| १२ | सुखगती=सुख आणि गति=मोक्ष. | १४४ |
| १३ | रसी=रसिक. न भूषित न=ती नतीष्टवनभू न भूषित न म्हणजे भूषित (होती). | १४४ |
| १७ | चतुर्थ चरण बरोबर लागत नाहीं. | १४५ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १८ | खपेरितपला=खप+ईरित+पला=ब्रह्मदेवानें सांगितलेल्या वेळेला. | १४५ |
| १० | पुण्ययशःपद=श्रीराम (भ्रमावा म्हणून). | १४७ |
| १२ | तीस सोडी क्षण=रावणानें क्षणभर तिला (सीतेला) सोडिलें. | १४७ |
| १४ | त्रिदशवधूविरही जसा इलाप=उर्वशीच्या विरहानें पुरूरवा राजा जसा तसा. | १४८ |
| २१ | लंका उतरतांच शोक निववी (आणि) तो कपिराज तिच्या कलंका तुडवी=रामानें लंका उतरतांच सीतेचा शोक नाहींसा केला. आणि सुग्रीवानें लंकेला कलंकरूप जो रावण त्याला तुडविलें. | १४८ |
| २२ | कपिपतिसुत=वानरांचा राजा जो वाळी त्याचा पुत्र अंगद. | १४८ |
| ३२ | स्वतनयभिदुरीं=आपल्या मुलाचा भेद करणारा (मुलाला ठार मारणारा) जो लक्ष्मण त्याच्या वक्षःस्थळावर. | १४९ |
| २९ | वासवारि=रावण. | १४९ |
| ३७ | वेन उर्वशी यांचा संबंध कळत नाहीं. | १५० |
| ३९ | या दीनता न अवलोकिल तें करिं=याला ज्याच्या योगानें दैन्य वांकड्या नजरेनें पहाणार नाहीं असें करीं. | १५० |
| ४३ | शेवटचा चरण पुष्पिताग्रेचा दिसत नाहीं. | १५० |
| ४६ | पितृसख=भरद्वाज ऋषि. | १५१ |
| ४९ | काचा शात न वरी=कच्याला सुख मिळत नाहीं. | १५२ |
| ५२ | यम स्वनामयांतें वश न करी=स्वनामयांतें:–सु+अनामय अशांतें, नीरोग्यांतें. | १५२ |
| ९ | 'वंदी झाले ते मुनि जातां तम हर्षी' असा पाठ असावा. तम जातां ते मुनि हर्षी (आनंदी) झाले–असा अन्वयार्थ. | १५२ |
| १० | वार्ता वैरिजनीं केवळ थंडी झाली म्ह० वार्ता ऐकून शत्रूचे हातपाय गार पडले. | १५२ |
| २९ | जया (घटकर्णा) यम टाळा दे=ज्या घटकर्णापुढें उभें राहण्यास यमही टाळाटाळी करीत असे. | १५४ |
| ३१ | भेदी=भेद सांगणारा (बिभीषण). | १५४ |
| ४३ | स्वखगा=चकोराला. | १५४ |
| ४ | 'श्रितसुखा' हें विद्याकला याचें विशेषण. | १५६ |
| १३ | 'हिमशैलसुतापशीता' यांतील आप्+शीता यांचा समास चिंत्य आहे. | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | हिमशैलसुता+प+शीता असा समास करितां येईल परंतु समुद्राची शीतत्वाबद्दल प्रसिद्धि नाहीं. तशीच शंकराचीही नाहीं. | १५७ |
| १४ | मुनि=विश्वामित्र. | १५७ |
| १६ | 'क्षत्रापति' याबद्दल 'क्षत्राप्रति' असा पाठ असावा. | १५७ |
| २२ | आठवीला=स्मरला, आठवण केली. | १५८ |
| २७ | वृत्रारिचाहि सहाय 'हा' वरि (आणि) निधना वरी=इंद्राचा मित्र (दशरथ) हाय हाय म्हणून प्राण सोडिता झाला. | १५८ |
| २८ | अभीष्टफलसज्जनकां नगां=कल्पतरूला. | १५८ |
| ३२ | पर तो न वासा (आदरी)=त्यानें वस्त्रांचा स्वीकार केला नाहीं. वल्कलें घेतलीं. | १५९ |
| ३५ | भ्राता अगस्त्यमुनिचा=अगस्त्य ऋषीचा भाऊ. (त्याचें नांव इध्मवाह असें होतें). | १५९ |
| ८२ | (राम) स्वशत्रुमत सर्व मार्ग (मारुतीस) पुसोनि द्विट्तेज घेतें बळ घे=शत्रूचें तेज हरण करणारें सैन्य रामानें बरोबर घेतलें. | १६३ |
| ८६ | धृताहितदूत=धृत+अहित+दूत (धरलेले शत्रूचे दूत) शुक, व सारण हे रामाच्या सैन्याचा अंदाज काढण्याकरितां हेर म्हणून आले होते. | १६४ |
| ८८ | प्लवगेंद्र=सुग्रीव. | १६४ |
| ९२ | सामर=देवांसह. | १६४ |
| ९३ | माझी चापलता पवीतें लाज थायासि शर स्रवेल. खरचापल तापवितें, खरादि चतुर्दशसहस्र मेले; वाळी तोही (मेला). खरा शिवांसि दिवाळी घडेलचि.=माझें धनुष्य असे बाण सोडील कीं तें पाहून वज्रालाही लाज वाटेल. खरचापल (प्रखर मूर्खपण) त्रासदायक असतें. उत्तरार्ध–खरादि चौदाहजार राक्षस (मूर्खपणानें) मेले; तसाच वाळीही मेला. आणि आतांही हे मूर्ख रावणा तूं आप्तजनासह मरशील व रणांतील तुमच्या प्रेतांनीं कोल्ह्यांची चंगळ उडेल. | १६४ |
| १०५ | विभुसायक स्वबंधनाचें भय वारी=प्रभूच्या बाणानें आपलें बंधनाचें भय नाहींसें केलें. प्रभूच्या बाणानें आपणांस मुक्ति मिळाली म्हणूनच जणुं आनंदानें धडें नाचत होतीं काय? | १६५ |
| १२१ | 'दशास्यमहिपार्थं' याबद्दल 'दशास्यमथनार्थं' असें असावेंसें वाटतें. | १६७ |
| १२६ | भेरी=ब्रहिरी. | १६८ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १२८ | राम राजा संस्कारवी=रामानें रावणाची (बिभीषणाकडून) क्रिया करविली. | १६८ |
| १३६ | राजीवनेत्रदयिता तिस देवराजी वर्णी इ०=कमलनेत्र रामाची स्त्री जी सीता तिची देवसमुदायानें स्तुति केली. | १६९ |
| १४८ | प्रयागगततातसखा मुनीतें=भरद्वाजातें. | १७० |
| १५० | मुनीश्वर=भरद्वाज. | १७० |
| १५३ | पिता=जन्म देणारा बाप. | १७० |
| १५५ | सुधाकरकान्ति धारी करी=(रामानें) चंद्राची (आल्हाददायक) कान्ति (आपल्या सुखकर) रीतीनें हलकी कमी मानाची केली. | १७० |
| ३ | वृद्धभावांत=म्हातारपणीं. | १७१ |
| ५ | विद्या=बला आणि अतिबला या नांवाच्या विद्या. | १७२ |
| १२ | तया (परशुरामा) शांति, परि प्रभुसि जयश्री, माळा दे=त्या परशुरामास शांतीनें आणि श्रीरामचंद्रास जयश्रीनें माळ घातली. | १७३ |
| ३० | उपासी=उपासना करी, सेवा करी. | १७६ |
| ३२ | दशरथसुत लीलामानुष; ज्यांचे, चंद्रक्षीरधिस्वर्गजांचे गुरु (असें), यश स्वर्ग स्तवी=श्रीरामलक्ष्मणादि दशरथाचे पुत्र हे वस्तुतः विष्णुस्वरूप असून लीलेनें मनुष्य झाले होते. त्यांचें यश जें चंद्र क्षीरधि (क्षीरसागर) व स्वर्गज (ऐरावत) ह्यांनाही भव्यतेमुळें गुरुप्रमाणें वाटणारें असें होतें. त्याला स्वर्ग स्तवी. सारांश, दशरथाच्या पुत्रांचें यश चंद्र, क्षीरसागर व ऐरावत ह्यांच्या वर्णापेक्षांहि शुभ्रतर होतें. | १७६ |
| ४० | 'शतयज्ञ प्रेषिताल्पात्र' ह्याबद्दल 'शतयज्ञप्रेषितान्नाल्प' असें असावें. | १७७ |
| ५८ | वानरांच्या शक्रा=सुग्रीवास. | १८० |
| ६६ | सर्व=सर्व लोक, सर्व वानर. | १८१ |
| ७२ | शिरोधी=मान, गळा. | १८२ |
| ८१ | जगदसुसुतलीला जिष्णुची गाय; कांहीं उणी न. (ती) जैशी विष्णुची (लीला तैसी) गायकांहीं वरिली=जगताचा प्राण जो वायू त्याचा मुलगा जो मारुती त्याची लीला ही इंद्राची गाय म्ह० कामधेनुच होय. कामधेनूपेक्षां मारुतीची लीला इच्छित देण्यांत यत्किंचितही कमी नाहीं; म्हणून जशी श्रीविष्णूची लीला भक्त गातात तशीच याचीही गाऊं लागले. | १८४ |
| ८३ | मोही=मोह पाडी. | १८४ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ९२ | असी=अशी, वर सांगितल्या प्रकारची. | १८६ |
| ९६ | निष्कलंका=सोन्याची लंका. | १८७ |
| ९७ | घे वंदनातें=दशरथनृप हा 'घे' याचा कर्ता. | १८७ |
| ९८ | असुरवर=राक्षसश्रेष्ठ जो रावण हीच कोणी मद्यशाला (दारूचा पिठा). | १८७ |
| ९८ | भव्य कामागसा=इच्छित देणाऱ्या वृक्षासारखा म्ह० कल्पतरू-सारखा (भव्य). | १८७ |
| १०२ | सवांचे=यज्ञांचे (गुण धरिती म्ह० यज्ञाप्रमाणें फलद होतात). | १८८ |
| १ | सरोजजार्थित=सरोजज+अर्थित=ब्रह्मदेवानें स्तुति केलेला. | १८९ |
| ७ | वासरा=दिवसा. | १९० |
| ११ | पसा=ओंजळ. हाताचा पसा. पसा करी म्ह० हात जोडी. | १९१ |
| १३ | क्षमासुतार्चनें=सीतेच्या पूजेनें म्ह० सीतेला अलंकृत करून. | १९१ |
| २५ | नतापदा=नताचें शरणागताचें दुःख. वाल्यसु हरून क्षणांत राज्य दे; रामदृष्टिवृष्टि नतापदा पिटीच; (ती) तापदा (आपदा) उरों न दे-असा अन्वय. | १९४ |
| ३८ | देवकाल=देवान्तक या नांवाचा राक्षस. | १९६ |
| ४० | तांतड=जलदी, त्वरा, निकड. | १९८ |
| ५१ | अगस्त्य मंत्र दे (आणि) तज्जयें प्रसन्न (असा) सूर्य वर दे-असा अन्वय. | १९८ |
| ५२ | पडोनि (रावण) राहिल्यां म्हणे 'मला पहा; तमीं न रिघा. मी प्रजा-महारि अघें, मदें घात पावलों=रावण मरून पडला तो उरलेल्या राक्षसांस जणूं काय असें म्हणाला कीं, 'माझी स्थिति पाहून इतउत्तर पापांत शिरूं नका. प्रजाजनांना कट्टा शत्रु जो मी तो पापानें आणि उन्मत्तपणानें (गर्वानें) नाश पावलों. | १९८ |
| ६१ | ज्या (नद्या) यशा सांगती 'स्वराद्यनित्य सद्म न द्या'=ज्या नद्या आपल्या यशाला असें म्हणतात कीं भक्तांना स्वर्गासारखीं अशाश्वत स्थानें देऊं नका. अर्थात् शाश्वत मोक्ष द्या. | २०० |
| ६३ | ह्या श्लोकांतील शेवटच्या दोन चरणांत यतिभंग झाला आहे. असाच ह्या रामायणांत क्वचित् इतरत्रही आढळतो. | २०० |
| ८० | तयांत नाद, रीति आदरी (म्ह०) दरी शून्य पडून 'हा' बोलिल्या-असा अन्वय. | २०३ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ९१ | देवकें=लग्नांत देवक म्हणून जें ठेवतात तें (त्यानें). | २०५ |
| ३२ | तो (कबंध) सुविमान वरूनि 'रविसुता सुकंठा सखा करी (तो) कार्य करिल' हें कथुनि खा लंघून जाय=रामानें कबंधास गति दिल्यावर कबंध उत्तम विमानांत बसला आणि रामास 'सूर्यपुत्र सुग्रीव याशीं मैत्री कर; तो तुझें सीताशोधाचें काम करील' असें सांगून आकाश लंघून गेला. | |
| ६ | दिलीपा तीं वनें नंदनापरिस हितें गमति=दिलीप (रामाचा पूर्वज) हा स्वर्गात असल्यामुळें जरी नंदनवनाचें सौख्य भोगीत होता तरी त्याला श्रीरामचंद्र ज्या वनांतून फिरत होता तीं वनें त्या नंदनवनापेक्षांही अधिक सुखकारक वाटलीं. | २१२ |
| ३३ | विरहीं प्रभुमनास पंपा असह्य गमे-असा अन्वय. | २१२ |
| ३९ | संपाति 'जी निज असूंसि संपा म्हणे तिर्ते सागरा उडुनि पहा' (अशी) प्रवृत्ति कथि. तें मरण वारि.=ज्या वेळेस अंगदादि वानर आपली नेमून दिलेली वेळ संपली म्हणून मोठ्या विवंचनेंत पडले त्या वेळेस संपाति गृध्रानें 'सीता लंकेंत आहे' असें सांगितलें-ती कथा येथें लक्ष्य आहे. जी सीता आपल्या प्राणांस 'बाबांनो ! आतां निघून जा' असें विनवीत आहे तिला 'समुद्र उल्लंघन करून पहा' असें वृत्त संपातीनें (अंगदादिकांस) सांगितलें आणि त्यांचें मरण टाळलें. | २१३ |
| ५० | जयें करूनि=विजयाच्या योगानें. | २१५ |
| ६१ | तत्वमितयाम=चोवीस प्रहर. लक्ष्मण आणि मेघनाद यांचें युद्ध तीन अहोरात्र झालें. | २१७ |
| ६१ | वारणें श्रवणवारणें न अनुष्ठिलें=ऐरावतानें कान हलविल्याचें कर्म देखील केलें नाहीं. हत्तीची सहज कान हलविण्याची नेहमींची क्रियाही बंद पडली. | २१७ |
| ७० | ते गंधर्व सुरर्षिसह तें महित पर्व गाती-असा अन्वय. | २१८ |
| ७१ | तया अया हा प्रभु परिस. या अया का न गाती ?=त्या (रावणरूप) लोखंडाला हा रामप्रभु परिस होय. या त्याच्या शुभावह कृत्याला लोक कां गाणार नाहींत ? | २१९ |
| ८ | ती कीर्ति संसारभीता बहु निववि-असा अन्वय करावा. | २२२ |
| ११ | भूरिभागें=मोठें आहे भाग्य ज्याचें अशा (भरताच्या) मातुलें (युधाजितें). | २२३ |
| ११ | कामदासी=इच्छित देणाऱ्या दशरथास. | २२३ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १९ | स्थापी ज्ञाता गुहशव इ०. यांत 'गुह' हा शब्द चुकून पडलेला दिसतो. त्या ठिकाणीं 'गुरु' असें पाहिजे. कारण गुरु म्ह० वशिष्ठांनीं दशरथाचें शव भरत येईपर्यंत तेलाच्या द्रोणींत ठेवावयास सांगितलें होतें. | २२४ |
| २१ | साधुरीती=म्ह० कौसल्येचें सद्वर्तन (भरता निववी). | २२५ |
| २३ | तो भरत देव परतायासि प्रेमें राडा घाली. (कारण) प्रेमार्द्रांचा तिलहि रुसवा तो देवराडा श्री न=भरतानें श्रीरामचंद्रास परत (अयोध्येस) नेण्याकरितां मोठ्या प्रेमानें हट्ट घेतला. कारण त्याला ठाऊक होतें कीं देवराट् (देवांचा राजा) जो रामचंद्र त्याला प्रेमळ भक्तांचा यत्किंचित्‌ही रुसवा श्री म्ह० शोभा किंवा आनंददायक होत नाहीं. | २२५ |
| २६ | सीतादयित (राम) घटजा, गृध्रजा इ० वंदी—असा पदच्छेद. | २२६ |
| ४७ | (राम) मित्रा (सुग्रीवा) सांगे. महाबाहु (सुग्रीव) विभय (होत्साता) त्या (वाळीला) समरा (युद्धास) बाहे (बोलावी). | २३१ |
| ५३ | वातात्मजाला (मारुतीला) ऋक्षेशस्तव (जांबुवंतानें केलेलें स्तवन) तव महोत्साह दे. | २३२ |
| ५६ | देवदारोप्रकारा=देवांच्या स्त्रिया ज्यामध्यें कोंडून ठेविल्या होत्या तें कारागृह. | २३३ |
| ६२ | चकितस्वान्त=मनामध्यें चकित झालेले. | २३४ |
| ६७ | शोभासुमति हरित्या लोभा सुज्ञ चित्तीं न वाहे—असा अन्वय. | २३५ |
| ६८ | सोडी मारू इ०. चरण नीट लागत नाहीं. | ३३५ |
| ८१ | कीशेंद्राचा सुत=वालीचा मुलगा अंगद. | २३७ |
| ९२ | रात्रीं तो ससरमाजानिवातभू उल्काधर (असा) तें बळ पाहे (आणि) समवनाकारणें भूतें हात जोडी=रात्रीं बिभीषण आणि मारुति हातांत मशाली घेऊन सैन्यांत फिरले, त्यांनीं मूर्च्छित वीरांचें संरक्षण करण्याकरितां भूमीची प्रार्थना केली. उल्काधर=दिवट्या हातांत घेतलेले असे. | २३९ |
| १०५ | कीं तो त्यांचा (देवांचा) ओघ रावणीशर विखरतां नाचे—असा अन्वय. | २४१ |
| १०६ | पविभृदरिच्या=रावणाच्या. | २४१ |
| ११७ | शेवटचा चरण नीट लागत नाहीं. | २४३ |
| १२ | भुज=हात; बाहु. | २४६ |
| १९ | मला न; तिला पहा=माझ्याकडे माझ्या त्रासाकडे पाहूं नकोस तर तिला सीतेला पहा, शोध. | २४७ |
| २५ | कपि बळें मेघध्वाना सांपडे=मारुति मुद्दाम इंद्रजितास सांपडला. | २४८ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ४६ | रविहि वर दे, आणि राम वक्षोभेदें दशकंधरा वधि=सूर्यानेंही वर दिला तेव्हां श्रीरामानें रावणाचा उरांत बाण मारून वध केला. | २५१ |
| ५८ | सभापदका=सभेला भूषणभूत (अशा रामा). | २५३ |
| ६५ | शोभासुधानदि सेतुला प्रेक्षीं-असा अन्वय. सौंदर्यरूपी अमृताची नदी (सीता). हें संबोधन आहे. | २५४ |
| ६८ | तरि=तथापि. (नौका नव्हे.) | २५५ |
| ६९ | रामे ! वामे !=हे सुंदर स्त्रिये ! वामा (सुंदर) रामा (स्त्री). | २५५ |
| ७६ | समाधिजही=समाधीपासून उत्पन्न झालेलें (सुख) सुद्धां. | २५६ |
| १७ | घेणमणी=गडबडे. | २६० |
| २० | धनदविमान=कुबेराचें पुष्पक विमान. (बिभीषणानें दिलें.) | २६० |
| ९ | देवसिंधु=भागीरथी नदी. | २६२ |
| २१ | वाखर=खुरपें. | २६४ |
| २८ | हानि घडावया, तो खळ बळेंचि महासतीस घे-असा अन्वय. | २६६ |
| ३७ | नगपाहुनी=पर्वतश्रेष्ठापेक्षां, मैनाकपर्वतापेक्षां. | २६७ |
| ४२ | चुलत्यासि=मारुतीचा चुलता जो अग्नि त्यास. | २६८ |
| ६१ | अतिकाय, देवान्तक, नरान्तक हीं विशेषनामें आहेत. | २७१ |
| ६८ | हा मह खळीं डाजला म्ह० खळांस आवडला नाहीं, झोंबला म्हणून. नाहींतर आजला एकही खळ राहिला नसता. रामयश गोड न लागल्यामुळेंच जगांत खळ राहिले आहेत-असें तात्पर्य. | २७२ |
| ६९ | राम हा चंद्र, सन्मुनि हे चकोर त्यांना तो रामचंद्र सुखदायक झाला. कल्पतरूची स्तुति करून काय उपयोग? प्रभूच्या अयें क (यम) द्रुत जाय म्ह० रामाच्या भाग्यानें मृत्यूचीही पीडा टळते. कल्पतरूच्या स्तुतीनें ती टळत नाहीं. | २७२ |
| ७१ | दिव्यकरीस (चि) न (परि) पयोधिसही ती (सीता) स्वयशीं लोपवी-असा अन्वय. | २७३ |
| ८३ | हे दयानळसे ! मी सिंधुला भव या नळसेतुला हे महापथ वेद आणि तुला, जी न कथवे (ती), मुक्ति म्हणतों.=हे दया करण्याविषयीं अनळस (तत्पर) अशा सीते ! मी (राम) ह्या समुद्राला संसार नळानें बांधलेल्या त्यावरील सेतूला महापथ वेद आणि तुला अनिर्वचनीय अशी प्रत्यक्ष मुक्तिच असें म्हणतों. ज्याप्रमाणें संसारसमुद्रांत बुडणारा वेदरूपी सेतूंच्या | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | आधारानें तो सागर तरून जाऊन मुक्ति मिळवितो, तद्वत् मी तुला पावलों–असा भावार्थ. | २७४ |
| ९७ | पुरपामराहि नराहुनी=अयोध्येंतील गरीब लोकांहूनही (जिष्णुचें भाग्य अधिक न). | २७६ |
| ९ | जन्मेज्या इ०. रामायणांत प्रत्येक श्लोकांत प्रथम चरणांत 'श्रीराम' दुसऱ्यांत 'जय राम' तिसऱ्यांत 'जय जय' आणि चवथ्यांत 'राम' अशी अक्षरयोजना करून त्रयोदशाक्षरी मंत्र बांधला आहे; म्हणून 'जन्मेज्या' यांतील आद्याक्षर 'ज' हें मंत्रांतील गणिलें पाहिजे. वरच्या चरणांतील 'जसी' यांतील 'ज' मंत्राचा समजतां येत नाहीं. | २७९ |
| १ | कौसल्याज यतीड्य=कौसल्येपासून जन्म पावलेला आणि यतींनीं पूजित असा. | २८१ |
| ६ | तो राजक्षयजन्मदानयमहादुःखें=तो भरत राजक्षय म्ह० दशरथाचा मृत्यु आणि जन्मदानय म्ह० जन्म देणाऱ्या कैकेयीचा अनय म्ह० अविचार यांच्या महादुःखानें. | २८२ |
| १३ | तिसरा चरण नीट लागत नाहीं. | २८५ |
| १० | विप्रसा=अगस्त्यऋषीसारखा. | २८५ |
| १३ | नमनीं मला धूता, भू तारिता, द्रुहिणसूता यशांत लपवि म्ह० नमन केलें असतां पाप नाहींसें करणारा (धुऊन टाकणारा) पृथ्वीचें रक्षण करणारा, द्रुहिणसूता म्ह० ब्रह्मदेवाचा विमानवाहक हंस जो त्याला यशांत लपवी. | २८९ |
| ११ | ताडी=ताडण करी. (जटायूस मारी). | २९१ |
| १२ | सांगे=लक्ष्मणानें सांगितलें. | २९२ |
| २६ | निशाकर नांवाच्या मुनीनें सांगितलेलें वृत्त संपातीनें वानरांस सांगितलें. आणि सूर्याच्या तेजानें दग्ध झालेले आपले पंख पुन्हा आले असें दाखविण्याकरितां तो आकाशांत उडाला आणि अशा रीतीनें निशाकर सन्मुनिवाक्याचा प्रत्यय देऊन त्यानें वानरांस हर्षित केलें. | ३०० |
| ३१ | शासनलंघन=सुग्रीवानें आपल्या आवडत्या मधुवनांत आज्ञेवांचून कोणी जाऊं नये असा निर्बंध केला होता व त्याप्रमाणें सर्व वानर चालतही असत. परंतु सीतेचा शोध लावून आल्यामुळें शेफारून गेलेले मारुति वगैरे वानर ती आज्ञा मोडून तेथील दधिवक्र नांवाच्या रक्षकास मार देऊन बेलाशक मधुवनांत घुसले आणि तेथील मधावर त्यांनीं यथेच्छ | |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| | हात मारला. तेव्हां दधिवक्र फिर्याद घेऊन सुग्रीवाकडे गेला. तेव्हां सुग्रीवानें असें ताडलें कीं, ज्याअर्थीं आपल्या आज्ञेचें जाणून बुजून प्रसिद्धपणें उल्लंघन केलें आहे त्याअर्थीं वानरांनीं सीतेचा शोध खचित लाविला असावा. | ३०१ |
| ५६ | प्रभुबंधु सख्याप्रति=लक्ष्मण बिभीषण यास मागें घालून आपण पुढें झाला. | ३०४ |
| १०५ | तिसरा चरण नीट लागत नाहीं. | ३१२ |
| १०[illegible] | शमिलेखर्षभ=शमि+लेख+ऋषभ=योगींद्र (लेखर्षभ=इंद्र). | ३१९ |
| २४ | शक्रसभाजनांतें=इंद्राच्या सभेंतील जे त्यांस (देवांस). | ३२० |
| २४ | मुनि काय होमी, (आणि) विमानीं बसे–असा अन्वयार्थ. | ३२० |
| ३९ | योषाऽसुरी=स्त्रीरूप घेतलेली राक्षसी. (असाही पाठ असूं शकेल.) | ३२२ |
| ४६ | उत्तरार्ध नीट लागत नाहीं. | ३२३ |
| ५७ | तापते ऐकतां आर्तें 'हा' केला कान. रक्षण । करितां टाळितां साधु हाकेला कां नर क्षण ? ॥ आर्तें 'हा' केला ऐकतां कान तापते; रक्षण करितां साधु नर हांकेला क्षण टाकितां कां ?–असा अन्वय. आर्तानें पीडितानें 'हा' हाय हाय असा विलाप केलेला ऐकून कोणाचेंही कान तापलें असते. रक्षण करण्याची जर तुमची सद्बुद्धि असती तर तुम्हीं हांकेला धावून जाण्यास क्षणाचा तरी विलंब लावला असता काय ? परंतु ज्याअर्थीं तुम्ही विलंब लावतां त्याअर्थीं तुमची रक्षण करण्याची बुद्धि नाहीं. हें सीतेचें भाषण. | ३२४ |
| १२६ | अघ (पाप) त्या कुबुद्धिस (रावणास) म्हणे असावध (बेफाम) हो आणि मातें (माज) म्हणून मातें (म्हणजे सीतेस) असा वध प्राप्त होय इ०. | ३३१ |
| १३३ | वाहिलें=वाहून नेलें. | ३३२ |
| १३७ | स्वर्वाद्यनाद=देवांनीं स्वर्गांत वाजविलेल्या वाद्यांचा ध्वनि. | ३३३ |
| १४५ | सुरुचिराकारा=सु+रुचिर+आकार=जिचा आकार (ठेवण) सुंदर आहे अशी, तूं सुरुचिराकारा या गुणें तुतें तें यातु (तो राक्षस) हरी. | ३३३ |
| १४६ | परी निंदक यशा विटाळाया जपती–असा अन्वय. | ३३३ |
| १५० | कै=कित्येक, कांहीं. | ३३४ |
| १५२ | कविसभाश्रीसंपदे (सीते !) जें पतिभक्तिसद्व्रत सतीसर्वस्व तत्सेवनें भर्ता संकटीं तारुनि (त्वां) विश्वोपद्रव वारिला; या तव तपें देवारिला कंप जाहला–असा अन्वय. | ३३४ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १६० | बद्धकर (बिभीषण) स्वामीस बसाया पुष्पक दे. हे प्रभु (राम) त्या (पुष्पक देणाऱ्या) बिभीषणाला आणि सुग्रीवालाही 'या (आंत तुम्हीही) बसा' असें म्हणती–असा अन्वयार्थ. | ३३५ |
| १६२ | हृदयहरहासे !=मनोहर आहे हास्य जिचें असे हे सीते ! | ३३५ |
| १६६ | चवथा चरण नीट लागत नाहीं. | ३३६ |
| १७६ | (पूर्वी) जें अभय अर्पिलें (म्हणजे जो अवधि सांगितला होता तो) भरतां (सरल्यानें) नाथ (राम) भरतातें दुसरें अभय देती. | ३३७ |
| १७८ | विषया=देशास, अयोध्येस. | ३३७ |
| १८२ | मुदितधीकपी नाकीं (देव वाटले) ते महावरद (भरद्वाजऋषि) पिनाकी (शंकर असे) कां न वाटावे? | ३३७ |
| १८५ | भगिनी हो ! या सासुबाईचें पुण्य तें अगाध ! (म्हणून) रणीं जय आला. हे धरणी शत्रुभयें (स्वतां) कांपुनि अगा (पर्वतासही) कांपवी–असा अन्वयार्थ. | ३३७ |
| २२ | आपवा ! तें=वसिष्ठा ! तें दुःख इ०. | ३४० |
| ५२ | तें पर्वतें शृंग न सत्य शिवें आशीर्वच दिलें=(पंत म्हणतात) तें कैलासपर्वतानें आपलें शिखर दिलें असें नव्हे तर तें शंकरांनीं आशीर्वचनच दिलें. | ३४५ |
| ५७ | या गीतींतील यमक 'होमाया' असें असावेंसें वाटतें. तसें घेतल्यास खालच्या चरणाचा अन्वयः—धीर (बिभीषण) 'हा' न म्हणों देचि (आणि) (होमा इंद्रजित करित असलेल्या होमास) या असें सांगे असा होईल. | ३४५ |
| ६१ | प्रेमें द्रवुनि राम वदे ततनया शिवदेवा ! वाततनया ! प्रथम शिव दे; परा भक्ता पश्चात् (शिव दे)–असा अन्वय. | ३४६ |
| ६२ | दूरसा=दुर्+रसा=वाईट रसास (हें विषयाचें विशेषण. र् पुढें र आल्यामुळें र् चा लोप होऊन मागील उकारास दीर्घत्व आलें आहे.) | ३४६ |
| ७४ | अश्रुतें=अज्ञानानें. | ३४८ |
| ७६ | परमाग=कल्पतरू. | ३४८ |
| ९२ | रागेजे=रागावला. | ३५१ |
| २ | भृंगापशुतं= | ३५४ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ११ | अयोमुखी=राक्षसीविशेष. ही लक्ष्मणास मोहून वश करण्याकरितां आली होती. | ३५५ |
| १२ | श्रीनिशाकृत्समभिधमुनीच्या=निशाकर नांवाच्या ऋषीच्या. | ३५८ |
| १२ | दाहव्यथेतें हरि (आणि) आज्ञा करी—असा अन्वय. | ३५८ |
| ८ | ऋक्षेशस्तुत=जांबुवानानें स्तुति केलेला (मरुत्पुत्र). | ३६२ |
| १० | धरा=पर्वताला. | ३६२ |
| १० | राजद्वय=बिभीषण व सुग्रीव. | ३६५ |
| १२ | जे सरयूकीट त्या पर्वी गतिखनि पावले तेही धन्य!—असा अन्वय. गतिखनि=मोक्षाची खाण. | ३६५ |
| १३ | जों नाम (तों) प्रणतसमवना भक्त ठेवी=जोंपर्यंत आपलें राम हें नाम पृथ्वीवर राहील तोंपर्यंत भक्त (मारुती) त्यास शरणागतांचें रक्षण करण्याकरितां मृत्युलोकीं (राम) ठेवी (आणि आपण) 'वैकुंठलोका जाय.' | ३६५ |
| ७ | रवा=प्रघात, रीति. | ३६७ |
| १४ | जटायू=अरुण आणि गरुड हे कश्यपाचे मुलगे. पैकीं अरुणास संपाती आणि जटायू हे दोन पुत्र झाले. म्हणून अरुण आणि संपाति व जटायू यांचें पितापुत्राचें नातें आहे. | ३७७ |
| १५ | लक्ष्मणा(ला) 'वर जा' असें राम म्हणाला. योगी ज्ञानिवर हें लक्ष्मणाचें विशेषण. | ३७७ |
| १६ | प्रत्न=जुनें. सीतेपुढें पूर्वींचीं जुनीं स्त्रीरत्नें तुच्छ आहेत असें शूर्पणखा रावणास बोलली. | ३७७ |
| १८ | याया धीर=तीस (सीतेस) तिचा दीर लक्ष्मण धीर याया तत्व सांगे. | ३७८ |
| १८ | विभावसून=सूर्याहून कमी (विभावसु+ऊन). | ३७९ |
| २२ | अयोमुखीनासात्तन=अयोमुखी ही शूर्पनखेप्रमाणेंच एक राक्षसी रामलक्ष्मणांवर मोहित होऊन आलेली होती. | ३८० |
| २२ | हास्यें=अयोमुखीच्या विटंबनानें उत्पन्न होणारीं हास्यें. | ३८० |
| २३ | ती परमाग मानी. परमाग=मोठा अपराध. आपल्यामुळें प्रभूचा शोक वाढला हा आपला मोठा अपराध झाला असें पंपेस वाटलें. | ३८० |
| २५ | त्रास=भीति. | ३८१ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| २७ | वांचाया वळें=तुला वांचण्याची इच्छा असेल तर मी सांगतों त्यास अनुसर असें मारुतीनें रावणास सांगितलें. | ३८१ |
| २८ | खेटोन=खेट+ऊन=ग्रहापेक्षां कमी. | ३८२ |
| ३२ | हर्ष बरा भव या शब्दांचा अर्थ समाधानकारक लागत नाहीं. | ३८५ |
| ३४ | तो स्वयें करी रण=तो म्ह० रावण. | ३८५ |
| ३५ | भंगे, बळीं जयलेश न पाहे, बलेश धरी. देश मिळतां चावर बिघे किमर्थ घ्यावे ?–असा अन्वय. कुंभकर्ण पराभूत झाला आणि त्यानें सैन्य-मर्दनांत आपल्यास मोठासा जय नाहीं असें समजून वानर सेनापती जो सुग्रीव त्याला धरिलें. अर्थात् सबंध देश मिळत असतां चावर बिघे तो कशास घेईल. मुख्य सेनापति सांपडल्यावर तो इतर वानराकडे कशास बघील ?–असा अर्थ. | ३८६ |
| ३७ | अमर्त्यव्याळांचे धूर=देवरूपी सर्पांस सैरावैरा पळविणारे धूरच असे. धुरीनें सर्प वगैरे पळतात असा अनुभव आहे. | ३८६ |
| ४२ | महाबळ पळमात्रें ओषध्यगशृंग आणि. तो (लक्ष्मण) उठोनी खळरक्षो-राजमारणीं (दुष्ट रावणाच्या वधाकरितां) सजे–असा अन्वयार्थ. | ३८८ |
| ४४ | भ्रमे मंत्रें इ०=भ्रमे या क्रियेचा कर्ता 'रावण.' काढी या क्रियेचा कर्ता 'सूत' (अध्याहृत). प्रभूत क्रोधें हें रावणाचें विशेषण. आरंभीं जें राहिलें म्ह० जें युद्ध रावणास मूर्च्छा आल्यामुळें थांबलें होतें तें रावणानें (सावध होतांच) आरंभिलें. | ३८९ |
| ४५ | (शेवटल्या ओळींतील) 'म्हणतां' याच्याबद्दल म्हणतां ('रामा बाण सोड इ० म्हणणारा रावण) असा पाठ प्रशस्त वाटतो. | ३८९ |
| ५५ | याचकातें याचिलें ह्यांत 'याचिलें' बद्दल 'पाचिलें' असा पाठ प्रशस्त वाटतो. | ३९३ |
| ५८ | आशीर्वाद शतमान=शेंकडों आशीर्वाद. | ३९४ |
| ६४ | उदार+गणा=जिचा परिवार मोठा आहे अशी तारा. | ३९६ |
| ६५ | हूक=उसण. | ३९६ |
| ६५ | सुग्रीवमंत्रें=सुग्रीवानें घातलेल्या मंत्रानें किंवा सुग्रीवरूपी मंत्रानें. उसण किंवा कण मंत्रानें नाहींशी होते असा जनसमज आहे. | ३९६ |
| ६६ | शुभा यशें ह्या ठिकाणीं शुभाशयें म्ह० चांगला आहे आशय असा (हेतु) जीचा असे सीते ! असें पाहिजे. | ३९७ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| ६१ | पूर यापुढें दुजें येथें 'दुजें'च्या ऐवजीं बुजे असें असावेंसें वाटतें. | ३९८ |
| ७० | 'नय+धर्मज्ञेशप्रभुः अयं एवं भाग्यवान्' इति, नीति आणि धर्म जाणणारांमध्यें श्रेष्ठ असा हा प्रभु रामचंद्र असा भाग्यवान् आहे असें म्हणती इ०. | ३९९ |
| ७२ | दयाघना आठवी. ह्यांत 'आठवी'च्या ऐवजीं 'सांठवी' असें असावें. | ४०० |
| ७२ | पाठवी=स्तोत्रपाठ गाऊं लागला. | ४०० |
| ७३ | द्दष्ट कराया, बळें=बळें=सैन्यें. | ४०० |
| ७४ | करितां पसा=ओंजळ करून हात जोडून (प्रार्थून). | ४०० |
| ७८ | मेल्या दावितें स्वदेश=मेल्यावर स्वदेश दावितें. मेल्याशिवाय अमृत स्वर्ग दाखवीत नाहीं. रामयश जीवंतपणींच स्वर्ग दाखवितें. ह्या ठिकाणीं रामयशाचें अमृताहूनही श्रेष्ठत्व वर्णिलें आहे. | ४०३ |
| ८२ | धणी=जोड. | ४०४ |
| ८३ | तत्तदसत्कर्म=(मुनिभक्षण) रंभाधर्षण इ०. | ४०५ |
| ८५ | यक्षेश सोम+राहु=कुबेररूपी चंद्रास केवळ राहूच असा रावण. | ४०६ |
| ९१ | वीरलोक=युद्धांत सन्मुख मरण पावल्यानें वीरांस जी गति मिळते ती. | ४०९ |
| ९५ | मांड=मेळा, जमाव. | ४११ |
| ९६ | धणी=इच्छा. | ४१२ |
| १०३ | म्हणे 'यशें माते! साज' इ०=यांत 'म्हणे' याचा कर्ता 'राम' होऊं शकत नाहीं. कारण हें सर्व भाषण अगस्त्यऋषी रामास सांगत आहे. 'म्हणे' याचा कर्ता 'मारुति.' माते! 'यशें साज' असें शत्रू लया नेऊन मारुति म्हणे-असा अन्वयार्थ. | १०५ |
| १०४ | पोंवित जाय=पोंचवीत जाय. | ४१५ |
| १०५ | त्यांच्या सदा=त्यांच्या सभेला. | ४१६ |
| १०६ | पूजिले गणेशस्कंद इ०=जैसे जगल्लताकंदरूपें छंदउदन्वन्मुखें हरें गणेशस्कंद (तैसे) पूजिले-असा अन्वय. जगद्रूपवल्लीचा जो केवळ कंदच (मूळ हेतु) व ज्याच्या मुखामधें वेदरूपी समुद्र आहेत (समुद्राप्रमाणें अगाध वेद ज्याच्या मुखांतून आले) त्या शिवानें स्वगुणांनीं म्हणजे आपले गुण अर्पण करून जशी गणपति व कार्तिकेय या दोघांची पूजा केली तशी रामानें आपले अलंकार लेववून मारुति व अंगद यांची केली-असा अर्थ. | ४१६ |

| पद्यांक. | पद्याचा अर्थ. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १११ | सर्व सत्व=प्राणिमात्र (येथें 'सत्व'शब्द नपुंसकलिंगी आहे). | ४१८ |
| ११४ | लंड=आडदांड, उन्मत्त, दांडगा. | ४१९ |
| १२१ | नंदनांसमान=रामलक्ष्मण भरतशत्रुघ्न या चौघां पुत्रांसारखा. | ४२३ |
| १२२ | बोले विप्ररूपी काळ इ०=विप्ररूपी काळ बोले 'जों काळ तुजशीं मंत्र तों (काळ) जो बाळ प्रवेशेल तो मारावा'-असा अन्वय. जों बाळ असा शब्द घेतां येत नाहीं. | ४२३ |
| १२३ | रामचित्तीं म्हणे 'हाय! पण त्याज्य नव्हे, हा न मातला, वधूं काय?'-असा अन्वय. | ४२४ |

# *मोरोपंतकृत रामायणें–भाग ५–यांतील शुद्धाशुद्धाचें परिशिष्ट.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८ | १९ | बापाला | मोठ्या |
| १३ | १ | हा | 'हा!' |
| ,, | १३ | प्राकृतस्त्री सारखी | प्राकृतस्त्रीसारखी. |
| ,, | २१ | लक्ष्मणास | शत्रूस |
| १४ | ९ | देखतां | देखता |
| २६ | ३ | अमृताधिकगोडवीक्षण | अमृताधिक गोड वीक्षण |
| २७ | १ | ताप! न देविला पहा | ताप न, देविला पहा |
| ,, | २८ | रणरूप सभामंडपामध्यें इ०. | रणरूप रंगभूमीवरील जे महानट त्यांच्या अयुतें म्हणजे दशसहस्रानें. |
| २९ | ८ | परते परतेजहारवी | परते पर तेज हारवी. |
| ३० | ६ | अरिची करुं हानि रोप हा म्हणवूं | अरिची करुं हानि रोप 'हा!' म्हणवू |
| ३२ | ५ | चिरधी भेसि न हात पेंव दे | चिर धी भेसि न हात पेंव दे. |
| ,, | २८ | भेसि (भयास) | भेसि (प्रभावास, तेजास.) |
| ३५ | १ | कथि शत्रूंत सुकीर्ति हो! धसा | कथि 'शत्रूंत सुकीर्ति हो! धसा' |
| ,, | १७ | मोठी | शिरा |
| ३७ | १ | सदां रमा नवें | सदा रमा नवे |
| ३८ | १ | जें | जे |
| ४० | ४ | धरितां | धरिता. |
| ४२ | ४ | गतिपूज्य | गति पूज्य |
| ४५ | २ | यशगाय | यश गाय |
| ,, | ६ | पूज्य | पूज |
| ,, | ,, | भूजां | भूजा |
| ४८ | ४ | घटजादिमहीसुरां श्रमातें | घटजादिमहीसुराश्रमातें |

* टीप—हें परिशिष्ट यावल येथील रा० सा० नागनाथ केशव गोडबोले आणि मुंबईतील आमचे दोन सन्मान्य मित्र यांनीं तयार केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहोंत.

काव्यसंग्रहकार.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४९ | ५ | शंभु हासगौर | शंभुहासगौर. |
| ५२ | २ | कथि हा गुण, भव्य साद देती सुर, सादास सदा इ० | कथि हा गुण भव्य, साद देती सुर सादास सदा; |
| ५३ | १ | परमा राम दयाप्रभाव | परमारामदया प्रभाव |
| ,, | ६ | कामदेवदेवा. | कामदेव देहा |
| ५५ | १ | सदयागायन | सद यागा यम |
| ५७ | ३ | हा ! | हा |
| ५८ | २० | मनोभंगाला | मरणास |
| ५९ | ९ | वंदी | बंदी. |
| ६० | ४ | लंवडूनि | लवंडून |
| ,, | ६ | प्रियतोकरीती | प्रिय तोक रीति |
| ६६ | ३ | रक्षूनि चिंतूनि शरीर मेला | रक्षूनची, तो न शरीर मेला |
| ६८ | २ | म्हणे | म्हणें |
| ,, | १५ | 'स्थानी घडो मृत्यु म्हणे तुला या' | 'स्थानीं घडो मृत्यु' म्हणे 'तुला या' |
| ६९ | १० | 'बा! पावला स्पर्शुनि' | 'बा! पावला.' स्पर्शुनि |
| ७० | ५ | द्वेषि बळप्रभावें | द्वेषिबळ प्रभावें |
| ७१ | ३ | पूतभावा | पूत भावा |
| ,, | ११ | स्वासुपकारभारी | स्वासुप कारभारी. |
| ७२ | ७ | परि पूर्वभूतें | परिपूर्व भूतें |
| ,, | १२ | नति निष्कलंका | न ति निष्कलंका |
| ७४ | १७ | सुतातें | सुतांतें |
| ७७ | ६ | पीना | पी ना. |
| ७९ | १ | प्रभुवचा | प्रभु वचा |
| ,, | ८ | भार्गवा घसा | भार्गवा, घसा |
| ८० | ६ | मातुलपुरा | मातुल पुरा |
| ८२ | १ | बोलिली न अनघा 'बरें' नती, घे | बोलली न अनघा 'बरें' नती घे. |
| ,, | ९ | त्या सुशांतिस मवा दटावि ती. | त्या सुशांतिस, भवा दटाविती. |
| ८३ | ४ | भरद्वाजि | भरद्वाज |
| ८५ | ८ | कथि धौत मी नद्या, स्वर्ग यांसि | कथि.'धौत मीन द्या स्वर्ग यांसिं' |
| ८६ | ४ | युवतिरत्नसानुजा (?) | युवतिरत्न सानुजा. |
| ,, | ९ | ईशशक्तिचरितार्थ | ईशशक्ति चरितार्थ |
| ८७ | ६ | 'रहा, रे!' म्हणे 'करि अधर्म येर हा.' | 'रहा रे' म्हणे. करि अधर्म येर हा. |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८७ | १७ | क्षतअसावधान | क्षत असावधान |
| ८८ | ७ | बुधाहिता | बुधा हिता. |
| ,, | १४ | ज्या खळें हरुनी दार वाळिला, बंधु, | ज्या खळे हरुनि दार, वाळिला बंधु, |
| ८९ | ९।१० | 'काळसा खळबळीं शिरो पती.' बोलिला मुख 'न दोन मा-सखा,' येउं सत्वर वदो 'न मास खा' | "काळसा खळबळीं शिरो पती बोलिला मुख 'न दोन मास खा' येउं सत्वर. वदो न "मा" सखा" |
| ९० | ३ | महासतीव्रतें | महासती व्रतें |
| ९१ | ५ | आँर्य साधिता | आर्य साधिंता |
| ,, | ७ | 'अघा तरे, नीतिनें हित, | अघा तरें नीतिनें; हित |
| ,, | १५ | कातरें.' | कातरें ?' |
| ९२ | १ | त्या म्हणे, 'नमिन मी नरा महा-राजभक्ष मृग मी, न राम हा, । | त्या म्हणे, 'नमिं न मी नरा महा–राज भक्ष्य मृग मीन राम हा. । |
| ,, | २ | देववे दया | देववे. दया |
| ,, | ८ | 'उशीं रहा | उशी 'रहा |
| ,, | १० | नीळवारिरुहहार | नीळ वारिरुह |
| ९३ | १५ | स्वअसु | स्व असु |
| ९४ | ९ | 'सोडुं वालिशतशासनक्षमा ? रे सुबालिश ! तशास न क्षमा. | सोडु वालिशतशासनक्षमा रे सुबा-लिश तशास न क्षमा. |
| ,, | १० | बोल पावुनि न खेद ? हा ! शिरें, न्हींत न त्यज सखे दहा शिरें. | बोल पावुनि न खेद 'हा' शिरें न्हींत न त्यज सखे ! दहा शिरें. |
| ९५ | ५ | छद्म गर्व न असे अ–सामया. | छद्मगर्व न असे असा मया |
| ९७ | १० | परस्पर बळौघ | परस्परबलौंघ. |
| ,, | १२ | रामरावणकृतारण | रामरावणकृता रणा |
| ,, | १५ | महा महा | महामहा. |
| ९८ | ११ | रुचीसेंचि | रुची; तेंचि |
| ९९ | ४ | विवाहसा, दिव्य काळ वदला 'निवा, हसा,' | 'विवाहसा दिव्यकाळ' वदला 'निवा हसा' |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १०० | ४ | कळा | कळा |
| ,, | ८ | वरावनी | वरा वनी |
| ,, | ८ | यातुच्या हृतमनोगदे वरा | या तुझ्या हृतमनोगदे वरा. |
| १०१ | ११ | वाहती, खगरवें | वाहती खगरवें |
| १०२ | १ | इतरउत्सवा | इतर उत्सवा |
| १०४ | ११ | भानुजाला | भानु जाला |
| १०५ | १२ | नशाला | न शाला |
| १०६ | ७ | तिणें घातही अर्थसा | १३ तिणें घातही अर्थसा |
| १०७ | ११ | वीन भा | वीनभा |
| ११६ | ११ | सामित्रि | सौमित्रि |
| ११७ | १ | स्मरा | स्मरा |
| ११८ | १० | सुधासिंधुतप्तांसि | सुधासिंधु तप्तांसि |
| ,, | ११ | गर्वदानीं रदातें | गर्वदाना रदातें |
| ११९ | ५ | श्रमें | श्रमे |
| ,, | ७ | प्रजा तें | प्रजांतें |
| १२० | २ | सेवा, सवास | सेवा-सवास |
| १२१ | १ | भार्गव रामहित | भार्गवराम हित |
| ,, | ५ | आदरुं | आदरु |
| १२२ | १२ | दिधली | दिधला |
| ,, | १२ | देव व शतास | देव शतास |
| १२४ | ७ | 'मूठ' वळी | मूठ वळी |
| ,, | १३ | लोळविला. प्रभुनें | लोळविला; प्रभुनें |
| ,, | १७ | खळशक्तिशमे | खळशक्ति शर्मे |
| १२५ | २ | कीर्तिगती | कीर्ति गती |
| ,, | ४ | वन याद म्हणे मिळण्या जनया | 'वन याद' म्हणे मिळण्या जन या |
| ,, | ९ | भरता प्रभुभेटिं मना! | भरता प्रभु भेटिं घना; |
| ,, | १३ | 'भर वारुनि, शर्म' म्हणे 'भरवा' | भरव,वारुनि 'शर्म' म्हणे 'भरवा' |
| ,, | १४ | शमनास | शमनाश |
| ,, | ,, | न तू वदना! वद 'ना' | "न तूं वदना! वद 'ना' " |
| १२६ | ५ | त्रिजगींनगीं. | त्रिजगीं नगीं. |
| १२७ | २ | करूं | करू |

